# महाराष्ट्रातील काही
# ताम्रपट व शिलालेख

लेखक
डॉ. वि. भि. कोलते

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई



## डॉ. विष्णु भिकाजी कोलते

जन्म २२ जून १९०८ नरवेल (बुलढाणा)
एम्. ए. १९३१ नागपूर विद्यापीठ
एल्.एल्. बी. १९३१ नागपूर विद्यापीठ
पीएच्. डी. १९४८ नागपूर विद्यापीठ
विद्यारत्न १९५२ अ. भा. महानुभाव परिषद

मराठीचे प्राध्यापक, किंग एडवर्ड कॉलेज, अमरावती १९३१–१९४४

मराठीचे प्राध्यापक, मॉरिस कॉलेज, नागपूर (नागपूर महाविद्यालय) १९४४–१९६४

प्राचार्य, नागपूर महाविद्यालय, १९५६–१९६४

प्राचार्य, विदर्भ महाविद्यालय, अमरावती १९६४–६६

कुलगुरू, नागपूर विद्यापीठ १९६६–१९७२

अध्यक्ष, विदर्भ साहित्य संमेलन (गोंदिया) १९४८

अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन (भोपाळ), १९६७

---

किंमत : रु. ८२·००

# महाराष्ट्रातील काही ताम्रपट व शिलालेख

लेखक

वि. भि. कोलते

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

मुंबई

गुरुवर्य

**कै. डॉ. महामहोपाध्याय वा. वि. मिराशी**

यांच्या स्मृतीस

सादर समर्पण

## अनुक्रमणिका



### प्राकृत व संस्कृत कोरीव लेख

## अनुक्रमणिका—चालू

### कन्नड शिलालेख



### मराठी शिलालेख



### परिशिष्टे

# निवेदन

प्रथितयश साहित्यिक, नाणावलेले प्राध्यापक, मराठी, संस्कृत, प्राकृत या भाषांचे आणि व्याकरणाचे जाणकार, मराठी साहित्यातील अधिकारी टीकाकार आणि प्राचीन ताम्रपट आणि शिलालेख यांचे संशोधक, या सर्व नात्यांनी डॉ. वि. भि. कोलते हे मराठी माणसाला माहीत आहेत. मागच्या अनेक पिढ्यांनी जोपासलेली पंडित परंपरा भाऊसाहेबांनी टिकवून ठेवली आहे. त्यामुळे भाऊसाहेबांनी लिहिलेल्या "महाराष्ट्रातील ताम्रपट व शिलालेख" या ग्रंथाला महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीने फार महत्त्व आहे.

आज हा ग्रंथ महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे प्रकाशित होत आहे. आपला ग्रंथ डॉ. वि. भि. कोलते यांनी आम्हाला प्रसिद्ध करण्यास दिला त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

सुरेंद्र बारलिंगे
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

४२, यशोधन,
मुंबई–४०० ०२०
११ ऑगस्ट १९८७.

## हृद्गत

मी संपादन केलेल्या, महाराष्ट्रातील ताम्रपट व शिलालेख यांचा हा संग्रह अभ्यासकां-समोर ठेवताना मला आनंद वाटतो. इ. स. १९५४ मध्ये सिरसो येथे उपलब्ध झालेल्या 'झरिका' ताम्रपटावरील माझ्या लेखापासून या कार्याला सुरवात झाली व ते कार्य गेल्या वर्षीपर्यंत चालू होते. मेहूण येथील शिलालेख हा मला मिळा-लेला व मी संपादन केलेला शेवटचा लेख होय. यानंतरही आवश्यक ती साधन-सामुग्री मिळाल्यास हे कार्य चालू ठेवण्याची माझी इच्छा आहे, एवढेच या ठिकाणी नमूद करतो. हे ताम्रपट व शिलालेख मला कोठून मिळाले, ते मिळवून देण्याच्या कामी मला कोणाकोणाचे साह्य झाले व त्यांचे संपादन करताना मला कुणाचे मार्ग-दर्शन लाभले याचा उल्लेख त्या त्या लेखाच्या आरंभी मी आभारपूर्वक केला आहे. आज पुन्हा त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानतो. हे लेख मिळवून देण्याच्या कामी महाराष्ट्र शासनाच्या पुरातत्त्व व पुराभिलेख विभागाचे भूतपूर्व संचालक, कै. डॉ. मो. गं. दीक्षित व श्री. वि. गो. खोबरेकर यांनी मला फार मदत केली. ऐतिहासिक साधने महाराष्ट्रातील जनसामान्यांपर्यंत पोचावी या इच्छेपोटी, ती साधने केवळ आपणासाठीच राखून न ठेवता इतरांनाही उपलब्ध करून देण्यात दिसून येणारी त्यांची उदारवृत्ती प्रशंसनीय आहे. त्याबद्दल मी त्यांचे विशेष आभार मानतो.

या कोरीव लेखांच्या वाचनात व संपादनात मला कै. गुरुवर्य डॉ. वा. वि. मिराशी व कै. लक्ष्मीनारायण राव यांचे विशेष साह्य व मार्गदर्शन लाभले, याचा कृतज्ञता-पूर्वक उल्लेख करणे अवश्य आहे.

हा संग्रह विदर्भ संशोधन मंडळातर्फे प्रसिद्ध करण्याचा प्रथम विचार होता. त्याची कार्यवाही सुरू होऊन मंडळाने अनुदानासाठी साहित्य संस्कृती मंडळाकडे जेव्हा आवेदन पाठविले तेव्हा, सा. सं. मंडळाने स्वतःच हा संग्रह प्रसिद्ध करण्याचे ठरविले ही आनंदाची गोष्ट होय. या कामी मंडळाचे सर्व सभासद व विशेषतः अध्यक्ष, डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांनी घेतलेल्या पुढाकाराबद्दल मी त्यांचा विशेष आभारी आहे. महाराष्ट्राचा

## हृद्गत

प्राचीन इतिहास व संस्कृती यावर नवीन प्रकाश टाकणारा हा संग्रह सा. सं. मंडळाने प्रसिद्ध करावा हे औचित्यपूर्ण होय, यात शंका नाही. त्याबद्दल मंडळाचे अभिनंदन करणे हे मी माझे कर्तव्य समजतो.

या संग्रहाला गुरुवर्य डॉ. वा. वि. मिराशी यांनी पुरस्कार लिहिण्याचे मान्य केले होते. दुर्दैवाने त्यांचे दोन वर्षांपूर्वीच निधन झाले. त्यामुळे, भारतातील दुसरे नामवंत पुराभिलेखशास्त्रज्ञ व नागपूर विद्यापीठातील प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती व पुरातत्त्व विभागाचे अध्यक्ष, डॉ. अजयमित्र शास्त्री यांना मी विनंती केली. त्यांनीही ती मान्य केली व पुरस्कार लिहून दिला, त्याबद्दल मी त्यांचाही आभारी आहे. त्यांच्या या पुरस्कारामुळे अभ्यासकांना या ग्रंथाच्या अंतरंगात जाणीवपूर्वक प्रवेश करता येईल असा मला विश्वास वाटतो.

नागपूर येथील शासकीय मुद्रणालयाचे व्यवस्थापक व त्यांचे सहकारी यांनी जातीने लक्ष घालून ग्रंथाचे निर्दोष व सुंदर मुद्रण केल्याबद्दल त्यांचेही मी आभार मानतो.

वि. भि. कोलते

# पुरस्कार

पुराभिलेख-शास्त्राच्या क्षेत्रात औपचारिक प्रशिक्षण न घेताही ज्यांनी आपल्या संस्कृत ज्ञानामुळे मोठी कामगिरी केली आहे अशा संस्कृत पंडितांच्या परंपरेतील डॉ. वि. भि. कोलते हे बहुधा शेवटचे पंडित आहेत. आतापर्यंत ज्या विद्वानांनी कोरीव लेख आणि नाणकशास्त्र या क्षेत्रात लेखन केले ते एक तर व्यवसायाने संस्कृत पंडित होते, किंवा संस्कृत विषयाचे प्राध्यापक होते, किंवा आपल्या संस्कृत ज्ञानामुळे पुरातत्त्व विभागात त्यांनी नोकरी स्वीकारली होती. (त्यावेळी विद्यापीठात प्राचीन भारतीय इतिहास व पुरातत्त्व विभाग नव्हता). डॉ. कोलते हे याला अपवाद आहेत. कारण, त्यांनी बी. ए. पर्यंत संस्कृतचा एक ऐच्छिक विषय म्हणून अभ्यास केला आणि नंतर मराठी विषयात एम. ए. होऊन ते मराठीचे प्राध्यापक झाले. मराठीच्या क्षेत्रात त्यांची कामगिरी फार मोठी आहे. पण त्यांनी मराठी बरोबर कोरीव लेखांकडेही लक्ष दिले, आणि गेल्या सुमारे तीन दशकात अनेक कोरीव लेखां-वरील आपले संशोधनपर इंग्रजी लेख इंग्रजीतील एपिग्राफिया इंडिका या विद्वन्मान्य पत्रिकेत, त्याचप्रमाणे काही गौरव-ग्रंथांत संपादन करून प्रसिद्ध केले. कोरीव-लेखांवरील आपले मराठी लेखही त्यांनी प्रामुख्याने विदर्भ संशोधन मंडळाच्या वार्षिकां-तून आणि भारतीय इतिहास आणि संस्कृती, या त्रैमासिकातून प्रसिद्ध केले. प्रस्तुत ग्रंथ हा, या विषयावरील त्यांच्या संशोधित व परिवर्धित मराठी लेखांचे संकलन होय.

या ग्रंथात समाविष्ट केलेले लेख, काळाच्या दृष्टीने अत्यंत व्यापक स्वरूपाचे आहेत. त्यांत इ. पू. द्वितीय–प्रथम शतकापासून तो सुमारे इ. सनाच्या अठराव्या शतकापर्यंतचे लेख समाविष्ट केलेले आहेत. भाषेच्या दृष्टीनेही त्यांचे क्षेत्र व्यापक आहे. त्यांत प्राकृत, संस्कृत, कन्नड व मराठी भाषांतील लेखांचा समावेश आहे, भारतीय इतिहासाच्या दृष्टीने त्यांत वाकाटक, बादामी आणि कल्याणचे चालुक्य, राष्ट्रकूट, शिलाहार, यादव, परमार, मुस्लिम आणि इतर राजवंशांच्या कोरीव लेखांचा समावेश आहे. एवढेच नव्हे तर एका सातवाहन नाण्यावरील लेखाचाही त्यांत अंतर्भाव झालेला आहे. हे सर्व लेख महाराष्ट्राच्या विविध क्षेत्रात वेळोवेळी सापडलेले आहेत.

या संग्रहातील काही निवडक लेखांची चर्चा करण्यापूर्वी, या लेखांच्या आधारे डॉ. कोलते यांचे भारतीय इतिहास-संशोधनविषयक कार्य व कोरीव लेखांचे संपादन, यांसंबंधी कै. डॉ. मिराशी यांनी काढलेले उद्‌गार या ठिकाणी उद्‌धृत करणे योग्य होईल असे वाटते. 'संशोधनाची क्षितिजे' या त्यांच्या अमृत महोत्सव गौरव ग्रंथात या विषयावर लिहिताना त्यांनी म्हटले आहे :

" हे लेख केवळ विदर्भातील नसून महाराष्ट्राच्या भिन्न भिन्न प्रदेशातून त्यांच्याकडे आलेले आहेत. त्यांपैकी काही पौनी, वाशीम, माहुरझरी यांसारख्या विदर्भातील स्थळी सापडले होते, पण दुसरे काही पश्चिम महाराष्ट्रात कोल्हापूर, सातारा, वजीरखेड (नाशिक जिल्हा) इत्यादी ठिकाणी, तर इतर काही वसई, अंधेरी यासारख्या कोकण प्रदेशात, किंवा गणेशवाडी, धर्मापूर यांसारख्या मराठवाड्यातील गावात मिळाले होते. एक काळ असा होता की, विदर्भात सापडलेले कोरीव लेख संपादनार्थ कीलहॉर्न, ब्यूल्हर वगैरे सारख्या विदेशी विद्वानांकडे किंवा रामकृष्णपंत भांडारकर, का. बा. पाठक, रायबहादूर हीरालाल, यांसारख्या इतर प्रांतातल्या विख्यात संशोधकांकडे पाठविले जात. आता काळ बदलला आहे. महाराष्ट्राच्या कोणत्याही भागात सापडलेल्या नवीन कोरीव लेखांची वार्ता कळताच भाऊसाहेब ते हर प्रकारे प्रयत्न करून संपादनार्थ मिळवितात आणि शक्य तो विदर्भातील नियतकालिकात प्रसिद्ध करतात, ही परिस्थिती विदर्भाला निःसंशय गौरवास्पद आहे.

कोरीव लेखांचे संपादन करणे ही सोपी गोष्ट नाही. त्याकरिता संस्कृत भाषेचे उत्कृष्ट ज्ञान, कुशाग्र बुद्धी, संदर्भ ग्रंथांचे विस्तृत वाचन, अपार परिश्रम करण्याची सवय आणि प्रखर न्यायनिष्ठा हे गुण आवश्यक आहेत. हे सर्व गुण भाऊसाहेबांच्या ठिकाणी प्रकर्षाने वास्तव्य करतात. संशोधनाने होणारा निरतिशय आनंद त्यांनी अनुभविला आहे. तो काव्यनिर्मितीच्या आनंदासारखा ब्रह्मानंदसहोदर असतो. आपण केलेले संशोधन कार्य दीर्घकाळ टिकेल याची त्यांना खात्री आहे. ते कार्य निर्दोष असावे याकरिता ते अपार परिश्रम करतात. कोरीव लेखाचे काटेकोर वाचन करून त्यातील खडान् खडा माहिती ते वेचून काढतात आणि त्या त्या लेखांनी आपल्या ज्ञानात कोणती भर पडली ते सांगतात. तसे करताना ते आपल्या पूर्वगामी संशोधकांच्या मताचे न्यायनिष्ठुरपणे परीक्षण करतात, आणि त्यांना योग्य तो मान देऊन त्यांच्या मतात काही त्रुटी असल्यास त्या दाखवितात. असे करताना सत्यान्वेषण एवढाच त्यांचा हेतू असतो."

डॉ. मिराशी यांच्या या उद्‌गारांशी मी पूर्णपणे सहमत आहे. त्यात आणखी एका गोष्टीची भर मला घालावीशी वाटते, ती अशी की, डॉ. कोलते जसे इतरांच्या मतांचे न्यायनिष्ठुरपणे परीक्षण करून त्यांतील त्रुटी दाखवितात त्याचप्रमाणे त्यांच्या

स्वतःच्या संशोधनातील त्रुटी इतरांनी दाखविल्यास किंवा त्याविषयी इतरांनी केलेल्या विवेचनाच्या आधारे आपल्या मतात ते दुरुस्ती करतात. 'सुरंबी' हे त्यांनी केलेले वाचन चुकीचे आहे असे श्री. रोडे यांनी दाखविल्यावर त्यांनी त्या ठिकाणी 'आरंभी' हे वाचन आभारपूर्वक मान्य करून स्वीकारले. तसेच 'पृथ्वीपुर' व 'पृथिवी-समुद्र' या स्थळांची त्यांनी प्रथम केलेली निश्चिती, त्याचप्रमाणे 'कृष्णाले शालिकटके' या शब्दाचा अर्थ व तदनुसार स्थळनिश्चिती आभारपूर्वक स्वीकारण्यातही त्यांच्या या न्यायनिष्ठुर संशोधन दृष्टीचा प्रत्यय येतो. ही गोष्ट नमूद करावीशी वाटते.

या संग्रहात समाविष्ट केलेल्या लेखांपैकी काही निवडक लेखांतील वैशिष्ट्यांकडे वाचकांचे लक्ष्य वेधणे अवश्य आहे. ग्रंथाची सुरवात 'पौनी' (भंडारा जिल्हा) येथील चार प्राकृत लेखांनी होते. 'पचनेकायिक' हा शब्द सध्याच्या द्विवेदी त्रिवेदी आणि चतुर्वेदी या शब्दांप्रमाणे फक्त आडनाव म्हणून रूढ झाला असावा, ही डॉ. कोलते यांची सूचना बरोबर वाटते. पौनी येथील या लेखांमुळेच तेथे भूगर्भात असलेल्या मौर्य-सातवाहनकालीन स्तूपांकडे विद्वानांचे लक्ष्य गेले आणि जगन्नाथ टेकडी व सुलेमान टेकडी या ठिकाणी नागपूर विद्यापीठाने केलेल्या उत्खननात स्तूप व अनेक लेखांकित शिल्पे उपलब्ध झाली. या लेखानंतर, बहुधा भाषेच्या दृष्टीने, वाई (यवतमाळ जिल्हा) येथील एक जैन प्राकृत शिलालेख संपादित केला आहे. हा लेख बहुधा शके ९८९ (इ. स. १०६७) चा असून त्यात भरताचा पौत्र आणि महीपतीचा पुत्र भोमदेव याने वीतरागाचे एक देऊळ बांधल्याची चर्चा आहे. डॉ. कोलते यांच्या मते हा भरत राष्ट्रकूट नृपती कृष्णराज ऊर्फ वल्लभराज याचा महामात्य, आणि सुप्रसिद्ध जैन कवी पुष्पदंत यांचा आश्रयदाता होता.

यानंतर वाकाटक राजवंशाचे तीन कोरीव लेख आले आहेत. वाकाटकांच्या इतिहासाच्या दृष्टीने हे तिन्ही लेख त्यांच्या कालक्रमाच्या दृष्टीने अभ्यासकांस अत्यंत उपयुक्त ठरतील यात शंका नाही. त्यांतील देवसेनाचा हिस्से बोराळा येथील शिलालेख वाकाटकांचा काळ निश्चित करण्याच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे. कारण, ज्यात कालनिर्देश स्पष्टपणे नोंदलेला आहे असा वाकाटकांचा हा एकमेव शिलालेख होय. हा लेख उपलब्ध होण्यापूर्वी वाकाटकांचा काल, महाराणी प्रभावती गुप्ताच्या मातृवंशाच्या निर्देशाच्या अनुषंगाने, गुप्त वंशाशी असलेल्या वाकाटकांच्या समसामायिकत्वाच्या आधारे ठरविण्यात आला होता. पण हिस्से-बोराळा येथील या लेखावरून, वत्सगुल्म शाखेचा राजा देवसेन शके ३८० म्हणजे इ स. ४५८ मध्ये गादीवर होता असे स्पष्टपणे प्रमाणित होते. या लेखातील 'शकोने' हा शब्द 'शकानां' असा वाचून तो शक कालाचा स्पष्ट निर्देश असल्याचे

काही संशोधक म्हणतात. तथापि, डॉ. कोलते म्हणतात त्याप्रमाण तेथे 'शकोन' हाच शब्द आहे, हे खरे. प्रस्तुत लेखातील कालनिर्देश हा सप्तर्षी संवत्सरात केलेला आहे असे डॉ. कोलते म्हणतात. ते त्यांचे मत विवाद्य वाटले तरी त्या अनुषंगाने त्यांनी केलेली चर्चा उद्‌बोधक वाटेल यात शंका नाही.

वाकाटकांचा दुसरा कोरीव लेख, म्हणजे पौनी येथे सापडलेला ताम्रपट. हा द्वितीय प्रवरसेनाच्या कारकीर्दीचा असून तो त्याच्या ३२ व्या राज्यवर्षी दिला होता, हे मुद्दाम नमूद करावेसे वाटते. कारण, त्याच्या कारकीर्दीचे आतापर्यंत ज्ञात असलेले हे शेवटचे वर्ष होय. हा लेख ह्या क्षेत्राच्या आर्थिक इतिहासाच्या दृष्टीनेही महत्त्वाचा आहे. कारण, कृष्णा (=कन्हान) नदीचे खोरे त्या काळीही धानाच्या शेतीचे एक महत्त्वपूर्ण केंद्र होते असे त्यावरून दिसते. द्वितीय प्रवरसेनाचा पौत्र द्वितीय पृथिवीषेणाच्या माहुरझरी ताम्रपटामुळे वाकाटकांच्या काळीही हे गाव म्हणजे पृथिवीपुर आणि तेथील पृथ्वीसमुद्र नामक तळे महत्त्वपूर्ण होते असे दिसते. प्रस्तुत ताम्रपट म्हणजे द्वितीय पृथिवीषेणाच्या काळाचा आतापर्यंत ज्ञात असलेला असा शेवटच्या १७ व्या वर्षाचा लेख होय, हे येथे नमूद करण्यासारखे आहे. या ताम्रपटातील नरेंद्रसेनाच्या वर्णनप्रसंगी आलेल्या एका विशेषणाचे वाचन 'पूर्व्वाधिगतगुणविश्वासादपहृतवंशश्रियः' नसून 'पूर्व्वाधिगतगुणवद्दायादादपहृतवंशश्रियः' आहे; आणि ऐतिहासिकदृष्ट्या ते महत्त्वाचे आहे हे येथे नमूद करणे अवश्य आहे.

वाकाटकांच्या लेखानंतर बादामी व कल्याण येथील चालुक्यांच्या काही कोरीव लेखांवरील निबंधांचा या संग्रहात समावेश झालेला आहे. यांपैकी कासार–शिरसी व कोल्हापूर ताम्रपट बनावट असले तरी त्यांतील माहितीची चर्चा डॉ. कोलते यांनी सविस्तर केली आहे. कोल्हापूर ताम्रपटातील पद्मशिवराऊळ हा शिलाहारांचा समकालीन असावा असे त्यांनी दाखविले आहे. कासार–शिरसी (ता. निलंगा, जि. उस्मानाबाद) येथून मिळालेला विजयादित्याचा शके ६१९ चा ताम्रपट महत्त्वाचा वाटतो. त्यावरील लेखात, चालुक्यांचे मूलस्थान असलेला चल्लिकी देश म्हणजे बिदर जिल्ह्यातील मोरखंडी जवळचा प्रदेश होय असे डॉ. कोलते यांनी या ताम्रपटाच्या आधारे दाखविले आहे, ते मान्य होण्यासारखे आहे. 'धर्मापुरी शिलालेख,' सहाव्या विक्रमादित्याचा पुत्र तृतीय सोमेश्वर ऊर्फ भूलोकमल्ल, आणि परमार जगद्देव यांच्या संबंधातील एका प्रसंगावर महत्त्वपूर्ण प्रकाश टाकतो. यातील माहिती प्रथमच इतिहासाभ्यासकांसमोर येत आहे. या लेखात, ज्यांचा उल्लेख अन्यत्र आढळत नाही अशा काही नाण्यांचा निर्देश आलेला आहे. त्याची चर्चा आपल्या माहितीत नवीन भर घालते. गणेशवाडी (ता निलंगा, जि. उस्मानाबाद)

येथील शिलालेखात ६ व्या विक्रमादित्याचा महाप्रधान भीमनाथ याचा कुलवृत्तांत व त्याच्या दानांची वर्णने आली आहेत. विक्रमादित्याच्या वर्णनात 'सत्याश्रयकुल-तिलक' या विशेषणावरून त्या काळीही द्वितीय पुलकेशीचे स्मरण त्याच्या वंशजात जागृत होते असे दिसते हा लेख पर्वतावली व शिवलिंगी संतान या संप्रदायांच्या इतिहासाच्या दृष्टीनेही महत्त्वाचा होय. या लेखात 'शिवलिंगी संतान आणि वीरशैव संप्रदाय यांचे परस्पर संबंध अभ्यासले गेले पाहिजेत' या डॉ. कोलते यांनी केलेल्या सूचनेकडे संबंधितांचे मी लक्ष वेधतो.

राष्ट्रकूट वंशाशी संबद्ध असलेल्या यापुढील तीन कोरीव लेखांपैकी राष्ट्रकूट नृपती तृतीय गोविंद याचा शके ७२५ (इ. स. ८०३) चा झरिका ताम्रपट, उत्तर दिग्विजयाहून परतताना त्याचा मुक्काम तुंगभद्रा नदीवरील अलंपूर या क्षेत्रात होता हे निश्चित होण्याच्या दृष्टीने, तर इ. स. ८०५ चा त्याचा नेसरी ताम्रपट शिंद (सेंद्रक) कुलाच्या इतिहासाच्या दृष्टीने फार महत्त्वाचा आहे. विशेष हे की, 'बंगाल' चा प्राचीनतम उल्लेख या नेसरी ताम्रपटात आढळतो. तृतीय गोविंदाच्या दिग्विजयाच्या कालक्रमावरही या लेखावरून प्रकाश पडतो. या ताम्रपटाच्या काळी, म्हणजे शके ७२७ मध्ये, त्याचा दिग्विजय पूर्ण झाला होता असे त्यावरून स्पष्ट होते. तृतीय गोविंदाचा पुत्र महाराज शर्व्व ऊर्फ प्रथम अमोघवर्ष याच्या काळातील, त्याचा मांडलिक नरसिंह देव याचा शके ७४७ चा मेहूण (ता. एदलाबाद, जि. जळगाव) शिलालेखही अनेक दृष्टींनी अत्यंत महत्त्वाचा आहे. महाराष्ट्रातील हैहय वंशाच्या इतिहासाची माहिती यात प्रथमच आली आहे, हे एक; आणि दुसरे असे की, या हैहय वंशातील नृपतीचे मूळ नाव 'महाराष्ट्र' होते, ही अत्यंत महत्त्वाची माहिती त्यात आली आहे. हा महाराष्ट्र प्रतिकंट आणि त्याचा पुत्र स्तंभ ऊर्फ शुभकंट या राजांविषयीची चर्चा, त्यावरील डॉ. कोलते यांच्या या लेखात आली आहे, ती मूळातून अवश्य वाचावी. त्यात, कलचुरी हे मूळात महाराष्ट्रीय होते हे डॉ. कोलते यांचे प्रतिपादन विचारांना चालना देईल, यात शंका नाही. अमोघवर्षाच्या मांडलिकाचा मेहूण शिलालेख, हा पहिलाच कोरीव लेख आहे ही बाबही उल्लेखनीय वाटते. तापी नदीचे 'बदरी' हे नाव या लेखात आले आहे. त्या विषयीची चर्चाही उद्बोधक ठरावी.

यानंतर राष्ट्रकूट नृपती तृतीय इंद्रराज याच्या वजीरखेड (ता. मालेगाव, जि. नासिक) येथे मिळालेल्या दोन ताम्रपटांवरील लेख आलेला आहे. त्यावरून जैन संघाच्या इतिहासाची महत्त्वाची माहिती मिळते. द्रविड संघाच्या वीरगणातील वीर्णाय अन्वयाचे यात उल्लेख आहेत. चालुक्य नृपती सिंहुक आणि अरियम्म यांचेही उल्लेख महत्वाचे आहेत. डॉ. कोलते यांनी वेंगुलवाडा येथील चालुक्य नृपती नरसिंह

आणि त्याचा मुलगा द्वितीय अरिकेसरी यांच्याशी सुचविलेला त्यांचा अभेद विचारणीय आहे. इंद्रराजाचे राज्यारोहण शांतपणे पार पडले अशी साधारण समजूत आहे, पण ती बरोबर नाही असे डॉ. कोलते यांनी या ताम्रपटांच्या आधारे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे, तोही विचारणीय आहे.

यानंतर शिलाहारांचा वसई (जि. ठाणे) येथील शके ११२० च्या शिलालेखावरील लेख आलेला आहे. त्यात द्वितीय अपरादित्याचा, आतापर्यंत अज्ञात असलेला पुत्र, द्वितीय अनंतदेव नृपतीची माहिती प्रथमच पुढे आलेली आहे. यादव नृपती द्वितीय सिंघणाच्या कारकीर्दीतील भाळवणी (ता. खानापूर, जि. सांगली) येथील शके ११३८ चा शिलालेख, त्याच्या राज्याधिकाऱ्यांचा या विभागात मिळालेला हा पहिलाच लेख होय. त्यावरून भाळवणी त्या काळी एक महत्त्वपूर्ण गाव असून ते ४,००० गावे ज्यात अंतर्भूत होती अशा कऱ्हाड मंडळाचे राजधानीचे ठिकाण होते असे दिसते. 'भाळवणी' हे नाव देवतेच्या नावावरून पडले असावे ही डॉ. कोलते यांनी केलेली सूचना मात्र चिंत्य वाटते. भाळवणी येथे कलचुरींच्या कारकीर्दीचे काही कानडी शिलालेखही मिळाले आहेत. त्यांचे संपादन डॉ. कोलते यांनी या ग्रंथात अन्यत्र केलेले आहे.

यानंतर तीन कन्नड शिलालेख आहेत. त्यातील पहिला लेख देशिंग–बोरगाव (ता. कवठे महांकाळ जि. सांगली) येथे मिळाला असून त्यावरून चालुक्य नृपती, जगदेकमल्लाचा 'पादपद्मोपजीवी' बिज्जल यांच्या विषयी बरीच माहिती मिळते. विशेषतः बिज्जलाला मैळुगीदेवाशिवाय राजल या नावाचाही दुसरा एक भाऊ होता हे याच लेखावरून प्रथमच कळते. ऐतिहासिकदृष्ट्या हा उल्लेख महत्त्वाचा होय. याशिवाय जैन धर्माच्या यापनीय संप्रदायाबद्दल यात आलेली ऐतिहासिक माहितीही महत्त्वाची होय. त्या संबंधीचे डॉ. कोलते यांनी केलेले विवेचन अभ्यासपूर्ण आहे. देशिंग बोरगाव येथील या शिलालेखानंतर आलेले भाळवणी येथील दोन कानडी शिलालेख कलचुरी राजवंश आणि वीरशैवांचा इतिहास या दृष्टींनी महत्त्वपूर्ण वाटतात. वस्तुतः डॉ. कोलते यांचा कन्नड भाषेशी परिचय नाही. तरीही, आवश्यक ती माहिती मिळवून त्यांनी केलेले या कन्नड लेखांचे संपादन व त्यांवरील त्यांचे अभ्यासपूर्ण विवेचन पाहून कुणीही त्यांच्या परिश्रमशीलतेबद्दल त्यांचे कौतुकच करील.

या कन्नड शिलालेखांनंतर या संग्रहात काही मराठी कोरीव लेख व त्यावरील डॉ. कोलते यांचे विवेचन सगळ्यात शेवटी दिलेले आहेत. त्यांतील पहिला लेख हरिश्चंद्र गडावरील शिलालेखासंबंधीचा होय. त्यातील लेख क्र. १ आणि ४ मराठी

वाङ्मयाच्या इतिहासाच्या दृष्टीने उल्लेखनीय ठरणार आहेत. कारण, त्यात 'तत्त्वसार' या प्राचीन मराठी काव्याचे कवी चांगा वटेश्वर यांचे उल्लेख आलेले आहेत. महाराष्ट्रातील नाथ संप्रदायाच्या इतिहासाच्या दृष्टीनेही हे लेख महत्त्वपूर्ण आहेत. या संग्रहाच्या संस्कृत विभागातील अंधेरी येथील शिलालेख व या मराठी विभागातील डोंबिवली शिलालेख यावरून महाराष्ट्राच्या इतिहासातील आरंभीच्या मुसलमान काळावर चांगला प्रकाश पडतो. शेवटी आलेल्या अकोला येथील शिलालेखावरून या स्थानाचे १८ व्या शतकात आकोल हे नाव असून ते 'शुभस्थान' आणि 'पुण्यनगरी' म्हणून प्रसिद्ध होते, इतकेच नाही तर महानुभावांचेही एक मोठे केंद्र होते असे दिसून येते.

वरील सिंहावलोकनावरून कोरीव लेखांच्या या संग्रहातील माहिती किती महत्त्वपूर्ण व उपयुक्त आहे याची सहज कल्पना करता येईल डॉ. कोलते हे मराठीचे एक थोर व विद्वान लेखक असून त्यांनी प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृती या विभागातील पुराभिलेख विद्येच्या क्षेत्रातही एवढी मोठी कामगिरी करावी हे खरोखरच कौतुकास्पद आहे. त्यांच्या, कोरीव लेखांच्या संपादनासंबंधी डॉ. मिराशी यांनी काढलेले उद्गार आरंभी उध्दृत केलेच आहेत. त्यांची पुनरुक्ती करीत नाही. त्यांच्या लेखनशैलीचे आणखी एक वैशिष्ट्य येथे नमूद करावेसे वाटते.

कोरीव लेखांच्या अभ्यासाकरिता इतिहासाचे ज्ञान अनिवार्य असते हे सांगण्याची गरज नाही; आणि ज्यांना इतिहासाचा गंधही नाही त्यांना कोरीव लेखावरील लेखन सामान्यतः समजून घेणे कठीण होते. पण डॉ. कोलते यांचे विवेचन इतके विस्तृत असते आणि त्या विवेचनाची शैली इतकी प्रासादिक व मधुर असते की, इतिहासाचा गंध नसलेल्या सामान्य अभ्यासकांनाही त्यांचे लेखन समजण्यास जड जाणार नाही. डॉ. कोलते यांचे ठिकठिकाणी विखुरलेले, कोरीव लेखांवरील संशोधनपर लेख, या संग्रहामुळे एका ठिकाणी उपलब्ध होतील. सुविद्य अभ्यासक त्याचे निश्चितच स्वागत करतील यात मला शंका नाही. या निमित्ताने मी त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो.

'प्राची'<br>२३, विद्याविहार<br>राणा प्रतापनगर<br>नागपूर-२२

अजयमित्र शास्त्री<br>प्रमुख<br>प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती व पुरातत्त्व विभाग,<br>नागपूर विद्यापीठ<br>१५ फेब्रुवारी १९८७.

# संक्षेप

लेखात बहुतेक सर्व ठिकाणी ग्रंथांचे व इतर संदर्भ सविस्तर दिलेले आहेत. काही ठिकाणी संक्षेप दिले आहेत. त्यांचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे :

| | |
|---|---|
| अ. | अध्याय. |
| इंडि. अँटी. | इंडियन अँटीक्वेरी. |
| एपि. इंडि (का)<br>ए. इं. | एपिग्राफिया इंडिका. |
| एपि. कर्ना. | एपिग्राफिया कर्नाटका. |
| ओ. | ओळ. |
| ग्रा. | ग्राम. |
| ज. बॉ. ब्रँ. रॉ. ए. सो.<br>J.B.B.R.A.S. | जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ रॉयल एशियाटिक सोसायटी. |
| जि. | जिल्हा. |
| ता. | तालुका. |
| नृ. | नृपती. |
| प्रामकोले. | प्राचीन मराठी कोरीव लेख. |
| ब्रि. म्यु. | ब्रिटीश म्युझियम. |
| म. ब. | महिकावतीची बखर. |
| रा. नृ. | राष्ट्रकूट नृपती. |
| वि. सं. मं. | विदर्भ संशोधन मंडळ. |
| शिला. | शिलालेख. |
| श्लो. | श्लोक. |
| सें. मी. | सेंटीमीटर. |

# १

## पौनी येथील चार ब्राह्मी कोरीव लेख

### उपलब्धी

पौनी हे शहर महाराष्ट्रातील भंडारा जिल्ह्यात वैनगंगेच्या काठावर वसलेले आहे. तेथील विकास विद्यालयाचे मुख्याध्यापक, माझे मित्र श्री. वामन गणेश घोडवैद्य यांनी दिनांक १९ मार्च १९६८ रोजी मला कळवले की, पौनी येथे काही शिल्पखंड आणि शिलालेख सापडले आहेत. तावडतोब पौनीला जाणे मला शक्य झाले नाही. त्यापूर्वीच पौनी येथील संशोधक डॉ. मेश्राम यांच्याकडून नागपूर महाविद्यालयातील प्रा. ब्रह्मानंद देशपांडे आणि प्रा. किल्लेदार यांनाही या शिल्प-खंडांची आणि शिलालेखांची माहिती मिळाली होती. ते दोघेही तेथे गेले आणि त्यांनी त्यासंबंधी एक टिपण नागपूर टाइम्स (दिनांक १९ मार्च १९६८) मध्ये प्रसिद्ध केले. त्यात पौनी येथे मिळालेल्या या शिलालेखांचे वाचन मात्र नव्हते. त्या-नंतर लागलीच काही दिवसांनी श्री. घोडवैद्य यांनी मला पुन्हा कळविले की, वरील शिल्पखंडाजवळच विटांसाठी माती खोदण्याचे काम चालू असताना एका खड्ड्यात एक लांब शिळा आढळली असून तिच्यावर पुष्कळ अक्षरे कोरलेली आहेत. हे कळताच यावेळी मात्र वेळ न घालवता मी तावडतोब पौनीला गेलो. पूर्वी मिळा-लेल्या आणि आता नवीनच उपलब्ध झालेल्या शिलालेखांचे ठसे घेतले, आणि त्यांचे वाचन करून त्यासंबंधी ३१ मार्च १९६८ च्या नागपूर टाइम्समध्ये आणि ७ एप्रिल १९६८ च्या दैनिक तरुण भारतात मी एक लहानसा लेख प्रसिद्ध केला.

### स्तूपाच्या अस्तित्वाच्या खुणा

जेथे हे शिल्पखंड आणि शिलालेख सापडले त्या जागेची मी पाहाणी केली. तेथे आणखी काही ताशीव दगड पडलेले होते. त्यांच्या मधल्या भागी दोन्ही बाजूंना लहान चौकोनी खाचा होत्या. म्हणजे त्यांत आडव्या सूची बसवण्याची सोय होती. त्यावरून माझ्या लक्षात आले की, हे दगड म्हणजे कठड्याचे खांब होत. तेथे जे शिल्पखंड सापडले होते त्यांवर बोधिवृक्ष, धर्मचक्र, शालभंजिका, यक्ष, चामरधारिणी यक्षिणी इत्यादी शिल्पे उठावात कोरलेली होती. या स्तंभांचे व शिल्पखंडांवरील

शिल्पांचे भर्हूत व साची येथील शिल्पांशी विलक्षण साम्य असल्याचे लक्षात आले. ज्या ठिकाणी वरील शिलालेख सापडले ती जागा विटांनी भरलेली होती. तेथील ज्या जगन्नाथ मंदिराच्या टेकडीच्या पायथ्यांशी हे अवशेष मिळाले त्या मंदिराच्या आवारासाठी पाया खोदण्याचे काम चालू होते. या पायातदेखील सर्वत्र विटांचे तुकडे पडलेले आढळले. या सर्व गोष्टी लक्षात घेता ही जगन्नाथ टेकडी म्हणजे प्राचीन बौद्ध स्तूप असून तेथील उपरोक्त शिलाखंड व शिल्पे ही या स्तूपाभोवती असलेल्या कठड्याचेच भाग होत असे माझे मत झाले. काही वर्षांपूर्वी या टेकडी-वरील जगन्नाथ मंदिर बांधण्यासाठी पाया खोदला जात असताना तेथे एक दगडी पेटी सापडली. तिच्यात काही जुने अवशेष व मूर्ती होत्या. हे अवशेष त्याखाली असलेल्या प्राचीन बौद्ध स्तूपातीलच असले पाहिजेत असे अनुमान करण्यास हरकत नाही.

## पौनी : प्राचीन बौद्ध केंद्र

पौनी हे फार प्राचीन बौद्ध केंद्र व ऐतिहासिक महत्त्वाचे स्थान असले पाहिजे, हे सभोवतालच्या परिसरावरूनही दिसून येते. येथून २० मैल अंतरावर असलेल्या चांदा जिल्ह्यातील देवटेक या गावी मिळालेला अशोककालीन शिलालेख प्रसिद्धच आहे. इ. स. १९५९ मध्ये पौनी येथील श्री. मणिराम लांजेवार यांच्या शेतात महाक्षत्रप रुपिअम्म याचा एक स्तंभलेख सापडला होता. (विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९६५, पृ. १ ते ७). काही वर्षांपूर्वी भारवंशीय नृपती भगदत्त याच्या पादुका-पट्टाची एक मोठी शिला व तेथेच दिमभाग नृपतीचें एक प्राचीन नाणेही डॉ. मिराशी यांना मिळाले होते. (एपि. इंडिका. वर्ष २४, पृ. ११ ते १४). गेल्या वर्षी या जगन्नाथ टेकडीच्या मागील बाजूस विटांसाठी माती खोदण्याचे काम चालू असताना वाकाटक नृपती द्वितीय प्रवरसेन याचा एक ताम्रपट सापडला होता. आणि आता या टेकडीच्या समोरच्या बाजूला विटांसाठी माती खोदण्याचे काम चालू असताना बौद्धकालीन उपरोक्त शिल्पखंड आणि शिलालेख उपलब्ध झालेले आहेत. त्यामुळे पौनीच्या प्राचीन इतिहासावर नवीन प्रकाश पडेल यात शंका नाही. प्रस्तुत लेखात त्या ठिकाणी सापडलेल्या महत्त्वाच्या चार शिलालेखांची माहिती करून देत आहे.

## शिलालेखांची लिपी व भाषा

हे चारही शिलालेख ब्राह्मी लिपीत कोरलेले आहेत. त्यांवरील अक्षरांचे वळण सर्वत्र सारखे असून साची आणि भर्हूत येथील लेखांतील अक्षरांच्या वळणाशी त्याचे सादृश्य आहे. शिलालेख क्र. अ. मधील अक्षरे थोडी जाड व आकाराने मोठी

आहेत. इतर शिलालेखांतील अक्षरे, विशेषत: **क** व **ड** लेखांतील अक्षरे ठसठशीत असूनही वळणदार आहेत.

या सर्व लेखांची भाषा प्राकृत आहे. साची आणि भर्हूत येथील लेखांच्या भाषेत शब्दांची रूपे आणि प्रत्यय जसे आढळतात तसेच या लेखांतील भाषेतही आढळतात. त्यांतील काही वैशिष्टचे येथे नमूद करतो.

(१) या लेखात 'दान' हा शब्द **क** आणि **ड** या दोन लेखांत आलेला आहे. तथापि, लेख क्र. **ड** मध्ये तो **दन** असा लिहिलेला आढळतो. कदाचित ही कोरकाची चूकही असेल. 'द' अक्षराच्या वरच्या बाजूवरील उभ्या दंडाला आकाराचे चिन्ह कोरण्याचे अनवधानाने राहून गेले असणे शक्य आहे. 'दान' या शब्दाचे '**दन**' हेच रूप साची येथील स्तूप क्र. १ वरील क्र. ६, १९, २८ आणि ३२ या क्रमांकांच्या लेखांत आढळते, हे मात्र खरे. याच शब्दाचे 'देन' हेही रूप साची स्तूप क्र. २ वरील क्र. ३ च्या लेखात आढळते.

(२) वरील दोन्ही ठिकाणी 'दान' हा शब्द प्राकृत भाषेच्या दृष्टीने 'दानं' असा असायला पाहिजे. या शेवटच्या अनुस्वाराचे चिन्ह सुद्धा कोरकाकडून कोरण्याचे अनवधानाने राहून गेले असणे शक्य आहे. तथापि, दान असे निरनुस्वार रूपसुद्धा साची येथील स्तूप क्र. २ वरील ६, ८ ते ११, १८ आणि २० या क्रमांकांच्या लेखांत आढळते हे नमूद करणे अवश्य आहे.

(३) पुल्लिंगी अकारान्त नामाचा षष्ठीचा प्रत्यय '**स**' आहे. उदा. नागस, पवजितस वगैरे; आणि स्त्रीलिंगी आकारांत शब्दांना लागलेला षष्ठीचा प्रत्यय 'य' आहे. उदा. विसमिताय, उपासिकाय. आकारांत स्त्रीलिंगी नामांना लागणारे षष्ठी विभक्तीचे प्रत्यय **या** व **ये** हेही अन्यत्र आढळतात. उदा. साची येथील स्तूप क्र. १ वरील क्र. ४८ व ८६ या लेखांत, त्याचप्रमाणे भर्हूत येथील क्र. ५ व ९ या लेखांत **या** हा प्रत्यय आढळतो, तर साची येथील स्तूप क्र. १ वरील क्र. २०, ३२, ३३, ३६ इत्यादी लेखांत, त्याचप्रमाणे भर्हूत येथील स्तूपावरील क्रमांक ९३ च्या लेखात **ये** हा प्रत्यय आढळतो. हे प्रत्यय पौनी येथील प्रस्तुत चार लेखांत मात्र आढळत नाहीत.

### शिलालेख अ

पौनी येथे सापडलेल्या एका शिल्पस्तंभाच्या सपाट पृष्ठभागावर हा लेख कोरला आहे. या पृष्ठभागाची लांबी १८ सें. मी. असून रुंदी ५ सें. मी. आहे. प्रत्येक अक्षराची उंची साधारणपणे ३ ते ४ सें. मी. आहे. अक्षरे चांगली खोल कोरलेली असून उत्तम स्थितीत आहेत. या लेखात कोणा एका नागाने दान दिल्याचा उल्लेख

आहे. 'नाग' हा शब्द येथे बहुधा एखाद्या व्यक्तीचे नाव म्हणून आला असावा. त्यावरून ही दान देणारी व्यक्ती नाग वंशातील असावी असे अनुमान काढणे योग्य होणार नाही. नाहीतर नाग हा शब्द ज्या नावात आलेला आहे त्या सर्व व्यक्ती नाग वंशातील असल्या पाहिजेत असे अनुमान काढावे लागेल. उदा. नाग, नागिला, नागदत्त वगैरे. ते समर्थनीय होणार नाही. डॉ. बूल्हर यांच्या मते नाग, नागिला, नागदत्त इत्यादी नावांवरून त्यावेळी प्रस्थापित ब्राम्हण धर्माच्या अनुयायांत व इतर पाखंडी लोकात 'नाग' (=सर्प) या देवतेची पूजा अस्तित्वात असल्याचेच दिसून येते (एपि. इंडिका, वर्ष २, पृ. ९५). कदाचित अशी नावे बुद्धाच्या नागसेन या नावाच्या शिष्याच्या नावावरूनही स्वीकारली असणे शक्य आहे. सारांश, प्रस्तुत लेखातील 'नाग' या व्यक्तिनामावरून ती व्यक्ती नागवंशातीलच असावी असे मानण्याचे कारण नाही.

### पचनेकायिक शब्दाचा अर्थ

प्रस्तुत शिल्पस्तंभाचे दान ज्याने दिले होते त्या 'नाग' नावाच्या व्यक्तीला 'पचनेकायिक' हे विशेषण लावले आहे. 'पचनेकायिक' म्हणजे पाच (पंच) निकायांचा ज्याने अभ्यास केला आहे, किंवा पाच निकायांत जो प्रवीण आहे असा. 'निकाय' हा संस्कृत शब्द असून त्याचा अर्थ समूह, गट, खंड असा होतो. बौद्धांचा सुत्त-पिटक हा ग्रंथ पाच खंडांत विभागला असून त्यातील प्रत्येक खंडाला 'निकाय' असे म्हणतात. कारण त्यात काही सूत्र-समूहाचा समावेश असतो. या पाच निकायांची नावे : (१) दीघ निकायो, (२) मज्झिम निकायो, (३) संयुत निकायो, (४) अंगुत्तर निकायो, आणि (५) खुद्दत निकायो अशी आहेत.

भर्हुत स्तूपातील एका कठड्यावर असलेल्या एका दानलेखात हा शब्द 'पंच-नेकायाक' या रूपात, तर साची स्तुप क्र. १ मधील क्र. ६६ च्या दानलेखात तो 'पचनेकथिक' या रूपात आढळतो. ए. कनिंगहॅम यांना या शब्दाचा अर्थ नीट उमगला नाही. ते एक स्थलनाम आहे असे त्यांना वाटले. बूल्हर यांनी मात्र 'साची येथील स्तूपावरील दानलेख' या आपल्या लेखात 'पाच निकायांचा ज्ञाता' असे त्याचे सार्थ भाषांतर केले आहे (एपि. इंडि. वर्ष २, पृ. ९३). भर्हुत येथील उपरोक्त लेखातील या शब्दात आरंभी 'पंच' हा शब्द आहे, तर साची येथील लेखात व पौनी येथील आपल्या प्रस्तुत लेखात त्याऐवजी 'पच' शब्द आहे. येथे बहुधा 'पंच' या शब्दातील 'प' या अक्षरावर अनुस्वाराचे चिन्ह कोरण्याचे अनवधानाने राहून गेले असावे ; किंवा 'पंच' या शब्दाचेच 'पच' हे त्या भागातील पाली भाषेतील स्थानिक रूप असावे. आपल्या प्रस्तुत लेखातील 'पच' या

शब्दाच्या पुढील शब्द 'नेकायिक' हा साची येथील लेखात 'नेकयिक' असा, तर भर्हूत येथील लेखात 'नेकायाक' असा आढळतो.[१] ही दोन्ही रूपे चुकीची आहेत. या बहुधा कोरकाच्या चुका असाव्यात. आपल्या पौनी येथील प्रस्तुत लेखात मात्र 'नेकायिक' असे त्याचे शुद्ध पाली रूप आढळते.

'पचनेकायिक' या शब्दाच्या संदर्भात बूल्हरने व्यक्त केलेला अभिप्राय या ठिकाणी नमूद करणे योग्य होईल. ते म्हणतात: "ही पदवी (विशेषण) म्हणजे ज्या काळात हा लेख कोरला गेला त्या काळात सुत्त-पिटक ग्रंथाचे हे पाच विभाग अस्तित्वात होते याचा हा निश्चित पुरावा होय. हा काळ खिस्तपूर्व तिसरे शतक होय. कारण, या लेखातील अक्षरांचे वळण पूर्णपणे अशोकाच्या शिला-लेखांतील अक्षरांच्या वळणासारखे आहे. प्रो. ओल्डेनबर्ग यांनी बैराट येथील अशोकाच्या प्रदीर्घ लेखात नमूद केलेल्या काही प्रबंधांचे मज्झिम-निकायो आणि अंगुत्तर-निकायो यांतील काही भागाशी असलेली एकरूपता दाखविली आहे. सुत्त-पिटकाचे हे पाच विभाग इतक्या प्राचीन काळातही अस्तित्वात असल्याचे या लेखा-तील (पचनेकायिक) शब्दावरून सिद्ध होत असल्यामुळे त्यांच्या मताला पुष्टीच मिळते." (एपि.इंडि.ऋ. २, पृ. ९३).

पदवी किंवा विशेषणाप्रमाणे असलेल्या या 'पचनेकायिक' शब्दाचा वारंवार होत असलेला उपयोग लक्षात घेता, त्या काळात हा शब्द सध्याच्या द्विवेदी, त्रिवेदी, चतुर्वेदी या शब्दाप्रमाणे केवळ आडनाव म्हणून वापरला जात असावा असे सूचित होते. बरुआ आणि सिन्हा यांनी असे दाखवून दिले आहे की, निकाय हा शब्द एका विशिष्ट पंथाचे, मतप्रणालीचे किंवा विभागाचे नाव खेरीज करून इतर अर्थाने बौद्धामध्ये वापरला जात नव्हता. यावरून स्वाभाविकपणे असे अनुमान काढता येते की, निकाय हा शब्द बौद्ध सूत्रातील त्याच्या तात्त्विक अर्थाने केवळ थेरवाद या पंथातच वापरला जात होता (भर्हूत इन्स्क्रिप्शन्स, पृ. २८) आणि म्हणून पंचनेकायिक या शब्दाचा अर्थ 'थेरवाद पंथाचा अनुयायी' असा करणे इष्ट होईल.

## शिलालेख ब

हा लेख एका अष्टकोनी स्तंभाच्या तीन बाजूंवर कोरलेला आहे. एका बाजूवर 'पवजितस', दुसऱ्या बाजूवर 'उतरकस मा' आणि तिसऱ्या बाजूवर 'दिरेहि' ही अक्षरे आहेत. या संपूर्ण लेखाचे वाचन 'पवजितस उतरकस मादिरेहि' असे

---

१. काही लिपितज्ञांनी भर्हूत लेखातील या शब्दाचेही वाचन 'पंचनेकायिक' असेच केलेले आहे (पाहा. C II, Vol. II, प्लेट, p. 37).

होईल. यातील पहिल्या दोन शब्दांचा अर्थ 'उतरक भिक्षूचे' (त्याने दिलेले दान) असा होतो. तिसऱ्या शब्दाचा अर्थ नीट लागत नाही. त्यातील 'हि' हे अक्षर तृतीया किंवा पंचमी विभक्तीचा प्रत्यय असावा. मला वाटते तो पंचमी विभक्तीचा प्रत्यय मानणे अधिक योग्य होईल. तसे मानले तर 'मादिरेहि' म्हणजे 'मादिरहून' असा अर्थ होईल. मादिर हे एखाद्या गावाचे नाव (मादुरा ?) असेल. या संपूर्ण लेखाचा अर्थ 'मादिर (मादुरा) येथून आलेल्या उतरक नावाच्या भिक्षूने दिलेले दान' असा करता येईल.

**शिलालेख क आणि ड**

या दोन्ही लेखांत विसमिता नावाच्या एकाच व्यक्तीचा उल्लेख आहे. क या लेखात तिचे 'उपासिका' = सेविका हे विशेषण आहे, तर ड या लेखात तिने दिलेल्या दानामुळे प्राप्त व्हावयाच्या आशीर्वादाचा उल्लेख आहे.

कदाचित हे दोन्ही लेख अपूर्ण असण्याचा संभव आहे. त्यांच्या पूर्वीची अक्षरे या शिलाखंडांच्या दुसऱ्या भागावर असणे शक्य आहे. तथापि, क हा लेख सध्याच्या स्थितीत आपल्या परीने संपूर्ण आहे. पण ड लेखातील 'विसमिता' शब्दापूर्वीची दोन अक्षरे लक्षात घेता त्यापूर्वीची एकदोन अक्षरे तरी नष्ट झालेली असावीं हे स्पष्ट दिसते. 'विसमिता' शब्दातील 'वि' पूर्वीचे अक्षर 'य' असे आहे. त्यावरून असे वाटते की विसमिता या शब्दापूर्वीचा (नष्ट झालेला) तो शब्द 'विसमिता' चे विशेषण असावा. क या लेखात 'विसमिता' शब्दापूर्वी 'उपासिका' हा शब्द आलेला आहे. त्यावरून असे वाटण्याचा संभव आहे की, 'ड' या लेखातील 'विसमिता' शब्दापूर्वीही तोच शब्द असावा. पण तशी वस्तुस्थिती दिसत नाही. 'य' या अक्षरापूर्वीच्या अक्षराचा जो खंडित भाग उपलब्ध आहे तो उभ्या दंडाच्या खालील भागी आढळणाऱ्या ऊर्ध्वमुख अर्धवर्तुळाचा आहे; आणि तो 'य' या अक्षरातच आढळतो. या खंडित अक्षराच्या वरच्या भागावर उजवीकडे आडवी रेषाही स्पष्ट दिसते; आणि खालच्या बाजूला असलेल्या ऊर्ध्वमुख अर्धवर्तुळाकार चिन्हाला लागून उभा दंड असल्याचेही अस्पष्ट चिन्ह दिसते. यावरून 'य' पूर्वीचे हे खंडित अक्षर 'या' असावे, ते 'का' असणे शक्य नाही. अर्थात, 'विसमिताय' या शब्दापूर्वीचा नष्ट झालेला शब्द 'उपासिकाय' असा असणे शक्य नाही. तो दुसराच एखादा शब्द असावा.

या 'ड' लेखातील शेवटचा शब्द 'सातान' असा आहे. तो 'साताना' (सं. सत्त्वानां) असा पाहिजे. येथेही अंत्य अनुस्वार कोरण्याचे अनवधानाने राहून गेले असावे.

या शिलालेखांची लिपी व त्यांतील अक्षरांचे वळण, ज्या शिल्पखंडांवर यातील काही लेख कोरलेले आहेत त्यांवरील बोधिवृक्ष, यक्ष, यक्षिणी इत्यादिकांची शिल्पे आणि त्या शिल्पखंडांचे स्थापत्य हे सर्व लक्षात घेता या शिलालेखांचा काळ स्थूल मानाने खिस्तपूर्व दुसरे किंवा पहिले शतक ठरविण्यास हरकत नाही.

## वाचन

*शिलालेख अ*

**नागस पचनेकायिकस**

*शिलालेख ब*

**पवजितस उतरकस मादिरेहि**

*शिलालेख क*

**उपासिकाय विसमिताय दान**

*शिलालेख ड*

**[या]य विसमिताय द(दा)न सुखाय होतु सवसातान**

# २

## वाई येथील एक जन शिलालेख

### विदर्भातील वाई

वाई हे नाव कानावर पडले म्हणजे सातारा जिल्ह्यातील पांचगणी पठाराच्या पायथ्याशी कृष्णा नदीच्या काठावर वसलेल्या प्रसिद्ध श्रीक्षेत्र वाईची आठवण होते. पण महाराष्ट्रात एकच वाई आहे असे नाही. संपूर्ण महाराष्ट्रात वाई या नावाची एकूण २८ गावे आहेत. त्यांतील यवतमाळ जिल्ह्यात सात, अकोला जिल्ह्यात पाच, अमरावती जिल्ह्यात चार, वर्धा जिल्ह्यात दोन व नागपूर जिल्ह्यात दोन अशी वीस गावे विदर्भातच आहेत. मराठवाड्यातील नांदेड व परभणी जिल्ह्यात अनुक्रमे तीन व चार अशा सात वाई आहेत; आणि उर्वरित महाराष्ट्रात सातारा जिल्ह्यातील फक्त एक. पण त्या एकाच वाईचे नाव व माहात्म्य इतके मोठे की, तिच्याशिवाय इतर वाईंचे कुणाला स्मरणही राहू नये! या उपेक्षित वाईंपैकी यवतमाळ जिल्ह्यातील एका वाईचे व तेथील जैन शिल्पांचे आज आपल्याला दर्शन घ्यायचे आहे.

वणी-यवतमाळ सडकेवर, वणीहून २५ मैल अंतरावर 'करंजी' नावाचे लहानसे गाव आहे. तेथून दक्षिणेला पाच-सहा मैलांवर ही वाई वसलेली आहे. करंजी गावापासून वाईला जाण्यासाठी एक कच्चा रस्ता आहे. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना उंच झाडी आहे. अर्धा-पाऊण मैलाच्या अंतरावर पांढरादेवी या नावाचे एक हेमाडपंथी देऊळ आहे. त्यावरूनच हा परिसर फार प्राचीन—निदान मध्ययुगातील—असावा याची जाणीव होते. तेथून दोन मैल पुढे गेल्यावर शिखांचे एक स्थान दृष्टीस पडते. शिखांचे गुरु गोविंदसिंग नांदेडकडे जाताना या ठिकाणी थांबले होते असे म्हणतात. या स्थानावरून पुढे गेलो म्हणजे वाईचे दर्शन होते.

### जैन मंदिरातील शिल्पे

ही वाई आज एक लहानसे खेडेगाव आहे; पण तेथे अनेक प्राचीन शिल्पे इतस्ततः विखुरलेली आहेत. त्यांवरूनही या गावाच्या व त्याभोवतालच्या परिसराच्या प्राचीनत्वाची साक्ष पटते. ही शिल्पे जैनांची आहेत तशी हिंदू देव-देवतांचीही

आहेत. गावाच्या मागच्या बाजूला दूर अंतरावर असलेल्या देवीच्या देवळाच्या आवारात जी अनेक शिल्पे एका ढिगाऱ्यात पडलेली आहेत त्यात शुष्कस्तनी चामुंडेचेही एक शिल्प आहे. या चतुर्भुज चामुंडेच्या वरच्या उजव्या हातात डमरू व खालच्या हातात खड्ग, तर डावीकडील वरच्या हातात खट्वांग असून त्यावर नरकपाल (मुंडके) ही आहे. या चामुंडेच्या मूर्तीवरून तेथे अघोरपंथी शैव कापालिकांचेही स्थान असावे असे दिसते.

गावाच्या मागे पूर्व दिशेला एक पडके देऊळ आहे. देवळाच्या शिळा व काही खांब इतस्तत: विखुरले आहेत. याच मंदिराजवळ काही जैन शिल्पे सापडली, असे गावातील लोकांनी सांगितले. त्यावरून ते जैन मंदिर असावे असे वाटते. या मंदिराचे शिल्प हेमाडपंथी पद्धतीचे आहे. गावात सापडलेले शिवपार्वती, शेषशायी विष्णू इत्यादी शिल्पपट्ट नक्की कोणत्या ठिकाणी सापडले हे निश्चित नाही. कदाचित त्यांतील काही या मंदिरातील असतील.

वाईत सापडलेल्या एका शिलापट्टावर जैन तीर्थंकर भगवान महावीरांची मूर्ती कोरलेली आहे. ही मूर्ती नग्न आहे; अर्थात, ती दिगंबर पंथीयांची होय. मूर्ती कायोत्सर्ग पद्धतीची म्हणजे उभी आहे; आणि तिच्या खाली सिंहाची आकृती कोरलेली आहे. सिंह हे महावीर तीर्थंकराचे लांछन असल्यामुळे ही मूर्ती भगवान महावीरांचीच होय यात शंका नाही. मुख्य मूर्तीच्या वरील भागात सुद्धा दोन जैनमूर्ती कोरलेल्या दिसतात. एकंदरीत या शिलापट्टावरील कोरीव काम अतिशय सुंदर व प्रेक्षणीय आहे. त्यावर अनेक जिनमूर्ती यक्ष-यक्षिणी, विद्याधरादिकांच्या मूर्ती कोरलेल्या आढळतात.

वाई येथे आढळलेल्या दुसऱ्या एका शिलापट्टावर तीन जैन मूर्तींच्या आकृती कोरलेल्या आहेत. त्या पाण्यापावसाने फार झरून गेल्या आहेत. त्यामुळे त्यांचे आकृतीसौंदर्य नजरेत भरत नाही. या तिन्ही मूर्ती नग्न व कायोत्सर्ग पद्धतीच्या आहेत. त्याखाली कोणतीही लांछने, निदान आज तरी आढळत नाहीत त्यामुळे त्या कोणकोणत्या तीर्थंकरांच्या आहेत ते सांगता येत नाही. मधल्या तीर्थंकराच्या शिरावर छत्र कोरलेले आहे.

### वीतराग शिलापट्ट

वाईला मिळालेला तिसरा शिलापट्ट विशेष महत्त्वाचा आहे. या शिलापट्टाच्या शिळेवर दोन पावले व त्याखाली एक शिलालेख कोरलेला आहे. पावले खंडित आहेत. त्यांवरून एखाद्या जैन तीर्थंकराच्या कार्योत्सर्ग पद्धतीत उभ्या असलेल्या विशाल मूर्तीची ती पावले असावीत असे तावडतोब लक्षात येते. खाली पादपीठावर

कोरलेल्या शिलालेखावरून ही मूर्ती कोणाची असावी व ती कोणी निर्माण केली असावी यावर व मूर्तीच्या निर्मितीकालावरही चांगला प्रकाश पडतो.

### पादपीठावरील शिलालेख

पादपीठावरील शिलालेख ठसठशीत अक्षरात कोरलेला आहे. त्यात एकूण ६ ओळी आहेत. लेख जैन-अपभ्रंश भाषेत असून त्यात एकूण तीन श्लोक आहेत. त्यांचे वाचन पुढीलप्रमाणे :

१ दुविहालंकारगई रसोहपुट्ठा पसंणगंभीरा चहुमुहमुहसरहं–
२ सी सरस्सई जयउ जसपउरा ।। आस्ति इह भरहखेते भरहसमो
३ भरहणाम विखाह तस्स सुअ सिरि-महिवई महिवईसुअ भी–
४ मदेवोत्ति ।। जो सद्दंसणजुत्तो जिणवरगुरुणाण दत्तचित्तो
५ य । तणेय वरभवण णिमिअ सिरि-वीतरायस्स ।। संव्वत ८९
६ विलंबि स्वत्सरे । माघा सुदि ५ गुरौ ।। छ ।।

या लेखाचे स्वैर भाषांतर पुढीलप्रमाणे करता येईल :—

दोन प्रकारच्या अलंकारांनी युक्त अशी गती असलेली (=शब्दालंकार व अर्थालंकार, ही दोन प्रकारची भूषणे लेऊन चालणारी—क्रीडा करणारी), रसांनी (नवरसांनी) परिपुष्ट, प्रसन्न-गंभीर, चतुर्मुख ब्रह्मदेवाच्या मुख-सरोवरातील हंसी आणि यश-प्रचुर अशी जी सरस्वती तिचा विजय असो. या पृथ्वीतलावरील भरत क्षेत्रात भरतासारखाच भरत नावाचा विख्यात (राजा किंवा पुरुष) होता. त्याचा पुत्र श्रीमहीपती, त्या महीपतीचा पुत्र भीमदेव होय. तो सम्यक् दर्शनाने युक्त आहे, (सम्यक् दर्शनाचे पालन करतो), व ज्याने जिन श्रेष्ठ गुरूच्या ज्ञानाला आपले चित्त अर्पण केले आहे त्याने (त्या भीमदेवाने) हे श्रीवीतरागाचे श्रेष्ठ मंदिर निर्माण केले आहे. संवत ८९, विलंबी संवत्सर, माघ शुद्ध पंचमी, गुरुवार.

यावरून दिसून येईल की, कोणा भीमदेव नावाच्या जैन भक्ताने वाई येथे श्रीवीतरागाचे एक मोठे मंदिर बांधले होते. त्यातील एका मूर्तीच्या पादपीठावरील हा शिलालेख आहे. ही मूर्ती कदाचित (कायोत्सर्ग पद्धतीत उभ्या असलेल्या) श्रीवीतरागांचीही असू शकेल. 'वीतराग' हे कोणत्या एका तीर्थंकराचे नाव आहे असे नाही. ते एक विशेषण आहे व सामान्यतः सर्वच तीर्थंकरांना ते लावले जाते. विशेषतः दिगंबर जैन सांप्रदायिकांकडून त्याचा वापर होत असतो. त्यावरून हे मंदिर दिगंबर पंथीय जैनांचे असावे यात शंका नाही.

वाईत वीतरागाचे हे मंदिर कोठे असेल ? गावाच्या मागच्या बाजूस असलेल्या ज्या पडक्या हेमाडपंथी मंदिराचा पूर्वी उल्लेख केला आहे ते हे मंदिर नव्हे. कारण, शिलालेखाचा हा शिलापट्ट वाई येथील नागरिक, सध्या यवतमाळ येथे राहाणारे, ॲडव्होकेट खुशालराव मानकर यांना त्यांच्या गावाबाहेरील शेतात मिळाला होता. यापूर्वी ज्याचे वर्णन केले आहे तो तीर्थंकर महावीराचा शिलापट्टही त्यांना त्याच शेतात सापडला होता. त्यावरून सध्याच्या गावाबाहेर त्या शेताच्या जागीच वीतरागाचे हे मोठे मंदिर असले पाहिजे. इतर तीन नग्न जैन मूर्तींचा शिलापट्टही तेथीलच असावा. त्या काळात या वाईत जैनांची पुष्कळ वस्ती असून ते त्यांचे एक तीर्थक्षेत्र असावे असे अनुमान काढण्यास हरकत नाही.

भीमदेवाने जेव्हा हे मंदिर बांधले तो काळ संवत ८९ असा निर्दिष्ट केला आहे. ८९ हा आकडा शक काल किंवा विक्रम संवत्सराचा कोणताही घेतला तरी इतके हे मंदिर जुने असेल असे शिलालेखातील अक्षरवटिकेवरून वाटत नाही. लेख कोरताना ८९ या आकड्यामागील आकडे चुकून गळले असावेत असे वाटते.

या काळाविषयी एक अनुमान करता येणे शक्य आहे. शिलालेखाच्या आरंभीच्या श्लोकात सरस्वतीचे वर्णन केले आहे. त्यात तिला दुविहालंकारगई, रसोहपुट्ठा, पसंणगंभीरा, चहुमुहसरहंसी इत्यादी विशेषणे लावली आहेत. जैन महाकवी पुष्पदंत याने आपल्या 'णायकुमार चरिउ' या काव्यात सरस्वतीचे वर्णन करताना तिला 'दुविहालंकारे विप्फुरंति' (१-१/३), 'णवहिं मि रसेहिं संचिज्जमाण' (१-१/८) असे म्हटले आहे. त्यानेच आपल्या 'महापुराण' काव्यात सरस्वतीचे वर्णन 'गंभीरपसण्ण सुवण्णदेह' (१-२/४), 'चहुमुहवासिणि' (१-२/७) असे केले आहे. पुष्पदंताने केलेल्या सरस्वतीच्या वर्णनात व या शिलालेखातील सरस्वतीच्या वर्णनात इतके विलक्षण साम्य आहे की, या शिलालेखातील श्लोकांची रचना करणाऱ्या कवीचा पुष्पदंताच्या काव्याशी चांगला परिचय असावा असे वाटल्यावाचून राहत नाही. हा तर्क बरोबर असेल तर पुष्पदंतानंतर केव्हा तरी हा मजकूर रचला गेला असे म्हणता येईल. पुष्पदंत कवी साधारणपणे शककाल ८५० ते ९०० (इ. स. ९२८ ते ९७८) म्हणजे इसवी सनाच्या दहाव्या शतकात होऊन गेला. त्यानंतर केव्हातरी हा शिलालेख कोरला गेला असावा. शिलालेखातील अक्षरवटिकाही दहा या शतकातील आहे. त्या सुमाराला भीमदेवाने हे वीतराग मंदिर बांधले असावे असे म्हणण्यास हरकत नाही.

हे अनुमान बरोबर असेल तर ज्या भीमदेवाने हे मंदिर बांधले त्याचा शोध काढणे शक्य होईल. शिलालेखात ज्याचा उल्लेख केला आहे तो भरत म्हणजे पुष्पदंताचा आश्रयदाता भरत असावा. मान्यखेट येथील कृष्णराज ऊर्फ वल्लभराज म्हणजे

राष्ट्रकूटनृपती तृतीय कृष्णराजाचा तो महामात्य होता. हा भरत जैन धर्मानुयायी होता. त्याचा उल्लेख 'अनवरत-रचित-जिननाथ भक्ती' व 'जिनवर-समय–प्रासादस्तंभ' असा केला गेला आहे. त्याचाच उल्लेख जैन शिलालेखात 'महामंत्री भरतमय्य' असा आढळतो. त्याच्याच प्रेरणेने पुष्पदंताने आपल्या महापुराण, णायकुमाचरिउ इत्यादी काव्यांची रचना केली आहे. महापुराण काव्यातील प्रत्येक संधीच्या शेवटी पुष्पदंताने 'महाभव्व भरहाणुमण्णिअ' या चरणात या भरताचा अत्यंत आदरपूर्वक उल्लेख केला आहे.

आपल्या शिलालेखात भरताच्या महिपती नामक पुत्राचा पुत्र म्हणून भीमदेवाचा उल्लेख केला आहे. महामात्य भरताला देवल्ल, भोगल्ल, नन्न, सोहण, गुणवर्म, दंगैय, आणि सांतैय या नावाची सात मुले होती[1] त्यांत महीपतीचा उल्लेख मात्र आढळत नाही. तेव्हा या ठिकाणी 'सुत' हा शब्द शिष्य या अर्थाने वापरलेला असावा. या अर्थाने सुत हा शब्द अनेक ठिकाणी आढळतो. उदा. ज्ञानेश्वर स्वतःला 'निवृत्ती-सुत' म्हणतात. त्याचप्रमाणेच भरताचा महिपती हा शिष्य व महिपतीचा भीमदेव हा शिष्य असावा व त्याने हे मंदिर बांधले असावे.

पुष्पदंत कवीचा काल साधारणपणे शके ८५० ते ९०० असल्याचे वर नमूद केले आहे. तोच भरत महामात्याचा काळ गृहीत धरणे युक्तिसंगत होईल. त्यानंतर महीपती व नंतर भीमदेव. प्रत्येक पिढीला स्थूलमानाने २५ वर्षे धरली तर भीमदेव हा शके ९५० नंतर झाला असे मानण्यास हरकत नाही. त्याने आपल्या उतार वयात वाई येथे हे मंदिर बांधले असावे. शिलालेखात ८९ हा जो कालोल्लेख आहे तो बहुधा शके ९८९ (इ. स. १०६७) असावा असे म्हणता येईल.

● ● ●

---

१. डॉ. हीरालाल जैन, णायकुमारचरिउ, प्रस्ता. पृ. १७---१९; पं. नाथुराम प्रेमी, जैन साहित्य और इतिहास, पृ. ३०१; जैन शिलालेख संग्रह भाग १, क्रमांक ११५.

# ३

# वाकाटक देवसेन याचा हिस्से बोराळा शिलालेख

**प्रास्ताविक : उपलब्धी**

वत्सगुल्म (वाशीम), जिल्हा अकोला, येथून दक्षिणेस सुमारे सहा मैलांवर 'हिस्से बोराळा' या नावाचे एक गाव आहे. गावाच्या सभोवती अनेक टेकड्या आहेत. गावाच्या उत्तरेस दोन टेकड्यांमधून एक लहानसा ओढा वाहतो. या दोन टेकड्या सांधण्यासाठी तेथे एक बांध किंवा धरण बांधले असावे असे दिसते. सध्या हे धरण तेथे नाही ; पण ओढ्याच्या दोन्ही बाजूंना त्याचे अवशेष स्पष्ट दिसून येतात. यांपैकी पूर्वेकडील अवशेषाच्या दक्षिण बाजूला प्रस्तुत शिलालेख मातीत गाडला गेला होता. पाण्याने त्यावरील माती वाहून गेल्यावर त्याचा वरचा भाग उघडा पडला. त्यावरून एके दिवशी एक गुराखी घसरला, तेव्हा या दगडाकडे लोकांचे लक्ष वेधले. भोवतालची माती उकरल्यानंतर त्यावर काही कोरलेले आहे हे त्यांच्या लक्षात आले. कर्णोपकर्णी ही माहिती श्री. प्रभातकुमार जैन यांना कळली. त्यांनी ती शिळा पाहिली तेव्हा तो एक शिलालेख आहे असे त्यांच्या लक्षात आले. त्यावरील काही अक्षरे नकलून त्यांनी ही माहिती अकोला येथील 'मातृभूमी' दैनिकाचे संपादक श्री. कमलकिशोर बियाणी यांना कळविली. प्रस्तुत शिलालेख अकोला येथे आणविण्याची खटपट त्यांनी वाशीम येथील स्थानिक अधिकाऱ्यांकडून चालविली होती. काही दिवसांपूर्वी पुणे येथील सौ. शोभना गोखले यांनी श्री. कमलकिशोर बियाणी यांच्याकडून मिळालेली माहिती अकोला जिल्हाधिकारी श्री. सुरडकर यांना दिली व त्यांनी प्रस्तुत शिलालेख आपल्या अधिकाऱ्यांकडून अकोला येथे जिल्हा कचेरीत आणून ठेवला. त्यांनी पुरविलेल्या माहितीवरून श्री. प्रभातकुमार जैन व श्री. कमलकिशोर बियाणी यांच्या व अकोला जिल्हाधिकारी श्री. सुरडकर यांच्या परवानगीने प्रस्तुत शिलालेखाचे मी संपादन करीत आहे. शिलालेखाचे ठसे घेण्यात व वाचून काढण्यात मला प्रामुख्याने डॉ. मो. ग. दीक्षित व श्री. लक्ष्मीनारायण राव यांचे साह्य झाले आहे, हे कृतज्ञतापूर्वक नमूद करणे आवश्यक आहे.

**वर्णन**

शिलालेखाचे तीन तुकडे झालेले आहेत. हे तिन्ही तुकडे जोडल्यानंतर दिसून येते की, या संपूर्ण शिलालेखाची लांबी ४।। फूट, रुंदी १४ इंच व उंची ९ इंच आहे. शिलालेखावर एकूण चार ओळी कोरलेल्या आहेत. त्यांतील आरंभीच्या तीन ओळींत मूळ लेखाचा मजकूर आहे. तिसऱ्या ओळीच्या शेवटी अपूर्ण राहिलेल्या श्लोकातील तीन अक्षरे खालीच लिहून तो पूर्ण केलेला दिसतो. यातील आरंभीचे एक अक्षर स्पष्ट आहे. इतर अक्षरे, शिळा फुटल्यामुळे नष्ट झाली आहेत. शेवटची चौथी ओळ मध्यभागी कोरलेली असून तिच्या भोवती रेषांची एक चौकट काढलेली आहे. अक्षरे वळणदार असून त्यांचा आकार सर्वत्र सारखा आहे. साधारणपणे इकार व उकाराची चिन्हे लक्षात घेता अक्षरांची उंची २।। ते २।।। इंच आहे. प्रत्येक अक्षराची जाडी स्थूल मानाने १ इंच येईल.

**महत्त्व**

वाकाटकांचे अनेक ताम्रपट उपलब्ध झालेले असले तरी शिलालेख विरळ आढळतात. वाकाटकांच्या मूळ शाखेतील केवळ तीन शिलालेख आतापर्यंत उपलब्ध झालेले आहेत. त्यांपैकी वाकाटक नृपती पृथ्वीषेण याचा मांडलिक व्याघ्रदेव याचे नचना येथील दोन शिलालेख हे एकाच शिळेवर कोरलेले आहेत. त्यांतील पहिला अपूर्ण आहे. तो अपूर्ण लेख त्याच शिळेवर दुसऱ्या ठिकाणी पुन्हा संपूर्ण लिहिलेला आहे. याच व्याघ्रदेवाचा 'गंज' येथील आणखी एक शिलालेख उपलब्ध आहे. वत्सगुल्म शाखेतील वाकाटक नृपती हरिषेण याच्या अमात्याचा एक, आणि मांडलिकाचा एक, असे दोन लेख अजिंठा येथील क्रमांक १६ व १७ या लेण्यांत, तर तिसरा अजिंठ्याच्या पश्चिमेस असलेल्या घटोत्कच लेण्यात आहे. हे तिन्ही लेख भिंतीवर कोरलेले आहेत. वत्सगुल्म शाखेचा स्वतंत्र शिळेवर कोरलेला लेख अद्याप उपलब्ध नव्हता. प्रस्तुत शिलालेख हा स्वतंत्र शिळेवर कोरलेला असल्यामुळे तो महत्त्वाचा ठरतो.

याशिवाय आणखी अनेक दृष्टींनी हा शिलालेख महत्त्वाचा आहे. पहिली गोष्ट अशी की, हा कालोल्लिखित शिलालेख होय. आतापर्यंत उपलब्ध झालेल्या वाकाटकांच्या कोणत्याही ताम्रपटात किंवा शिलालेखात कालाचा निर्देश नाही. त्यांच्या ताम्रपटात त्या त्या राजाचे राज्यवर्ष, म्हणजे राज्यावर बसल्यापासूनचे वर्ष तेवढे दिलेले आढळते. पण त्यावरून ऐतिहासिक दृष्टीने त्याचा काळ कोणता ते कळू शकत नाही. द्वितीय चंद्रगुप्ताची कन्या प्रभावती गुप्ता हिचा विवाह वाकाटक नृपती द्वितीय रुद्रसेनाशी झाला होता. या वस्तुस्थितीच्या आधारे द्वितीय चन्द्रगुप्ताच्या कालानुरोधाने वाकाटक नृपतींचे काळ आतापर्यंत स्थूल मानाने ठरविलेले

आहेत. प्रस्तुत शिलालेखात वाकाटकांच्या वत्सगुल्म शाखेतील देवसेन नृपतीच्या कारकीर्दीतील एका निश्चित काळाचा (आणि तोही शालिवाहन शकाचा) निर्देश असल्यामुळे तो खुणेच्या दगडाप्रमाणे आधारभूत मानता येईल. दुसरे असे की, हा कालनिर्देश आकड्यात आहे, इतकेच नाही तर तो आकाशस्थ नक्षत्रतारकांच्या स्थितिगतीच्या द्वारा केलेला आहे. नक्षत्रतारकांचा हा ज्योतिषविषयक उल्लेख म्हणजे सप्तर्षींचे उत्तरा नक्षत्रातील अवस्थान. या दृष्टीने तर हा शिलालेख विशेष महत्त्वाचा ठरतो. कारण, सप्तर्षींच्या द्वारा अशा रीतीने केलेला कालनिर्देश अन्यत्र कोणत्याच शिलालेखात किंवा ताम्रपटात आढळत नाही. या शिलालेखात, माझ्या माहितीप्रमाणे तो प्रथम आढळतो. त्यामुळे प्रस्तुत शिलालेखाचे महत्त्व विशेष आहे.

## लिपी व भाषा

प्रस्तुत शिलालेखाची लिपी ब्राह्मी होय. या ब्राह्मी लिपीतूनच आपली देवनागरी लिपी उत्क्रांत झालेली आहे. अर्थात, प्रस्तुत शिलालेखाची लिपी म्हणजे देवनागरीचे प्राचीन स्वरूप होय. वाकाटकांचे आतापर्यंत मिळालेले बहुतेक शिलालेख व ताम्रपट पेटिकाशीर्षक लिपीत आहेत. म्हणजे असे की, त्या त्या अक्षराच्या शिरोरेषेला सामान्यतः एक चौकोनी पेटी कोरलेली असते. तो प्रकार प्रस्तुत शिलालेखाच्या लिपीत आढळत नाही. अक्षरांच्या उभ्या दंडाला खाली डावीकडे अर्धगोलाकार वळणे दिलेली आहेत; पण त्या पेटिका नव्हेत. तसेच काही अक्षरांच्या शेवटी पेटिका असल्यासारख्या दिसतात. उदा. दुसऱ्या ओळीतील 'सर्व्वसत्व' या शब्दातील र्व्व आणि त्व ही अक्षरे पाहा. त्यांतील उभ्या दंडाच्या शेवटी डावीकडे पेटिका असल्यासारख्या वाटतात. पण त्या पेटिका नसून ती व या अक्षराची चिन्हे होत.

सामान्यपणे अक्षरांना शिरोरेषा कोठेच कोरलेल्या दिसत नाही. याला अपवाद च या अक्षराचा आढळतो. दुसऱ्या व तिसऱ्या ओळीतील च पाहावा. आकाराचे चिन्ह बहुधा अक्षरातील उभ्या दंडाच्या वर उजवीकडे आडवी रेषा कोरून दाखविलेले आहे. 'सूर्य्यां' शब्दातील र्य्यां अक्षरात ही रेषा स्पष्ट दिसत नाही; कारण ती तेथे पुढील अक्षरात मिळून गेलेली आहे. इकार दाखविण्यासाठी अक्षरातील दंडावर ठसठशीत गोलाकार पोकळ चिन्ह कोरलेले आहे. उदा. 'अस्मिन्', 'प्रतिष्ठापितं'-ओ. २, यांतील इकार पाहावे. ओ. १ मधील 'श्री'तील इकार मात्र दंडाच्या उजवीकडे आजच्या सारखे चिन्ह कोरून दाखविला आहे. 'स्वामिल्ल' मधील इकारही आजच्यासारखे

चिन्ह कोरून दाखविला आहे. 'श्री'तील इकाराचे चिन्ह हे दीर्घ ईकाराचे स्वतंत्र चिन्ह म्हणावे तर तसे दिसत नाही. कारण, 'प्रिथिवी', 'सत्कीर्त्तन'–ओ. ३; या शब्दांतील दीर्घ ईकार ऱ्हस्व इकाराच्या चिन्हाप्रमाणेच पोकळ गोलाने दाखविलेला आहे. अक्षरातील उभ्या दंडाला खाली उजवीकडे अर्धवर्तुळाकार वळण देऊन ऱ्हस्व उकार दाखविला आहे. ऱ्हस्व उकाराचे चिन्ह कोरून शिवाय दंडाला मधेच उजव्या बाजूला आडवी रेघ देऊन दीर्घ ऊकार दाखविला आहे. उदा. ओ. २ मधील 'सुदर्शन,' आणि ओळ १ मधील 'सू' व ओ. ३ मधील **'सूर्य्यौ'** यांतील ऱ्हस्व व दीर्घ सू पाहावा. अक्षराच्या दंडाला वर डावीकडे आडवी रेषा कोरून एकार दाखविला आहे. मात्र, ओ. २ मधील 'काले' व ओ. ३ मधील 'ममेदं' या शब्दातील एकार त्या त्या अक्षराच्या खालच्या बाजूस डावीकडे किंचित बाकदार रेषा कोरून दाखविला आहे. ओ. ३ मध्ये **'सूर्य्यौ'** शब्दात औकार कसा दाखविला आहे ते पाहावे. विसर्गाचे चिन्ह आजच्या सारखेच आहे. कपूर्वी आलेल्या विसर्गाचे, म्हणजे जिव्हामूलीयाचे चिन्ह चौथ्या ओळीत दुसऱ्या क वर आलेले आहे. ते म या अक्षराच्या चिन्हा-सारखे दिसते. संयुक्त व्यंजनातील अंतिम र तत्पूर्वीच्या अक्षराच्या दंडाला खाली डावीकडे मोठे अर्धवर्तुळाकार चिन्ह जोडून दाखविला आहे; पाहा, प्रिथिवी. ओ. ३, तर आधीचा र, अक्षरावर उभी रेघ देऊन दाखविला आहे. पाहा. 'सप्तर्षय'–ओ. १, 'आर्य्येण' 'सर्व्व'–ओ. २, इ.

शिलालेखाची भाषा संस्कृत असून ती बहुतेक शुद्ध आहे. 'पृथिवी' शब्द 'प्रिथिवी' असा लिहिलेला असून 'तावत् + मम' यांचा संधी 'तावन्मम' असा न करता 'तावम्मम' असा केलेला आढळतो. अर्ध रकारानंतर आलेली अक्षरे द्वित्त करून लिहिलेली आहेत. उदा. 'आर्य्येण'–ओ. २; 'चतुर्य्युगानां' 'परिवर्त्तनानि', 'सूर्य्यौ', 'सत्कीर्त्तनं', 'सर्व्व'–ओ. ३.

या शिलालेखात आलेल्या 'व' च्या भिन्न वळणाकडे अभ्यासकांचे लक्ष वेधणे अवश्य आहे. 'स्वामिल्ल' शब्दातील 'व' त्रिकोणाकृती आहे; 'वाकाटकानां', 'देवसेनस्य', 'परिवर्त्तनानि' इत्यादी शब्दांतील 'व' चौरस आहे; तर 'सर्व्वसत्व' या शब्दांतील 'व' आडव्या चौकोनासारखा काटकोना-कृती आहे. काही ठिकाणी 'व' चे वळण अगदी आजच्या सारखे आहे. उदा. 'वृ' –ओ. १, 'सर्व्व'–ओ. २. यांतील पहिला 'व'; 'सर्व्व' –ओ. ३, यांतील दोन्ही 'व' इत्यादी, या 'व'चे वळण लंबगोलाकृती आहे. 'व'चे त्रिकोणाकृती वळण जुने असून प्रथम पृथिवीषेणाच्या काळानंतर ते प्रचारातून गेले, व त्या जागी काटकोनाकृती वळण आले असे डॉ. दिनेशचंद्र सरकार यांचे

म्हणणे आहे. पण वाकाटक नृपती देवसेनाच्या प्रस्तुत शिलालेखात सुद्धा त्रिकोणाकृती 'व' आढळत असल्यामुळे त्यांचे म्हणणे निर्विवाद मानता येत नाही. या प्रश्नाची सविस्तर चर्चा डॉ. मिराशी यांनी 'वाकाटक नृपति आणि त्यांचा काल' या आपल्या ग्रंथात (पृ. ३२०, ३२१) केलेली आहे. प्रस्तुत शिलालेखावरून डॉ. मिराशी यांच्या विवेचनाला उपोद्बलक पुरावा मिळतो. त्रिकोणाकृती व काटकोनाकृती वळणांव्यतिरिक्त 'व' चे आजच्या-सारखे लंबगोलाकृती वळणही त्याच काळात प्रचारात येण्याला सुरवात झाली होती असे प्रस्तुत शिलालेखावरून दिसून येते.

**विषय : वाकाटक नृपती देवसेन**

प्रस्तुत शिलालेखाचा विषय वाकाटक नृपती देवसेन याची आज्ञा पालन करणाऱ्या आर्य स्वामिल्लदेवाने सुदर्शन नावाचे सरोवर प्रतिष्ठापित केल्याचा निर्देश करण्याचा आहे. लेखाच्या उत्तरार्धात, आपण केलेले हे बांधकाम यावच्चंद्रदिवाकर सर्व लोकांच्या उपभोगास यावे अशी इच्छा व्यक्त केली आहे.

ज्याअर्थी वाशीमजवळ केवळ सहा मैलांच्या अंतरावर हा शिलालेख आढळला त्याअर्थी त्यात उल्लेखिलेला देवसेन नृपती हा वाकाटकांच्या वाशीम शाखेतील होय यात शंका नाही. वाकाटकांच्या मूळ शाखेचा प्रवर्तक प्रथम विंध्यशक्ती याच्या प्रथम प्रवरसेन नामक पुत्राचा मुलगा सर्वसेन हा या वाशीम शाखेचा संस्थापक होय. त्याचा पुत्र द्वितीय विंध्यशक्ती, त्याचा पुत्र द्वितीय प्रवरसेन, त्याचा पुत्र--याचे नाव अद्याप उपलब्ध झालेले नाही, या अनुपलब्धनामधेय नृपतीचा पुत्र हाच प्रस्तुत शिलालेखातील देवसेन होय. आतापर्यंत याचा एकच ताम्रपट उपलब्ध झालेला आहे, पण तोही अपूर्ण आहे. सध्या हा ताम्रपट लंडन येथील इंडिया ऑफीसमध्ये आहे. तो लंडन येथील 'ब्रिटिश म्युझियममध्ये आहे' असे डॉ. मिराशी यांनी एके ठिकाणी, बहुधा अनवधानाने म्हटले आहे (वाकाटक नृपति व त्यांचा काल, पृ. ५८) ते बरोबर नाही. ही चूक त्यांनी आपल्या याच ग्रंथाच्या पृ. ३३७ वर दुरुस्त केलेली आढळते. हा ताम्रपट 'वात्सगुल्म' येथून दिलेला असून त्यात या नगराच्या उत्तर-मार्गातील 'नाङ्गरकटक' मधील कोणते तरी गाव एका ब्राह्मणाला दान दिल्याचा निर्देश आहे. या ताम्रपटात देवसेनाला 'महाराज' असे म्हटले आहे. अजिंठा येथील वराहदेवाच्या शिलालेखात या देवसेनाचे नाव आढळते. त्या लेखातील माहितीवरून असे कळते की, देवसेनाचा एक हस्तिभोज नावाचा प्रधान होता. तो प्रजेला मातापित्याच्या प्रेमाने वागवीत असे. त्यामुळे

तो सर्वांना प्रिय झालेला होता. या हस्तिभोजावर सर्व कारभार सोपवून देवसेन आपला काळ सुखविलासात घालवीत असे (तत्रैव. पृ. ३४१-३५६).

## सुदर्शन सरोवर

या माहितीत प्रस्तुत शिलालेखाने आणखी थोडी भर घालता येते. ती अशी की, देवसेनाचा 'स्वामिल्लदेव' नावाचा एक आज्ञाधारक अधिकारी होता. त्याने बहुधा ह्या देवसेन नृपतीच्या आज्ञेवरूनच सर्व प्राणिमात्राच्या हितासाठी एक सरोवर बांधून काढले. यावरून, देवसेन केवळ सुखविलासातच आपला काळ घालवीत असे, असे नाही. आपल्या राज्यातील प्राणिमात्राच्या हिताचीही तो काळजी वाहत असे. त्यासाठी आपल्या राज्यात तो सरोवरे किंवा जलाशय निर्माण करीत असे. जनतेच्या कल्याणासाठी वापी, कूप, तडाग वगैरे निर्माण करणे हे प्रजाहितदक्ष राजाचे कर्तव्य समजले जाई. शके १०३ मधील रुद्रसिंह १ च्या काळातील गुंडा (काठेवाड) येथील शिलालेखात "–वापी खनिता बन्धापिता च सर्व्वसत्वानां हितसुखार्थमिति" असा उल्लेख आढळतो. (डॉ. दिनेशचंद्र सरकार: सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स्, पृ. १७६). अशा सरोवरांना 'सुदर्शन', 'प्रियदर्शन' अशी नावे देण्याची पद्धती असावी. जुनागड येथे चंद्रगुप्त मौर्य राजाचा राष्ट्रिक पुष्यगुप्त याने एक तलाव बांधला होता, त्याला त्याने 'सुदर्शन' असे नाव ठेवले होते (एपि. इंडिका, वर्ष ८, पृ. ४२). साचीजवळ कानाखेरा येथे श्रीधरवर्म्याचा शके २०१ मधील एक शिलालेख आहे. त्यात 'अपि च कान्तः सलिलः प्रियदर्शनो जलनिधिर्द्धर्म्मामलः शाश्वतः कूपः श्रीधरवर्मणा गुणवता खानापितोऽयं शुभः' असा निर्देश आहे (एपि. इंडिका, वर्ष १६, पृ. २३२). जुनागड येथील सुदर्शन तलाव अनेकदा फुटल्यामुळे तो पुनःपुन्हा बांधून काढावा लागला. पुष्यगुप्ताने तो प्रथम बांधला; नंतर, अशोकासाठी यवनराज तुषास्फ याने तो फुटलेला तलाव बांधून काढला; त्यानंतर पुन्हा पर्जन्यवृष्टीने फुटलेला हा तलाव स्कन्दगुप्ताचा अमात्य पर्णदत्त याचा मुलगा चक्रपालित याने गुप्त संवत् १३६ ते १३८ म्हणजे शके ३७७ ते ३७९ मध्ये तो पुन्हा बांधून काढला. देवसेनासाठी स्वामिल्लदेवाने वाशीमजवळ हिस्से बोराळा येथे बांधलेला 'सुदर्शन' तलाव शके ३८० मध्ये बांधला होता. यावरून, जुनागड येथील 'सुदर्शन' तलावाच्या प्रसिद्धीमुळेच बहुधा देवसेनानेही आपल्या तलावाचे नाव 'सुदर्शन' असे ठेवले असावे असे अनुमान करता येते.

'वत्सगुल्ममाहात्म्या'त तेथील परिसरातील अनेक तीर्थे वर्णन केली आहेत. त्यात समुद्रस्पर्द्धी अशा चंद्रसरोवराचे वर्णन आहे. ते वाशीम क्षेत्राच्या

उत्तरेस असल्याचे तेथे सांगितले आहे. हिस्से बोराळा हे गाव वाशीमच्या दक्षिण मार्गाने पण पूर्वेकडील बाजूला आहे. उत्तरेला व पूर्वेला व्यापून असलेल्या या सरोवराचा आकार चंद्रकलेप्रमाणे अर्धवर्तुळाकार होतो, म्हणूनच त्याला चंद्रसरोवर हे नाव असावे. याच चंद्रसरोवराला एका बाजूने (हिस्से बोराळा येथे) धरण बांधून त्याला 'सुदर्शन' असे नाव वाकाटकांच्या काळात दिलेले असावे असे वाटते. शिलालेखाच्या शेवटी आलेल्या श्लोकात 'माझे हे सत्कीर्त्तन यावच्चंद्रदिवाकर सर्व जनतेच्या उपयोगी पडो' अशी प्रार्थना आली आहे. 'कीर्तन' म्हणजे इमारत, कलापूर्ण कार्य, देऊळ. श्लोकात 'इदं सत्कीर्त्तनं' म्हटले असल्यामुळे त्याचा संबंध वरच्या ओळीत निर्देशिलेल्या सरोवराच्या प्रतिष्ठापनेसाठी केलेल्या बांधकामाकडे अधिक पोचतो. 'देऊळ' हा अर्थ येथे लागू पडत नाही. तथापि, धरणाजवळ एखादे देऊळ बांधलेले असणेही शक्य आहे. शिलालेख जेथे मिळाला त्याच्या बाजूला जुन्या विटा एकमेकावर रचलेल्या अजूनही सापडतात.

### स्वामिल्लदेव व बप्पक

स्वामिल्लदेवाचे नाव प्रस्तुत शिलालेखात प्रथमच आढळते. 'आज्ञाकर' आणि 'आर्य' अशी दोन विशेषणे त्याला लावलेली आहेत. 'आज्ञाकर' म्हणजे हुकूम पाळणारा किंवा अमलात आणणारा सेवक. यावरून बांध किंवा धरण बांधून 'सुदर्शन' सरोवर निर्माण करण्याची आज्ञा देवसेनाने दिली असून स्वामिल्लदेवाने ती केवळ अमलात आणली असावी असे म्हणण्यास हरकत नाही. तथापि, शिलालेखात ज्याअर्थी त्याचे नाव कोरलेले आहे त्याअर्थी तो कुणीतरी श्रेष्ठ अधिकारी असावा. 'आर्य' या विशेषणावरून देखील या अनुमानाला बळकटी येते.

शिलालेखाच्या चौथ्या ओळीत 'बप्पक' हे आणखी एक नवीन नाव आढळते. या बप्पकाला 'कर्मोपदेष्टा' असे म्हटले आहे. 'कर्मोपदेष्टा' म्हणजे कामाबद्दल सूचना देणारा, संचालक, आचार्य. 'वेणीसंहार' नाटकातील 'चत्वारो वयमृत्विजः स भगवान्कर्मोपदेष्टा हरिः ।' (अंक १-२५) या श्लोकात याच अर्थाने हा शब्द वापरला आहे. त्यावरून 'बप्पक' हा सुदर्शन सरोवराच्या प्रतिष्ठापनेच्या कार्यावरील प्रमुख अधिकारी होता; आणि त्याच्या नावाभोवती स्वतंत्र चौकट कोरली आहे त्यावरून तो कुणीतरी महत्त्वाचा अधिकारी असावा असे वाटते.

वाकाटकांच्या मूळ शाखेतील नृपती द्वितीय प्रवरसेन याच्या चम्मक ताम्रपटात 'स्वामिदेव' आणि 'बप्प' अशी दोन ब्राम्हणांची नावे आलेली आहेत. त्याच्याच सिवनी ताम्रपटात आणि वडगाव ताम्रपटात 'बाप्पदेव' या सेनापतीचे नाव

आलेले आहे. तो व प्रस्तुत शिलालेखातील 'बप्पक' हे एकच असतील काय ? वाशीम शाखेतील देवसेनाचा पिता राज्यावर बसला त्यावेळी तो अल्पवयी असल्यामुळे त्याच्या राज्याचा कारभार मूळ शाखेतील द्वितीय प्रवरसेन पाहात असावा असा एक तर्क आहे (दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन, संपादक: याझदानी, भाग ३, पृष्ठ १७९ व १८७). तो लक्षात घेता 'बाप्पदेव' आणि 'बप्पक' यांची एकरूपता किंवा संबंध चित्य ठरतो.

वाकाटक नृपती द्वितीय पृथिवीषेण व देवसेनाचा पुत्र हरिषेण यांच्या, अनुक्रमे बिदर व थाळनेर ताम्रपटांत देखील स्वामिल्लदेव व बप्पक यांचा उल्लेख आढळतो. त्यावरून देवसेनाप्रमाणेच हरिषेणाच्या कारकीर्दीत ही हे दोघे अधिकार पदावर होते असे स्पष्ट दिसते (डॉ. अजयमित्र शास्त्री. 'दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन. प्रॉब्लेम्स अॅण्ड पर्स्पेक्टिव्ह्ज्').

**वाचन व कालनिर्णय**

प्रस्तुत शिलालेख हिस्से बोराळा येथे होता तेव्हाच त्याचे तेथे दोन तुकडे पडलेले होते. तेथून तो आकोला येथे आणण्यासाठी उचलला जात असताना त्याच्या पूर्वार्धाचे पुन्हा दोन तुकडे झाले. त्यामुळे त्यातील आरंभीची काही अक्षरे नष्ट झाली. सुदैवाने हिस्से बोराळा येथील दोन्ही तुकड्यांची छायाचित्रे डॉ. सौ. शोभना गोखले यांनी घेऊन ठेवली होती. ती आकोला येथील दैनिक 'शिवशक्ति' (ता. २६-२-१९६४) आणि मुंबई येथील दैनिक 'लोकसत्ता' (ता. २२-३-१९६४) यांत प्रसिद्ध झालेली आहेत. त्यांच्या साह्याने या शिलालेखातील, विशेषत: पहिल्या ओळीचे वाचन मी येथे केले आहे. या गोष्टीचा साभार व कृतज्ञतापूर्वक निर्देश करणे मी माझे कर्तव्यकर्म समजतो.

माझ्याजवळ असलेल्या या शिलालेखाच्या ठशातील पहिल्या ओळीत आरंभी 'त्तस्य व्रु २०' ही व यापुढील काही अक्षरे स्पष्ट आहेत.

छायाचित्रात त्यापूर्वी 'तस्य त्रि' अशी आणखी दोन अक्षरे आढळतात. म्हणजे हे वाक्य '**तस्य त्रि(वृ)त्तस्य व्रु(वृ) २०**' असे पूर्ण होईल. याही पूर्वीची तीन-चार तरी अक्षरे नाहीशी झालेली आहेत. ती उपलब्ध अक्षरांच्या अनुषंगाने पूर्वापर संबंध लक्षात घेऊन 'मध्यग' अशी असावीत असे वाटते. छायाचित्रातील आरंभीच्या 'त' पूर्वी असलेल्या अवशिष्ट चिन्हावरून ते अक्षर 'ग' असे वाचता येणे शक्य आहे.

या पूर्वार्ध चरणाचे वाचन करीत असताना वत्सगुल्म ऊर्फ वाशीम या गावाचे ज्योतिषशास्त्रविषयक महत्त्व लक्षात घेतले पाहिजे. प्राचीन ज्योतिषशास्त्रात

आकाशातील ग्रह-नक्षत्र-तारकादिकांचे वेध घेण्यासाठी एक 'मध्यरेषा' कल्पिलेली होती. ती रेषा वाशीम गावातून जाते. 'वत्सगुल्म माहात्म्या'त (संपा. डॉ. य. खु. देशपांडे) यासंबंधी पुढील उल्लेख आढळतो:—

ग्रहाणामुदयास्तौ च ग्रहणं चन्द्रसूर्ययोः
आयुःप्रमाणं सकलं दैवज्ञैर्ज्ञायते यतः ।।
देशांतरपरिज्ञानं तदर्थं देशलक्षणम्
लंकामेर्वोस्ततो मध्ये मध्यरेखां विनिर्ममुः ।।
भूगोलज्ञानसिद्ध्यर्थं ग्रहाणां गणिताय च ।।
लंकापुरीतः किल देवकन्यां
कांचीं तथा श्वेतगिरिं च पर्यलीम् ।
यद्वत्सगुल्मं परिकल्प्य मध्य–
स्ततोज्जियिन्यादिकमुत्तरार्धकम् ।।

(अ. ११, श्लो. १७ ते १९)

यावरून दिसून येईल की, प्राचीन ज्योतिषशास्त्रज्ञांनी कल्पिलेल्या मध्यम रेषेवर वाशीम हे स्थान आहे. ही मध्यरेषा ज्याप्रमाणे ग्रहांचे वेध घेण्यासाठी व ग्रहांच्या गणितासाठी कल्पिलेली आहे तशी ती भूगोलज्ञानासाठी व निरनिराळ्या प्रदेशांचे अंतर (देशांतरपरिज्ञानं) दाखविण्यासाठीही कल्पिलेली आहे. हे लक्षात घेऊनच प्रस्तुत शिलालेखातील पहिल्या ओळीच्या पूर्वार्धातील आरंभीची अक्षरे 'मध्यगतस्य' अशी वाचावी. म्हणजे ही ओळ पुढीलप्रमाणे होईल:—

**'मध्यगतस्य व्रि(वृ)त्तस्य व्रु(वृ) २०'**

या वाक्यार्धाचा अर्थ, 'मध्यम वृत्तावरील व्रु(वृ) २०'=२० व्या वृत्तावर. व्रु(वृ) हे 'वृत्त' अर्थात, अक्षांश याचे संक्षिप्त रूप असावे. अशा रीतीने शब्दाचे संक्षिप्त रूप करून ते लिहिण्याची पद्धत अनेक प्राचीन शिलालेखांत आढळते. उदा. कनिष्काच्या झेडा शिलालेखात '**सं** १० (+) १ अषडस्य मसस दि २० उतर फगुणे–' या वाक्यात **सं** हे अक्षर 'संवत्सर' या शब्दाचे आणि **दि** हे अक्षर 'दिवस' या शब्दाचे संक्षिप्त रूप होय. (सिलेक्ट इन्स्क्रि.—सरकार, पृ. १३६). सारनाथ येथील बुद्धमूर्तीवर कनिष्काचेच जे लेख आहेत त्यांतही 'संवत्सर' साठी सं, 'हेमन्त' साठी **हे**, 'दिवस' साठी **दि**, असे संक्षेप आलेले आहेत (सदर, पृ. १३२, १३३). यावरून **वृ** हा 'वृत्त

शब्दाचा (किंवा, ध्रु हा 'ध्रुव' शब्दाचा) संक्षेप मानायला हरकत नाही. यापुढील चिन्ह २० असे निश्चित वाचता येते. सारांश, पूर्वार्ध चरणाच्या ह्या भागात या शिलालेखात जे सुदर्शन सरोवर निर्माण केल्याचा निर्देश आहे, त्याच्या स्थळाचा ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने निर्देश केलेला असावा, असे दिसते. ते स्थळ वाशीममधून जाणाऱ्या मध्यम रेषेवर २० अक्षांशावर होते. नकाशावरून हिस्से बोराळा हे गाव वाशिमच्या दक्षिणेकडील २० अक्षांशावर असलेले स्पष्टपणे दिसून येईल. त्यामुळे वर सुचविल्याप्रमाणे या ओळीच्या पूर्वार्धाचे वाचन करणे इष्ट ठरेल.

या वाक्याचे पर्याय वाचन कसे करता येईल, तेही निर्दिष्ट करतो. या ओळीतील 'ब्रु २०' अशी वाचलेली अक्षरे 'ध्रु २०' अशीही वाचता येतील. शककालाच्या आरंभीच्या शतकातील काही शिलालेखांत 'ध' हा आजच्या 'व' सारखा कोरलेला आढळतो. (बूल्हरकृत भारतीय लिपिमाला. तक्ता क्रमांक ३ च्या दुसऱ्या उभ्या ओळीतील २४ वे अक्षर पाहावे. तक्ता क्रमांक ५ च्या उभ्या ओळीतील २८ वे अक्षरही पाहावे.) ध्रु २० असे वाचन केले तरी मध्यरेषेवर २० अक्षांशावर सुदर्शन सरोवर आहे हा उल्लेख चुकीचा ठरत नाही. उलट त्यामुळे निश्चितपणा अधिक येतो. हे पर्याय वाचन विचारासाठी येथे मांडत आहे.

पहिल्या ओळीच्या पूर्वार्ध चरणातील यानंतरची जी अक्षरे स्पष्ट आहेत ती पुढीलप्रमाणेः——

**'सप्तर्षय उत्तरासू········ष्ट्यंशकोने ३८०'**

माझ्या जवळील ठशात 'शकोने' ही अक्षरे स्पष्ट आहेत. या अक्षरांचे वाचन 'शकानां' असे करण्याचा मोह होतो. पण ते बरोबर नाही. 'न' या अक्षराच्या दंडाच्या वर उजवीकडे आकाराची रेषा मुळीच नाही. याच्या उलट, ती डाव्या बाजूला स्पष्ट आहे. अर्थात, ते अक्षर ने असे आहे. तसेच त्यापूर्वीच्या 'क' अक्षराच्या दंडाला वर उजवीकडे जशी आडवी रेषा आहे तशीच ती डाव्या बाजूलाही स्पष्ट आहे. म्हणजे, ते अक्षर को असे आहे. त्यामुळे ही दोन्ही अक्षरे मिळून 'कोने' असे वाचन केले पाहिजे. त्यामागील अक्षर 'श' हे अगदी स्पष्ट आहे आणि त्यापूर्वीच्या अक्षराचा मागचा काही भाग नष्ट झालेला असला तरी मूळ अक्षर 'ष' असून त्याला प्रथम 'ट' आणि त्याखाली 'य' जोडलेला असावा असे दिसते. त्यामुळे ते 'ष्ट्य' असे वाचता येईल. म्हणजे 'ष्ट्यशकोने' अशी अक्षरे होतील, 'ष्ट्य' हा ज्या शब्दांच्या संधीत येऊ शकेल असे शब्द 'अष्टि' व 'षष्टि' (+ 'अंश') हे संभवतात. त्यामुळे हे शब्द 'अष्ट्य(ष्ट्यं)शकोने' अथवा 'षष्ट्यंशकोने'

असे वाचले पाहिजेत. त्यापूर्वी आणखी दोन अक्षरे तरी असावी. पैकी पहिले अक्षर 'प' आणि त्यानंतर 'रि' हे अक्षर असावे. छायाचित्रात उजव्या बाजूच्या वरच्या भागात उभ्या दंडाचा अवशिष्ट भाग असून त्याला इकाराचे चिन्ह जोडलेले दिसून येते. त्यामुळे हे अक्षर 'रि' असे असावे. हे लक्षात घेता हे वाक्य पुढीलप्रमाणे वाचता येऊ शकेलः—

**'सप्तर्षय उत्तरासू(सु+उ)परि अष्ट्यंशकोने** (अथवा **'षष्ट्यंशकोने'**) **३८०'**

आता मुख्य प्रश्न, या वाक्याचा अर्थ कसा लावावयाचा? या वाक्यापूर्वी उल्लेखिलेल्या 'वृत्त' शब्दाच्या निर्देशावरून ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने जसे या सरोवराचे स्थान सांगितले असावेसे वाटते, तसेच प्रस्तुत वाक्यात ज्योतिष-शास्त्रदृष्टचा हे सरोवर बांधण्याचा काळ सांगितलेला असावा, असे वाटते. हा काळ कोणता? तर सप्तर्षी 'उत्तरा'मध्ये म्हणजे 'उत्तरा' नक्षत्रात (–वर किंवा वरून) १/१६ किंवा १/६० वा अंश चालून गेल्यानंतर येणाऱ्या ३८० या काळात (अस्मिन् काले) हे सरोवर बांधले गेले, असा याचा अर्थ होतो.

**बृहत्संहिता आणि सप्तर्षि-परिभ्रमण**

आता प्रश्न असा की, सप्तर्षी उत्तरा नक्षत्रात कोणत्या काळात होते? यासंबंधीचा विचार करीत असताना, सप्तर्षींच्या कालगणनेकडे लक्ष दिले पाहिजे. प्राचीन काळी 'सप्तर्षी संवत' सुरू होते हे प्राचीन इतिहासाच्या अभ्यासकांस माहीत असेलच. श्री. गौरीशंकर ओझा यांनी 'भारतीय प्राचीन लिपिमाला' या आपल्या ग्रंथात १५९ पृष्ठावर आणि श्री. गणेश हरी खरे यांनी 'संशोधकाचा मित्र' (पहिला भाग) या आपल्या ग्रंथात ११७ व्या पृष्ठावर याचे वर्णन केलेले आहे. वृद्धगर्ग मुनीच्या मतानुसार वराहमिहिर या ज्योतिषाने आपल्या 'बृहत्संहिते'त असे वर्णन केले आहे की, सप्तर्षी हे निरनिराळ्या नक्षत्रांतून २७०० वर्षांमध्ये एक परिभ्रमण पूर्ण करतात. प्रत्येक नक्षत्रात ते शंभर-शंभर वर्षे राहतात. 'बृहत्संहिते'त यासंबंधी पुढील श्लोक आहेतः—

आसन्मघासु मुनयः शासति पृथ्वीं युधिष्ठिरे नृपतौ ।
षड्द्विकपंचद्वियुतः शककालस्तस्य राज्ञश्च ।।
एकैकस्मिनृक्षे शतं शतं ते चरन्ति वर्षाणाम् ।
प्रागुदयतोप्यविवरादृजून्नयति तत्र संयुक्ताः ।।

(अ. १३–३, ४)

यावरून दिसून येईल की, युधिष्ठिर राजा राज्य करीत असताना सप्तर्षी मघा नक्षत्रात होते. त्या राजाचा शककाळ २५२६ ने युक्त होता; म्हणजे शककाळात २५२६ मिळविले असता युधिष्ठिर शकाचा गतकाळ काढता येतो (श्लोक ३). प्रत्येक नक्षत्रात ते (सप्तर्षी) शंभर शंभर वर्षे भ्रमण करतात. ज्या नक्षत्राच्या पूर्व दिशेला उदय झाल्यानंतर सप्तर्षी-मंडळ स्पष्ट दिसून येते त्या नक्षत्रात ते आहेत, असे समजले पाहिजे (श्लोक ४). प्राचीन काळी काश्मीरमध्ये सप्तर्षी-संवताचा प्रचार होता. कल्हणाने आपल्या राजतरंगिणीत 'बृहत्संहिते'तील 'आसन्मघासु मुनयः' हीच आर्या दिलेली आहे. यावरून निरनिराळ्या नक्षत्रांत सप्तर्षी भ्रमण करतात, आणि युधिष्ठिर शकाच्या आरंभी ते मघा नक्षत्रात होते हे कळते. याच्या अनुषंगाने प्रस्तुत शिलालेखातील वाक्याचा अर्थ लावला पाहिजे.

### अ(ष)ष्ट्यंशकोने

या शिलालेखात उल्लेखिल्याप्रमाणे ज्या काळी 'सुदर्शन' सरोवर बांधले गेले त्याकाळी सप्तर्षी उत्तरा नक्षत्रात १/१६ किंवा १/६० अंश चालून गेले होते. तेव्हा मुख्य प्रश्न असा की, सप्तर्षी उत्तरा नक्षत्रात कोणत्या काळात असणे शक्य आहे? युधिष्ठिर शकाच्या आरंभी ते मघा नक्षत्रात होते. प्रत्येक नक्षत्रात ते शंभर वर्षे राहतात, हे लक्षात घेऊन असे म्हणता येईल की, युधिष्ठिर शक १ ते १०० या वर्षी सप्तर्षी मघा नक्षत्रात होते, १०१ ते २०० ते त्यापुढील पूर्वा नक्षत्रात होते, आणि २०१ ते ३०० मध्ये ते उत्तरा नक्षत्रात होते. एक परिभ्रमण पूर्ण करून युधिष्ठिर शक २९०० मध्ये सप्तर्षी पुन्हा उत्तरा नक्षत्रात आले असतील व तेथे ते १०० वर्षांपर्यंत म्हणजे युधिष्ठिर शक ३००० पर्यंत भ्रमण करीत राहिले असतील. युधिष्ठिर शकाच्या प्रारंभानंतर २५२६ वर्षांनी शालिवाहन शक सुरू झालेला असल्यामुळे ही वर्षे यातून वजा करावी, म्हणजे सप्तर्षी पुन्हा उत्तरा नक्षत्रात शक काळात केव्हा होते हे कळेल. २९००–२५२६=शके ३७४ ते ३०००–२५२६=शके ४७४. अर्थात, शके ३७४ ते ४७४ मध्ये सप्तर्षी उत्तरा नक्षत्रात होते असे दिसून येईल. या अनुरोधाने पाहता शिलालेखातील आकडा ३८० असा वाचला पाहिजे हे स्पष्ट होईल. यावेळी सप्तर्षी उत्तरा नक्षत्रात १/१६ किंवा १/६० अंश चालून गेले होते. एवढा काल क्रमण करण्यास सप्तर्षींना ६ वर्षे लागली असावीत. यावरून या शिलालेखातील ज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने उल्लेखिलेला काळ हा शालिवाहन शके ३८० असा निश्चित करण्यास काही हरकत नाही.

हा काळ आणखी एका रीतीने तपासून पाहणे शक्य आहे. एखाद्या वर्षी सप्तर्षी कोणत्या नक्षत्रात होते हे शोधून काढण्याचे गणित 'बृहत्संहिते'-वर संस्कृत टीका लिहिणारा प्रसिद्ध ज्योतिषी 'भट्टोत्पल' याने आपल्या 'विवृत्ति' नामक टीकेत दिले आहे. (अ. १३-३, पं. सुधाकर द्विवेदी प्रत). त्याचा सारांश असा :—'शकपूर्व युधिष्ठिर काळात, म्हणजे २५२६ मध्ये इष्ट वर्ष (शककाल) मिळवावे, त्याला १०० ने भागावे. जो भागाकार येईल तितकी 'मघा' पासूनची नक्षत्रे गत समजावी. त्यापुढील नक्षत्रात त्यावर्षी सप्तर्षी भ्रमण करीत असतात. भागाकारानंतर जी बाकी उरेल तितकी वर्षे त्या विद्यमान नक्षत्रातील भुक्त वर्षे होत.' या गणितानुसार शिलालेखातील काळ आपण तपासून पाहू. शिलालेखातील काळाचा आकडा १८० आहे असे मानले तर २५२६+१८०=२७०६÷१००=२७ गत नक्षत्रे; त्यापुढील नक्षत्रात सप्तर्षी होते. मघापासून २७ वे नक्षत्र आश्लेषा; त्यापुढील नक्षत्र मघा होय. अर्थात, शके १८० मध्ये सप्तर्षी मघा नक्षत्रात होते व त्यावेळी त्याची ६ वर्षे भुक्त होती. शिलालेखातील उत्तरा नक्षत्राच्या उल्लेखाला हा काळ जमत नाही, तेव्हा तो बरोबर नाही. याच पद्धतीने गणित केले म्हणजे शके २८० मध्ये सप्तर्षी पूर्वा नक्षत्रात, आणि शके ३८० मध्ये ते उत्तरा नक्षत्रात असून त्यावेळी त्यांची ६ वर्षे भुक्त झाली होती, म्हणजे उत्तरा नक्षत्रात प्रवेश करून त्यांना सहा वर्षे झाली होती असे दिसून येते. तेव्हा शिलालेखातील आकडा शालिवाहन शक ३८० असा निश्चित करण्याला हरकत नाही. याच गणिताच्या अनुषंगाने शिलालेखातील '(ष)ष्ट्यंशकोने' या शब्दांचा विचार केला पाहिजे. तदनुसार माझ्या दृष्टीने त्याचा पुढीलप्रमाणे विचार करता येईल. 'षष्ट्यंशक' म्हणजे एकंदर अंशांचा साठावा भाग. आकाश-वर्तुलाचे एकूण ३६० अंश कल्पिलेले आहेत. त्यांचा साठावा भाग म्हणजे ६. अंकनिर्देशाच्या परिभाषेत हा ६ आकडा या ठिकाणी सांगितलेला असावा. ही सहा वर्षे सप्तर्षींच्या उत्तरा नक्षत्रातील परिभ्रमणात 'ऊन' म्हणजे कमी झाल्यावर, म्हणजे तेथे त्यांची सहा वर्षे निघून गेल्यावर येणाऱ्या शककाल ३८० मध्ये या सरोवराची प्रतिष्ठापना करण्यात आली.

पण यापेक्षा '(अ)ष्ट्यंशकोने' असे वाचन करणे अधिक समर्पक होईल. अष्टिः=१६, अष्ट्यंशक=१/१६ अंश. आकाशगोलाचे एकूण ३६० कोन कल्पिले आहेत. यांतून २७ नक्षत्रे भ्रमण करतात. एकेका नक्षत्राचा विभाग १३ अंश+२० कला असा आहे. सप्तर्षी उत्तरा नक्षत्रातून १/१६ अंश चालून गेले, याचा अर्थ उत्तरा नक्षत्राच्या १३ अंश+२० कला यांचा १/१६ भाग चालून गेले.

इतका भाग चालून जाण्यास त्यांना किती काळ लागेल? १३ अंश+२० कला=८०० कला (एक अंश=६० कला) चालून जाण्यास १०० वर्षे लागतात, तर त्याचा १६ वा भाग म्हणजे ५० कला चालून जाण्यास किती वर्षे लागतील? अर्थात, ६ वर्षे ३ महिने. पूर्वी आपण पाहिले की, सप्तर्षींचे भ्रमण उत्तरा नक्षत्रात शके ३७४ मध्ये सुरू झाले. 'सुदर्शन' सरोवर बांधले त्यावेळी सप्तर्षी उत्तरा नक्षत्राचा १/१६ वा अंश ६ वर्षे ३ महिन्यात चालून गेले. तेव्हा ३७४+६ वर्षे, ३ महिने=शके ३८० मध्ये तीन महिन्यांनंतर बांधकाम पूर्ण झाले. यावरून शिलालेखात उल्लेखिलेला ३८० हा आकडा बरोबर असून तो शककाळाचा निदर्शक आहे, हे स्पष्ट होईल. निश्चित बोलायचे म्हणजे शके ३८० ज्येष्ठ महिना, हा या शिलालेखाचा काळ ठरतो.

यावरून एक कल्पना मनात आली ती येथे नमूद करून ठेवतो. 'सप्तर्षिचारा' च्या अध्यायात (बृहत्संहिता, *अध्याय* १३) पहिल्या श्लोकात वराहमिहिराने, सप्तर्षींनी सुशोभित दिसणाऱ्या कौबेरी म्हणजे उत्तर दिशेचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे:—

'सैकावलीव राजति ससितोत्पलमालिनी सहासेव।
नाथवतीव च दिग्यैः कौबेरी सप्तभिर्मुनिभिः ॥'

त्यानंतरचा श्लोक पुढीलप्रमाणे—

'ध्रुवनायकोपदेशान्नरिनर्तीवोत्तरां भ्रमद्भिश्च।
यैश्चारमहं तेषां कथयिष्ये वृद्धगर्गमतात् ॥'

या श्लोकाचा अर्थ बहुतेक टीकाकारांनी असा केला आहे की, आपला नायक जो ध्रुव त्याच्या उपदेशानुसार भ्रमण करणाऱ्या या सप्तर्षींमुळे उत्तरा (= उत्तर दिशा) जणू वारंवार नाचत आहे. त्याचे भ्रमण मी आता वर्णन करतो. यातील 'उत्तरा' शब्द 'उत्तर' दिशेचा वाचक नसून उत्तरा नक्षत्राचा वाचक असावा. वराहमिहिराचा जन्मशक कै. शं. बा. दीक्षित यांनी शके ४०७ आणि 'बृहत्संहिते'चा लेखनकाल सुमारे शके ४२७ असा ठरविला आहे. आपल्या ग्रंथातील गणितास त्याने आरंभ वर्ष ४२७ घेतले आहे. यावेळी सप्तर्षी उत्तरा नक्षत्रात होते. त्यावरून असे वाटते की, या श्लोकात वराहमिहिराने आपल्या काळातील सप्तर्षींची उत्तरा नक्षत्रातील स्थिती वर्णन केली असावी; आणि ती तशी कशावरून, हे स्पष्ट करण्यासाठी युधिष्ठिर–काळी

सप्तर्षी मघा नक्षत्रात होते हे सांगून नंतर एखाद्या वर्षी सप्तर्षी कोणत्या नक्षत्रात होते हे काढण्याचे गणित दिले असावे.

### नक्षत्रतारकादिकांच्या द्वारा कालनिर्देश

प्रस्तुत शिलालेखातील नक्षत्रतारकादिकांच्या द्वारा कालनिर्देश करण्याच्या स्वरूपासंबंधी असा प्रश्न विचारला जाण्याचा संभव आहे की, अशा रीतीने कालनिर्देश करण्याची पद्धती पूर्वी होती काय? या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर शोधणे आवश्यक आहे. प्रथम एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की, अन्यत्र असे उल्लेख असोत किंवा नसोत, प्रस्तुत शिलालेखात मात्र या पद्धतीने उल्लेख केलेला आहे हे निश्चित. एरवी 'सप्तर्षय उत्तरासु.....षष्ट्यंश-कोने' इत्यादि शब्दांचा समाधानकारक अर्थ लागू शकत नाही. शिलालेख–ताम्रपटांत शक-संवत्सराबरोबर मास, तिथी, नक्षत्र, चंद्रग्रहण किंवा सूर्यग्रहणा-दिकांसारखे पर्वकाल निर्देशिलेले नेहमीच आढळतात.[1] प्रस्तुत शिलालेखात संवत्सर, मास, तिथी, वार नाही. फक्त सप्तर्षींच्या उत्तरा नक्षत्रातील अव-स्थानाच्या अनुरोधाने (शक)काल दिलेला आहे. नक्षत्रतारकादिकांच्या द्वारा कालनिर्देश करण्याची अशी पद्धती काही जैन ग्रंथांत आढळते. 'षट्-खंडागम' ग्रंथावरील 'जयधवला' टीकेचा समाप्तिलेख[2] अशाच पद्धतीने दिलेला

---

१. उदाहरणार्थ पुढील काही निर्देश पाहा:—(अ) '...वर्षे त्रियुत्तर–शते' १००+३, वैशाखशुद्धे पंचम धत्ये (ण्य?) तिथौ रोहिणी नक्षत्रमुहुर्ते....' (गुंडा येथील शिलालेख,–ए. इं., पु. २६), (आ) 'संवत् ३००+८०+६ ज्येष्ठ मासे शुक्लपक्षे प्रतिपदि १ [रो]हिणी नक्षत्रयुक्ते चन्द्रमसि मुहुर्ते प्रशस्तेऽभिजिति ....' (चांगुनारायण स्तंभलेख. इं. ॲंटि., पु. ९., पृ. १६३), (इ) 'स्वस्ति श्री शकवर्षे ११३६ श्रीमुखसंवत्सरे चैत्रे सूर्यपर्वणि सोमदिने श्रीमद्देवगिरावधिष्ठित– (खिद्रापूर शिलालेख).

२. अठतीसम्हि सतसए विक्कमरायंकिए सु–सगणामे।
वासे सुतेरसीए भाणु-विलग्गे धवल-पक्खे ।।
जगतुंगदेवरज्जे रियम्हि कुंभम्हि राहुणा कोणे।
सूरे तुलाए संते गुरुम्हि कुलविल्लए होंते ।।
चावम्हि तरणि-वुत्ते सिंघे सुक्कम्मि मीणे चंदम्मि।
कत्तिय-मासे एसा टीका हु समाणिआ धवला ।।
(षट्खंडागमकी प्रस्तावना–प्रो. हीरालाल जैन, पृ. ४३–४५ पाहा.)

आहे. दुसरा उल्लेख 'लोकविभाग' नामक ग्रंथात आढळतो.[१] योगायोग असा की, या दुसऱ्या उल्लेखातील नक्षत्रग्रहादिकांची स्थिती नेमकी शककाल ३८० मधली,[२] म्हणजे वाकाटकांच्या प्रस्तुत शिलालेखाच्या शकातील आहे. या दोन्ही जैन ग्रंथांत नक्षत्र–ग्रह–स्थितीचे तपशीलवार वर्णन आढळून येते.

### वाचन

१. ...[ मध्यग* ]तस्य त्रि(वृ)[३]त्तस्य वृ[४] २० सप्तर्षय उत्तरासू...
...[ अ * ]ष्टय(ष्ट्यं) शकोने ३८० वाकाटकानां श्रीदेवा(व)–
सेनस्य
२. राज्ञः आज्ञा [ करे * ] ण स्वामिल्लदेवेन आर्य्येण अस्मिन्काले
[ प्र ] तिष्ठापितं नाम्ना सुदर्शनं सरः सर्व्वसत्वहि–
३. ताय [ । * ] चतुर्य्युगानां परिवर्त्तनानि शशाङ्कसूर्य्यौ प्रि(पृ)थिवी
च या [ व ] त्तावम्ममेदं भगवत्प्रसादं सत्कीर्त्तनं सर्व्वजनोपभो–
[ ग्यम् ।। * ][५]
४. बप्पकेकर्म्मोपदेष्टा ।[६]

---

१. वैश्वेस्थिते रविसुते वृषभे च जीवे ।
राजोत्तरेषु सितपक्षमुपेत्य चंद्रे ।।
ग्रामे च पाटलिकनामनि पाण्डचराष्ट्रे ।
शास्त्रं पुरा लिखितवान् मुनिसर्वनन्दिः ।।
२. संवत्सरे तु द्राविंशे कांचीशसिंहवर्मण :
अशीत्यग्रे शकाब्दानां सिध्दमेतच्छतत्रये ।। (सदर)
३. 'तस्य त्रि' ही अक्षरे छायाचित्रातून वाचली आहेत.
४. या अक्षरावरील भाग थोडा फुटला असल्यामुळे तो शिरोरेषेसारखा वाटतो, पण तसा तो नाही. हे अक्षर ध्रु असेही वाचता येणे शक्य आहे.
५. 'भोग्यम्' ही अक्षरे, जागा नसल्यामुळे ओळीच्या शेवटी खाली कोरलेली आहेत. त्यांपैकी 'भो' हे अक्षर, वरील 'नो' अक्षराला जोडलेले दिसत असले तरी ते स्वतंत्र व स्पष्ट आहे. शिळा फुटल्यामुळे पुढील अक्षरे नष्ट झाली आहेत.
६. ही ओळ मध्यभागी असून तिच्या भोवती चौकट कोरलेली आहे. ओळीतील पहिल्या क वर म सारखे दिसणारे चिन्ह 'जिव्हामूलीया'चे होय. 'बप्पकः कर्म्मोपदेष्टा'—असे वाचावे.

# ४

## द्वितीय प्रवरसेन याचा पौनी ताम्रपट

### उपलब्धी

पौनी (तालुका व जिल्हा भंडारा) गावाच्या परिसरात सुमारे मार्च १९६७ मध्ये विटांच्या कामासाठी माती खोदत असताना तेथील एक सद्‌गृहस्थ श्री. रामचंद्र नारायण वाकडीकर यांना हा ताम्रपट मिळाला. पौनी येथील विकास विद्यालयाचे मुख्याध्यापक श्री. वामन गणेश घोडवैद्य यांच्या सौजन्यपूर्वक मध्यस्थीने तो मला मिळाला. नागपूर येथील मध्यवर्ती संग्रहालयाचे अभिरक्षक (क्यूरेटर) यांनी तो स्वच्छ करून दिला, आणि शासकीय मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री. श्री. र. देसाई यांनी त्याचे उत्कृष्ट ठसे काढून दिले. या सर्वांचा आणि विशेषत: महाराष्ट्र राज्याच्या पुरातत्त्व व पुराभिलेख विभागाचे संचालक डॉ. मो. गं. दीक्षित यांचा, त्यांनी हा ताम्रपट संपादन करण्याची अनुमती दिल्याबद्दल मी फार आभारी आहे. गुरुवर्य डॉ. वा. वि. मिराशी व श्री. लक्ष्मीनारायण राव यांनी केलेल्या मार्गदर्शनाबद्दल त्यांचाही मी ऋणी आहे. मूळ ताम्रपटावरूनच त्याचे या ठिकाणी मी संपादन करीत आहे.

### वर्णन

या ताम्रपटाचे एकूण चार पत्रे असून तो मिळाला त्यावेळी हे चारही पत्रे एका कडीत ओवलेले होते व त्या कडीला मुद्रा जोडलेली होती. श्री. वाकडीकर यांनी कडी तोडून पत्रे व मुद्रा वेगळी केली. त्यांच्याजवळची ती कडी हरवली. मुद्रा आहे. ताम्रपट स्वच्छ करण्यासाठी त्यांनी तो एका सोनाराजवळ दिला होता. त्याने तो विस्तवात टाकल्यामुळे दुसऱ्या व तिसऱ्या पत्र्यांचा काही भाग दुर्दैवाने खराब झालेला आहे. काही अक्षरे दुर्वाच्य झाली असली तरी एकंदरीत फारसे नुकसान झालेले नाही. संपूर्ण ताम्रपट व मुद्रा स्वच्छ वाचता येतात.

ताम्रपटाच्या प्रत्येक पत्र्याची लांबी सुमारे १६.५ सेंटिमीटर असून पहिल्या तीन पत्र्यांची रुंदी ८.७ तर चौथ्या पत्र्याची रुंदी ९ सेंटिमीटर आहे. चारही पत्र्यांचे वजन १ किलो ४० ग्राम, आणि मुद्रेचे वज़न ९० ग्राम आहे. मुद्रेसहित संपूर्ण

ताम्रपटाचे वजन एकूण १ किलो १३० ग्राम असल्याचे दिसून येईल. प्रत्येक पत्र्याला डावीकडील बाजूपासून ३.४ सें. मी. अंतरावर पत्रे कडीत ओवता येण्यासाठी एक वर्तुलाकार छिद्र आहे. छिद्राचा व्यास १ सें. मी. आहे. अक्षरांचे संरक्षण व्हावे म्हणून, एरवी आढळतात त्याप्रमाणे पत्र्यांच्या कडा उंच केलेल्या नाहीत. पहिल्या व चौथ्या पत्र्याच्या एका बाजूवर आणि दुसऱ्या व तिसऱ्या पत्र्याच्या दोन्ही बाजूंवर लेख कोरलेला आहे. अक्षरे खोल व ठसठशीत कोरलेली असून प्रत्येक अक्षराची उंची साधारणपणे १ सेंटिमीटर आहे. प्रत्येक पत्र्यावर सात ओळी आहेत. एकूण संपूर्ण लेख ४२ ओळींचा आहे. प्रस्तुत ताम्रपटाची मुद्रा वर्तुळाकार असून तिचा व्यास ७.५ सेंटिमीटर आहे.

**अक्षरवटिका**

लेख पेटिकाशीर्षक ब्राम्ही लिपीत लिहिलेला आहे. वाकाटकांचे शिलालेख व ताम्रपटलेख ब्राम्ही लिपीत असून तिचे सामान्यतः तीन प्रकार आढळतात. (१) शीर्षविरहित, (२) कीलशीर्षक – Nail–headed, आणि (३) पेटिका-शीर्षक – Box–headed . दाक्षिणात्य पद्धतीच्या ब्राम्ही लिपीत अक्षरांवर सामान्यतः शिरोरेषा असतात. वाशिम शाखेतील वाकाटक नृपती देवसेन याच्या हिस्से बोराळा शिलालेखातील अक्षरांवर शिरोरेषा आढळत नाहीत. शिरोरेषेच्या ऐवजी अक्षरांवर खाली टोक आलेला नखाकृती त्रिकोण जोडण्यात येऊ लागला. हा प्रकार 'कीलशीर्षक'– Nail–headed म्हणून संबोधतात. प्रभावती गुप्ता हिचा पुणे ताम्रपट या प्रकारच्या लिपीत कोरलेला आहे. अक्षरांच्या शिरोभागी त्रिकोणाऐवजी एक चौकोन कोरण्यात येतो. हा चौकोन छोटया पेटीप्रमाणे दिसतो म्हणून त्या प्रकाराला 'पेटिकाशीर्षक' म्हणतात. वाकाटक नृपतींचे बहुतेक कोरीव लेख या प्रकारच्या लिपीत कोरलेले आढळतात. प्रस्तुत पौनी ताम्रपटाची लिपीही पेटिकाशीर्षक प्रकारची आहे.

या पेटिकाशीर्षक प्रकारच्या लिपीतील काही अक्षरांच्या शिरोभागी पेटिका आढळत नाहीत. कारण शिरोभागी पेटिका कोरण्यासाठी आवश्यक तो दंड त्या अक्षरांना नसतो. उदा. **ज**–ओ. १, ३, ५ इत्यादी ; **ल**–५, ६, १८, २९ इ.; **ब**–२, १९, २४, २८ इ. ; **ख**–३०. पेटिका कोरताना काही ठिकाणी त्या पूर्ण कोरल्या नाहीत. उदा. सं**चा**रि–२२ शब्दातील **चा** अक्षराच्या पेटिकेतील खालची रेषा कोरण्याचे राहून गेले आहे. 'अ**चा**रासन', '**चा**तुर्वैद्य' इत्यादी शब्दांतील **चा** अक्षराशी ताडून पाहा. इकार सामान्यत. अक्षरावर अर्धवर्तुळ किंवा वर्तुळ कोरून दाखविलेला आहे. दीर्घ ईकारासाठी इकाराच्या वर्तुळात एक रेषा कोरलेली

आढळते. उदा. भागीरथ्या–६, श्री–८, १३, १५ ; बी–१३; ती–४१ इत्यादी. व्यंजनांवर पेटिका न कोरता हलन्त व्यंजन दाखवीत असत. उदा. म्–ओ. ४२, त्–ओ. २१ पाहा.

कोरकाकडून काही चुका झाल्या आहेत. उदा. ओळ १ मधील हलन्त त् कोरताना उभी रेषा कोरण्याचे चुकून राहून गेले असावे. ३१ व्या ओळीच्या शेवटी कं अक्षर कोरायचे होते. त्यातील उभा दंड व पेटिका कोरण्याचे असेच राहून गेले. 'परदत्तां'–ओ. ३७ मधील त्ता वर कोरावयाचा अनुस्वार चुकून पुढील वा वर कोरला गेला आहे. 'औपमन्यव'–२० शब्दातील न्य च्या जागी ण्य अक्षर कोरले गेले आहे. सामान्यतः विरामचिन्हे उभ्या दंडाने दाखवितात, ओ. ४२ पाहा. क्वचित त्यासाठी विसर्ग कोरतात. क्वचित ही विरामचिन्हे चुकीने कोरली आहेत. लेखाच्या वाचनात ती सूचित केली आहेत. कोरताना क्वचित अनवधानाने काही विसर्ग व अक्षरे गळाली आहेत. उदा. ओ. ६, १६, २३, २८, २९, ३३, ३८ पाहा. तीही वाचनात सूचित केलेली आहेत.

## भाषा

ताम्रपटावरील लेख संस्कृत भाषेत असून ३७ ते ४० या ओळींतील शापाशीर्वादात्मक दोन श्लोकांखेरीज सर्व मजकूर गद्यात आहे. मुद्रेवरील लेख पद्यात आहे. सर्वसाधारणतः लेखाची भाषा शुद्ध आहे. 'भूमेर्न्निवर्त्तनानि पञ्चाशा(श)त् दत्ताः' हे रूप चुकीचे आहे. 'दत्तानि' असे पाहिजे होते. वाकाटकांच्या इतर काही ताम्रपटांत ते शुद्ध स्वरूपात योजले आहे, (उदा. वडगाव ताम्रपट. ओ. २०, २१). 'कारयीत' हे रूप अशुद्ध आहे असे डॉ. मिराशींचे मत आहे. पण ते आत्मनेपदी रूप मानल्यास शुद्ध समजण्याला हरकत नसावी. धीमत्व(त्त्व) ओ. १० ; सव्वाद्ध्य(ध्य)क्ष–ओ. २१ असे चुकीचे लेखनही आढळते. रेफाच्या नंतर आलेल्या व्यंजनांचे द्वित्व केलेले आहे. उदा. आप्तोर्य्याम–१ ; सत्यार्ज्जव, शौर्य्य–९; नैर्म्मल्य–११, °वृत्तेर्व्वाकाटकानां–१३ ; धर्म्म, ऐश्वर्य्य–२४ इत्यादी. याला काही अपवादही आढळतात. उदा. वर्ष–११, प्रसादोपार्जित–१४; इत्यादी.

## विषय

प्रस्तुत ताम्रपटावर दानपत्र कोरलेले आहे. दानपत्राचा आरंभ 'दृष्टं' या शब्दाने होतो. याचा अर्थ असा की, दानपत्र पूर्ण होऊन ते सचिवालयातील अधिकाऱ्यांनी पाहिले आणि नोंदले होते. हे दानपत्र वाकाटक महाराजाधिराज प्रवरसेन (द्वितीय) याने प्रवरपुराहून दिले होते. प्रवरपूर हे त्याच्या राजधानीचे स्थान होते.

आरंभी प्रवरसेनाची वंशावळ दिली आहे. तिचा आरंभ **प्रथम प्रवरसेन** याज-पासून होतो. त्याला 'सम्राट' हे विशेषण लावले आहे. तो विष्णुवृद्ध गोत्राचा असून त्याने अग्निष्टोम, आप्तोर्याम, उक्थ्य, षोडशी, अतिरात्र, वाजपेय, बृहस्पतिसव, साद्यस्क्र व चार अश्वमेध यज्ञ केले होते. (ओ. १–३) त्याच्यानंतर **रुद्रसेन** गादीवर बसला. त्याला केवळ 'महाराज' हे विशेषण लावले आहे. प्रथम प्रवरसेनाचा पुत्र आणि या रुद्रसेनाचा पिता **गौतमीपुत्र** हा वडिलांच्या हयातीत मृत्यू पावला म्हणून पौत्र रुद्रसेन याला गादी मिळाली. ४ ते ७ ओळींत त्याच्या मातृवंशाचे वर्णन केले आहे. रुद्रसेन हा भारशिव वंशातील महाराज भवनाग याच्या मुलीचा मुलगा होता. अर्थात, प्रथम प्रवरसेनाचा मुलगा गौतमीपुत्र याचा विवाह भवनाग नृपतीच्या मुलीशी झालेला होता. भारशिव वंशाचे राजे आपल्या खांद्यावर शिवलिंगाचा भार धारण करीत. खांद्यावर सतत शिवलिंग वाहून शंकराला अत्यंत संतुष्ट केल्यामुळे शिवकृपेने हा राजवंश निर्माण झाला होता. (म्हणूनच त्यांना भारशिव हे नाव पडले). त्यांनी आपल्या पराक्रमाने भागीरथीचे स्वच्छ पाणी प्राप्त करून घेऊन त्या पाण्याने स्वतःला मूर्धाभिषेक करून घेतला होता. दहा अश्वमेध यज्ञ करुन त्यांच्या समाप्तीच्या वेळी अवभृथ स्नान केले होते. अशा पराक्रमी शिवोपासक राजवंशातील भवनाग महाराजाचा नातू (मुलीचा मुलगा) महाराज रुद्रसेन हाही शिवोपासक होता. तो महाभैरवाचा भक्त होता. (ओ. ४–८) रुद्रसेनानंतर त्याचा पुत्र **पृथिवीसेन** गादीवर बसला. हाही शंकराचा परमभक्त होता. सत्य, आर्जव, कारुण्य, शौर्य, विक्रम, नय, विनय, माहात्म्य, धीमत्व (बुद्धिमत्ता), सत्पात्र व्यक्तींविषयी भक्ती, धर्मविजयित्व, मनोनैर्मल्य (मनाचा निर्मळपणा) इत्यादी गुणांनी तो संपन्न होता. शंभर वर्षपर्यंत सतत वाढत जाणारा द्रव्यसंग्रह आणि सैन्य त्याच्याजवळ होते. त्याला पुत्र आणि पौत्र होते. त्याची वृत्ती युधिष्ठिरासारखी होती. (ओ. ९–१२) पृथिवीसेनानंतर त्याचा मुलगा **द्वितीय रुद्रसेन** राज्य करु लागला. हा विष्णुभक्त असावा. कारण त्याला आपली कल्याणसमृद्धी भगवान चक्रपाणीच्या प्रसादाने प्राप्त झाली होती. (ओ. १३–१५) त्याचा विवाह महाराजाधिराज देवगुप्ताची कन्या प्रभावती गुप्ता हिच्याशी झाला होता. तिच्यापासून त्याला झालेल्या मुलाचे नाव **द्वितीय प्रवरसेन.** वडिलांच्या मृत्यूनंतर हा द्वितीय प्रवरसेन गादीवर बसला. हा शंकराचा परमभक्त होता. भगवान शंकराच्या प्रसादाने त्याने जणु नवीन कृतयुग निर्माण केले होते. (ओ.१५–१८)

येथे ज्या **देवगुप्त महाराजाधिराजाचा** निर्देश आलेला आहे तो सुप्रसिद्ध गुप्त सम्राट द्वितीय चंद्रगुप्त होय. साची येथील शिलालेखात त्याला 'देवराज' असे म्हटलेले आहे. देवराजाचाच उल्लेख प्रस्तुत ताम्रपटात 'देवगुप्त' असा केलेला

आहे. द्वितीय प्रवरसेनाच्या इतर ताम्रपटांतसुद्धा प्रभावती गुप्ताचे वडील म्हणून 'देवगुप्ता'चाच उल्लेख येतो. प्रभावती गुप्तेच्या पुणे ताम्रपटात मात्र या देवगुप्ताचा चंद्रगुप्त म्हणून स्पष्ट उल्लेख आहे. (एपि. इंडिका. पु. १५. पृ. ४०) गुप्त वंश आणि वाकाटक वंश यांतील हा शरीरसंबंध लक्षात घेण्यासारखा आहे. वाकाटक नृपती रुद्रसेन याला प्रभावती गुप्तापासून दिवाकरसेन आणि प्रवरसेन अशी दोन मुले झाली होती असे उदयपूर ताम्रपटावरून दिसून येते. दिवाकरसेन लहान असतानाच गादीवर बसला असावा व त्याच्या बालवयात त्याची आई प्रभावती गुप्ता राज्यकारभार पाहात असावी असे अनुमान तिने दिलेल्या पुणे ताम्रपटावरून करता येते. दिवाकरसेनाच्या मृत्यूनंतर वाकाटकांची गादी त्याचा धाकटा भाऊ द्वितीय प्रवरसेनाला मिळाली. त्यानेच प्रस्तुत ताम्रपटावरील दान दिलेले आहे.

## उद्देश

प्रस्तुत ताम्रपटाचा उद्देश द्वितीय प्रवरसेनाने दुर्गार्य्य नावाच्या ब्राम्हणाला दिलेले दान नोंदण्याचा आहे. हा दुर्गार्य्य बहृच म्हणजे ऋग्वेदात पारंगत[१] असून तो औपमन्यव गोत्रातील होता. तो बहुधा अचलपूर येथील राहणारा असावा. कारण, त्याला दुसऱ्या कोणत्यातरी भूमीच्या बदलात शासनाने ठरविलेल्या मानदंडाने अचलपूर येथील ५० निवर्तने जागा त्यावरील घरांदारांसह देण्यात आलेली आहे.

## स्थल निश्चिती

मूळ ताम्रपटात 'अचलपुक'––ओ. १९, असा गावाच्या नावाचा उल्लेख आहे. तेथे 'अचलपुर' असा शब्द असावा असे वाटते. 'र' हे अक्षर कोरताना मध्यभागी आडवा दंड कोरलेला आहे, त्यामुळे ते अक्षर क असे झाले आहे. हा आडवा दंड चुकून कोरण्यात आला असावा असे वाटते. ३० व्या ओळीत 'सर्व्वविष्टिपरिहार'- या शब्दातील 'रि' व 'र' मधील र अक्षरालाही असाच आडवा दंड चुकून कोरलेला दिसतो. ३१ व्या ओळीतील शेवटचे अक्षर कं कोरताना तर उभा दंड कोरावयाचा राहून गेलेला आहे. कोरकाच्या या चुका लक्ष्यात घेता 'अचलपुर' शब्दातील र ला मध्ये आडवा दंड चुकून कोरला गेला असणे शक्य आहे. तेव्हा, मुळातील 'अचलपुक' हा शब्द 'अचलपुर' असा वाचणे इष्ट ठरेल. अचलपुक असे गाव आढळत नाही.

---

१ बहृच शब्दाच्या या अर्थाकडे माझे लक्ष वेधल्याबद्दल डॉ. अजयमित्र शास्त्री यांचा मी आभारी आहे.

**कृष्णालेशालि कटके**

कृष्णालेशालि **कटकात** असलेले हे अचलपुर म्हणजे अमरावती जिल्ह्यातील अचलपूर असून त्याच्या भोवतालच्या प्रदेशाला कृष्णालेशालि हे नाव असावे असे मी यापूर्वी मूळ लेखात म्हटले होते[१]. ते मत आता बदलले पाहिजे. डॉ. अजयमित्र शास्त्री यांनी आपल्या एका लेखात या प्रश्नाची चर्चा केली आहे.[२] त्यांच्या सूचनेनुसार ज्या विभागात हा ताम्रपट सापडला त्यालाच 'कृष्णाल शालि-कटक' हे नाव असावे. हा ताम्रपट भंडारा जिल्ह्यातील पौनी येथे माती खणत असताना सापडला. भंडारा जिल्हा हा 'शालि' म्हणजे तांदळासाठी आज प्रसिद्ध आहे तसाच तो पूर्वीही असावा. त्यावरून या विभागाला 'शालि+कटक' असे नाव पडले असावे. 'कृष्णालेशालि' शब्दाने त्या विभागातील 'कालीकामोत' या तांदळाच्या प्रकाराची आठवण होते. तेव्हा त्याच्याशी या शब्दाचा काही संबंध असावा असे ते सुचवितात. पण त्यापेक्षा 'कृष्णा' शब्दाचा संबंध 'कन्हान' नदीशी असावा ही त्यांची सूचना अधिक मान्य होण्यासारखी आहे. त्या अनुरोधाने विचार करता 'कृष्णाले शालिकटके' असे हे दोन शब्द कल्पावे. कृष्णाल (कृष्णा > कण्हा + स्वार्थे ल > न =. कन्हान) म्हणजे कन्हान नदीचा प्रदेश, खोरे. 'कृष्णाले' (सप्तमी) = कन्हान नदीच्या प्रदेशातील 'शालि-कटके' = तांदळाच्या विभागात असलेले 'अचलपुर' शहर असा अर्थ करणे अधिक इष्ट होईल.

**अचलपुर**

कन्हान नदीच्या प्रदेशात त्या काळी 'अचलपुर' नावाचे एक गाव होते असे दिसते. 'नगरधन' ताम्रपटात 'शूलनद्याः उत्तरतटे[ऽ*] चलपुराग्राहात्पश्चिमेन' असा अचलपुरचा उल्लेख आलेला आहे. नगरधनजवळच असलेली सूर नदी हीच त्या ताम्रपटातील **शूल नदी** असून तिच्या उत्तरेला जवळच कोठेतरी अचलपुर नावाचे गाव असावे. तेथे अग्रहार असल्याचे त्या ताम्रपटात निर्देशिलेले आहे. त्यावरून ते पवित्र स्थान असावे असे दिसते. प्रसिद्ध क्षेत्र रामटेकच्या परिसरात ते होते ही गोष्टसुद्धा सूचक होय. तेव्हा आपल्या या पौनी ताम्रपटातील अचलपुर हे अमरावती जिल्ह्यातील अचलपुर नसून नागपूर जिल्ह्यातील नगरधनजवळील अचलपूर असावे

---

१ विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक. १९६७, पृ. २६.
२ फ्रेश एपिग्राफिक एव्हिडन्स ऑन दि वाकाटकाज. (अप्रसिद्ध)

### प्रवरपुर

प्रस्तुत ताम्रपट 'प्रवरपुर' येथून दिलेला आहे. प्रवरपुर म्हणजे आजचे पवनार होय असे अनेक विद्वानांचे म्हणणे आहे. भाषाशास्त्रदृष्ट्या प्रवरपुर शब्दाचा अपभ्रंश पवनार असा होणे स्वाभाविक वाटत नाही. त्यामुळे हे मत समाधानकारक वाटत नाही. पवनार येथे सापडलेले प्राचीन शिल्प वाकाटककालीन असून तेथील गंगा भगवतीच्या मूर्तीवरील आणि एका पदकावरील अक्षराचे वळण वाकाटक-कालीन असावे असे दिसते, हे नमूद करणे अवश्य आहे.

### काल निश्चिती

प्रस्तुत ताम्रपट प्रवरसेनाच्या राज्यारोहणाच्या ३२ व्या वर्षी ज्येष्ठ कृष्ण तृतीयेला दिलेला आहे. (ओ. ४०-४१) यापूर्वी उपलब्ध झालेल्या द्वितीय प्रवरसेनाच्या ताम्रपटांत सर्वात अलीकडच्या म्हणजे पांढुर्णा ताम्रपटातील दान त्याने आपल्या राज्यारोहणाच्या २९ व्या वर्षी दिलेले असल्याचे निर्देशिलेले आहे. या पौनी ताम्रपटाच्या उपलब्धीमुळे त्याने कमीत कमी ३२ वर्षे तरी राज्य केले असावे असे स्पष्ट दिसते. या निर्देशामुळे हा ताम्रपट महत्त्वाचा ठरतो.

त्यावेळी प्रवरसेनाचा सेनापती माधप्प हा होता. पांढुर्णा ताम्रपटसुद्धा माधप्प हाच सेनापती असताना दिलेला होता असे त्यातील उल्लेखावरून दिसते.

#### वाचन

*पहिला पत्रा*

१. दृष्टं [।*] प्रवरपुरात्[1] [।*] अग्निष्टोमाप्तोर्य्यामोक्थ्य-
षोडश्यतिरात्रवाज-
२. पेयबृहस्पतिसवसाद्यस्कचतुरश्वमेधयाजिन[:*] व(वि)ष्णुवृद्ध[सगो]त्र-
३. स्य सम्राड्वाकाटकानां महाराजश्रीप्रवरसेनस्य [सूनोः] सूनोः
४. अत्यन्तस्वामिमहाभैरवभक्तस्य अंसभारसन्नि(न्नि)वेशितशि-
५. वलिङ्गोद्वहनशिवसुपरितुष्टसमुत्पादितराजवंशानां[ना]म्पराक्र-
६. माधिगतभागीरथ्यामलजलमूद्धना(र्द्धा)भिषिक्ताना(नां)
दशाश्वमेधाव[भृ*]थ-
७. स्नातानां भारशिवानां महाराजश्रीभवनागदौहित्रस्यः[2]

---

१ या अक्षराचा दंड कोरला गेला नाही.

२ हा विसर्ग अनावश्यक.

दुसरा पत्रा : पहिली बाजू

८. गौतमीपुत्रस्य पुत्रस्य वाकाटकाना(नां) महाराजश्रीरुद्रसेन–
९. स्य सूनो[:*] अत्यन्तमाहेश्वरस्य सत्यार्ज्जवकारुण्यशौर्य्यविक्रम–
१०. नयविनयमाहात्म्यधि(धी)मत्व(त्त्व)पात्रगतभक्तित्वधर्म्मविजयित्वम–
११. नोनैर्म्मल्यादिभिर्गुणैस्समुपेतस्य वर्षशतमभिव–
१२. र्द्धमानकोशदण्डसाधनसं(स)न्तानपुत्रपौत्रिणः युधिष्ठिरवृत्तेर्वा–
१३. काटकानां महाराजश्रीपृथिवीसेनस्य सूनोः भगवतश्चक्र–
१४. पाणे[:*] प्रसादोपार्जितः(त)श्रि(श्री)समुदयस्य वाकाटकानां

दुसरा पत्रा : दुसरी बाजू

१५. महाराजश्रीरुद्रसेनस्य सूनोः महाराजाधिराजश्रीदेवगु–
१६. प्तसुतायां प्रभावतिगुप्तायामुप(त्प)न्नस्य शम्भोऽप्रसादधृति(त)का–
१७. र्त्तयुगस्य वाकाटकानां(ना) म्परममाहेश्वरमहाराजश्रीप्र–
१८. वरसेनस्य वचनाः[1] [।*] कृष्णालेशालिकटके:[2] ऐहिकामु–
१९. ष्मिके धर्म्मस्थाने अचलपुके(रे) भूमिप्रतिवस्तुं बह्वृच औप–
२०. मण्य(न्य)वसगोत्रदुर्ग्गार्य्याय राजन्यमानेन भूमेर्न्निवर्तनानि
२१. पञ्चाशा(श)त् दत्ताः[3] सहनिवेशनेन। यतोस्मत्सन्तका–

तिसरा पत्रा : पहिली बाजू

२२. [4]कास्सर्व्वाद्ध्यक्षनियोगनियुक्ता आज्ञासञ्चारिकुलपुत्राधिकृता भ–
२३. टाच्छा(श्च्छा)त्राश्च विग्(श्रु)तपूर्व्वयाज्ञया ज्ञापयितव्याः[।*]
विदितमस्तु व[:*] य–
२४. थैहास्माभिरात्मनो धर्म्मायुर्ब्बलविजयैश्वर्य्यविवृद्धये इहामु–
२५. त्रहितार्त्थमात्मानुग्रहाय वैजयिके धर्म्मस्थाने अपूर्व्व–
२६. दत्त्या उदकपूर्व्वमतिसृष्टः[।।*] अथास्योचितां पूर्व्वराजानुमतां
२७. चातुर्व्वैद्यग्राममर्य्यादापरिहारात्थ(र्थ)ं कीर्त्तयामस्तद्यथा अकर–
२८. दायि अभटच्छ(च्छा)त्रप्रावेश्यः अपारंपरगोबलिबर्द्दः अ–

---

१ विसर्ग अनावश्यक. 'त्' या अक्षराऐवजी तो चुकोने कोरला गेला असावा. 'वचनात्' असे वाचावे.

२ विसर्ग अनावश्यक.

३ 'दत्तानि' असे वाचावे.

४ 'का' हे अक्षर येथे चुकीने पुन्हा कोरले गेले आहे. अनावश्यक.

*तिसरा पत्रा : दुसरी बाजू*

२९. [पु*]ष्पक्षीरस(सं)दोहः अचारासनचर्म्माङ्गारः अलवणक्लिन्व(ण्व)क्रे–
३०. णिखनकः सर्व्वविष्टिपरिहारपरिहृतः सनिधिः सोपनिधि[:*]
३१. सक्लिप्तोपक्लिप्त[:*][1] आचन्द्रादित्यकालीयः पुत्रपौत्रानुगामि[कं]
३२. भुञ्जता न केनचि [द्*] व्याघात [:*] कर्त्तव्यः [स]र्व्वक्रियाभिस्संरक्षित–
३३. व्य [:*] परिवर्द्धयितव्यश्च । यश्चास्मच्छासनमगणयमान [:*] स्वल्पामपि–
३४. परिबाधा[धां*] कुर्यात्कारयित वा[2] तस्य ब्राह्मणैर्व्वेदितस्य सदण्डं निग्रहं
३५. कुर्यामि [।*] अस्मि(स्मि)श्च धर्म्मादधिकरण(णे) अति(ती)तानेकराज–
दत्ता(त्त)संचिन्त–

*चौथा पत्रा*

३६. नपरिपालन(नं) कृतपुण्यानुकीर्त्तनपरिहारात्थँ न कीर्त्तयाम [:।*]
३७. व्यासगीतो(तौ) चात्र श्लोकौ प्रमाणि(णी)कर्त्तव्यौ । स्वदत्तां परदत्ता(त्तां)
व्वां(वा)
३८. यो हरेत वसुन्धरां (।*) गवं (वां) शतसह[स्र*]स्य हन्तुर्हरति
दुष्कृतं(तम्) [।।१।।*]
३९. षष्टि(ष्टि)वर्षसहस्राणि स्वर्ग्गे मोदति भूमिदः [।*] आच्छेत्ता
४०. चानुमन्ता च्च(च) तान्येव नरके वसेदिति (वसेत् [।।२।।*] इति ।)
संवत्सरे द्वात्रि(त्रिं)शे
४१ ३० २ ज्येष्ठमासकृष्णपक्षतृतीयायां सेनापतौ मा–
४२. धव्ये लिखितं शासनम् ।।

*मुद्रा*

वाकाटकललामस्य
क्रमप्राप्तनृपश्रिय[:।*]
राज्ञ[:*] प्रवरसेनस्य
शासनं रिपुशासनं(नम्)[।।*]

---

१ 'सक्लप्तोपक्लप्तः' असे वाचावे.

२ '–कारयेद्वा' असे वाचावे.

# ५

# द्वितीय पृथिवीषेणाचा माहुरझरी ताम्रपट

## प्रास्ताविक

बोरगाव (गिट्टीखदान, नागपूर) येथील लोकप्रिय विद्यालयाचे मुख्याध्यापक श्री. बोरकर यांच्या माहुरझरी येथील शेतात नांगरणी चालू असताना गेल्या जून १९७१ मध्ये हा ताम्रपट उपलब्ध झाला. नागपूर येथील केंद्रीय अबकारी खात्यातील कर्मचारी श्री. एस. बी. खापर्डे व तेथील अधीक्षक श्री. वि. मो. भोजराज यांच्या द्वारा त्यांनी तो नागपूर विद्यापीठातील प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती आणि पुरातत्त्व विभागाचे प्रमुख डॉ. शां. भा. देव यांच्या स्वाधीन केला. या विषयासंबंधी माझी जिज्ञासा लक्षात घेऊन त्यानी तो माझ्या निदर्शनास आणला. त्याचे वाचन करून मी त्यावर एक लहानसे टिपण नागपूर येथील 'तरुण भारत' दैनिकाच्या दिनांक २८ नोव्हेंबर १९७१ च्या अंकात प्रसिद्ध केले. असे कळते की, त्यानंतर नागपूर येथील जिल्हाधिकाऱ्यांनी तो ताम्रपट आपल्या ताब्यात घेतला. महाराष्ट्र शासनाच्या पुरातत्त्व व पुराभिलेख विभागाचे संचालक श्री. वि. गो. खोबरेकर यांनी माझ्या विनंतीवरून तो जिल्हाधिकाऱ्यांकडून घेऊन संपादनासाठी माझ्या स्वाधीन केला. वरील सर्व सद्गृहस्थांचा आणि विशेषतः पुरातत्त्व व पुराभिलेख विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई, यांचा मी अत्यंत आभारी आहे. विभागाचे संचालक श्री. खोबरेकर यांच्या परवानगीने मूळ ताम्रपटावरून त्याचे संपादन मी येथे करीत आहे.

माहुरझरी (ता. व जिल्हा नागपूर) हे गाव फार प्राचीन आहे. इ. स. पूर्व सुमारे एक हजार वर्षांपूर्वीच्या बृहदश्मयुगीन संस्कृतीची चिन्हे म्हणून समजली जाणारी शिळावर्तुळे तेथे अनेक आहेत. वाकाटक नृपतींच्या काळात माहुरझरी हे गाव फार प्रसिद्ध असले पाहिजे. तेथे इतस्ततः विखुरलेल्या विटा वाकाटककालीन असाव्यात असे डॉ. हंटर यांचे मत आहे.[1] त्यांना माहुरझरी येथे काही मुद्रा (सील्स) सापडल्या होत्या. त्यांतील एकीवर 'अमूपाद' किंवा 'अप्रमाद' ही अक्षरे वाकाटककालीन पेटिकाशीर्षक स्वरूपाच्या लिपीत आहेत. अलीकडे डॉ. अजयमित्र

---

१ शारदाश्रम वार्षिक, १९३३ (संपादक. य. खु. देशपांडे,) पृ. ३४.

शास्त्री यांना माहुरझरी येथे एक मुद्रा उपलब्ध झाली आहे.[1] तिच्यावर 'श्रीमाधवराज' ही अक्षरे कोरलेली असून ती वाकाटकांच्या ताम्रपटांत आढळणाऱ्या 'कीलशीर्षक' (nail-headed) लिपीच्या वळणाची आहेत. आणि आता माहुरझरी येथेच प्रस्तुत ताम्रपट उपलब्ध झाला आहे. तोही वाकाटक नृपतीचा आहे. यावरून वाकाटकांच्या काळात माहुरझरी गाव फार महत्त्वाचे म्हणून प्रसिद्ध असले पाहिजे याविषयी शंका राहात नाही.

**वर्णन**

या ताम्रपटाचे एकूण पाच पत्रे असून ते एका कडीत ओवलेले आहेत. कडीत ओवता येण्यासाठी प्रत्येक पत्राच्या डाव्या बाजूला सुमारे ४ सें. मी. अंतरावर एक गोल छिद्र आहे. छिद्राचा व्यास १.३ सें. मी. आहे. ज्या वर्तुळाकार कडीत हे पत्रे ओवलेले आहेत तिचा व्यास ८.६ सें. मी. असून कडीच्या सळाकीची जाडी ७ सें. मी. आहे. ही कडी सलग नसून तिची दोन्ही टोके एकमेकावर येऊन ती खिळ्याने पक्की केली आहेत. या कडीतच १.८ सें. मी. रुंद पट्याची २.८ सें. मी. व्यासाची दुसरी कडी ओवलेली आहे. तीही सलग नसून तिची दोन्ही टोके एक-मेकावर येऊन खिळ्याने जोडलेली आहेत. या कडीत बहुधा ताम्रपटाची मुद्रा जोडलेली असावी. ही मुद्रा आज उपलब्ध नाही. ताम्रपटाचा प्रत्येक पत्रा साधारणपणे तीन ते चार मिलिमीटर जाडीचा असून त्याची लांबी १८.३ सें. मी. व रुंदी १०.३ सें. मी. आहे. या प्रत्येक पट्याचे वजन सुमारे ३३५ ग्राम असून पाचही पट्यांचे वजन १.६९५ किलोग्राम आहे. लहान कडी, मोठी कडी आणि पाचही पत्रे मिळून संपूर्ण ताम्रपटाचे वजन, १.८०७ किलोग्राम असल्याचे दिसून येईल. ताम्रपटाचे सूक्ष्म निरीक्षण केल्यावर असे आढळते की, केव्हा तरी तो विस्तवात टाकला असावा. त्यामुळे बऱ्याच ठिकाणी डाग आलेले आहेत. या अग्निदिव्यातून हा ताम्रपट सुरक्षित राहिला ही परमेश्वरी कृपाच समजली पाहिजे.

ताम्रपटाच्या पहिल्या पट्याची वरची बाजू आणि पाचव्या पट्याची दुसरी बाजू कोरी आहे. या दोन्ही पट्यांच्या एकेका बाजूवर व बाकीच्या तिन्ही पट्यांच्या दोन्ही बाजूंवर लेखाचा मजकूर कोरलेला आहे. वर उल्लेखिलेल्या अग्निदिव्यामुळे विशेषतः तिसऱ्या पट्यावरील वरची बाजू बरीच खराब झालेली आढळते. या पट्याच्या मागील बाजूच्या काही भागाला, तसेच पाचव्या पट्यावरील वरच्या बाजूच्या उजवीकडील आणि खाली डावीकडील बाजूलाही या अग्निसंस्कारामुळे

---

१ जर्नल ऑफ न्यूमिस्मॅटिक सोसायटी, व्हॉ. ३४.

नुकसान पोचले आहे. त्यामुळे तेथील अक्षरे दुर्वाच्य झालेली आहेत. ताम्रपत्रांच्या कडा उंच केलेल्या नाहीत, तरी मजकूर सुरक्षित आहे. अर्थात, वर उल्लेखिलेल्या जागा अपवाद समजल्या पाहिजेत. पहिल्या चार पानांवर प्रत्येकी सहा ओळींचा, आणि बाकीच्या चार पानांवर प्रत्येकी सात ओळींचा, असा एकूण बावन ओळींचा मजकूर कोरलेला आहे. अक्षरे ठसठशीत व चांगली खोल कोरलेली आहेत.

**अक्षरवटिका**

ताम्रपटावरील कोरीव लेखाची लिपी ब्राम्ही असून ती पेटिकाशीर्षक स्वरूपाची होय. अक्षराच्या दंडाला शिरोभागी, सामान्यत: उजव्या बाजूला, एक चौकोन कोरलेला असतो, तो पेटिकेप्रमाणे दिसतो, म्हणून त्या प्रकाराला पेटिकाशीर्षक असे म्हणतात. ही पेटी सर्वच अक्षरांना असते असे नाही. उदा. **इ**.–ओ. ३१ ; **ए**–ओ. ४८ ; **ज**–ओ. २, ४, ७ ; **ब**.–ओ. २, १८, ३८ ; **ल**–ओ. ७, १८, २० वगैरे. हलन्त व्यंजने सामान्यत: आकाराने लहान व पेटिकाविरहित कोरतात. उदा. दृष्ट**म्**, पृथिविसमुद्रा**त्**–ओ. १ ; वचना**त्**–ओ. २७. क्वचित ती शिरोरेषाविरहितसुद्धा असतात. उदा. वचना**त्**–ओ. २७. जोडाक्षरातील रेफ दाखविण्यासाठी अक्षराच्या शिरोभागी उभी रेघ कोरतात. उदा. व**र्ष**, व**र्द्ध**मान–ओ. १३. अनेकदा या रेघेलाही पेटिका जोडलेली आढळते. उदा. का**र्त्त**युगस्य–ओ. २०; अभ्य**र्च्चि**त–ओ. २३; ध**र्म्म**–ओ. १२, ३१, ३२, ४५; कु**र्य्या**मि:–ओ. ४५. इत्यादी.

आकार सामान्यत: अक्षराच्या दंडावरील डाव्या बाजूला खाली लहानशी रेघ ओढून दाखवतात. उदा. समु**द्रा**त्–ओ. १, अतिरा**त्रवा**जपेय–ओ. २, इत्यादी. क्वचित दंडाच्या डाव्या बाजूला मध्यभागी आडवी उभी रेघ कोरून तो दाखवतात. उदा. व**र्द्धमान**–ओ. १३, **मा**हेश्वरस्य–ओ. ११, कोसलामेकला–ओ. २२, **आज्ञा**–ओ. २९. **ज्ञा**पयितव्या–ओ. ३० यातील **ज्ञा** या अक्षरातील **आकाराने** शिरोभागावर गेलेली अर्धवर्तुळाकृती धारण केली आहे. **इ**कार बहुधा अक्षरावर अर्धवर्तुळ किंवा वर्तुळ कोरून दाखवला आहे. उदा. **विष्णु**–ओ. ३, **शि**वलिङ्ग–ओ. ६, **पृथिवि**, **अग्नि**–ओ.१. इकाराच्या वर्तुळातच एक छोटे वर्तुळ किंवा टिंब कोरून दीर्घ ईकार दाखवतात. उदा. **श्री**–ओ. ४, ९, १० ; गौत**मी**–ओ. ९, भागीरथ्या–ओ. ७. **उ**काराचे चिन्ह कधी अक्षरातील दंडाच्या खाली उजव्या बाजूला आकड्याच्या आकाराचे चिन्ह कोरून दाखविला आहे. उदा. स**मु**द्रात्–ओ. १, **विष्णु**–ओ. ३, **पु**त्रस्य–ओ. ९, **यु**धिष्ठिर–ओ.१४, **सु**नय–ओ. १८ इत्यादी ; कधी

हा आकडा उजव्या बाजूला कोरलेला आहे. उदा. चतुरश्व–ओ. ३, सुपरितुष्ट–ओ. ६, देवगुप्तसुतायां–ओ. १९ ; कधी दंडाच्या मध्यभागी डाव्या बाजूला आडव्या व नंतर खाली गेलेल्या स्वरूपाचे चिन्ह कोरून उकार दाखविला आहे. उदा. रुद्रसेनस्य–ओ. १०, कुन्तलाधिपति–ओ. २४, कुल–ओ. २९, विश्रुत–२९. दीर्घ ऊकार दाखवण्यासाठी प्रथम ऱ्हस्व इकाराचे चिन्ह कोरून नंतर दंडाच्या उजव्या बाजूला आजच्या दीर्घ ऊकाराचे चिन्ह आडवे कोरलेले आहे. उदा. मूर्द्धा–ओ. ७, सूनोः–ओ.४, १०, १५, १७, २४ ; पूर्व्व–ओ. १७, ३२, ३६ ; भूतस्य–ओ. २०. एकार सामान्यतः दंडाच्या वर उजव्या बाजूला आडवी व नंतर खाली आखूड उभी रेघ ओढून दाखवतात. उदा. वाजपेय–ओ.२, अश्वमेध–ओ. ३, प्रवरसेनस्य–ओ. ४, सन्निवेशित–ओ. ५. या एकाराचा आकार स्थूल मानाने अर्ध्या चतुष्कोनासारखा आहे. ऐकाराच्या दोन मात्रा जोडताना मात्र मात्रेचा हा आकार बदलतो. उदा. भैरव–ओ. ५, वैजयिके–ओ. ३१, चक्रपाणैः–ओ. १५, नैर्म्मल्य–ओ. १३. यांतील काही मात्रांना अर्धगोलाकार आला आहे. धर्म्मायुर्ब्बलैश्वर्य–ओ. ३१ या शब्दातील लै च्या मात्रा डाव्या बाजूलाच पण एक वर व एक खाली दिलेली आहे. ओकाराचे चिन्ह म्हणजे अक्षराच्या वर डाव्या बाजूला आकाराचे चिन्ह व उजव्या बाजूला वर वर्णन केल्याप्रमाणे एकाराची एक मात्रा. उदा. अग्निष्टोमाप्तोर्य्यामोक्थ्य–ओ. १, सूनोः–ओ. ४, १०, १७, २१, कोसला–ओ. २२ इत्यादी. औकारासाठी अर्थातच ऐकाराप्रमाणे उजव्या बाजूला दोन मात्रा द्यायला पाहिजेत. पण त्याऐवजी डाव्या बाजूला आकाराच्या चिन्हावर एक व उजव्या बाजूला एक अशा रीतीने ह्या दोन मात्रा कोरलेल्या आहेत. उदा. दौहित्रस्य, गौतमीपुत्रस्य–ओ. ९, शौर्य्य–ओ. ११ ; पौत्रिणः–ओ. १४, पौत्रानुगामी–ओ. ४१, गौरवात्–ओ. ४८. विसर्गाचे चिन्ह म्हणून कोरलेली टिंबे गोल नसून ती आडव्या रेषेसारखी दिसतात. उदा. याजिनः–ओ. ३, सूनोः–ओ. ४, १० ; पौत्रिणः–ओ. १४ इत्यादी. अनुस्वाराची टिंबेही गोल नसून आडव्या रेषेसारखी आहेत. उदा. दुष्कृतं, संव्वत्सरे–ओ. ५१, लिखितं–ओ. ५२ यांतील अनुस्वार पहा. जिव्हामूलीय किंवा उपध्मानीय यांची चिन्हे कोठेही वापरलेली आढळत नाहीत.

व्यंजनांच्या बाबतीत विशेष लक्षात आणून देण्यासारखे अक्षर ञ हे होय. वाकाटकांच्या इतर ताम्रपटांत ते क्वचितच आढळते. द्वितीय पृथ्वीषेणाच्या बालाघाट ताम्रपटात ते आहे. प्रस्तुत ताम्रपटातील 'अज्झितभट्टारिका'–ओ. २५, या शब्दात ते आले आहे. ङ चे चिन्ह चुकीने का होईना पण 'राजवङ्शानाम् '–ओ.७, 'वङ्शालंङ्कार'–ओ. २०, 'वङ्श'–ओ. २२, इत्यादी शब्दांत आलेले आहे. जोडाक्षरातील ङ चे चिन्ह म्हणून द चेच

चिन्ह योजलें आहे. उदा. 'दण्ड'–ओ. १४, ४५ यातील ड पहा. एरवी ड चे स्वतंत्र चिन्ह 'षोडश्यतिरात्र'–ओ. २ या शब्दातील ड मध्ये आढळते. ब च्या चिन्हात उजव्या बाजूला उभा दंड सरळ नसतो. उदा. बृहस्पती–ओ. २, बल–ओ. १८, आयुर्ब्बल–ओ. ३१, इत्यादीमधील ब हे अक्षर पाहा. पण 'बाधा'–ओ. ४४ या शब्दातील ब मधे हा दंड सरळ आलेला आहे. त्यामुळे एरवीच्या ब पेक्षा या ब अक्षराचे स्वरूप वेगळे दिसते. तेथे ब साठी चौकोन कोरला गेला. कोरकाच्या चुकीमुळेही हे झाले असणे शक्य आहे. धर्म्म–ओ. १२, ३१, ३२ या शब्दातील दोन्ही म चे स्वरूप सारखेच आहे. पण धर्म्मादरकरणे–ओ. ४५, या शब्दातील र्म्म या जोडाक्षरात दोन्ही म सारखे नाहीत. पहिल्या म चे स्वरूप नेहमीच्या म सारखे आहे. (त्यातही कोरकाची चूक झालेली आहे. उजवीकडील जी रेषा तिरपी कोरायची ती सरळ उभी कोरली गेली आहे) पण दुसऱ्या म चे वळण निराळे असून ते फासासारखे दिसते. जोडाक्षरातील दुसरा म अन्यत्रही असाच आढळतो. उदा. ब्राह्मण–ओ. ४४ अस्मिश्च–ओ. ४५, अस्मच्छासन–ओ. ४३, अस्मत्–ओ. २८, यथास्माभिः–ओ. ३० यांतील म पाहा. तथापि, आत्मनो–ओ. ३१. यातील त् ला जोडलेल्या म चे स्वरूप मात्र नेहमीच्या म सारखेच आहे. साधा य व जोडाक्षरातील य यांचीही वळणे निराळी आहेत. उदा. वाजपेय–ओ. २, याजिनः–ओ. ३, नयविनय–ओ. ११ इत्यादी शब्दांतील य पाहा; आणि 'आप्तोर्य्यामोक्थ्य-षोडश्यतिरात्र, सवसाद्य–ओ. १, २, सगोत्रस्य–ओ. ३, प्रवरसेनस्य-ओ. ४, अत्यन्त, भक्तस्य–ओ. ५ इत्यादी शब्दांतील जोडाक्षरांत आलेला य पाहा. तीच गोष्ट व आणि जोडाक्षरातील व च्या वळणासंबंधी. उदा. पृथिवि–ओ. १, वाजपेय, सवसाद्य–ओ. २, विष्णुवृद्ध–ओ. ३ इत्यादी शब्दांतील व पाहा; आणि चतुरश्व–ओ. ३, स्वामि–ओ. ५, दशाश्वमेध–ओ.८, धीमत्व, भक्तित्व, विजयित्व–ओ. १२ इत्यादी शब्दांतील जोडाक्षरांत आलेला व पाहा. क्वचित जोडाक्षरातही नेहमीसारखा साधा व कोरलेला आढळतो. उदा. शिवलिङ्गोद्वहन–ओ, ६, सर्व्वद्विषः–ओ. १८, विश्वासात्–२२, इत्यादी शब्दांतील जोडाक्षरात असलेला व पाहा. विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट ही की, पूर्व्व–ओ. १७, व ३० या ओळीत आलेल्या पूर्व्व शब्दांतील जोडाक्षरात दोन्ही व सारखेच आहेत, तर पूर्व्वेण–ओ. ३२, अपूर्व्व,–ओ. ३५ या शब्दांतील जोडाक्षरात दोन्ही व निरनिराळ्या वळणांचे आहेत. चातुर्व्वैद्य–ओ. ३६ व संव्वत्सरे ओ. ५१ यांतील व्व या जोडाक्षरातही ते भिन्न प्रकारचे आहेत. ओ. १८ व ४० मधे आलेल्या सर्व्व या शब्दातील व्व हे जोडाक्षरही दोन्ही ठिकाणी

भिन्न रीतींनी कोरले आहे. जोडाक्षरात आलेले य आणि व यांची वळणे आपाततः सारखीच दिसतात. 'स्वामि' आणि 'भक्तस्य'–ओ. ५ यांतील व आणि य पाहा. पण यातील फरक असा की, य ची उजव्या बाजूची रेषा वरपर्यंत गेलेली असते तर व चा फासा पूर्ण होऊन तो खालीच संपतो. जिव्हामूलीय किंवा उपध्मानीयाचे चिन्ह या ताम्रपटात कुठेही कोरलेले मला आढळले नाही.

### भाषा

ताम्रपटावरील कोरीव लेखाची भाषा संस्कृत असून स्थूल मानाने ती शुद्ध आहे. 'वंश' हा शब्द 'वङ्श' असा लिहिला आहे (ओ. ७, २०, २२ व २६) ते चुकीचे होय. धीमत्व–ओ. १२, सर्व्वाद्ध्यक्ष–ओ. २८, किण्व–ओ. ३९, सक्लप्तोपक्लप्त–ओ. ४१ हे शब्द चुकीचे लिहिले किंवा कोरले आहेत. वाचनात ते त्या त्या ठिकाणी दुरुस्त करून दिले आहेत, ते पाहावे. 'काश्यपसगोत्रो'–ओ. ३४, हे रूपही चुकीचे होय, त्याऐवजी तेथे 'काश्यपसगोत्र' असे पाहिजे.

रेफाच्या नंतर आलेली व्यंजने द्वित्त केली आहेत. उदा. आप्तोर्य्याम–ओ. १, शौर्य्य–ओ. ११; धर्म्म–ओ. १२, ३१, ४५; नैर्म्मल्य–ओ. १३; सर्व्व–ओ. १८, ४०; पूर्व्व–ओ. १७, ३०, ३२; कुर्य्युः–ओ. ४५, मार्ग्ग ओ. १७, २८ इत्यादी. याला अपवाद फक्त वर्ष–ओ. १३ हा शब्द.

### विषय

प्रस्तुत ताम्रपट म्हणजे एक दानपत्र होय. वाकाटक नृपती द्वितीय पृथिवीषेण याने पृथिवीपुर येथील विष्णुदत्त व भवदत्त या दोन ब्राम्हणांना जमलखेटक नावाचे गाव दान दिले, ते नमूद करून ठेवणे हा या ताम्रपटाचा विषय होय.

### वाकाटकांची वंशावळ

वाकाटकांच्या इतर ताम्रपटांप्रमाणे या ताम्रपटाचाही आरंभ 'दृष्टम्' या शब्दाने झाला आहे. याचा अर्थ असा की, दानपत्र संपूर्ण कोरले गेल्यावर सचिवालयातील अधिकाऱ्यांनी ते पाहिले आणि त्याची सरकारी दप्तरात नोंद केली. यावरून लक्षात येईल की, 'दृष्टं' हा शब्द ताम्रपटाच्या प्रारंभी कोरलेला असला तरी तो सर्वात शेवटी कोरला जात असावा. याच पृथिवीषेणाच्या बालाघाट येथील अपूर्ण ताम्रपटात हा शब्द कोरलेला आढळत नाही, याचे कारण यावरून लक्षात येईल. हे दानपत्र पृथिवीषेणाने पृथिवीसमुद्र

या स्थानातून दिले होते. बहुधा ते त्याच्या राजधानीचे शहर असावे. त्यानंतर प्रथम प्रवरसेनापासून तो द्वितीय पृथिवीषेणापर्यंतच्या वाकाटक नृपतींची वंशावळ आलेली आहे (ओ. १ ते २७). ती साधारणपणे वाकाटकांच्या इतर ताम्रपटांत जशी आढळते तशीच येथेही आहे. प्रथम प्रवरसेनापासून तो द्वितीय रुद्रसेनापर्यंतचे वर्णन सर्व ताम्रपटांत सारखेच आहे.

## 'उच्छिन्नसर्वद्विष'–द्वितीय प्रवरसेन

रुद्रसेनानंतर गादीवर बसलेला त्याचा पुत्र द्वितीय प्रवरसेन याचे वर्णन मात्र पृथिवीषेणाच्या ताम्रपटांत थोडे अधिक आढळते. 'पूर्वीच्या राजांनी घालून दिलेल्या मार्गाचे अनुसरण करणारा व नीती, बल आणि पराक्रम यांच्या साह्याने ज्याने आपले सर्व द्वेष्टे नष्ट केले असा'-(ओ. १७ व १८). ही विशेषणे द्वितीय प्रवरसेनाला पृथिवीषेणाच्या बालाघाट व प्रस्तुत माहुरझरी या दोन्ही ताम्रपटांत योजलेली आहेत. तथापि, या ताम्रपटांत ती अगदीच नव्याने योजली आहेत असे नाही. द्वितीय प्रवरसेनाच्या सिवनी[1] ताम्रपटात ती पूर्वी आलेली आहेत. त्यामुळे या ताम्रपटातून द्वितीय प्रवरसेनाविषयी काही नवीन माहिती मिळते असे मुळीच नाही.

तथापि, एक प्रश्न मनात येतो, त्याचा निर्देश या ठिकाणी करून ठेवतो. द्वितीय प्रवरसेनाचे आतापर्यंत एकूण चौदा ताम्रपट उपलब्ध झालेले आहेत. त्यांतील दोन अपूर्ण आहेत. जांब ताम्रपट त्याच्या द्वितीय राज्यवर्षात दिलेला होता. त्यात व त्यानंतर दिलेल्या बेलोरा, ऋद्धपुर व चम्मक या ताम्रपटांत वरील विशेषणे नाहीत. त्यानंतर त्याच्या अठराव्या राज्यवर्षातील फाल्गुन महिन्यात दिलेल्या सिवनी ताम्रपटात ही दोन विशेषणे आहेत. पण त्यानंतर दिलेल्या आठ ताम्रपटांपैकी कोणत्याही ताम्रपटात ती नाहीत. सिवनीनंतरच्या त्याच्या ताम्रपटांत ती का गाळली असावी, किंवा सिवनी ताम्रपटातच ती का यावी, हा प्रश्न मनात येतो. (विशेष कारण असे की, प्रवरसेनानंतर नरेन्द्रसेनाच्या मागून गादीवर बसलेल्या द्वितीय पृथिवीषेणाच्या दोन्ही उपलब्ध ताम्रपटांत ती पुन्हा आलेली आहेत.) या प्रश्नाचा समाधानकारक उलगडा होणे अवश्य आहे. सिवनी ताम्रपट आतापर्यंत जेम्स प्रिन्सेप,[2]

१ वाकाटक नृपति आणि त्यांचा काल (डॉ. मिराशी), पृ. २२९, ओळ १४, १५.

२ जर्नल ऑफ दि एशियाटिक सोसायटी ऑफ बंगाल, व्हॉ. ५, पृ. ७२६.

डॉ. फ्लीट[1] आणि डॉ. मिराशी[2] यांनी संपादन केला आहे. पण त्यांपैकी कोणीही या दोन नवीन विशेषणांचा विचार केलेला मला आढळला नाही.

यांतील दुसऱ्या विशेषणावरून निदान एवढे दिसून येते की, वाकाटकांच्या राज्याचा किंवा द्वितीय प्रवरसेनाचा द्वेष करणारे अनेक शत्रू त्यावेळी निर्माण झाले होते. पण आपल्या नीतीने, सामर्थ्याने आणि पराक्रमाने प्रवरसेनाने त्या सर्वांचा नाश केला.

**'अपहृतवंशश्री'–नरेंद्रसेन**

प्रवरसेनाच्या मृत्यूनंतर नरेंद्रसेन गादीवर बसला. त्याने दिलेला एकही ताम्रपट अद्याप उपलब्ध झालेला नाही. त्याच्या संबंधीची माहिती द्वितीय पृथिवीषेणाच्या बालाघाट येथील अपूर्ण ताम्रपटावरून प्रथम उजेडात आली. तीच माहिती प्रस्तुत ताम्रपटात देखील आढळते. 'पूर्व्वाधिगतगुणविश्वासादपहृतवंशश्रियः' (ओ. २२) हे नरेंद्रसेनाला लावलेले विशेषण बरेच चर्चाविषय झाले आहे. या विशेषणाचा अर्थ असा की, 'पूर्वीच मिळवलेल्या गुणांनी आणि विश्वासाने ज्याने वंशलक्ष्मी हरण केली, असा नरेन्द्रसेन'. यातील 'अपहृत' हा शब्द विशेष महत्त्वाचा आहे. 'अप+हृ' या मूळ धातूचा अर्थ हरण करणे, हिसकावून घेणे असा आहे. नरेंद्रसेनाने वंशलक्ष्मी हरण केली, अर्थात तिच्यावर दुसऱ्या कोणाचा तरी अधिकार होता, पण नरेंद्रसेनाने ती बलात्काराने हिसकावून घेतली, असा अर्थ लक्षात घेऊन डॉ. कीलहॉर्न यांनी असे अनुमान केले की, बहुधा नरेंद्रसेनाने ती आपल्या वडील भावाजवळून हिसकावून घेतली असावी. अर्थात, वाकाटकांच्या सिंहासनासंबंधी त्यावेळी कलह उत्पन्न झाला असावा. नरेंद्रसेनाला वडील भाऊ असल्याचा पुरावा नाही. तो होता असे गृहीत धरले तरी त्याच्याजवळून बलात्काराने केलेल्या राज्यहरणाचा प्रसंग त्याच्या मुलाकडून म्हणजे द्वितीय पृथिवीषेणाकडून गौरवपर रीतीने केला जाणे शक्य नाही. हृ=हरण करणे, या धातूला 'अप' उपसर्ग लावल्यानंतर त्याचा 'मागे घेणे, परत घेणे' असाही अर्थ होऊ शकतो. उदा. सृ=सरकणे, जाणे; अप+सृ>अपसरणे=मागे सरकणे, परतणे. त्याचप्रमाणे हृ=हरण करणे; अप+हृ=परत हरण करणे, मागे ओढून घेणे. या अर्थाने 'अपहृतराज्यश्री' म्हणजे ज्याने (शत्रूंनी पूर्वी हरण केलेली) राज्यश्री परत

१ कॉर्पस इन्स्क्रिप्शनम्, इंडिकॅरम, व्हॉ. ३, पृ. २४३.
२ कित्ता, व्हॉ. ५, पृ. २८-३२.

हरण केली, ओढून घेतली, परत मिळवली, असा अर्थ सयुक्तिक होऊ शकेल. या दृष्टीने 'आपल्या पूर्वजाकडून मिळवलेल्या गुणांनी निर्माण झालेल्या आत्मविश्वासाने त्याने (नरेंद्रसेनाने) आपली राज्यश्री परत मिळवली'[१] हा डॉ. अळतेकर यांनी केलेला अर्थ अधिक समर्पक आहे. डॉ. मिराशी यांनी या बाबतीत असे म्हटले आहे की, 'तेव्हा बालाघाट ताम्रपटातील वर्णन काव्यमय समजून त्याचा अर्थ नरेन्द्रसेनाने आपल्या अंगच्या गुणांनी राज्यलक्ष्मीला आकर्षित केले एवढाच घेतला पाहिजे[२]' हे अन्वर्थक वाटत नाही.

द्वितीय प्रवरसेनाच्या कारकीर्दीत वाकाटकांच्या राज्याला शत्रू निर्माण होऊन त्यांचा प्रवरसेनाने विध्वंस केला असला (ओ. १८) तरी त्यांनी पुन्हा डोके वर काढून त्याच्या राज्याचा काही भाग तरी घेतला असावा असे यावरून सूचित होते. प्रवरसेनाचे अनेक ताम्रपट नागपूरजवळील नन्दिवर्धन या राजधानीतून दिलेले आहेत. बस्तर राज्यातील नलवंशीय नृपती भवदत्तवर्मा यानेही त्याच काळात नन्दिवर्धन येथून यवतमाळ जिल्ह्यातील कदंबगिरी ग्राम दान दिल्याचा उल्लेख त्याच्या ऋद्धपूर[३] ताम्रपटात आढळतो. त्यावरून वाकाटक साम्राज्यातील नागपूर-यवतमाळ जिल्ह्यांचा हा प्रदेश त्याने जिंकून घेतला होता, इतकेच नाही तर प्रवरसेनाची राजधानी नन्दिवर्धन येथून आपला राज्यकारभार सुरू केला होता असे स्पष्ट दिसते. नन्दिवर्धन शत्रूंनी काबीज केल्यामुळे प्रवरसेनाला आपली राजधानी बदलणे भाग पडले. याच वेळी प्रवरसेनाने प्रवरपुर येथे नवी राजधानी केली असावी. द्वितीय प्रवरसेनाच्या कारकीर्दीत त्याच्या ११ व्या राज्यवर्षापर्यंत त्याची राजधानी नगरधन येथे होती. कारण, त्या कालावधीत त्याने आपल्या दुसऱ्या राज्यवर्षात दिलेला जांब ताम्रपट आणि ११ व्या राज्यवर्षी दिलेला बेलोरा ताम्रपट हे नगरधनहून दिलेले होते. त्याने १८ व्या राज्यवर्षी दिलेला चम्मक ताम्रपट मात्र प्रवरपुराहून दिला आहे. तथापि, प्रभावतीगुप्ताने दिलेला ऋद्धपूर ताम्रपट प्रवरसेनाच्या १९ व्या राज्यवर्षी दिला, असून तो 'रामगिरिस्वामिनः पादमूलात्' म्हणजे नगरधनजवळील रामटेक येथून दिला आहे. याचा अर्थ असा की, शत्रूच्या संकटाची पूर्ण कल्पना आल्यामुळे प्रवरसेनाने आपल्या १८ व्या राज्यवर्षीच राजधानी हलवून ती प्रवरपुर येथे नेली. १९ व्या राज्यवर्षापर्यंत नगरधन वाकाटकांच्या हातून गेले नव्हते.

---

१ दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (यझदानी), भाग १ ते ४, पृ. १८१.

२ वाकाटक नृपति आणि त्यांचा काल (मिराशी), पृ. ४६.

३ एपि. इंडि., पु १९, पृ. १००.

त्यानंतर काही वर्षांनी नलवंशीय राजांनी ते काबीज करून तेथे आपले बस्तान बसवले असावे असे दिसते. भवदत्तवर्म्याच्या स्वारीमुळेच वाकाटकांना आपली राजधानी नगरधन सोडावे लागले असे डॉ. अळतेकरही म्हणतात.[1] तेव्हा वाकाटकावर आपल्या राज्याचा हा भाग गमावण्याचा दुर्धर प्रसंग द्वितीय प्रवरसेनाच्या कारकीर्दीत ओढवला असावा. द्वितीय प्रवरसेनाच्या हातातून निसटलेला तो प्रदेश त्याचा पुत्र नरेन्द्रसेन याने पुन्हा परत मिळवला असावा. नरेन्द्रसेनाच्या या कर्तृत्वाचा उल्लेख 'अपहृतवंशश्री' या शब्दांनी पृथिवीषेणाच्या बालाघाट ताम्रपटात केलेला असावा असे म्हणण्यास हरकत नाही. प्रस्तुत माहुरझरी ताम्रपटातही तेच विशेषण आढळत असल्यामुळे वरील अनुमानाला दुजोरा मिळतो. या नरेन्द्रसेनाने कोसला, मेकला व मालव या प्रदेशावरही आपले स्वामित्व प्रस्थापित केले होते. (ओ. २२-२३).

### भग्नवंशोद्धारक द्वितीय पृथिवीषेण

नरेन्द्रसेनानंतर त्याचा मुलगा द्वितीय पृथिवीषेण गादीवर बसला. त्याच्या आईचे नाव अज्झितभट्टारिका असे असून ती कुन्तल देशाच्या राजाची कन्या होती (ओ. २५). गोदावरी नदीच्या दक्षिणेकडील प्रदेशाला पूर्वी 'कुन्तल' देश हे नाव होते. त्यात स्थूल मानाने आजच्या सोलापूर, कोल्हापूर व सातारा या जिल्ह्यांतील प्रदेशाचा अंतर्भाव होत होता. वाकाटकांच्या काळात 'कुन्तलाधिपति' कोण होता हे निश्चित सांगता येत नाही. डॉ. मिराशी यांनी त्या विभागात सापडलेल्या ताम्रपटादिकांच्या आधारे असे दाखविले आहे की, इ. स. चौथ्या शतकापासून त्या प्रदेशात मानपूर नावाचे राष्ट्रकूट वंशाचे राजे राज्य करीत होते, त्यांचा मूळ पुरुष 'मानांक' होता, आणि त्याची राजधानी मानपूर (सध्याचे माण या नावाचे गाव, जिल्हा सातारा) ही होती. अज्झितभट्टारिका ही या राष्ट्रकूट वंशाच्या 'कुंतलाधिपती'ची कन्या असावी. त्यावरून कुंतलातील राष्ट्रकूटांचे आणि आपल्या वाकाटक नृपतींचे संबंध सलोख्याचे असले पाहिजेत असे दिसते. त्यामुळेच द्वितीय प्रवरसेनाने आपला पुत्र नरेन्द्रसेन याच्याशी कुंतलाधिपतीची कन्या अज्झितभट्टारिका हिचा विवाह घडवून आणला असावा. त्यांना झालेला मुलगा द्वितीय पृथिवीषेण हा होय.

---

१ दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (यझदानी), भाग १ ते ४, पृ. १८०.
२ संशोधन मुक्तावलि (डॉ. मिराशी), सर पहिला, पृ. ६५ ते ७५.

पृथिवीषेण भागवत धर्माचा निष्ठावंत उपासक व तेजःक्षमादिगुणसंपन्न होता (ओ. २६). त्याने आपल्या 'मग्न' वंशाचा उद्धार केला असे 'मग्न-वंशोद्धर्त्तुः' या विशेषणावरून दिसून येते. पृथिवीषेणाच्या बालाघाट ताम्रपटात 'द्विमग्नवंशोद्धर्त्तुः' असे शब्द आहेत. त्यावरून आपले राज्य शत्रूपासून वाचवण्याचे प्रसंग पृथिवीषेणावर दोनदा आले असावेत असे दिसते. 'द्विमग्न'–हा शब्द 'निमग्न' असा असावा असे डॉ. मिराशी यांना वाटते.[1] पण ताम्रपटाच्या ठशात तो 'द्विमग्न' असा स्पष्ट आहे. प्रस्तुत ताम्रपटात मात्र केवळ 'मग्न' असा शब्द आलेला आहे (ओ. २६). त्यावरून असे वाटते की, प्रस्तुत माहुरझरी ताम्रपट दिल्यानंतर बालाघाट ताम्रपट कोरण्यात आला असावा. माहुरझरी ताम्रपट देण्यापूर्वी पृथिवीषेणाच्या राज्यावर फार मोठे संकट येऊन राज्य बुडाल्यासारखे झाले असावे. पण त्यातून आपल्या पराक्रमाने त्याने ते वाचवले. म्हणून 'मग्नवंशोद्धर्त्तुः' असे विशेषण प्रस्तुत माहुरझरी ताम्रपटात योजले असावे. त्यानंतर पुन्हा असाच कठीण प्रसंग येऊन त्यामुळेही राज्य जाते की काय असे वाटण्याइतपत शत्रूंनी त्याला त्रस्त केले असावे. पण त्यातूनही पृथिवीषेणाने पराक्रमाची शर्थ करून ते वाचवले असावे असे स्पष्ट दिसते. त्यामुळेच बालाघाट ताम्रपटात त्याला 'द्विमग्नवंशोद्धर्त्तुः' असे विशेषण लावले असावे. बालाघाट ताम्रपट कोरण्याचे काम अपूर्ण राहिले ही गोष्टही सूचक वाटते. त्यावरून दोनदा बुडत चाललेल्या वंशाचा उद्धार केल्यानंतर पुन्हा दुर्धर संकट आलेले असावे, त्यामुळे नित्याचे व्यवहार विस्खळित होऊन ताम्र-पटाच्या द्वारे जे गाव दान द्यायचे तेही संकटात आले असणे असंभवनीय नाही. जेथे राज्यच शिल्लक राहते की नाही याची शंका होती तेथे त्या राज्यातील ग्रामादिकांचे दान करण्याचा प्रयास व्यर्थ ठरला असता. त्यामुळेच बालाघाट ताम्रपट अपूर्ण राहिला असावा.

### दोन संकटे कोणती ?

ज्या दोन प्रसंगी पृथिवीषेणाला आपला वंश किंवा राज्य वाचवावे लागले ते प्रसंग कोणते, याचा निर्देश ताम्रपटात नाही. डॉ. अ. स. अळतेकर यांच्या मताप्रमाणे छत्तिसगडमधील शरभपुरचा राजा मानमात्र याने या सुमारास विदर्भ व मध्यप्रदेशाचा दक्षिण भाग जिंकून घेतला होता. तेव्हा, पृथिवीषेणाच्या राज्यावर आलेले एक संकट ते असावे. डॉ. अळतेकरांचा हा तर्क अविधेय

१ वाकाटक नृपति आणि त्यांचा काल (मिराशी), पृ. ५२, २९८, ३०६.

नृपतीच्या पंडरंगपल्ली ताम्रपटावर आधारलेला[1] आहे. परंतु अविधेयाचा हा ताम्रपट शरभपुर येथील नृपतीचा नसून तो 'कुन्तलानां अधिपति' चा म्हणजे त्या काळात दक्षिण महाराष्ट्रात राज्य करणाऱ्या राष्ट्रकूट नृपतीचा आहे, असे डॉ. वा. वि. मिराशी यांनी या ताम्रपटाचे पुनर्वाचन करून लिहिलेल्या लेखात स्पष्ट केले आहे.[2] पृथिवीषेणाची आई अज्झितभट्टारिका कुन्तलाधिपती राष्ट्रकूटवंशातील होती. तेव्हा त्यांनी पृथिवीषेणाच्या राज्यावर आक्रमण केले असेल असे वाटत नाही. कुन्तलाधिपति अविधेयाला 'सन्त्रस्तविदर्भाश्मक-मण्डल:' असे वरील ताम्रपटात म्हटले आहे. त्यावरून असे दिसते की, त्याने त्यावेळी विदर्भाच्या पश्चिम विभागावर राज्य करणाऱ्या वाशिम येथील वाकाटक नृपतीशी लढाया केल्या असाव्या. याला उपोद्बलक पुरावा अजंठा लेण्यातील वराहदेवाच्या शिलालेखातही मिळतो असे डॉ. मिराशी यांनी दाखवले आहे. ते सयुक्तिक वाटते.

पृथिवीषेणाच्या राज्यावर आलेले दुसरे संकट त्यावेळी उत्तर कोकणात उदयाला येत असलेल्या त्रैकूटक नृपतीकडून आले असावे, असा डॉ. अळतेकर यांचा तर्क आहे. त्या वंशातील दहरसेन नृपती याचे राज्य इ. स. ४४५ ते ४७५ पर्यंत होते. त्याने अश्वमेध यज्ञ केला होता. त्या प्रसंगी त्याने पृथिवी-षेणाच्या राज्यावर स्वारी केली असावी, असे ते म्हणतात. पण त्यांचा हा तर्कही सुसंगत वाटत नाही. उत्तर कोकणातील त्रैकूटकाकडून स्वारी झाली असल्यास ती वाकाटकांच्या वाशिम शाखेच्या राज्यावर झाली असणे शक्य आहे; त्याच्याही पूर्वेकडे असलेल्या पृथिवीषेणाच्या राज्यावर संभवत नाही. तेव्हा, पृथिवीषेणाच्या राज्यावरील दोन्ही संकटे कोणती असावी ते निश्चितपणे सांगता येत नाही.

### पृथिवीषेणाचा मांडलिक व्याघ्रदेव

राज्यावर दोनदा संकटे आली असली तरी दोन्ही वेळा द्वितीय पृथिवीषेणाने त्यांतून आपले राज्य वाचवले व वंशाचा उद्धार केला, यावरून त्याचे धैर्य व पराक्रम याची चांगली कल्पना येते. पृथिवीषेणाच्या राज्याचा विस्तार नर्मदेपलीकडेही झाला होता. पूर्वीच्या विंध्य प्रदेशातील जसो संस्थानामधील कुठारागडाच्या बाहेर आणि नचने की तलाई या गावाजवळ, उच्चकल्प

---

१ दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (संपा. यझदानी), पृ. १८४.

२ संशोधन मुक्तावलि (डॉ. मिराशी), सर ५, पृ. ११७-१४२.

वंशातील व्याघ्रदेव राजाचे दोन शिलालेख उपलब्ध झालेले[1] आहेत. त्यात व्याघ्रदेवाने आपणाला 'वाकाटकाणां महाराजश्रीपृथिविषेणपादानुध्यात' असे विशेषण लावले आहे. त्यावरून पृथिविषेणाचा तो मांडलिक असावा असे स्पष्ट दिसते.

## कालनिर्देश

प्रस्तुत ताम्रपट पृथिवीषेणाने 'संव्वत्सरे सप्ता(प्त)दशे कार्त्तिक शुक्लपक्षे द्वादश्यां' (ओ. ५१, ५२) म्हणजे आपल्या सतराव्या राज्यवर्षी दिलेला आहे. बालाघाट तेथील त्याचा अपूर्ण ताम्रपट त्यानंतर दिला गेला असावा, हे अनुमान खरे असल्यास त्याने आणखी चारपाच वर्षे तरी राज्य केले असावे असे मानण्यास हरकत नाही. अर्थात, द्वितीय पृथिवीषेणाची कारकीर्द कमीत कमी वीस वर्षे तरी असली पाहिजे. प्रस्तुत माहुरझरी ताम्रपट द्वितीय पृथिविषेणाचा संपूर्ण कोरलेला असा एकुलता एक ताम्रपट आहे.[2] त्यात वरीलप्रमाणे त्याच्या राज्यवर्षाचा निर्देश असल्यामुळे तो विशेष महत्त्वाचा ठरतो. या वेळी पृथिवीषेणाचा सेनापती 'रविदत्त' हा होता असे ताम्रपटाच्या शेवटच्या ओळीतील उल्लेखावरून स्पष्ट होते.

## आज्ञापत्र

ताम्रपटाचा उद्देश व त्यातील ग्रामदान लक्ष्यात येण्यासाठी, या दानासंबंधीचे संपूर्ण आज्ञापत्र विशेषतः मराठी अभ्यासकांसाठी भाषांतर करून पुढे देत आहे.

"आरम्बी राज्याच्या जमलखेटक मार्गात (विभागात) सर्वाध्यक्षाच्या आज्ञेने नेमले गेलेले आणि आमच्या आज्ञेने आपला अधिकार चालवणारे आमचे सर्व अधिकारी, सैनिक व शिपाई यांना, त्यांना पूर्वीच माहीत असलेली आमची पुढील आज्ञा विदित करण्यात यावी.

तुम्हा सर्वांना माहीत करून देण्यात आले आहे की, आपला धर्म, आयुष्य, बल आणि ऐश्वर्य यांच्या वृद्धीसाठी व इहलोकात आणि परलोकात आत्मकल्याणासाठी आमच्या विजयी धर्मस्थानातून, पृथिवीपुर येथे वास्तव्य करणारे वाजसनेयि काश्यप गोत्रातील विष्णुदत्त आणि भवदत्त यांना, पूर्वी कुणालाही न दिलेले,

---

१ वाकाटक नृपति आणि त्यांचा काल (डॉ. मिराशी), पृ. ५३, ३१८ ते ३२४.

२ हा लेख लिहिल्यानंतर मांढळ (जि. नागपूर) येथे द्वितीय पृथिवीषेणाचे आणखी दोन संपूर्ण ताम्रपट उपलब्ध झालेले आहेत. (पाहा. विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९७७, पृ. १५७-१७४).

सोमदरीच्या पश्चिमेस, नांदीपुरकाच्या पूर्वेस, उब्भिलकाच्या दक्षिणेस आणि जलकुत्कुभाच्या उत्तरेस असलेले जमलखेटक नावाचे गाव आम्ही उदकपूर्वक दान दिले आहे. त्याचप्रमाणे, चारही वेदांत प्रवीण असलेल्या ब्राह्मणांना दान दिलेल्या गावांच्या बाबतीत पूर्वीच्या राजांनी मान्य केलेल्या सवलतीही (मर्यादापरिहार) आम्ही त्यांना देत आहोत. हे गाव करमुक्त राहील (अकरदायी). त्यात कोणत्याही सैनिकाला व शिपायाला प्रवेश करता येणार नाही (अभटच्छात्रप्रावेश्यः). रिवाजाप्रमाणे त्यांना (राज्याला) गाई आणि बैल द्यावे लागणार नाहीत (अपारंपरगोबलीवर्दः). फुले आणि दूध (यांच्या ठोक विक्रीवरील) कर भरावे लागणार नाहीत (अपुष्पक्षीरसन्दोहः), सरकारी गुप्त हेरांना जागा, ढाल किंवा कातडी व कोळसा यांचा पुरवठा करावा लागणार नाही (अचारासनचर्माङ्गारः), जमिनीतून मीठ खणण्यासाठी व दारू गाळण्यासाठी कर द्यावे लागणार नाहीत (अलवणकिण्वक्रेणिखनकः), सर्व प्रकारच्या वेठबिगारीपासून हे गाव मुक्त राहील (सर्वविष्टिपरिहारपरिहृतः), भूगर्भातील सर्व वस्तुजात आणि ठेवी (सनिधिः सोपनिधिः), तसेच गावात घेण्यात येणारे लहान मोठे कर यांवर त्यांचा अधिकार (सक्लृप्तोपक्लृप्तः) राहील. विश्वात चंद्र आणि सूर्य आहेत तोपर्यंत त्यांना व त्यांच्या पुत्रपौत्रादि वंशजांना त्यांचा उपभोग घेता येईल. याच्या उपभोगात कोणीही कोणत्याही प्रकारचा अडथळा करता कामा नये. उलट या दानाचे सर्वांनी सर्वप्रकारे संरक्षण व संवर्धन करावे. या आमच्या आज्ञेचे उल्लंघन करून स्वतः किंवा इतराकडून (या दानाला) जो थोडीही बाधा निर्माण करील त्याला, या ब्राह्मणांनी तक्रार केल्यास, आमच्याकडून कडक शासन व दंड करण्यात येईल.

अशा रीतीने नीतिनियमांचा आदर करताना, पूर्वी होऊन गेलेल्या अनेक राजांनी दिलेल्या दानांचे आम्ही काळजीपूर्वक संरक्षण कसे केले, हे केवळ आम्ही केलेल्या पुण्यकृत्यांचे पुन्हा वर्णन करण्याचे टाळावे म्हणून वर्णन करीत नाही. आमचे संकल्प, युद्ध आणि पराक्रम यांनी आम्ही ज्यांना जिंकले आहे त्या विद्यमान व्यक्तींना आम्ही (याप्रमाणे) आज्ञा करतो, आणि या काळानंतर होणाऱ्या राजाविषयी मनात गौरव बाळगून आम्ही त्यांना (वरील-प्रमाणे) विनंती करतो. या बाबतीत व्यासांनी गाइलेला (पुढील) श्लोक सर्वांनी प्रमाण मानावा." . . . इत्यादी.

यावरून दिसून येईल की पृथिवीपुर येथील विष्णुदत्त आणि भवदत्त या वाजसनेयि काश्यप गोत्रातील ब्राम्हणांना आरम्वि राज्याच्या जमलखेटक विभागातील जमलखेटक नावाच्या गावाचे दिलेले दान नोंदणे हा या ताम्रपटाचा

प्रमुख उद्देश आहे. जमलखेटक या गावाच्या चतुःसीमा पुढीलप्रमाणे : पूर्वेस सोमदरी, पश्चिमेस नान्दीपुरक, उत्तरेस उध्भिलक आणि दक्षिणेस जलकुत्कुभ (पाण्याचा धबधबा). गावे दान देताना गावात कोणते अधिकार व करातील सवलती देण्यात येत असत याचीही यावरून कल्पना येईल. वाकाटककालीन ग्रामराज्यव्यवस्थेचे चित्र या आज्ञापत्रात आढळते असे म्हणण्यास हरकत नाही.

**स्थलनिश्चिती**

जेथून हा ताम्रपट देण्यात आला आहे ते 'पृथिविसमुद्र' व ज्यांना दान दिले होते ते ब्राम्हण ज्या गावचे रहिवासी होते ते 'पृथिविपुर' या दोन्ही गावांचा शोध लागत नाही. प्रत्यक्ष या नावाची गावे अस्तित्वात असल्याचे आढळत नाही. पृथिवि-समुद्र हे पृथिवीषेणाच्या राजधानीचे गाव असावे या कल्पनेने आरंभी आलेले 'पृथिवि' हे राजनाम सोडून 'समुद्र' या ग्रामनामाच्या अनुषंगाने या गावाचा शोध घेण्याचा मी प्रयत्न केला होता व वर्धा जिल्ह्याच्या हिंगणघाट तालुक्यातील 'समुद्रपुर' हे पृथिविसमुद्र असावे असे मी सुचविले होते.

त्यानंतर डॉ. रा. चिं. ढेरे यांचे 'लज्जागौरी'[1] हे पुस्तक माझ्या वाचनात आले. त्यात त्यांनी पृथिविपुर व पृथिविसमुद्र या शब्दांचा शोध घेऊन माहुरझरी हेच पृथिवीपुर असले पाहिजे, तसेच 'पृथिविसमुद्र' हे ग्रामनाम नसून तीर्थनाम असले पाहिजे आणि ते पृथिवीपुर येथेच असले पाहिजे असे मत मांडले आहे. "हे प्रस्तुत दानपत्र माहुरझरी येथे मिळाले आहे. माहूरझरी येथे संशोधकांना आजवर वाकाटककालीन विटा, मुद्रा व अन्य अवशेष वैपुल्याने मिळाले आहेत. अर्थातच, माहुरझरी हे स्थान वाकाटक संस्कृतीचे एक जागते केंद्र असल्याचे सिद्ध झाले आहे. म्हणूनच जेथे हे दानपत्र मिळाले ते माहुरझरी स्थानच पृथिवीपुर असले पाहिजे. माहूर (मातापुर) आणि पृथिवीपुर ही एकार्थक ग्रामनामे आहेत." हा त्यांचा युक्तिवाद समर्पक आहे. माहुरझरी येथे मातृदेवतेची एक प्रतिमा मिळाली आहे. त्यावरून ते मातृदेवतेचे शक्तिपीठ असावे. त्यामुळेच 'पृथ्वी' = माता + 'पुर' = मातापुर < माहूर हे नाव त्या गावाला पडले असावे. माहुरझरी येथे जवळच एक मोठे तळे आहे. तळ्याला किंवा सरोवराला 'समुद्र' असे आजही म्हणतात. माहुरझरी गावाच्या पश्चिमेस सुमारे अर्ध्या फर्लांगावर एक विस्तीर्ण तळे आहे. तेच प्रस्तुत ताम्रपटातील पृथिवीसमुद्र होय. हे त्या काळात पवित्र तीर्थ असावे. तेथूनच, प्रस्तुत दान देण्यात आले असावे. अर्थात, या गावाचे व तेथील तीर्थाचे

---

१ लज्जागौरी रा. चिं. ढेरे, पृ. ५४–५५.

मूळ नाव माहूर व माहुरझरी असावे. पृथिवीषेण तेथे जेव्हा गेला असेल तेव्हा त्याच्या नावाशी जुळणारी या गावाची व तेथील तळ्याची पृथिवीपुर व पृथिविसमुद्र ही नावे ठेवण्यात आली असावी. तथापि ती नावे पुढे चालू न राहाता जुनीच नावे प्रचारात राहिली असावी असे वाटते.

ताम्रपटात उल्लेखिलेल्या आरंबी राज्यात या दोन्ही स्थळांचा शोध घेण्याच्या अनुषंगाने डॉ. अजयमित्र शास्त्रींनीही, आपल्या अलीकडील एका लेखात[1] वरील युक्तिवादाप्रमाणे ही स्थळे उपरोक्त माहुरझरी, व तेथील तळे (झरी) हीच असावी असे प्रतिपादन केले आहे.

डॉ. ढेरे व डॉ. अजयमित्र शास्त्री या दोन्ही संशोधकांच्या लेखांतून केली गेलेली ही स्थळनिश्चिती मला समर्पक वाटते. त्यांच्या या 'दिग्दर्शनाबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

दान दिलेले गाव 'जमलखेटक' ज्या राज्यात होते त्याला 'आरम्बी' असे नाव होते. दुदिया व पांढुर्णा ताम्रपटात उल्लेखिलेले आरम्मि राज्य व प्रस्तुत ताम्रपटातील आरम्बी राज्य एकच होय. नागपूर जिल्ह्यातील काटोल जवळ 'आरंभी' नावाचे एक खेडे आजही आहे. त्या भोवतालचा प्रदेश या राज्यात अंतर्भूत होत असून प्रस्तुत आरम्बी हे त्याच्या राजधानीचे स्थळ असावे. जमलखेटक हा त्या राज्याचा एक विभाग (मार्ग) असून त्याचे मुख्य स्थान जमलखेटक हेच होते. या गावांचा निश्चित शोध लागत नाही. ताम्रपट एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी सहज नेले जाऊ शकतात हे लक्षात ठेवूनही जेथे ताम्रपट सापडला त्याच्या जवळपास त्यातील गावांचा शोध घेण्याचा प्रयत्न करणे इष्ट होईल. त्या दृष्टीने शोध घेतल्यास असे वाटते की, सावनेर तालुक्यातील (जि. नागपूर) खापा या गावाच्या ईशान्येस दोन मैलावर असलेले 'जमालपाणी' हे बहुधा आपल्या ताम्रपटातील 'जमलखेटक' असावे. जमालपाणीच्या उत्तरेस दोन मैलावर 'खुबाळी' गाव आहे. ते ताम्रपटातील 'उब्भीलक' असणे शक्य आहे. जमालपाणीच्या पश्चिमेस तीन मैलावर 'नंदापुर' आणि चार मैलावर 'नांदोरा' ही गावे आहेत. त्यांपैकी कोणतेतरी एक, विशेषतः नंदापुर हे ताम्रपटातील 'नान्दीपुरक' असावे. पूवदिशेकडील 'सोमदरी' या गावाचा शोध लागत नाही. कदाचित ते जमलखेटक (=जमालपाणी) गावाच्या पूर्वेकडील दरीचेच नाव असावे. दक्षिणेकडील सीमेवर पाण्याच्या प्रपाताचा उल्लेख आहे. जमालपाणी गावाच्या दक्षिणेस दीड मैलावरून वाहणाऱ्या कन्हान नदीच्या पात्रातील प्रपाताचा तो उल्लेख असणे अशक्य नाही.

---

१ फ्रेश एपिग्राफिक एव्हिडन्स ऑन दि वाकाटकाज. (अप्रसिद्ध)

ही स्थळनिश्चिती बरोबर असल्यास नागपूर जिल्ह्यातील काटोल व सावनेर तालुक्यांचा, तसेच उपरोक्त दुदिया आणि पांढुर्णा ताम्रपट ज्या विभागात सापडले त्या छिंदवाडा जिल्ह्याचा या 'आरम्बी' राज्यात समावेश होत असावा, व हे राज्य वाकाटकांच्या साम्राज्यात अंतर्भूत होत असावे असे म्हणण्यास हरकत नाही.

### वाचन

*पहिला पत्रा*

१. दृष्टम् [।*] स्वस्ति [।*] पृथिविसमुद्रात् [।*] अग्निष्टोमाप्तोर्य्यामो-
२. क्थ्यषोडश्यतिरात्रवाजपेयबृहस्पतिसवसाद्यस्क्र-
३. चतुरश्वमेधयाजिनः विष्णुवृद्धसगोत्रस्य स-
४. म्राट्[1]वाकाटकानां महाराजश्रीप्रवरसेनस्य सूनो[:*] सूनो-
५. रत्यन्तस्वामिम[2]हाभैरवभक्तस्य अंसभारसन्निवे-
६. शितशिवलिङ्गोद्व[3]हनशिवसुपरितुष्टसमुत्पादित-

*दुसरा पत्रा : पहिली बाजू*

७. राजव[4]ङ्शानाम्पराक्क(क्र)माधिगतभागीरत्थ्या[5]मलजलमूर्द्धाभि-
८. षिक्तानान्द(नां द)शाश्वमेधावभृथस्नातानां भारशिवानां महारा[6]ज-
९. श्रीभवनागदौहित्रस्य गौतमीपुत्रस्य पुत्रस्य वाका-
१०. टकानां महाराजश्रीरुद्रसेनस्य सूनोः अत्यन्त-
११. माहेश्वरस्य सत्य[7]र्ज्जवकारुण्यशौर्य्यविक्रमनयविनय-
१२. माहात्म्यधीमत्व[8]पात्रगतभक्तित्वधर्म्मविजयित्वमनोनै-

---

१ 'सम्राट्' हे वाकाटकांचे विशेषण घेतले तर 'सम्राड्वाकाटकानाम्' असे वाचावे लागेल. त्यापेक्षा ते प्रवरसेनाचे विशेषण मानून 'सम्राजो वाकाटकानाम्' असे वाचणे अधिक चांगले होईल.

२ म या अक्षरानंतर बरीच जागा मोकळी सुटली आहे. बहुधा तेथे आधी चुकीची अक्षरे कोरली जाऊन नंतर ती मिटवली असावी.

३ येथेही आधी चुकीची अक्षरे कोरून मग ती मिटवली असावी असे दिसते. त्याच ठिकाणी द्व हे अक्षर मागाहून कोरलेले दिसते.

४ 'राजवंशानाम्'–असे वाचावे.

५ 'भागीरथ्यमलजल'–असे वाचावे.

६ 'महाराजश्रीभवनागदौहित्रस्य गौतमीपुत्रस्य पुत्रस्य वाकाटकानां'–हे शब्द बालाघाट ताम्रपटात आढळत नाहीत.

७ 'सत्यार्ज्जव' असे वाचावे.

८ 'धीमत्त्व' असे वाचावे.

*दुसरा पत्रा : दुसरी बाजू*

१३. र्म्मल्यादिगुणसमुदितस्य वर्षशतमभिवर्द्धमानकोशद–
१४. ण्डसाधनसन्तानपुत्रपौत्रिणः युधिष्ठिरवृत्तेर्वाकाटका–
१५. नां महाराजश्रीपृथिवीषेणस्य सूनोर्ब्भ(र्भ)गवतश्चक्रपाणैः(णेः)
१६. प्रसादोपा[1]ज्जित श्रीसमुदि(द)यस्य वाकाटकाना(नां) महारा–
१७. जश्रीरुद्रसेनस्य सूनोः पू[2]र्व्वराजानुवृत्तमार्ग्गानुसारिणः
१८. सुनयबलपराक्रमोच्छिन्नसर्व्वद्विष[:*] महाराजाधिराजश्री–

*तिसरा पत्रा : पहिली बाजू*

१९. देवगुप्तसुतायां प्रभावतिगुप्तायामुत्पन्नस्य वाका–
२०. टकवंङ्[3]शालङ्कारभूतस्य शम्भोः प्रसादधृति(त)कार्त्तयुगस्य
२१. [4]महाराजश्रीप्रवरसेनस्य सूनोः पूर्व्वाधिगतगु–
२२. णविश्वासादपहृतवङ्श[5]श्रिय[:*] कोसलामेकलामाल–
२३. वाधिपति[भि*]रभ्यर्च्चितशासनस्य प्रतापप्रणतारा(रि)[शा*]सनस्य
२४. वाकाटकानां महाराजश्रि(श्री)नरेन्द्रसेनस्य सूनोः कुन्तलाधिपति–

*तिसरा पत्रा : दुसरी बाजू*

२५. सुतायां महादेव्यामज्झितभट्टा[6]रिकायामुत्पन्नस्य अत्यन्न(न्त)भाग–
२६. वतस्य तेजःक्षमासन्निधानभू[7]तस्य मग्नवंङ्[8]शोद्धर्त्तुर्व्वाकाटकानां
२७. महाराजश्रीपृथिवीषेणस्य वचनात् [।*] आरम्बीराज्ये[9] जमल–

---

१ ताम्रपटावरील येथील अक्षरे खराब झाली आहेत.
२ या आणि पुढील वाक्यात आलेले द्वितीय प्रवरसेनाचे हे वर्णन बालाघाट व सिवनी ताम्रपटातच आढळते. इतर ताम्रपटांत ही वाक्ये नाहीत.
३ 'वंशा–' असे वाचावे.
४ अन्य सर्व ताम्रपटांत यापूर्वी आढळणारा 'वाकाटकानां' हा शब्द येथे चुकीने गाळला गेला आहे. पृथिवीषेणाच्या बालाघाट ताम्रपटातही तो आहे.
५ 'वंशश्रियः' असे वाचावे.
६ 'ट्टा' या अक्षरात आकाराचे चिन्ह वर कोरले आहे. नेहमीप्रमाणे डाव्या बाजूला रेघ ओढून ती खाली नाही.
७ या ठिकाणी ताम्रपट खराब झाला आहे. त्यामुळे अक्षरे अस्पष्ट आहेत.
८ 'वंशो'–असे वाचावे.
९ प्रथम मी हा शब्द 'सुरम्बी–' असा वाचला होता, तो 'आरम्बी–' असा आहे. ही चूक प्रथम श्री. वि. प्र. रोडे यांनी माझ्या लक्षात आणून दिली. त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

२८. खेटकमार्गे अस्मत्सन्तकास्सर्वाद्धच(ध्य)क्षनियोगनियुक्ता आ–
२९. ज्ञासञ्चारिकुलपुत्राधिकृता भटाच्छा(श्चा)त्राश्च विश्रुत–
३०. पूर्व्वयाज्ञया ज्ञापयितव्याः [।*] विदितमस्तु वः यथास्माभि–
३१. रात्मनो धर्म्मायुर्ब्बलैश्वर्य्यविवृद्धये इहामुत्रहितार्थ(र्थं) वैजयिके

चौथा पत्रा : पहिली बाजू

३२. धर्मस्थाने सोमदर्य्याः अपरेण–नान्दीपुरकस्य पूर्व्वेण [–*] उब्भि–
३३. लकस्य दक्षिणेन––जलकुत्कुभकस्य उत्तरेण जमलखेट–
३४. कंनाम ग्रामः पृथिवीपुरव(वा)स्तव्यो वाजसनेयिकाश्यपस–
३५. गोत्रो(त्र)विष्णुदत्तभवदत्ताभ्यामपूर्व्वदत्त्या[1] उदक––
३६. पूर्व्वमतिसृष्टः उचितांश्चास्य पूर्व्वराजानुमतां चातुर्वैद्य–
३७. ग्राममर्य्यादापरिहारान्वितरामः[।*] तद्यथा अकरदायी
३८. अभटच्छ(च्छा)त्रप्रावेश्यः अपारम्परगोबलीवर्द्दः अपुष्प–

चौथा पत्रा : दुसरी बाजू

३९. क्षीरसन्दोहः अचारासनचर्म्माङ्गारः अलवणकिण्वक्रेणी[2](णि)–
४०. खनकः सर्व्वविष्टिपरिहारपरिहृतः सनिधिः सोपनिधिः
४१. सक्लप्तोपक्लप्त[3]: आचन्द्रादित्यकालीयः पुत्रपौत्रानुगामि(मी)
४२. भुञ्जतो न केनचिद्व्याघातः कर्त्तव्यः सर्व्वक्रियाभिः
४३. संरक्षितव्यः परिवर्द्धयितव्यश्च [।*] यश्चास्मच्छासनमगणय–
४४. मानः स्वल्पामपि परिबाधां कुर्य्यात्कारयित[4] वा तस्य ब्राह्म–
४५. णैरावेदितस्य सदण्डं निग्रहं कुर्य्यामः [।*] अस्मि(स्मि)श्चधर्म्माद[र*]करणे

पाचवा पत्रा

४६. अतीतानेकराजदत्तासञ्चिन्तनपरिपालन(नं) कृतपुण्या–
४७. नुकीर्त्तनपरिहारात्थं न कीर्त्तयामः सङ्कलपाभिद्यो(यो)गपराक्रमो–

---

१ मूळात 'दत्त्या' असेच आहे. त्यातील या मिटवून त्ता केलेला दिसतो. तथापि या अस्पष्ट पण स्वच्छ दिसतो.

२ 'क्लिन्न' असे वाचावे.

३ 'सक्लृप्तोपक्लृप्तः' असे वाचावे.

४ 'कारयेद्वा'––असे वाचावे.

४८. पजितान्वर्त्तमानानाज्ञापयामः एष्यतका[1]लप्रभविष्णुगौरवा–
४९. न्द्रविष्यान्विज्ञापयामः [।*] व्यासगि(गी)तश्चात्र श्लोकः प्र–
५०. माणीकर्त्तव्यः [।*] स्वदत्तां परदत्तां वा हरेद्यो वै वसुन्धरां [।*]
५१. गवां शतसहस्रस्य हन्तुर्हरति दुष्कृतं ॥[१॥*] संवत्सरे
५२. सप्ता[2](प्त)दशे कार्त्तिकशुक्लपक्षे द्वादश्यां सेनापतौ रविदत्ते लिखित(तम्)॥.

• • •

१ 'एष्यत्काल–' असे वाचावे.
२ येथील अक्षरे बरीच खराब झाली आहेत. तथापि, 'सप्ता(प्त)दशे' शब्द स्पष्ट वाचता येतो; आणि ते वाचन निःसंशय बरोबर आहे.

# ६

# विनयादित्याचा बनावट कासार–शिरसी ताम्रपट
## शके ५२०

### प्रास्ताविक

कासार–शिरसी (तालुका निलंगा, जिल्हा उस्मानाबाद, महाराष्ट्र राज्य) येथील पोलीस पाटील श्री. दिनकरराव बाळाजीराव यांच्या मालकीचा हा ताम्रपट असून त्यांच्याचकडून तो मला मिळाला. अनेक पिढ्यांपासून तो त्यांच्या घराण्यात आहे असे त्यांचे म्हणणे आहे. काहीं संशोधकांनी हा ताम्रपट यापूर्वी पाहिला, पण चालुक्यनृपती विनयादित्य याच्या अनेक बनावट ताम्रपटांपकीच तो असल्यामुळे त्यांनी त्याच्याकडे दुर्लक्ष केले. ताम्रपट बनावट असला तरी त्यातील माहिती संशोधकांना उपलब्ध होणे अनेक दृष्टींनीं उपयुक्त ठरण्याचा संभव असतो. ज्या राजाच्या नावाने तो दिल्याचे निर्दिष्ट केले असेल त्याच्या बिनचूक किंवा चुकीच्या वंशावळीव्यतिरिक्त ज्याला तो दिला असेल त्याची माहिती, दान दिलेल्या गावाचे नाव, त्याच्या चतु:सीमा इत्यादी भौगोलिक माहितीही त्यावरून मिळते. प्राचीन इतिहासाच्या लेखकांना या माहितीचा उपयोग होण्याचा बराच संभव असतो भाषेच्या दृष्टीनेही अशा ताम्रपटाचा उपयोग होऊ शकतो. प्रस्तुत ताम्रपटाच्या बाबतीत तर हे विशेष खरे आहे. त्यातील भाषा बऱ्याच प्रमाणात असंस्कृत असल्यामुळे, ज्या काळात तो तयार करण्यात आला असेल त्या काळातील संस्कृत भाषेचे अपभ्रष्ट स्वरूप माहीत करून घेण्यात त्याचा कदाचित उपयोग होऊ शकेल. या दृष्टीने मी तो प्रसिद्ध करण्याचे ठरविले.

त्याला दुसरेही एक कारण आहे. विनयादित्य नृपतीचे असे अनेक बनावट ताम्रपट आहेत. (परिशिष्ट पाहा.) पण त्यांतील अजून एकही ताम्रपट योग्य रीतीने संपादन करून प्रसिद्ध करण्यात आलेला माझ्या पाहण्यात नाही. महाराष्ट्रात सापडलेल्या अशा ताम्रपटांपैकी एक ताम्रपट भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्रैमासिकात (वर्ष ३, अंक १, जून–जुलै १९२२, पृष्ठे ६ ते १६) 'शके ५२० तील चालुक्यांचा ताम्रपट' या लेखात पांडुरंग मार्तंड चांदोरकर यांनी प्रसिद्ध केला आहे. पण त्यांनी केलेले ताम्रपटाचे वाचन बरेच सदोष दिसते. असाच दुसरा एक ताम्रपट

डॉ. मोरेश्वर गंगाधर दीक्षित यांना दिवे–आगर येथील श्री. पटवर्धन–जोशी यांच्याकडून मिळाला. त्याच्या साह्याने त्यांनी एक लेख 'बी. सी. लॉ. व्हाल्यूम १' मध्ये (पृष्ठे ५७० ते ५७३) 'ऑन सम् स्प्यूरिअस चालुक्य–कॉपरप्लेट ग्रॅन्टस्' या मथळ्याखाली प्रसिद्ध केला. पण त्यात त्या ताम्रपटाचे संपादन नाही. ताम्रपटाच्या दोन पत्र्यांचे ठसे व त्यातील २७ ते ४७ ओळींचेच फक्त त्यात वाचन दिलेले आहे. हे लक्षात घेता अशा एखाद्या ताम्रपटाचे संपादन होणे आवश्यक वाटले. म्हणून, श्री. दिनकरराव पाटील यांच्याकडून मला मिळालेल्या, अजून प्रकाशात न आलेल्या या ताम्रपटाचे संपादन करण्याचे मी ठरविले. ताम्रपट माझ्याकडे पाठवून तो संपादन करण्याची परवानगी दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. ताम्रपटाच्या संपादनासाठी आवश्यक ती माहिती पुरवून अनेक दृष्टींनी मला मार्गदर्शन केल्याबद्दल गुरुवर्य म. म. डॉ. वा. वि. मिराशी यांचेही मी अंतःकरणपूर्वक आभार मानतो.

## वर्णन

ताम्रपटाचे एकूण तीन पत्रे आहेत. त्यांतील पहिल्या व तिसऱ्या पत्र्याच्या आतील बाजूवर आणि दुसऱ्या पत्र्याच्या दोन्ही बाजूंवर मजकूर कोरलेला आहे. प्रत्येक पत्र्याची लांबी मध्यभागी २३ सेंटिमीटर असून रुंदी ११.५ सेंटिमीटर आहे. त्याच्या चारही बाजू काटकोनात नाहीत तर किंचित गोलाकार आहेत. प्रत्येक पत्र्याच्या डाव्या बाजूला मध्यभागी २ सें. मी. व्यासाचे छिद्र असून त्यातून मुद्रेची कडी गोवण्यात आली आहे. कडीचा व्यास ८ सें. मी. आहे. कडीची दोन्ही टोके ज्या वर्तुळाकार मुद्रेत फसवलेली आहेत तिचा व्यास ५ सें. मी. आहे. मुद्रेवर वराहाची आकृती उठावात कोरलेली असून तिच्या संरक्षणासाठी मुद्रेची वर्तुळाकार कडा उंचावलेली आहे. ताम्रपत्रांच्या कडा मात्र, एरवी असतात त्याप्रमाणे उंचावलेल्या नाहीत. तरीही त्यावर कोरलेल्या मजकुराचा कोणत्याही प्रकारे नाश झालेला नाही. सर्व मजकूर ठसठशीत अक्षरांत खोल कोरलेला असून तो स्वच्छ वाचता येतो. ताम्रपटाच्या पहिल्या पत्र्यावर १२, दुसऱ्या पत्र्याच्या वरच्या बाजूवर १३ व मागील बाजूवर १२, आणि तिसऱ्या पत्र्यावर १३ असा एकूण ५० ओळींचा मजकूर या ताम्रपटावर कोरलेला आहे.

## लिपी व अक्षरांचे वळण

ताम्रपटाची लिपी नागरी असून तिच्यातील अक्षरांचे वळण उत्तर–भारतीय अक्षरांच्या स्वरूपाचे आहे. त्यातील काही वैशिष्टये लक्ष्यात घेण्यासारखी

आहेत. ऱ्हस्व उकाराचे चिन्ह म्हणून अक्षराच्या उभ्या दंडाला आजच्याप्रमाणेच डावीकडे वळणारे अर्धवर्तुळाकार चिन्ह आहे. उदा. ओ. २ मधील 'भुवनं वपुः' यातील चिन्हे पाहा. दीर्घ ऊकाराचे चिन्ह याच्या अगदी उलट आहे. म्हणजे अक्षराच्या उभ्या दंडाला सव्याभिमुख अर्धवर्तुळाकार चिन्ह जोडून दीर्घ ऊकार दाखविला आहे. आज व्यंजनांना जे ऋकाराचे चिन्ह आपण जोडतो त्यासारखे ते दिसते. उदा. संस्थूयमान–ओ. ३, संचूर्ण्णित–ओ. २०, पूर्व्वक–ओ. ३८, पूर्व्वतः– ओ. ४२–४५ इत्यादी शब्दांतील दीर्घ ऊकाराची चिन्हे पाहा. काही ठिकाणी उभ्या दंडाला खाली ऱ्हस्व उकाराचे चिन्ह जोडून आणि शिरोरेषेला उजवीकडे आकाराचे चिन्ह जोडून दीर्घ ऊकार दाखविलेला आहे. उदा. भूपाल–ओ. २३, पूर्व्व–ओ. ३१, या शब्दांतील दीर्घ ऊकार पाहा. कु या अक्षरातील ऱ्हस्व व दीर्घ उकार दाखविण्यासाठी उकाराचे चिन्ह त्याच्या उभ्या दंडाला न जोडता ते अक्षराच्या उजव्या बाजूकडील भागाला जोडलेले आहे. उदा. कुल्लिस, कुक्कुट–ओ. ८, मुकुंद-ओ. ९; ग्रामकूट-ओ. २९ इत्यादी पाहा. एकाराचे चिन्ह म्हणून बहुतेक सर्वत्र मात्रांचा उपयोग केलेला आहे. त्यासाठी पृष्ठमात्रेचा उपयोग फक्त कार्तिकेय–ओ. ४, वासुदेव द्वेदि–ओ. ३६, निडचव्वे-ओ. ३९, तेषां–ओ. ४८, केसव-ओ. ५० या शब्दांत केला आहे. अर्थात, पृष्ठमात्रांचा उपयोग फार कमी प्रमाणात करण्यात आलेला आहे असे म्हणावयास हरकत नाही. अनुस्वार वस्तुतः अक्षरांच्या शिरोरेषांवर द्यायला पाहिजेत. प्रस्तुत ताम्रपटातील लेखनात ते क्वचितच तसे दिलेले आढळतात. उदा. परिवर्ध्धितानां-ओ. ४. पण एरवी ते अक्षरांच्या शिरोरेषांच्या पुढे दिलेले आहेत. उदा : नमस्तुंग-ओ. २. त्यातही बहुधा ते शिरोरेषांच्या पुढे पण फार अंतरावर दिलेले आहेत; इतक्या अंतरावर की ते कोणत्या अक्षरावरील अनुस्वार आहेत याचा संभ्रम पडावा. उदा. क्षोभितार्ण्णवं, दंष्ट्राग्रं-ओ. १, शिरःश्चुंवि, चंद्र, नगरारंभ-ओ. २, महीभ्रितानां चालुक्यानां–ओ. ६, मुकुंद, संक–ओ. ९. इत्यादी. ध या अक्षराचे वळण सामान्यतः व या अक्षरासारखेच आहे, फक्त त्यावर शिरोरेषा नाही. पाहा : अस्वमेधावभ्रित–ओ. ६, लवुध–ओ. १५, १८, विवुध–ओ. १८ इत्यादी. जोडाक्षरातील ण्ण चे लेखन चित्य आहे. ण ला ण न लावता अर्धा न लावला आहे. त्यामुळे त्याचे वाचन ण्न असे करायला पाहिजे. उदा. क्षोभितार्ण्नवं–ओ. १, संचूर्ण्नित–ओ. २०, विकीर्ण्न–ओ. २०, २१ पाहा. तेव्हा ण ला जोडलेले अर्ध्या न चे चिन्ह हे द्वित्ताचे चिन्ह असावे असे वाटते.

लिपी आणि अक्षरांचे वळण या बाबतीत एक महत्त्वाची गोष्ट अभ्यासकांच्या लक्षात आणून देणे इष्ट वाटते. विनयादित्याचे आतापर्यंत उपलब्ध झालेले

सर्व ताम्रपट दक्षिण–भारतीय अक्षरांच्या वळणाचे आहेत. हे वळण कानडी लिपीला अधिक जवळचे आहे. याच्या उलट, प्रस्तुत ताम्रपटातील अक्षरांचे वळण मात्र उत्तर–भारतीय स्वरूपाचे आहे. विनयादित्याच्या नावाने दिल्या गेलेल्या व बनावट म्हणून मानल्या गेलेल्या सर्वच ताम्रपटांतील अक्षरांचे वळण सारखे असून ते उत्तर–भारतीय स्वरूपाचे आहे. उत्तर–भारतीय अक्षरांच्या वळणात देखील सहाव्या शतकातील अक्षरांचे वळण वेगळे होते. तसे ते या ताम्रपटात आढळत नाही. यातील अक्षरांचे वळण दहाव्या-अकराव्या शतकातील अक्षरांच्या वळणासारखे दिसते. या बनावट ताम्रपटां-पैकी धारवाड (कर्नाटक हिस्टॉरिकल रीसर्च सोसायटी) ताम्रपटासंबंधी लिहिताना मद्रास येथील त्यावेळचे पुराभिलेख-निरीक्षक श्री. कृष्णमाचारलू यांनी असे म्हटले आहे की : 'The characters of the present grant as in the other two grants noticed above are too late for the period of Vinayaditya and also the date given in it is too early for him.' (ॲन्युअल रिपोर्ट. साउथ इंडियन एपिग्राफी १९३३-१९३४, पृ. ३०).

### असंस्कृत संस्कृत भाषा

ताम्रपटाची भाषा संस्कृत आहे, पण ती अनेक ठिकाणी असंस्कृत आहे. तिच्यातील शब्दांच्या लेखनात जे असंस्कृत विशेष आढळतात त्यांचे सविस्तर वर्णन पुढे केलेले आहे. वाक्यरचनेच्या दृष्टीने पाहिले असता या ताम्रपटातील गद्य मजकुराच्या आरंभीच 'श्रीमतां' च्या ऐवजी 'श्रीमदा' असे चुकीचे रूप आढळते. अनेक ठिकाणी अनावश्यक अनुस्वार दिलेले असल्यामुळे ती द्वितीया विभक्तीची रूपे होतात; पण तेथे ती चुकीची असून एकंदर वाक्यरचनेशी विसंगत ठरतात. उदा. समस्तभुवनाश्रयं १०, १४, १६, २१, कौंतेयं ११, तस्याग्रजं साहसांजनेयं १५, परमभट्टारकं, १७, २२, २८ इत्यादी रूपे पाहा. याच्या उलट वंशावळीतील प्रत्येक नृपतीच्या वर्णनाच्या शेवटी आलेला 'परमेश्वर' हा शब्द विसर्गरहित असल्यामुळेही व्याकरणदोष निर्माण झालेला आहे. १७ ते २२ या ओळींत आलेल्या विक्रमादित्याच्या वर्णनातील षष्ठिप्रत्ययान्त बिरुदांना-विशेषणपदांना धरून विशेष्यपद (श्रीविक्रमादित्यदेव परमेश्वर) हेही षष्ठिप्रत्ययान्तच पाहिजे होते, पण ते तसे नाही. हीच व्याकरणदुष्ट रचना २२ ते २९ या ओळींतील विनयादित्य नृपतीच्या वर्णनात झालेली आहे. विशेषण-विशेष्य संबंध मुळीच पाळलेला दिसत नाही. याशिवाय व्याकरण-दृष्टया चुकीची रूपे तर अनेक आढळतात. उदा. राजधाने ३०, वंशजं

(अनेकवचन) ४७, 'स्वदत्तं परदत्तं वा...वसुंधरां' ४९, हरेति ४९, ग्रामं (एकवचन) ३९ ते ४६; 'ग्रामं...दत्त:' ३७, ३८. 'शिर:श्चुंबि' २, मातृभि:रभिवर्ध्धितानां' ४ या शब्दांत संधी करूनही विसर्ग कायम ठेवले आहेत.

### कोरकाच्या चुका

त्यातच कोरकाच्या चुकांमुळेही भाषेच्या असंस्कृतपणात अधिक भर पडलेली आहे. ठिकठिकाणी अनावश्यक अनुस्वार व विसर्ग त्याने कसे ठेवले आहेत हे यापूर्वी पाहिलेच. कित्येक ठिकाणी अनावश्यक आकारचिन्ह कोरले आहे. उदा. दांष्ट्राग्र १, मानव्यासगोत्र ३, मांडूक ८ इत्यादी. उलट काही ठिकाणी ते चुकीने गाळले आहे. उदा. चंद्र(द्रा)दित्य ९, देवभोगं(गा)ग्रहारान् ३१, परंपराणं(णां) ५, सम(मा)सादित ५, ग्रामकूट(टा)युक्तक २९ इत्यादी. 'प्रसाद' हा शब्द तर कोरकाने स्वच्छ 'प्रसदा' असा कोरला आहे. वर्ण-विपर्यासाची ही चूक होय. 'अध्यायनध्यापन' ३४ यातही वर्णविपर्यासामुळे अशीच चूक झालेली आहे. 'विनयादित्य' हा शब्द 'विनेयादित्य' २८ असा, तर 'पुण्य' हा शब्द 'पोण्य' ३१ असा कोरला आहे.

### लेखनाचे स्वरूप

संस्कृत भाषेच्या लेखनाचे जे स्वरूप या ताम्रपटात आढळते ते पुढीलप्रमाणे. (१) परसवर्णाऐवजी सामान्यत: सर्वत्र अनुनासिकाचा उपयोग केलेला आहे. उदा. विस्रांत १, तुंग, चुंबि, चंद्र, आरंभ, स्तंभ, शंभवे २, म्रिदंग १०, मंडल, दंड १२; पिंडखंडितप्रचंडदोर्द्दंडमंडल १३ इत्यादी. (२) **इ** हा स्वर **यि** असा लिहिला आहे. उदा. यिव=इव २७. (३) याच्या उलट, **ये** ऐवजी **ए** लिहिला आहे. उदा. ए ४८. (४) **ऋ** या स्वराची पुढील रूपांतरे यात आढळतात. (अ) ऋ=रि. उदा. आविष्क्रित्तं १, वशीक्रित ५, मही-भ्रितानां, अवभ्रित ६; क्रित ७; प्रिथ्वी १०, १४, १६, २१, २५, २७, **प्रिथु** २५, क्रिमि: ४९, व्रिषभ ८, न्रिप १२, २०, २४; म्रिदंग १०, ग्रिहित २०; **विध्धये** ३१. (आ) ऋ=रु. उदा. मात्रुभि: ४, ब्रुहस्पतो ३३. (५) **ख** ऐवजी **क**. उदा. संक ९. (६) **झ** ऐवजी **ज**. उदा. जल्लरी ९. (७) **थ** ऐवजी **त**. उदा. अवभ्रित ६, स्तित ७, अवस्तानेन ३० (८) क्वचित **त** ऐवजी **थ** लिहिलेलाही आढळतो. उदा. संस्थूयमान ३. त्याचप्रमाणे (९) **प** ऐवजी **फ**ही आढळतो. उदा. **फ**णव ९. (१०) **ल** हे अक्षर अनेक ठिकाणी द्वित्त

करून ल्ल असे लिहिले आहे. उदा. त्रैल्लोक्य २, कल्लश, कुल्लिस, हल्ल, मंडल्लाग्र-१३, दिगंतराल्लस्य, कुल्लविल्लय १९, चोल्ल २०, भूपाल्ल, मौल्ली, युगल्ल, माल्लव, २३; कल्लिग २४, मंडल्लाधीस्वर, तल्ल २५; तुल्लत्व २६, काल्लयुक्त ३२, निर्म्मल्ल ३४. ल्ल=ळ असे तर नसेल ना? (११) **ब** साठी सर्वत्र **व** अक्षर लिहिलेले आहे. उदा. चुंवि २, सप्तांविका ४, लवुध १५, १८, विदुध १८, संवद्यमान २९, पट्टवंधोत्सव ३०, वृहस्पतो ३३, व्राह्मण ३४, व्रह्मपुरि ३५. (१२) **श** ऐवजी बहुधा **स** लिहिलेला आढळतो. उदा. विस्रांत १, सिरः २, संभवे ३, वसीक्रित ५, असेष ५, २५, अस्व ६, ८, सरभ, साद्र्दूल, कल्लस, कुल्लिस ८, संक ९, आस्रय १०, १४, १६, २१, २७, २८, ५०, परमेस्वर १०, ११, १४, १७, २२, २८, पुलकेसि ११, किसोर १३, वेंगीस २४, मंडलाधीस्वर २५, प्रसमन, आस्रित्य २६, परसुराम २७, कुसल २९, विसत्युत्तरपंचसतीषु, सकवर्ष ३२, वैसाख ३३, सप्तसत ३६, सासन ३७, द्वादस, वंसज ४७, केसव ५०. (१३) क्वचित **ष** साठीही **स** लिहिलेला आढळतो. उदा. अभिसिक्त. (१४) उलट, क्वचित **स** साठीही **ष** हा लिहिलेला आढळतो. उदा. अवभाषित १९. (१५) त्याचप्रमाणे एका ठिकाणी **श** साठीही **ष** लिहिलेला आढळतो. उदा. यषो ३१.

## कालनिर्देश

प्रस्तुत ताम्रपटात दानकालाचा निर्देश 'विसत्युत्तरपंचसतीषु सकवर्षप्रतीतेषु काल्लयुक्तसंवत्सरप्रवर्त्तमाने वैसाखप्राप्तमवास्यां वृहस्पतो वारे सूर्य्यग्रहणदान-तात्काले-' म्हणजे गतशक ५२०, कालयुक्त संवत्सर, वैशाख अमावस्या, गुरुवार, सूर्यग्रहण, असा केलेला आहे. (ओ. ३२–३३) स्वामीकन्नु पिल्ले यांच्या भारतीय पंचांगानुसार तो अगदी बरोबर आहे. गत शकवर्ष ५२० चा संवत्सर 'कालयुक्त' हा त्यात निर्दिष्ट असून चालू शकवर्ष ५२१ च्या वैशाख अमावस्येला बरोबर गुरुवार येतो. कर्नाटक हिस्टॉरिकल सोसायटीच्या संग्रहातील विनयादित्याच्या धारवाड ताम्रपटात (बनावट) नेमका हाच काळ निर्देशिलेला आहे. फरक इतकाच की, तेथे त्या दिवशी व्यतीपात असल्याचे म्हटले आहे, तर आपल्या ताम्रपटात त्या दिवशी सूर्यग्रहण असल्याचे सांगितले आहे. पिल्ले यांच्या जंत्रीनुसार चालू शक ५२१ च्या वैशाख अमावस्येला सूर्यग्रहण देखील होते. तेव्हा आपल्या ताम्रपटातील कालनिर्देश सर्व दृष्टींनी बरोबर आहे असे म्हणावयास हरकत नाही. त्या दिवशी इंग्रजी तारीख ३० एप्रिल ५९९ ही होती.

## कालनिर्देश उत्तरकालीन : काही शंका

चालुक्य नृपती विनयादित्य याची कारकीर्द शके ६०३ ते ६१८ (इ. स. ६८१ ते ६९६) ही इतिहासमान्य आहे. या काळातील त्याचे अनेक ताम्रपट उपलब्ध आहेत. त्याच विनयादित्याच्या नावाने दिलेला प्रस्तुत ताम्रपट शके ५२० (इ. स. ५९९) चा म्हणजे ८२ वर्षांनी अगोदरचा आहे. त्यामुळे तो संशयास्पद अर्थात बनावट असावा असे वाटणे स्वाभाविक आहे. त्यातील कालनिर्देश पंचांगाच्या दृष्टीने बरोबर असला तरी त्याबद्दल संशय उत्पन्न करणारी काही प्रमाणे ताम्रपटातच आढळतात. त्यांचा विचार करणे आवश्यक आहे.

## बाणभट्टाच्या श्लोकाचा अंतर्भाव

(१) ताम्रपटाच्या आरंभी आलेल्या दोन श्लोकांपैकी 'नमस्तुंगशिरश्चुंबि–' हा श्लोक सुप्रसिद्ध संस्कृत कवी बाणभट्ट याने लिहिलेल्या 'हर्षचरित' ग्रंथातील प्रारंभीचा मंगल श्लोक होय. बाणभट्ट हा कनोजाधिपती हर्षवर्धन याच्या आश्रयाला होता. हर्षवर्धनाने इ. स. ६०६ ते ६४७ पर्यंत राज्य केले. त्यानंतर म्हणजे इ. स. ६४७ नंतर केव्हा तरी बाणभट्टाने 'हर्षचरित' ग्रंथ लिहिला असावा. आणि त्यातील श्लोक ज्याअर्थी या ताम्रपटात घेतला आहे त्याअर्थी तो त्याहूनही नंतर केव्हा तरी तयार करण्यात आला असला पाहिजे. हा काळ निश्चितपणे सांगता येत नसला तरी तो इ. स. ६४७ नंतरचाच असला पाहिजे हे उघड आहे.

चालुक्य नृपती सहावा विक्रमादित्य याच्या 'हडळी' ताम्रपटातही आरंभीच्या भागात 'नमस्तुंगशिरश्चुंबि... ' हा श्लोक उद्धृत केलेला आढळतो. (पाहा, इंडियन अँटिक्वेरी व्हॉल्यूम १३, पृ. ९२). हडळी ताम्रपटाचा काळ शके १००६ रक्ताक्षी संवत्सर, असा आहे. त्यावरून असे दिसते की, शककाल अकराव्या शतकाच्या पूर्वार्धात (म्हणजे इसवी सनाच्या अकराव्या शतकाच्या उत्तरार्धात) चालुक्यांच्या ताम्रपटात आरंभी बाणभट्टाचा हा श्लोक घालण्याची पद्धत सुरू झाली असावी. तसे असल्यास विनयादित्याचा प्रस्तुत कासारशिरसी ताम्रपटही त्याच सुमारास केव्हा तरी तयार करण्यात आला असावा.

## षष्टिसंवत्सरगणनेनुसार संवत्सराचा उल्लेख

(२) कालनिर्देशाच्या बाबतीत दुसरी लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे त्यातील शकसंवत्सरांचा निर्देश. विजयादित्य, विनयादित्य आणि त्यापूर्वीच्या

चालुक्य नृपतींच्या ताम्रपट–शिलालेखांत शकवर्षाबरोबर संवत्सराचा उल्लेख येत नाही. त्यांच्या 'प्रवर्धमान विजयराज्यसंवत्सराचा' म्हणजे राज्यवर्षाचा उल्लेख त्यात असतो; बार्हस्पत्य कालगणनेतील षष्टिसंवत्सरचक्र–पद्धतीनुसार येणाऱ्या संवत्सराचा उल्लेख नसतो, हे लक्षात घेतले पाहिजे. तसा शकसंवत्सरांचा उल्लेख प्रस्तुत ताम्रपटातील (आणि विनयादित्याच्या नावावर असलेल्या अशा इतर बनावट ताम्रपटांतील) कालनिर्देशात आहे. ही बाब या ताम्रपटाच्या बनावटपणाची सूचक आहे.

विनयादित्याच्या अशा बनावट ताम्रपटांपैकी बेल्लारी ताम्रपटाची माहिती 'ॲन्युअल रिपोर्ट, साऊथ इंडियन एपिग्राफी' १९१७–१८, पृ. १३४ मध्ये आली आहे. त्या ताम्रपटात शके ५१२, साधारण संवत्सर, माघ शुद्ध त्रयोदशी, सोमवार, हा काळ निर्दिष्ट केला आहे. हा कालनिर्देश पंचांगाच्या दृष्टीने दि. ब. स्वामीकन्नु पिल्ले यांनी स्वतः तपासून पाहिला होता. त्यांचा अभिप्राय वरील अहवालातच पृ. १२६ वर उद्धृत केला आहे. तो असा: 'In A. D. 590—S'aka 512 expired, Māgh S'ukla 13 fell on Monday as stated....all the same the record may be forgery; there being no evidence that the Southern Bārhaspatya recknoing according to which the year would be Sādhāraṇa was in use in the sixth centuary A. D.' याचा अर्थ असा की, शककालाबरोबरच संवत्सराचाही निर्देश करणारी दाक्षिणात्य बार्हस्पत्य कालगणना इसवी सनाच्या सहाव्या शतकात वापरात असल्याचा पुरावा आढळत नाही. त्याअर्थी हा ताम्रपट बनावट असला पाहिजे, कारण ताम्रपटात शककालाबरोबरच दाक्षिणात्य बार्हस्पत्य कालगणनेनुसार संवत्सराचाही उल्लेख आहे. हे विवेचन आपल्या ताम्रपटालाही लागू होते.

बार्हस्पत्य कालगणनेच्या दोन पद्धती आहेत. एक द्वादश संवत्सर गणनेची, आणि दुसरी षष्टिसंवत्सर गणनेची. षष्टिसंवत्सरगणनेत साठ वर्षांचे एक चक्र मानले असून त्यातील प्रत्येक वर्षाला एक संवत्सरनाम आहे. या षष्टिसंवत्सरगणनेच्याही दोन पद्धती आहेत. उत्तर–भारतीय पद्धतीत क्षय संवत्सर मानण्यात येतो. त्यामुळे त्या पद्धतीत मधूनमधून एक वर्ष गाळले जाते. दक्षिण–भारतीय पद्धतीत ते गाळले जात नाही. पूर्वी दक्षिण भारतातही उत्तर-भारतीय पद्धती होती. पण पुढे श.८३० पासून ती लुप्त होऊन केवळ दक्षिण-भारतीय पद्धती चालू झाली. (पाहा. ग. ह. खरे संशोधकाचा मित्र. पृ. ९२, ९३ ; विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९६२, डॉ. वा. वि. मिराशी यांचा 'राष्ट्रकूट

नृपती चतुर्थ गोविंद याचा अंदुरा ताम्रपट,' पृ. २, ३) आपल्या ताम्रपटात षष्टिसंवत्सरगणनेच्या दक्षिण–भारतीय पद्धतीनुसार शकसंवत्सरांचा निर्देश असल्यामुळे तो शके ८३० नंतर केव्हा तरी लिहिला गेला असावा असे दिसते.

### शासकीय विभागातील दशमान पध्दती

(३) प्रस्तुत ताम्रपटात दान दिलेले गाव 'वीरिगे' याचा उल्लेख 'वीरिगे-चाल्लीस' असा, आणि ते ज्या विषयात होते त्या अमरावतीचा उल्लेख 'अमरावती–सप्तशत' असा आहे. (ओ. ३६). हा आकड्याचा उल्लेख त्या ग्रामसमूहात किंवा विषयात अंतर्भूत होणाऱ्या गावांच्या संख्येचा होय, हे यापूर्वी सूचित केलेच आहे. ग्रामसमूह आणि विषय यांची रचना करताना त्यात दशगुणित ग्रामसंख्येचा अंतर्भाव करण्याची ही दशमान पद्धती म्हणून ओळखली जाते. राज्याचे शासकीय दृष्टीने विभाग पाडताना ते अशा दशमान पद्धतीचा स्वीकार करून पाडावे असे धर्मशास्त्रलेखकांनी सुचविले होते. ही पद्धत दक्षिण भारतात इसवी सनाच्या आठव्या शतकापासून सुरू झाली आणि क्रमाक्रमाने पुढे ती रूढ झाली, असे प्राचीन इतिहासतज्ञांचे मत आहे. (पाहा, दि अर्ली हिस्ट्री ऑफ दि डेक्कन, भाग १, पृ. ५१, संपा. जी. यझदानी) ज्या-अर्थी प्रस्तुत ताम्रपटात राजकीय विभागांच्या दशमान पद्धतीचा उपयोग केलेला आहे त्या अर्थी या ताम्रपटाची निर्मिती व लेखन इ. सनाच्या ८ व्या शतकात किंवा त्यानंतर केव्हातरी झाले असावे. यामुळेही शके ५२०=इ. स. ५९९ हा काल ताम्रपटात निर्दिष्ट असला तरी तो खरा मानता येत नाही. नंतर केव्हातरी तयार केलेल्या या ताम्रपटात हा मागील कालनिर्देश जाणूनबुजून घातला असावा, हे स्पष्ट दिसते.

### वंशावळी वर्णन : चर्चा

प्रस्तुत ताम्रपटाच्या द्वारे चालुक्यनृपती विनयादित्य सत्याश्रय याने वासुदेव द्विवेदीभट्टाला श्रीवल्लत या नावाचे गाव दान दिलेले आहे. ताम्रपटाच्या आरंभी 'जयत्याविष्कृतं विष्णोः' हा एक व त्यानंतर 'नमस्तुंगशिरश्चुंबि–' हा दुसरा, असे दोन श्लोक आलेले आहेत. यांपैकी पहिला श्लोक चालुक्यनृपतींच्या बहुतेक ताम्रपटांच्या आरंभी येतो; पण दुसरा श्लोक मात्र त्यांच्या समकालीन दुसऱ्या कोणत्याच ताम्रपटात आढळत नाही. बनावट म्हणून समजल्या गेलेल्या, विनयादित्याच्या इतर ताम्रपटांतही तो आढळत नाही. या ठिकाणी तो आहे; हे या ताम्रपटाचे एक वैशिष्टय म्हणता येईल. हा दुसरा श्लोक

सुप्रसिद्ध संस्कृत कवी बाणभट्ट याने लिहिलेल्या 'हर्षचरिता' च्या आरंभी आलेला मंगल श्लोक होय, हे यापूर्वी आपण पाहिले. येथे एवढेच लक्षात घ्यावयाचे की, या ताम्रपटात प्रारंभी वराह–अवतारधारी विष्णूचे व नंतर शंकराचे मंगलाचरण आले आहे.

त्यानंतर प्रथम चालुक्यवंशाचे वर्णन आहे. चालुक्यांच्या इतर ताम्रपटांत आढळते तसेच ते आहे. या चालुक्यकुळाला भूषणभूत पुलकेशिवल्लभ, त्याचा पुत्र कीर्तिवर्म्मा, त्याचा वडील भाऊ विजयादित्यदेव, त्याचा मुलगा विक्रमादित्यदेव आणि शेवटी त्याचा मुलगा विनयादित्यदेव अशा अनुक्रमाने चालुक्यनृपतींची वंशावळ या ताम्रपटात वर्णन केलेली आहे. विनयादित्याच्या नावावर असलेल्या बहुतेक बनावट ताम्रपटांत हीच वंशावळ दिलेली आढळते. पण त्यांतील बेल्लरी आणि मद्रास म्युझियम या दोन ताम्रपटांत मात्र विजयादित्याला कीर्तिवर्म्याचा वडील भाऊ न म्हणता मुलगा असे म्हटले आहे.

### ताम्रपटातील विजयादित्य = द्वितीय पुलकेशी ?

ताम्रपटादिकांच्या आधारे चालुक्यांची इतिहासमान्य वंशावळ पुढीलप्रमाणे आहे. प्रथम पुलकेशी–त्याचा पुत्र कीर्तिवर्मा–त्यानंतर त्याचा भाऊ मंगलेश–त्यानंतर कीर्तिवर्म्याचा पुत्र द्वितीय पुलकेशी–त्यानंतर त्याचा पुत्र प्रथम विक्रमादित्य आणि मग त्याचा पुत्र विनयादित्य. या विनयादित्यानंतर राज्य करणाऱ्या नृपतीचे नाव विजयादित्य असे होते. या इतिहासमान्य चालुक्यवंशावळीशी आपल्या ताम्रपटात दिलेली वंशावळ जुळत नाही, हे सांगावयास नकोच. इतिहासमान्य वंशावळीवरून असे दिसते की, कीर्तिवर्म्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा द्वितीय पुलकेशी लहान असल्यामुळे कीर्तिवर्म्याचा धाकटा भाऊ जो मंगलेश त्याच्याकडे राज्यपद गेले. वयात आल्यानंतर ते पुलकेशीने आपल्या काकाजवळून (कीर्तिवर्म्याजवळून) हिसकावून घेतले व तो सिंहासनाधिष्ठित झाला. चालुक्याच्या वंशात या द्वितीय पुलकेशीची कारकीर्द प्रसिद्ध आहे. प्रस्तुत ताम्रपटात मात्र कीर्तिवर्म्यानंतर त्याचा वडील भाऊ विजयादित्य गादीवर बसला असे म्हटले आहे. काही बनावट ताम्रपटांत त्यालाच कीर्तिवर्म्याचा मुलगा म्हणून संबोधले आहे. हे सर्व इतिहासमान्य वंशावळीशी विसंगत आहे. प्रस्तुत ताम्रपटाच्या लेखकाने द्वितीय पुलकेशीलाच कदाचित 'विजयादित्य' या नावाने संबोधले असावे. तसे असेल तर या बनावट ताम्रपटांपैकी बेल्लरी आणि मद्रास म्युझियम ताम्रपटांत त्याला कीर्तिवर्म्याचा 'सुत' म्हटले आहे ते बरोबर मानता येईल. पण ताम्रपटलेखकाला विजयादित्य =

मंगलेश जर अभिप्रेत असेल तर ते चूक ठरेल. कारण, एकतर मंगलेश हा कीर्तिवर्म्याचा वडील भाऊ नसून धाकटा भाऊ होता. तसे नसते तर प्रथम पुलकेशीनंतर वंशपरंपरेने तोच गादीवर बसला असता. यदाकदाचित असे मानले की, प्रथम पुलकेशीला विजयादित्य=मंगलेश हा एक व दुसरा कीर्तिवर्मा अशी दोन मुले होती, या पुलकेशीच्या मृत्यूनंतर विजयादित्य (=मंगलेश) याला डावलून कीर्तिवर्मा गादीवर बसला, पण त्याच्या मृत्यूनंतर मात्र विजयादित्याने (अर्थात मंगलेशाने) गादी बळकावली तरी या ताम्रपटातील वंशावळीचा इतिहासमान्य वंशावळीशी विरोध कायम राहतो. कारण, तीत मंगलेशानंतर द्वितीय पुलकेशी गादीवर आला असे असून त्याच्या पराक्रमांचे विस्तारपूर्वक वर्णन आढळते. त्याला या बनावट ताम्रपटांच्या वंशावळीत कुठे जागाच नाही. अर्थात, आपल्या ह्या ताम्रपटातील वंशावळ चुकीची आहे असेच म्हटले पाहिजे. या बनावट ताम्रपटांपैकी फार तर वेल्लरी आणि मद्रास म्युझियम ताम्रपटातील वंशावळ खरी मानता येईल. पण त्यासाठीही विजयादित्य हे द्वितीय पुलकेशीचे दुसरे नाव असावे असे मानावे लागेल. पण त्याला अन्य उपलब्ध साधनांत कोठेही आधार आजतरी सापडत नाही, हेही खरे आहे.

### प्रथम पुलकेशी

वस्तुस्थिती अशी दिसते की, विनयादित्याच्या इतिहासमान्य ताम्रपटांतील आराखड्यातच बरेचसे बदल करून या बनावट ताम्रपटातील वंशावळीचा आराखडा तयार केलेला असावा. चालुक्य कुलाच्या वर्णनानंतर प्रथम पुलकेशीचे वर्णन यात आलेले आहे. त्यातील 'अस्वमेधावभ्रितस्नानपवित्रीकृतगात्रस्य' एवढेच वर्णन अन्य ताम्रपटांत आढळते. त्यानंतर 'जयछत्रचामर–' इत्यादीपासून तो 'परमभट्टारक' या शब्दापर्यंतची विशेषणे प्रस्तुत ताम्रपटात नवीन आलेली आहेत. त्यात ऐतिहासिक दृष्टीने नवीन असे काहीही नाही. त्यात त्या नृपतीचे छत्र, चामर, सिंहासन आणि अनेक पशुपक्षांच्या आकृतींनी विराजित असा महाध्वज याचे वर्णन असून, त्या नृपतीच्या समोर वाजणाऱ्या निरनिराळ्या वाद्यांची नावे आलेली आहेत. मुळात नसलेली 'समस्तभुवनाश्रय... परमभट्टारक' ही विशेषणेही पुलकेशीला लावली आहेत.

### कीर्तिवर्मा

त्यानंतर प्रथम पुलकेशीचा पुत्र कीर्तिवर्मा याच्या वर्णनातील 'वनवास्यादिपरन्रिपतिमंडलप्रणिबद्धविशुद्धकीर्तिः' एवढा भाग प्रसिद्ध वंशावळीतून घेतला

असून त्यापुढील विशेषणे मात्र पदरची नवीन घातली आहेत. त्यांतही ऐतिहासिक दृष्टीने महत्त्वाचे असे काहीही नाही. त्यापूर्वी, मुळातील 'पराक्रमाक्रान्त' या शब्दांचे चुकीचे वाचन करून त्याचे 'पराक्रमकौंतेय' असे झाले आहे. त्यावरून कीर्तिवर्मा हा पराक्रमाने कौंतेयासारखा म्हणजे अर्जुनासारखा होता असे अलंकारिक रीतीने सूचित होते.

### विजयादित्य

कीर्तिवर्म्यानंतर त्याचा वडील भाऊ विजयादित्य हा गादीवर आला. (या माहितीविषयी चर्चा यापूर्वीच्या परिच्छेदात केलेलीच आहे.) त्याचे या ताम्रपटातील वर्णन हे द्वितीय पुलकेशीचे वर्णन आहे असे मानले तर असे आढळेल की, इतिहासमान्य ताम्रपटांमधील त्याच्या वर्णनातील 'पराजयोपात्तपरमेश्वरापरनामधेयः' एवढे वाक्य आपल्या या ताम्रपटात 'पराजयोपलबुधपरमेस्वरपरमाणां'—या शब्दांत घेतलेले आहे. 'उपात्त' या शब्दाऐवजी 'लबुध' हा शब्द योजला. 'अपरनामधेयः' याची 'परमाणां' या अक्षरात झालेली विकृती हास्यास्पद आहे. यावरून आपल्या ताम्रपटलेखकाला विजयादित्य म्हणजे द्वितीय पुलकेशी अभिप्रेत असावा या तर्काला बळकटी येते. पण तसे खरोखरच असते तर प्रसिद्ध वंशावळीत द्वितीय पुलकेशीने श्रीहर्षवर्धनाचा पराजय केल्याचे जसे स्पष्ट म्हटले आहे तसे या लेखकाने का म्हटले नाही, हर्षवर्धनाचे नाव त्याने का गाळले, हे प्रश्न उपस्थित होतात. द्वितीय पुलकेशी अभिप्रेत नसून दुसराच कोणी विजयादित्य वर्णन करायचा असेल तरीही त्याच्या वर्णनात प्रसिद्ध वंशावळीतील द्वितीय पुलकेशीच्या वर्णनातील वर उद्धृत केलेले शब्द या ताम्रपटलेखकाने तेथून उचलले आहेत असे स्पष्ट दिसते.

### विक्रमादित्य

विजयादित्यानंतर त्याचा मुलगा विक्रमादित्य याचे वर्णन आपल्या या ताम्रपटातील १७ ते २२ या ओळींत आलेले आहे. विक्रमादित्याच्या पराक्रमाची सर्वसाधारण वर्णने पहिल्या दोन विशेषणांत आली आहेत; आपण मिळविलेल्या विजयांनी विक्रमादित्याच्या चेहऱ्यावर वैभव विलसत होते, तसेच विद्वान, रसिक व समरांगणातील शत्रू यांच्यामध्ये त्याने सारखीच कीर्ती संपादन केली होती, एवढाच त्याचा भावार्थ आहे. त्यानंतरच्या वर्णनात विक्रमादित्याने पल्लव नृपतीचा पराजय करून नंतर कांची हे शहर काबीज केले, तसेच त्याने पेर, चोल आणि पांड्य नृपतींचा पराभव केला हे अलंकारिक रीतीने

वर्णन केले आहे. चिरडून टाकलेल्या या नृपतींच्या मुकुटांच्या शेखरातील मण्यांच्या नीलकिरणांनी विक्रमादित्याचे चरणकमल अभिषिक्त झाले होते असे म्हटले आहे.

विनयादित्याच्या अन्य उपलब्ध ताम्रपटांतील वर्णनाशी हे वर्णन बहुतेक जुळते. फरक इतकाच की, पांड्य आणि चेर नृपतींचा स्वतंत्र उल्लेख अन्य ताम्रपटांत आढळत नाही, तर तेथील केरळ धरणीधराचा उल्लेख यात नाही. तो या (सर्व बनावट) ताम्रपटांत आढळतो. मुळातील बरीच वाक्ये त्यात विकृत होऊन आलेली आहेत. मुळातील आरंभीचे शब्द 'मतिसहायसाहसमात्रसमधिगत' हे शब्द गाळले असून त्यापुढील 'निजवंशसमुचितचितराज्यविभवस्य' याचे विकृत रूपांतर 'निजविजयसमुचिततरास्यविभवस्य' असे झाले आहे. विक्रमादित्याची यापुढील विशेषणेही मुळातूनच उचलली आहेत, पण त्यात बदल आणि विकृती पुष्कळ आहेत. 'विविधरसितसितसमरमुखगत' या शब्दांचे 'विवुधरसिकसमररिपुगत' या शब्दांत रूपांतर झाले आहे. तीच दुर्दशा त्यापुढील विशेषणवाक्यांची झाली आहे. 'हिमकरकरविमलकुलपरिभवहेतु'—यातील 'विमल' शब्द आपल्या ताम्रपटात गाळला असून 'परिभव' शब्दाच्या ठिकाणी 'विलय' शब्द घातला आहे. मुळातील त्यापुढील 'प्रभावकुलिशदलित—' या, व 'अनन्यसमवनत—' या दोन विशेषणांतील आशय आपल्या ताम्रपटात मागील वाक्यात 'संचूर्णितचेरचोलपांड्य–' इत्यादी शब्दांनी एकाच वाक्यात आणला आहे. त्यातही आपल्या ताम्रपटात 'चेर' शब्द जास्तीचा घातला असून मुळातील 'केरळ' शब्द वगळला आहे. मुळातील 'चयमान-मानशृंगस्य' हेही शब्द गाळले आहेत. 'सलिलाभिषिक्त' चे 'सनिलाभिसिक्त' झाले आहे. मुळातील 'त्रिसमुद्रमध्यवर्तिभुवनमंडलाधीश्वरस्य' हे विशेषण पूर्णपणे गाळले आहे.

## विनयादित्य

विक्रमादित्यानंतर त्याचा मुलगा विनयादित्य गादीवर आला. त्याचे वर्णन २२ ते २८ ओळींत आलेले आहे. केवळ आपल्या विनयाने नमवलेल्या अनेक नृपतींच्या शिरोमालांनी त्याचे सुंदर चरणकमल गोंजारले जात होते; कोंकण, मालव, गोल्ल (?), गूर्जर, कलिंग, वेंगी इत्यादी राज्यांच्या नृपतींच्या मुकुटपंक्तींनी त्याचे पादपीठ (पाय ठेवण्याचे आसन) सुशोभित झाले होते; तीन समुद्रांच्या मध्यभागी असलेल्या प्रदेशाचा तो स्वामी होता; वासुदेव श्रीकृष्णाप्रमाणे तो ज्ञानी होता; परशुरामाप्रमाणे तो राजांचा नाश करणारा होता; आणि भरताप्रमाणे अनेक राजांना आश्रय देणारा होता. यात ऐतिहासिक-दृष्ट्या महत्त्वाचा भाग म्हणजे ज्या राजांना त्याने जिंकले होते त्यांचा उल्लेख.

बाकीचे वर्णन सर्वसाधारण स्वरूपाचे अलंकारिक असून स्तुतिपाठांनी भरलेले आहे. इतिहासमान्य ताम्रपटांत देखील विनयादित्याचे वर्णन असेच अतिशयोक्त आहे. त्यात, त्याने कांचीपति, तसेच कमेर, पारसिक, सिंहल इत्यादी द्वीपांच्या राजांना जिंकले होते, शिवाय उत्तर भारताच्या अधिपतीला जिंकून त्याजजवळून पालिध्वज आणि इतर सर्व ऐश्वर्यचिन्हे मिळवली होती असे वर्णन आहे. एवंगुणविशिष्ट विनयादित्याने प्रस्तुत ताम्रपटातील दान दिलेले आहे.

विनयादित्याच्या वर्णनातही बराचसा मजकूर मूळ ताम्रपटातून उचलला आहे, पण तो बरीच फिरवाफिरव करून. 'त्रिसमुद्रमध्यवर्ति–' इत्यादी मुळातील विक्रमादित्याचे विशेषण विनयादित्यासाठी वापरले आहे. मुळातील 'पितुराज्ञया–' या शब्दापासून तो '–अवष्टभ्य' या शब्दापर्यंतच्या वाक्यातून बरेच शब्द उचलून 'प्रिथुराज्योपनीता. . .माविष्ट्रेस्य' हे वाक्य तयार झालेले दिसते. त्यात 'पितुराज्ञया-'चे 'प्रिथुराज्योपनीत-' असे झाले आहे. 'बल'ची जागा 'फल' शब्दाने घेतली असून 'अवष्टभ्य' शब्दाऐवजी 'आविष्ट्रेस्य' असा शब्द आला आहे. या संपूर्ण वाक्यातून सुसंगत असा कोणताच अर्थ निघत नाही. त्यापुढील 'समस्तविषय. . .मनोनुरञ्जनः' या मूळ विशेषणातील 'समस्त' शब्दाची जागा 'यमधि' शब्दाने घेतली आहे. ते कदाचित 'समधि-' असेही असू शकेल. मुळातील 'प्रशमनाद्विहिततन्मनो-' इत्यादीचे 'प्रशमनाद्विहितमात्र-' असे झाले आहे. 'तन्मनोनुरञ्जनः' हे शब्द गाळले आहेत. मुळात 'अत्यन्तवत्सलत्वाद्युधिष्ठिर इव श्रीरामत्वाद्वासुदेव इव' असे आहे तर आपल्या ताम्रपटात-'आंतरतुल्लत्वयिर्व्विवुधवासुदेव इव' असे आहे. त्यात फार घोटाळा उडाला आहे, हे स्पष्ट दिसते. त्यानंतरचे विशेषण मुळात 'नृपांकुशत्वात्परशुराम इव' असे आहे. त्यातील 'नृपांकुशत्वात्'चे 'न्रिपकंसातु-' असे आपल्या ताम्रपटात झाले आहे.

विनयादित्य गादीवर बसण्यापूर्वी त्याचे आसन डळमळीत असावे, गादीवर हक्क सांगणाऱ्या विरोधकांना जिकल्यानंतरच त्याला सिंहासन प्राप्त झाले असावे असे 'स्थिरतरावस्थानेन' (ओ. ३०) या विशेषणाच्या योजनेवरून दिसते. आपले आसन पक्के झाल्यानंतर तो पट्टबंधोत्सव (डोक्यावर मुकुट धारण करण्याचा समारंभ) साजरा करण्यासाठी 'कुरुंद' गावी गेला होता. या उत्सवाच्या वेळी आपले पुण्य आणि यश वाढविण्यासाठी, पूर्वी केव्हा तरी देवालयांना दिले गेलेले पण नंतर लुप्त झालेले अग्रहार पुन्हा त्याच व्यक्तींना किंवा देवस्थानांना त्याने दान म्हणून दिले; आणि अशा रीतीने पूर्वीच्या दानांचे नवीनीकरण करून पूर्वीच्या राजांच्या इच्छांचे अनुपालन केले. प्रस्तुत

ताम्रपटात निर्दिष्ट केलेले ग्रामदान हे त्याचपैकी एक असावे असे 'तत्पालनां' (ओ. ३२) या शब्दावरून दिसून येते.

या ठिकाणी एका गोष्टीकडे अभ्यासकांचे लक्ष वेधणे आवश्यक वाटते. राष्ट्रकूटनृपती तृतीय इंद्रराज याच्या बहुतेक ताम्रपटात आलेले एक वाक्य या (व इतर बनावट ताम्रपटांतही) आवश्यक तेवढा बदल करून जसेचे तसे उद्धृत केलेले आढळते. उदा. इंद्रराजाच्या वजीरखेड ताम्रपटात (एपि. इंडिका, व्हॉ. ३८, भाग १, पृ. १८, ओ. ४६-४८) 'यथा मान्यखेटराजधानीस्थिरतरावस्थानेन पट्टबन्धोत्सवसंपादनाय समानन्दितकुरुन्दकमुपागतेन मया राज्याभिषेकसमये मातापित्रोरात्मनश्चैहिकामुत्रिकपुण्ययशोभिवृद्धये पूर्व्वलुप्तानपि देवभोगाग्रहारान्पालयता-' असे वाक्य आहे, तर प्रस्तुत ताम्रपटात 'रक्तापुरराजधाने स्तिरतरस्वस्तानेन पट्टबंधोत्सवसंपादनान्वितकुरुंदमुपागतेन पोण्ययषोव्रिवृध्धये पूर्व्वलुप्तानपि देवभोग(गा)ग्रहारानुपालयतः(ता)-' असे आहे. (ओ. ३०–३२). या दोन्ही वाक्यांतील बिंबप्रतिबिंबभाव लक्षात घेण्यासारखा आहे. हा ताम्रपट खरा असल्यास इंद्रराजाच्या ताम्रपटलेखकांनी ते वाक्य या ताम्रपटातून उद्धृत केले असे म्हणावे लागेल. पण तो बनावट असल्यास मात्र इंद्रराजाच्या ताम्रपटातून प्रस्तुत ताम्रपटाच्या लेखकाने ते उद्धृत केले असावे असे म्हणता येईल. या ताम्रपटातील अशुद्ध संस्कृत व त्याचे लेखन लक्षात घेता हे दुसरे अनुमानच बरोबर ठरेल असे वाटेल. आणि तसे असेल तर या ताम्रपटाच्या बनावटीच्या काळावरही प्रकाश पडू शकेल. इंद्रराजाचे ताम्रपट शके ८३६ च्या आसपासच्या काळात (म्हणजे प्रस्तुत ताम्रपटातील निर्दिष्ट कालानंतर जवळजवळ तीनशे वर्षानंतर) लिहिले गेले आहेत. तेव्हा त्यानंतर केव्हा तरी प्रस्तुत ताम्रपटांचे लेखन झाले असले पाहिजे असे म्हणावे लागेल.

**रक्तापुर राजधानी**

या ताम्रपटावरून चालुक्यनृपती विनयादित्याची राजधानी 'मलहारी' नदीच्या उत्तर तीरावरील 'रक्तापुर' येथे होती असे दिसून येते. इतिहासमान्य शिलालेख-ताम्रपटांवरून त्याची राजधानी 'वातापी' (म्हणजे आजचे बादामी) येथे होती हे प्रसिद्ध आहे. किंबहुना त्यामुळेच त्यांना 'वातापीचे चालुक्य' म्हणून संबोधण्यात येते. प्रस्तुत ताम्रपटातील 'रक्तापुरा' चा राजधानी म्हणून उल्लेख विनयादित्याच्या इतर बनावट ताम्रपटांतही आढळतो.

पूर्वीच्या मिरज संस्थानातील लक्ष्मेश्वर या गावी विनयादित्य सत्याश्रयाच्या राज्यारोहणानंतर पाचव्या वर्षातील शके ६०८ मधील एक शिलालेख उपलब्ध

आहे. त्यात 'अष्टोत्तरषट्छतेषु शकवर्षेष्वतीतेषु प्रवर्द्धमानविजयराज्य–पंचम-संवत्सरे श्रीरक्तापुरमधिवसति विजयस्कन्धावारे—' असा निर्देश आहे. विनयादित्याचा पुत्र विजयादित्य याचेही दोन शिलालेख त्याच लक्ष्मेश्वर गावी उपलब्ध झाले आहेत. एक शके ६४५ चा व दुसरा शके ६५१ चा. या दोन्ही शिलालेखांत 'श्रीरक्तापुरमधिवसति विजयस्कन्धावारे—' असेच रक्तापुरासंबंधीचे निर्देश आहेत. (पाहा. इंडियन अँटीक्वेरी, व्हॉल्यूम ७) यावरून केवळ विनयादित्याच्याच काळी नव्हे तर त्याचा पुत्र विजयादित्य याच्या काळीसुद्धा रक्तापुर हे त्यांच्या राजधानीचे स्थळ नव्हते, तेथे त्या त्या काळी त्यांच्या सैन्याचे तळ पडले होते असे स्पष्ट दिसून येते. अर्थात, प्रस्तुत ताम्रपटात 'रक्तापुर' शहराचा राजधानी म्हणून जो उल्लेख केलेला आहे तो चुकीचा होय. 'स्कन्धावार' म्हणजे राजधानी हा एक अर्थ आहे खरा, पण 'सैन्याचा तळ' असाही त्याचा अर्थ आहे. 'विजयस्कन्धावार' याचा हा अर्थ लक्षात न आल्यामुळेच प्रस्तुत व इतर बनावट ताम्रपटांच्या लेखकाने 'राजधानी' हा शब्द वापरलेला दिसतो. ते अर्थात चुकीचे होय.

वर उल्लेखिलेले विनयादित्य आणि विजयादित्य यांचे शिलालेख लक्ष्मेश्वर येथे सापडल्यामुळे तेच रक्तापूर असावे असा डॉ. फ्लीट यांनी तर्क केला, पण तो बरोबर नाही. कोप्पल (जिल्हा रायचूर) येथील कै. एन्. बी. शास्त्री यांनी लिहिलेल्या टिपणीत त्यांनी असे म्हटले आहे की, सध्याचे पट्टडकल शहर हेच रक्तापूर होय. पट्टडकलु गावाचे पूर्वीचे नाव 'किसुवोळलु' होते, असे ऐतिहासिक पुराव्यावरून निश्चित सिद्ध होते. 'किसुवोळलु' या कानडी शब्दाचा अर्थ 'लाल शहर' असा आहे. त्या शब्दाचे संस्कृतीकरण करून 'रक्तापुर' शब्द तयार करण्यात आलेला आहे. 'मलहारी' नदी म्हणजे आजची मलप्रभा नदी होय. आपल्या ताम्रपटात म्हटल्याप्रमाणे पट्टडकलु=किसुवोळलु=रक्तापूर हे गाव मलप्रभा नदीच्या उत्तर तीरावरच वसलेले आहे. कै. शास्त्री यांचा हा शोध तर्कसंगत असल्यामुळे पट्टडकल म्हणजे रक्तापूर हे मान्य करण्याला हरकत नाही. (पाहा : दि टेन्थ ऑल इंडिया ओरिअंटल कॉन्फरन्स, तिरुपती, प्रोसिडिंग्ज अँड ट्रॅन्झॅक्शन्स, पृ. ३६४–३६५).

## कुरूंद

रक्तापूर राजधानीहून आपल्या पट्टबंधोत्सवासाठी विनयादित्य 'कुरुंद' या गावी गेला होता. राष्ट्रकूट नृपती तृतीय इंद्रराज याच्या पूर्वोल्लिखित ताम्रपटात पट्टबंधोत्सवासाठी इंद्रराज ज्या गावी गेला होता त्याचे नाव 'कुरूंदक'

असे आहे. त्याचा अपभ्रंश कुरुंदा असा होणे अधिक संभवनीय असल्यामुळे परभणी जिल्ह्यातील, वसमत तालुक्यामधील 'कुरुंदा' गाव म्हणजे प्राचीन कुरुंदक असावे असे मी सुचविले होते. प्रस्तुत ताम्रपटातील 'कुरुंद' हेही तेच कुरुंदा असावे, कदाचित ते कुरुंदवाडही असू शकेल. ताम्रपटात त्यासंबंधी इतर कोणतीच सूचक माहिती नसल्यामुळे निश्चित काही सांगता येत नाही. पट्टडकल याला अधिक जवळचे स्थान कुरुंदवाड होय, हे मात्र खरे.

### वासुदेव द्विवेदीला दान

या ताम्रपटात वासुदेव द्विवेदीभट्टाला दिलेले दान नमूद करण्यात आले आहे. वासुदेव द्विवेदी हा ब्रम्हपुरी येथे राहणारा होता. ब्रम्हपुरीत यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान व प्रतिग्रह या षट्कर्मात रममाण झालेले अनेक ब्राम्हण राहत असत. त्यांच्याचपैकी हा महाब्राम्हण होता. तो वाजिय कुळातील असून त्याचे गोत्र गौतम होते. तो सोमयाजी म्हणजे सोमयज्ञ करणारा होता.

चालुक्य नृपती विनयादित्याने 'अमरावती–७००' म्हणजे ज्यात सातशे गावे अंतर्भूत होती अशा अमरावती विषयातील (जिल्ह्यातील) 'वीरिगे–चाळीस' म्हणजे वीरिगे नावाने ओळखल्या जाणाऱ्या चाळीस गावांच्या समूहातील 'वल्लत' या नावाचे गाव वासुदेव द्विवेदीभट्टाला त्याचे पादप्रक्षालन करून व त्याच्या हातावर पाणी सोडून दान दिले होते. याचबरोबर घटिका, पांढरे छत्र, चवरी, 'श्रीयद्वारद्वंदयुध्धसासन'—हेही दिले होते. यातील 'श्रीयद्वारद्वंदयुध्ध' या शब्दांचा अर्थ नीट लागत नाही. विनयादित्याच्या निरनिराळ्या ताम्रपटात हे शब्द सर्वत्र सारखे नाहीत. त्यात भिन्नता आढळते. उदा. कोप्पल ताम्रपटात 'श्रीद्वारसमस्तराज्यचिह्नत्रिभोगाभ्यंतरसासनसमेतं' असे आहे, तर धारवाड ताम्रपटात 'छत्रचामरद्वंद्वयुध्धसमस्तराज्यचिह्नत्रिभोगाभ्यंतरसासन-समेतं' असे शब्द आहेत. पाली ताम्रपटात '–श्रीमद्वारनिधिनिधाननिक्षेप-सहस्रभरद्वंद्वयत्ताम्रशासनसमेतं' हे शब्द आढळतात, तर दिवे–आगर ताम्रपटात ते 'घटिकाश्वेतछत्रचामरशासनसमेतं' एवढेच आढळतात. यावरून असे दिसून येते की, ग्रामदानाबरोबर घटिका, श्वेत छत्र, चामर इत्यादी राजचिन्हांचा उप-भोग घेण्याचेही आज्ञापत्र ब्राम्हणांना देण्यात येत असे. 'श्रीयद्वारद्वंदयुध्ध'— या शब्दांनी छत्र–चामरांप्रमाणेच इतर काही राजचिन्हांचा उपभोग अभिप्रेत असावा, एवढेच फार तर म्हणता येईल. कदाचित एखाद्या राजचिन्हात द्वन्द्वयुद्ध (दोन वीर एकमेकाशी युद्ध करीत असलेले) दाखविले असेल.

## स्थलनिश्चिती

या ताम्रपटात निर्देशिलेली विनयादित्याची राजधानी 'रक्तापुर' आणि तो पट्टबंधोत्सवासाठी ज्या गावी गेला होता ते 'कुरुंद' या स्थलांच्या निश्चिती-संबंधी यापूर्वी लिहिलेले आहेच. आता या ताम्रपटात आलेल्या इतर स्थळांचा शोध घेण्याचा प्रयत्न करू.

विनयादित्याच्या राज्यात अमरावती ७०० हा एक जिल्हा होता. ही अमरावती कुठे होती हे निश्चित सांगता येत नाही. पण सध्याच्या बिदर जिल्ह्यात ती कोठे तरी असली पाहिजे असे पुढील स्थलनिश्चितीवरून दिसून येईल. या अमरावती जिल्ह्यातील 'वीरिगे–चाळीस' या ग्रामसमूहातील वल्लत गाव दान देण्यात आले आहे. बिदर जिल्ह्यातील भालकी तालुक्यात 'बीरि' नावाचे खेडे आहे तेच ताम्रपटातील वीरिगे असावे. 'बीरि'च्या वाय-व्येला अडीच मैलांवर असलेले 'बलद' गाव म्हणजेच ताम्रपटातील वल्लत होय. ताम्रपटात ब या अक्षरासाठीही व हे अक्षर लिहिलेले आहे, हे लक्षात घेता वीरिगे हे नाव 'बीरिगे' आणि वल्लत हे नाव बल्लत असे वाचण्याला हरकत नाही. तसे वाचले म्हणजे या दोन्ही गावांची आजची नावे बीरि आणि बलद अशी असणे कसे शक्य आहे ते दिसून येईल. वल्लत अर्थात बलद हे गाव मांजरा व तिला येऊन मिळणाऱ्या हिवलमंडी या नद्यांच्या संगमावर पूर्व भागाला आहे. ताम्रपटात अनेकदा निर्देशिलेली मंजरी नदी म्हणजे आजची मांजरा नदी होय. बलदच्या पश्चिमेला मांजरा नदीच्या पश्चिमेकडील काठापासून सुमारे एक मैल आत असलेली अलंदी म्हणजे ताम्रपटातील अणंदि ग्राम असावे. अलंदीच्या वायव्येस दोन मैलांवर मांजरा नदीच्या उत्तर तीरावर असलेले खेर नावाचे गाव म्हणजे ताम्रपटातील खेट ग्राम असावे. खेरच्या पूर्वेला सुमारे एक मैलावर देवन नदी मांजरा नदीला येऊन मिळते. ताम्रपटात उल्लेखिलेला मंजरीनदीस्रोतसंगम तो हाच. आजही तेथे संगम या नावाचे गाव आहे. संगमच्या उत्तरेला सुमारे दीड मैलावर असलेले 'सावली' नावाचे गाव हेच ताम्रपटातील सावल्लिग्राम होय. सावलीपासून पूर्वेला पाच मैलांवर व बलदपासून उत्तरेला चार मैलांवर हिवलमंडी नदीच्या पूर्वतीरावर असलेले चंदवुरि गाव हेच ताम्रपटातील चंदवुरिग्राम होय. चंदवुरीच्या पूर्वेला एका मैलावर असलेले बेंडकोंडा गाव म्हणजे ताम्रपटातील वेंडकुंदे असावे. बलदच्या पूर्वेला चार मैलांवर कुसनूर नावाचे गाव सध्या आहे. ताम्रपटातील कुसुवंडूरु ग्राम म्हणजे हे कुसनुर गाव असावे. या ताम्रपटात उल्लेखिलेली निडचव्वे, पुणिंदि आणि दर्पसल्ल ही गावे मात्र त्या परिसरात आढळत नाहीत. बहुधा ती नष्ट झाली असावीत.

## वाचन

*पहिला पत्रा*

१. स्वस्ति ।। जयत्याविष्क्रि(ष्कृ)तं विष्णोर्व्वाराहं क्षोभितार्ण्न(र्ण्ण)वं [।*]
दक्षिणोन्नतदां(दं)ष्ट्राग्रं(ग्र)विस्रां(श्रां)तं(त)–

२. भुवनं वपुः ।। [१ ।। *] नमस्तुंगसि(शि)र:[1]श्चुंवि(बि)चंद्रचामरचारवे[।*]
त्रैल्लो(लो)क्यनगरारंभं(भ)मू–

३. लस्तंभाय सं(शं)भवे ।। [२।।*] श्रीमदा(तां) सकलभुवनजनसंस्थू(स्तू)यमान-
मानव्या(व्य)सगोत्रहरीत(ति)–

४. पुत्राणां सप्तांवि(बि)कामातृ(तृ)भिः सप्तमातृ(तृ)भिः[1]रभिवर्ध्धि(द्धि)-
तानां कार्त्तिकेयप्राप्तकल्याण–

५. परंपराणं(णां) भगवन्नारायणप्रस(सा)दा(द)सम(मा)सादितवराहलांछन(ने)-
क्षणक्षणवसी(शी)क्रि(कृ)तासे(शे)–

६. षममहीभ्रि(भृ)तानां[2] चालुक्यानां कुलमलंकरिष्णोरस्व(श्व)मेधावभ्रि(भृ)-
त(थ)स्नान–

७. पवित्रीक्रि(कृ)तगात्रस्य जयछत्रचामरसिंहासनमस्तकस्ति(स्थि)तवराहसिंह-
स(श)–

८. रभसा(शा) दुर्द्दूलास्व(श्व)करिमकरमत्स (त्स्य)मां(मं)डूकवि(वृ) षभकल्ल-
(ल)स(श)कुल्लि(लि)स(श)हल्ल(ल)कुक्कुटगरुडचं–

९. द्र(द्रा)दित्यनागमहाध्वजविराजितपल्लिकेतनविचित्रफ(प)णवज(झ)ल्लरी-
मुकुंदसंक(शंख)कहल्लभे–

१०. रीभ्रि(मृ)दंगघोस(ष)णण[3]समस्तभुवनास्र(श्र)यं(य)श्रीप्रि(पृ)थ्वीवल्लभ-
महाराजाधिराजपरमेस्व(श्व)रपर–

११. मभट्टारकं(क)श्रीपुलकेसि(शि)वल्लभमहाराजपरमेस्व(श्व)र(रः) ।। तस्य
सुतरानुपराक्रमकौंतेयं(यः)

१२. वनवास्यादि[4]परन्रि(नृ)पमंडलप्रणिव(ब)ध्ध(द्ध)विसु(शु)ध्ध (द्ध) कीर्त्या-
नेकन्रि(नृ)पवे[त्र*] दंडमस्तक–

---

१ हा विसर्ग अनावश्यक होय.

२ '—अशेषमहीभृतां'—असे वाचावे.

३ हा 'ण' जास्तीचा कोरला गेला आहे. अनावश्यक.

४ 'तस्य सूनुः पराक्रमाक्रान्तवनवास्यादि'—असे वाचावे.

दुसरा पत्रा : पहिली बाजू

१३. पिंडखंडितप्रचंडदोर्द्दंडमंडल्ला (ला)ग्रकरनखरविरा[ जि* ]तोत्तुंगकिसो(शो)-
रकेसरि सम–

१४. स्तभुवनाश्र ( श्र )यं ( य )श्रीप्रि (पृ )थ्वीवल्लभमहाराजाधिराजपरमेस्व (श्व)-
रपरमभट्टारकं (क)श्रीकीर्तिव–

१५. र्म्ममहाराजपरमेस्व (श्व)र (रः)।। तस्याग्रजं (जः) साहसांजनेयं (य)रिपुपुर-
त्रिपुरहरपराजयोपलवु (बु)ध–[१]

१६. परमेस्व (श्व)रपरमाणां[२] परमस्तुत्यसमस्तभुवनाश्र (श्र)यं (य)श्रीप्रि (पृ)थ्वी-
वल्लभमहाराजाधिराजपरमेस्व (श्व)र–

१७. परमभट्टारकं (क)श्रीविजयादित्यदेवपरमेस्व (श्व)र (रः) ।। तत्सूनुनिज[३]
विजयसमुचिततरा–

१८. स्यविभवस्य[४] विवु(बु)धरसिकसमररिपुगतरिपुनरपतिसमोपलवु (बु)धकीर्ति[५]–

१९. पताकावभावि (सि)तदिगंतराल्ल (ल)स्य[६] हिमकरकुल्ल (ल)विल्ल (ल)य–
हेतुपल्लवपतिपराज–

२०. यानंतरपरिग्रि (गृ)हि (ही)तकांचीपुरसंचूर्ण्णि (र्ण्ण)तचेरचोल्ल (ल)पांड्यन्नि-
(नृ)पमणिमुकुटकू–

२१. टकिरणसनीलाभिसि (षि)क्तचरणकमलस्य[७] समस्तभुवभुव[८]नाश्र (श्र)यं (य)-
श्रीप्रि (पृ)थ्वीवल्लभमहा–

२२. राजाधिराजपरमेस्व(श्व)रपरमभट्टारकं (क)श्रीविक्रमादित्यदेवपरमेस्व (श्व)-
र (रः) ।। तस्य सुतस्य विनय–

२३. विनमितानेकभूपाल्ल(ल)मौल्ली(लि)मालालालितचारुचरणारविंदयुगल्ल (ल)-
कोंकणाद्यनेकमाल्ल (ल)व[गो]–

---

१ 'लब्ध'–असे वाचावे.

२ 'परमेश्वरापरनामा' असे वाचावे.

३ 'तत्सूनुर्निजविजय'–असे वाचावे. ('निजवंशसमुचितचितराज्यविभवस्य') असे असावे.

४ 'विभवर्विबुध'–असे वाचावे.

५ 'समुपलब्धकीर्ति'–असे वाचावे. (हे वाक्य मूळात पुढीलप्रमाणे आहे. 'विविधरसितसितसमरमुखगतरिपुनरपतिविजयसमुपलब्ध').

६ 'दिगंतरालर्हिमकर'–असे वाचावे.

७ 'कमलस्समस्त'–असे वाचावे.

८ 'भुव' ही दोन अक्षरे येथे चुकून पुनरुक्त झाली आहेत.

२४. ल्लगूर्जरकल्लिं (लिं) गवेंगीसा (शा) दिन्रि (नृ) पर्माणमुकुटमंजरीरंजितपाद-
पीठत्रि (स्त्रि) समुद्रमध्यवर्तिभु–

दुसरा पत्रा : दुसरी बाजू

२५. वनमंडल्ला (ला) धोस्व (श्व) रस्य[1] प्रि (पृ) थुराज्योपनीतावनीतल्ला (ला) से-
(शे) षश्चेतानिहत्यफल–

२५. माविष्ट्रेस्य यमधिविषयप्रस (श) मनादिहितमात्रराज्योपनात्रि (श्रि) त्यांतरतुल्ल-
(ल) त्वयिर्व्विवु (बु) धवासुदे–

२७. व यि (इ) व त्रि (नृ) पकंतातुपरसु (शु) राम यि (इ) व राजराजात्र (श्र) य
भरत यि (इ) व[2] समस्तभुवनास्र (श्र) यं (य) श्रीप्रि (पृ) थ्वी–

२८. वल्लभमहाराजाधिराजपरमेस्व (श्व) रपरमभट्टारकं (क) श्रीविने (न) यादित्य-
सत्यास्र (श्र) यनरेंद्रदे–

२९. वकुस (श) ल (ली) सर्व्वानेवे (व) यतः (था) संव (ब) द्य (ध्य) मान[3] सौराष्ट्र-
विषयपतिग्रामकूट (टा) युक्तकमहत्व (त्त) रीनुसंवि[4]–

३०. दित (तं) यतः (था) मलहारीनद्युत्तरतटे रक्तापुरराजधाने स्ति (स्थि)-
रतरस्वस्ला (स्था) नेन पट्टबं (बं) धोत्सवसं–

३१. पादनान्वितकुरुंदमुपागतेन पो (पु) ण्ययषो (शो) र्विन्न (वृ) ध्ध (द्ध) ये पूर्व्वविलु-
प्तानपिदेवभोग (गा) ग्रहा–

३२. रानुपालयतः (ता) तत्पालनां विंस (श) त्युत्तरपंचस (श) ती (ते) षु स (श) क-
वर्षप्रतीतेषु काल्ल (ल) यु–

३३. क्तसंवत्सर (रे) प्रवर्त्तमाने वैसा (शा) खप्राप्तम[मा*]वास्यां व्रु (बृ) ह-
स्पतो (तौ) वारे सूर्य्यग्रहण–

३४. दानतात्काले यजनयाजनाध्ध्या (ध्य) यन (ना) ध्ध्या (ध्या) पनदानप्रतिग्रह-
षट्कर्म्मनिर्म्मल्ल (ल) ब्रा (ब्रा) ह्मणगणविकी–

३५. र्णब्र (ब्र) ह्मपुरिगधिपतीनां श्रीवाजियन्वये ग्रौ (गौ) तमगोत्रसर्व्वक्रतुसोमे (म)-
याजिश्रीवा–

---

१ 'धोश्वरः' असे वाचावे.

२ विनयादित्याच्या इतिहाससमान्य ताम्रपटांत ही वाक्ये पुढीलप्रमाणे आहेत. 'समस्तविषयप्रशमनाद्विहिततन्मनोनुरञ्जनः अत्यन्तवत्सलत्वाद्युधिष्ठिर इव श्रीरामत्वाद्वासुदेव इव नृपांकुशत्वात्परशुराम इव राजाश्रयत्वाद् भरत इव'.

३ '—मानकान्' असे वाचावे.

४ '—महत्तरादीन्समादिशत्यस्तु वः'—असे असावे.

३६. सुदेवद्वे (द्विवे) दिभट्टाय अमरावतीसप्तस (श) तविषयोपलक्षितं वीरिगे-
चाल्लीसाभ्यंतरे–

३७. श्रीवल्लतग्रामं (मः) घटिक (का)सितछत्रचामरश्रीयद्वारद्वंदयुध्ध(द्ध)सा (शा)-
सनस–

*तिसरा पत्रा*

३८. मेतं पादप्रक्षाल्य ( ल ) नं ( न ) धारापूर्व्वकसर्व्वनमस्यमहान्रि (नृ) पं (प) दत्तः।।
तद्ग्रामसीमां–

३९. तरे तस्य पूर्व्वदिसो भागे निडचव्वे ग्रामं तत्पश्चिमतः तटाकः प्रमाणं तद्दक्षिण–

४०. तः मंजरीनदी प्रमाणं तद्दक्षिणतः वीरिगे ग्रामं तदुत्तरतः मंजरीनदी
प्रमाणं तत्प–

४१. श्चिमतः पुणिदि ग्रामं तदुत्तरतः नदी प्रमाणं तत्पश्चिमतः अणंदिग्रामं तदुत्तरतः
नदी

४२. प्रमाणं तत्पश्चिमतः खेटग्रामं तत्पूर्व्वतः मंजरीनदीस्रोतसंगमप्रमाणं तदुत्त–

४३. रतः सावल्लिग्रामं तद्दक्षिणतः गिरिः प्रमाणं तत्पूर्व्वतः दर्वसल्लग्रामं त–

४४. द्दक्षिणतः ग्रामकंठक प्रमाणं तत्पूर्व्वतः चंदबुरिग्रामं तद्दक्षिणतः

४५. ग्रामासन्नतटाकः प्रमाणं तत्पूर्व्वतः वेंडकुंदेग्रामं तत्पश्चिमतः तटाकः

४६. प्रमाणं तत्पूर्व्वतः कुसुवंडूरु ग्रामं तत्पश्चिमतः स्रोतः प्रमाणं एवं अष्टाधाटो-
पलक्षि–

४७. तं भूमिप्रमाणं द्वादस (श) सहस्रं ।। मद्वंस (श) जाः परमहीपतिवंस (श) जं वा
पापादपेय (त) मनसो भु–

४८. वि भावि भूपा [:।*] ए(ये) पालयंति मम धर्म्ममिमं समस्तं तेषां मया
विरचितोंजलिरेष मूर्ध्निः ।। [३।।*] स्वद–

४९. त्तं(त्तां) परदत्तं(त्तां) वा यो हरेति(त) वसुंधरां [।*] षष्टिर्व्व(व)र्ष–
सहस्राणि विष्टायां जायते क्रि(कृ)मिः ।। [४ ।।*] श्रीचालुक्यान्वय–

५०. संजातं श्रीसत्यास्र (श्र) यवल्लभं तत्पादपद्मोपजीवि केस (श) वार्य्य सुलिख्यतं ।।

• • •

## परिशिष्ट

### विनयादित्याच्या नावाने दिले गेलेले बनावट ताम्रपट

**१ बेल्लरी ताम्रपट :** 'सकवर्षप्रतीतीषु द्वादस्योत्तरपंचसतीषु साधारणसंवत्सर प्रवर्त्तमाने माघ शुद्ध त्रयोदशी सोमवारे' या ताम्रपटाद्वारे पापारनूरु गाव दान दिलेले आहे. (पाहा. अॅन्युअल रिपोर्ट, साउथ इंडियन एपिग्राफी, १९१७-१८, पृ. १३४.)

**२ कोप्पल ताम्रपट :** 'सोलहोत्तर पंचसतीषु सकवर्षप्रतीतीषु आनंदसंवत्सर-प्रवर्त्तमाने वैशाखपौर्णमास्ये ब्रिहस्पतो वारे व्यतीपात'–या दानपत्राद्वारे भास्कर चौवेर भट्टाला किसुक्काडु–सत्तरि ग्रामसमूहातील निडुगुंडी नावाचे महाग्राम दान दिलेले आहे. (पाहा : टेन्थ ओरिअंटल कॉन्फरन्स, तिरुपती, मार्च १९४०, वृत्तांत. यातील रा. ब. कृष्णमाचारुलु यांचा 'थ्री स्प्युरिअस वेस्टर्न चालुक्य ग्रँट्स' पृ. ३६४–३६५.)

**३ दिवे आगर ताम्रपट :** 'विंशत्त्योत्तरपंचशतिषु शकवर्षप्रतीतिषु कालयुक्त-संवत्सरे प्रवर्तमाने। चैत्रप्राप्तामावास्यायां व्यतीपाते वृहस्पतिवारे सूर्यग्रहण तत्काले' या दानपत्राद्वारे केशव द्विवेदी, भास्कर त्रिवेदी, शंकर द्विवेदी, माधवभट्ट इत्यादी ३५०० ब्राम्हणांना दतिग–द्विसहस्त्र विषयातील कोल्लापुर नावाचे गाव दान दिले आहे. (पाहा. बी. सी. लॉ. व्हॉल्यूम, भाग १. त्यातील डॉ. मोरेश्वर दीक्षित यांचा 'ऑन सम् स्प्यूरिअस चालुक्य कॉपरप्लेट ग्रँट्स' हा लेख, पृ. ५००–५०३.)

**४ धारवाड ताम्रपट :** (कर्नाटक हिस्टॉरिकल सोसायटी) 'विंसत्योत्तर-पंचसतीषु सकवर्षप्रतीतीषु कालयुक्तसंवत्सरप्रवर्तमाने वैषाखप्राप्तमवास्यां व्रिहस्पतौ वारे व्यतीपात. . . .तत्काले' या दानपत्राद्वारे कन्नड कुलातील केशव चौवेर भट्टाला कुंडिसहस्त्र विषयातील वागडगे–सत्तरि ग्रामसमूहातील होदलुरु नावाचे महाग्राम दान दिले आहे. (पाहा. साउथ इंडियन एपिग्राफी, अॅन्युअल रिपोर्ट १९३३–३४, पृ. ३० व अॅपेंडिक्स A.)

**५ पाली ताम्रपट :** (भारत इतिहास संशोधक मंडळ) 'विंसत्त्योत्तरपंचसतीषु सकवर्षप्रतीतिषु कालयुक्तसंवत्सरप्रवर्त्तमाने कार्त्तिकसुक्ल पंचमि भानुवासरे' या दानपत्राद्वारे कन्नडकुलातील वासुदेवादि ब्राम्हणांना करहाटक–सहस्त्र विषया-तील कोपुरवंश ग्रामसमूहातील एल्लापुर नावाचे गाव दान दिले आहे. (पाहा. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष ३ रे, अंक १, जून–जुलै १९२२. पृ. ६ ते १६. यातील पां. मा. चांदोरकर यांचा 'शक ५२० तील चालुक्यांचा ताम्रपट' हा लेख).

**६ मद्रास म्यूझियम ताम्रपट :** 'सकवर्षप्रतीतीषु विंसत्योत्तरपंचशतीष कालयुक्तसंवत्सरप्रवर्तमाने पौष्यशुद्धत्रयोदश्यां ना सोमवारे तत्तिथीनां'---या ताम्रपटाद्वारे केसव त्रिवेदिभट्टाला वल्लकुंडि–शत विषयातील द्रौपति सत्तरि ग्रामसमूहातील मिट्टेरे नावाचे गाव दान दिलेले आहे. (पाहा. साउथ इंडियन एपिग्राफी, अॅन्युअल रिपोर्ट १९०६, अॅपेंडिक्स १२.)

**७ कोल्हापूर ताम्रपट :** 'विंसत्योत्तर पंचसतीसु सकवर्षप्रतीतीषु कालयुक्त-संवत्सरप्रवर्तमाने कार्त्तिकसुकुलत्रयोदस्यानां ब्रिहस्पतो वारे नवग्रहंगलेकादषशुभ-दिनसुमुहूर्त. . . .तात्काले' या ताम्रपटाच्या द्वारा श्रीपद्मषिव रावुल याला एडेनाडु–सप्तरिय ग्रामपरिसरातील तावसगावे नावाचे गाव दान दिलेले आहे. (पाहा. अलाहाबाद युनिव्हर्सिटी स्टडीज, सेक्षन ३, संस्कृत. यात 'कोल्हापूर स्प्युरिअस कॉपरप्लेट इन्स्क्रिप्शन ऑफ सत्त्याश्रय विनयादित्य (शक ५२०)' हा पंडित रघुवर मिठ्ठुलाल शास्त्री यांचा लेख.)

**८ कासार-शिरसी ताम्रपट :** 'विंसत्युत्तरपंचसतीषु सकवर्षप्रतीतेषु काल्लयुक्त-संवत्सर प्रवर्त्तमाने वैसाखप्राप्तमवास्यां ब्रहस्पतो वारे सूर्यग्रहणदानतात्काले–' या ताम्रपटाद्वारे ब्रम्हपुरी येथील वासुदेव द्विवेदि भट्टाला अमरावती–सत विषया-तील वीरिगे-चाल्लीस ग्रामसमूहातील वलत्त नावाचे गाव दान दिले आहे. (प्रस्तुतचा ताम्रपट.)

# ७

## चालुक्यनृपती विनयादित्य याचा बनावट कोल्हापूर ताम्रपट

### प्रास्ताविक

'अलाहाबाद युनिव्हर्सिटी स्टडीज १९३७, सेक्शन ३, संस्कृत.' या ग्रंथात प्रस्तुत ताम्रपटाची छायाचित्रे व त्यांचे वाचन पंडित रघुवर मिठ्ठुलाल शास्त्री यांनी 'कोल्हापुर स्प्यूरिअस कॉपरप्लेट इन्स्क्रिप्शन ऑफ सत्याश्रय विनयादित्य (शक ५२०)' या मथळ्याखाली प्रसिद्ध केले आहे. काही वर्षांपूर्वी पंडित रघुवर शास्त्री यांच्याकडे, त्यांना हा ताम्रपट कसा मिळाला व सध्या तो कोठे आहे यासंबंधी मी चौकशी केली, पण त्यांच्याकडून कोणतीही माहिती मिळू शकली नाही. अन्यत्र कोठेही हा ताम्रपट अजून प्रसिद्ध झालेला नाही. महाराष्ट्रातील कोल्हापूर जिल्ह्या-संबंधीचा तो असल्यामुळे मराठी वाचकांना त्याची माहिती असणे उपयुक्त होईल. शिवाय हा ताम्रपट बनावट असला तरी भौगोलिक व भाषेच्या दृष्टीने त्याचा उपयोग होऊ शकतो, म्हणूनही तो प्रसिद्ध करण्याचे मी ठरविले. यापुढे या ताम्रपटाचे, त्यावरील लिपीचे व अक्षरांचे जे वर्णन केले आहे ते पंडित रघुवर शास्त्री यांनी उपरोक्त ग्रंथात छापलेल्या छायाचित्रांच्या आधारे केलेले आहे, हे लक्षात असू द्यावे.

### वर्णन

प्रस्तुत ताम्रपटाचे एकूण तीन पत्रे आहेत. त्यांतील पहिल्या व तिसऱ्या पत्र्याच्या आतील बाजूवर आणि दुसऱ्या पत्र्याच्या दोन्ही बाजूंवर मजकूर कोरलेला आहे. पहिल्या पत्र्यावर १२, दुसऱ्या पत्र्याच्या पुढील व मागील बाजूवर प्रत्येकी १२ व तिसऱ्या पत्र्यावर १३, असा एकूण ४९ ओळींचा मजकूर त्यांवर कोरलेला आहे. प्रत्येक पत्र्याच्या डाव्या बाजूला मध्यभागी वर्तुळाकार छिद्र असून त्यातून ताम्रपटाचे पत्रे जीत ओवले आहेत ती कडी स्पष्ट दिसते. कडीची दोन्ही टोके ताम्रपटाच्या मुद्रेच्या खालील भागात जोडलेली असावी. मुद्रेचा आकार चौरस असून तिच्या चाऱ्ही बाजूंच्या कडा किंचित उंचावलेल्या दिसतात. मुद्रेच्या मध्यभागी, उजवीकडे तोंड करून उभ्या असलेल्या वराहाची व त्यावर डाव्या बाजूला चंद्र आणि उजव्या बाजूला सूर्य यांच्या आकृती उठावात कोरलेल्या आहेत.

### लिपी व अक्षरांचे वळण

ताम्रपटाची लिपी नागरी असून तिच्यातील अक्षरांचे वळण उत्तर-भारतीय अक्षरांच्या स्वरूपाचे आहे. चालुक्यनृपती विनयादित्याचे जे अस्सल ताम्रपट उपलब्ध झालेले आहेत त्यांतील अक्षरांचे वळण दक्षिण-भारतीय अक्षरांच्या स्वरूपाचे असून ते कानडी लिपीला अधिक जवळचे असते. याउलट विनयादित्याच्या नावावरील इतर बनावट ताम्रपटांप्रमाणेच प्रस्तुत कोल्हापूर ताम्रपटातील अक्षरांचे वळण उत्तर-भारतीय स्वरूपाचे आहे. खास विनयदित्याच्या काळातील उत्तर भारतीय अक्षरांचे वळण अन्यत्र जसे आढळते तसेही या ताम्रपटात नाही. ते दहाव्या-अकराव्या शतकातील उत्तर-भारतीय अक्षरांच्या वळणासारखे दिसते, ही गोष्ट लक्ष्यात घेण्यासारखी आहे.

### भाषा

ताम्रपटाची भाषा संस्कृत आहे, पण ती अनेक ठिकाणी बरीच असंस्कृत म्हणजे अशुद्ध आहे. ताम्रपटाच्या आरंभीच 'श्रीमतां' या ऐवजी 'श्रीमदा' हे चुकीचे रूप आढळते. शेवटी आलेल्या श्लोकातील 'स्वदत्तं परदत्तं वा यो हरेति वसुंधरा' या चरणात (ओ. ४८) अनेक अशुद्ध रूपे आहेत. ती '**स्वदत्तां परदत्तां** वा **यो हरेत** वसुंधरां' अशी पाहिजेत. राजवंशातील नृपतींच्या वर्णनातही कोठे विसर्ग गाळल्यामुळे, तर काही ठिकाणी पूर्वापर संबंध लक्षात न घेता प्रथमा विभक्तीऐवजी षष्ठी विभक्तीचा प्रयोग केल्यामुळेही व्याकरणाच्या दृष्टीने अनेक चुका झालेल्या आहेत (ओ. ९, १२ पाहा).

या ताम्रपटातील संस्कृत भाषेसंबंधी विशेष लक्ष्यात घेण्यासारखी गोष्ट अशी की, त्यातील संस्कृत भाषेवर कन्नड भाषेची छाप पडलेली आहे. संस्कृत देव हा शब्द देवर असा योजला आहे. उदा. श्रीकपालेस्वर**देवर** (ओ. ३४ व ३७). कन्नड शिलालेखात तो आढळतो. उदा. देशिंग बोरगाव येथील कन्नड शिलालेखातील ही उदाहरणे पाहा. 'माधवचन्द्र भट्टारक **देवरु**' (ओ. १५), 'बिज्जल**देवर**सर' (ओ. २४), 'नागेश्वर**देवर**' (ओ. २८) इत्यादी.[1] या ताम्रपटातील **ग्रामनामे**, श्रीतावसगावे, मनतगे, हेरिलगे, वरगावे, नागावे, वलगावे—अशी एकारांत लिहिली आहेत, तीही कन्नड पद्धतीप्रमाणेच. केवळ शब्दच नव्हेत तर संस्कृत शब्दांची काही रूपेही कन्नड भाषेतील प्रत्यय लावून केलेली आहेत. उदा. श्रीकोल्लापुर**द** (ओ. ३४) ; भाग**द** (ओ. ४१); देवि**य** (ओ. ४१); गिरि**य** (ओ. ४३) ही

१ भारतीय इतिहास आणि संस्कृति. त्रै. वर्ष ११, पु. ४२, पृ. १६–१८.

षष्ठी प्रत्ययान्त रूपे पाहा. आच्छादनक्कं (ओ. ३५) (सं. आच्छादनाय) येथेही 'साठी' या अर्थाने चतुर्थीचा प्रत्यय म्हणून कन्नड 'क्कं' चा प्रयोग केलेला आहे. तुळा. '..गवरेश्वरदेवरिगे गंधधूपदीपनिवेद्यखंडस्फुटिक(त)जीर्णोधारक्कं '..'

प्रस्तुत ताम्रपटात संस्कृतच्या दृष्टीने अशुद्ध पण तत्कालीन सामान्य जनतेच्या उच्चारात आलेले लेखन विपुल प्रमाणात आढळते. त्याची काही वैशिष्टये येथे नमूद करण्यासारखी आहेत. (१) इ आणि उ या स्वरांचे यि आणि यु असे लेखन. उदा. यिव–२५, यीषान्य–३८, युतुंग–४०. (२) संस्कृत ऋ या स्वराचा रि असा उच्चार व लेखन. उदा. नैरित्य–४१, ४२. संयुक्त व्यंजनातील ऋ चे रि व रु असे उच्चार व लेखन. उदा. वशीक्रित–४ ५; महीभ्रितानां–४; त्रिषभ–६; प्रिथ्वी–८, ११, १५; क्रिष्ण–३९, ४१, ४५, ४६; मात्रुभि–२; इत्यादी. (३) संस्कृत श व ष यातील उच्चारभेद नाहीसा झाल्यामुळे त्यांचे पर्यायी लेखन. उदा. श ऐवजी ष–षंख–७; कुषल–२७, दष, षुभ–३२, षास्त्र–३३ इत्यादी. ष ऐवजी श असे लेखन कोठेही नाही. किंबहुना श्री, श्च या दोन संयुक्त व्यंजनांत व यीशान्य या शब्दातच काय तो श चा प्रयोग आहे; अन्यत्र कोठेही नाही. या श ऐवजी स असे लेखन विपुल प्रमाणात आहे, उदा. अस्व–४, सरभसादर्दूलास्व–५, पोलेकेसि–९, विसुध–१०, किसोरकेसरि–११, परमेस्वर–८, १२, १५, १६ इत्यादी.

## कालनिर्देश

प्रस्तुत ताम्रपटातील दानकाल 'विंसत्योत्तरपंचसतीषु सकवर्षप्रतीतीषु कालयुक्त-संवत्सर प्रवर्त्तमाने कार्त्तिकसुकुल त्रयोदस्यानां व्रिहस्पतो वारे नवग्रहंगलेकादषषुभदिन–' म्हणजे गतशक ५२०, कालयुक्त संवत्सर, कार्तिक शुद्ध त्रयोदशी, गुरुवार, असा दिला असून त्या दिवशी 'नवग्रहगलेकादश शुभदिन सुमुहूर्त' होता. शकसंवत्सरांच्या दृष्टीने हा कालोल्लेख स्थूल मानाने बरोबर आहे. या वर्षी, ज्या कार्तिक शुद्ध त्रयोदशीला गुरुवारी हे दान दिले आहे त्या दिवशी 'नवग्रहगलेकादषशुभदिनसुमुहूर्त' होता असे या कालोल्लेखात म्हटले आहे. 'गल' हा कन्नड शब्द असून त्याचा एक अर्थ 'समूह' असा आहे. 'नव-ग्रह-गल' म्हणजे नऊ ग्रहांचा समूह. 'नव-ग्रहगल+एकदश' =नवग्रहगलेगलकादश. एकादश स्थानी सर्व ग्रह शुभ असतात, असा ज्योतिषशास्त्रात संकेत आहे. त्या दृष्टीने, एकादश स्थानी सर्व नऊ ग्रह जेव्हा

१ भारतीय इतिहास आणि संस्कृति. त्र. व. ९, पु. ३५. पृ. ७८.

आले—त्या (कार्तिक शुद्ध १३ चा) शुभ दिवसाचा शुभ मुहूर्त' असा या कालोल्लेखाचा अर्थ होऊ शकतो. शके ५२० कार्तिक शु. १३, गुरुवार रोजी असा शुभ मुहूर्त असावा व त्या मुहूर्तावर या ताम्रपटातील दान दिले असावे.

### कालनिर्देश उत्तरकालीन

चालुक्यनृपती विनयादित्य याची इतिहासमान्य कारकीर्द शके ६०३ ते ६१८ (इ. स. ६८१ ते ६९६) असल्यामुळे शके ५२० म्हणून कालनिर्देश असलेला हा ताम्रपट निश्चितच बनावट ठरतो. या बनावटपणाचे आणखीही काही पुरावे या ताम्रपटात आहेत. ते असे: (१) विनयादित्याच्या अस्सल ताम्रपटांतील अक्षरांचे वळण दक्षिण-भारतीय अक्षरांच्या स्वरूपाचे आहे, तर या ताम्रपटातील अक्षरांचे वळण दहाव्या–अकराव्या शतकातील उत्तर-भारतीय अक्षरांच्या स्वरूपाचे आहे, याचा उल्लेख यापूर्वी केलेलाच आहे. (२) विजयादित्य-विनयादित्य व त्यापूर्वीच्या चालुक्यनृपतींच्या ताम्रपटादी कोरीव लेखांत शकवर्षाबरोबर संवत्सराचा उल्लेख येत नाही. प्रस्तुत ताम्रपटात मात्र शकवर्षाबरोबरच षष्टिसंवत्सरचक्रपद्धतीनुसार संवत्सराचा उल्लेख आलेला आहे. (३) तसेच या ताम्रपटात दान दिलेले गाव ज्या विभागात होते त्याचा उल्लेख 'एडेनाडुसप्तरिय–' असा शासकीय विभागाच्या दशमानपद्धतीनुसार केलेला आहे. ही पद्धती भारतात शककालाच्या सातव्या शतकापासून सुरू झाली. या ताम्रपटात या दशमान पद्धतीचा उपयोग केलेला असल्यामुळे त्याची निर्मिती शकाच्या सातव्या शतकानंतर केव्हा तरी झाली असली पाहिजे हे स्पष्ट होते. या सर्व मुद्यांचा ऊहापोह मी माझ्या 'विनयादित्याचा कासार-शिरसी ताम्रपट' या लेखात सविस्तर केला आहे तो पाहावा.[१]

### वंशावळी वर्णन

ताम्रपटाच्या आरंभी, या ताम्रपटाद्वारे दान देणाऱ्या चालुक्यनृपती विनयादित्याची वंशावळ वर्णन केलेली आहे, ती अशी: पोलेकेसि (पुलकेशि) वल्लभदेव, त्याचा पुत्र कीर्त्तिवर्मदेव, त्याचा वडील भाऊ विजयादित्यदेव, त्याचा पुत्र विक्रमादित्यदेव, व त्याचा पुत्र विनयादित्य सत्याश्रय. इतिहासमान्य वंशावळीत कीर्तिवर्म्यानंतर त्याचा वडील भाऊ मंगलेश व त्याच्या नंतर कीर्तिवर्म्याचा पुत्र द्वितीय पुलकेशी गादीवर बसल्याचे वर्णन असून त्यानंतर गादीवर बसलेला विक्रमादित्य (प्रथम) हा या द्वितीय पुलकेशीचा पुत्र असल्याचे नमूद केलेले आढळते. अर्थात, या

---

१ विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९६८, पृ. ३९–४२. (मागे पृ. ६०-८३ पाहा)

ताम्रपटातील वंशावळ ही इतिहासमान्य वंशावळीशी विसंगत होय. विनयादित्याच्या नावाने तयार करण्यात आलेल्या सर्व बनावट ताम्रपटांत ही विसंगत वंशावळच आढळते. 'विनयादित्याचा कासार-शिरसी ताम्रपट' या माझ्या लेखात मी या-संबंधी विवेचन केलेले आहे, ते पाहावे.[१] प्रस्तुत ताम्रपटात निरनिराळ्या चालुक्यनृपतींना लावलेली विशेषणे ही उपरोक्त कासार-शिरसी ताम्रपटात आलेल्या विशेषणांसारखीच आहेत. त्यांचेही विवेचन मी माझ्या पूर्वोक्त लेखात केलेले असल्यामुळे येथे त्याची पुनरुक्ती करण्याचे प्रयोजन नाही.

**रक्तापुर राजधानी**

चालुक्यनृपती विनयादित्य हा 'मलापहारी' नदीच्या उत्तर तीरावरील आपल्या रक्तापुर नावाच्या राजधानीत विशेष दृढपणे (निष्कंटक) राज्य करीत असताना आपल्या पट्टबंधमहोत्सवासाठी कुरुंद नावाच्या गावी गेला होता. त्यावेळी आपले पुण्य व यश वाढविण्यासाठी त्याने दिलेल्या दानाचा निर्देश या ताम्रपटात आहे (ओ. २८–३०).

'मलापहारी' नदीचे नाव कासार-शिरसी ताम्रपटात 'मलहारी' असे आढळते, तसे ते अन्य बनावट ताम्रपटांतही आढळते. ही 'मलापहारी' किंवा 'मलहारी' नदी म्हणजे आजची मलप्रभा नदी होय. तिच्या उत्तर तीरावर वसलेले आजचे पट्टडकल शहर हेच ताम्रपटात निर्देशिलेले रक्तापुर होय. पट्टडकलु या गावाचे पूर्वीचे नाव 'किसुवोळलु' होते. या कन्नड शब्दाचा अर्थ 'लाल शहर' असा होतो. त्याच शब्दाचे संस्कृतीकरण करून 'रक्तापुर' शब्द तयार करण्यात आलेला आहे.[२]

चालुक्यांच्या इतिहासमान्य शिलालेख-ताम्रपटांवरून त्यांची राजधानी 'वातापी' (आजचे बादामी शहर, ता. विजापूर, कर्नाटक प्रांत) होती असे दिसून येते. त्यामुळेच त्यांना 'वातापीचे चालुक्य' म्हणून संबोधतात. विनयादित्याचा पुत्र विजयादित्य याच्या काही शिलालेखांत 'श्रीरक्तापुरमधिवसति विजयस्कन्धावारे–' असा उल्लेख येतो. पण तेथे 'विजयस्कन्धावार' म्हणजे 'विजयी सैन्याचा तळ' असा अर्थ आहे, राजधानी नव्हे. हा अर्थ लक्षात न आल्यामुळेच विनयादित्याच्या बनावट ताम्रपटात 'रक्तापुर' ला राजधानी म्हणून म्हटलेले असावे.[३]

१ वि. सं. मं. वार्षिक, १९६८ पृ. ४२–४९. (मागे पृ. ६०-८३ पाहा)
२ दि टेन्थ ऑल इंडिया ओरियंटल कॉन्फरन्स, तिरुपती. प्रोसिडिंग्ज अँड ट्रॅन्झॅक्शन्स. पृ. ३६४–३६५ ; वि. सं. मं. वार्षिक १९६८, पृ. ५०–५१.
३ वि. सं. मं. वार्षिक, १९६८. पृ. ५०. (मागे पृ. ७४-७६ पाहा)

कुरुंद

आपल्या पट्टबंधमहोत्सवासाठी विनयादित्य ज्या 'कुरुंद' गावी गेला ते कोणते असावे? राष्ट्रकूट वंशातील तृतीय इंद्रराज (इ. स. ९१४–९२८) हाही आपल्या पट्टबंधमहोत्सवासाठी 'कुरुंदक' येथे गेला होता व तेथूनच त्याने आपल्या बहुतेक ताम्रपटांतील दाने दिलेली आहेत,[१] हे येथे लक्षात घेतले पाहिजे. किंबहुना, इंद्रराजाच्या ताम्रपटांतील 'यथा मान्यखेटराजधानीस्थिरतरावस्थानेन पट्टबन्धोत्सवसंपादनाय समानन्दितकुरुन्दकमुपागतेन मया . .पुण्ययशोभिवृद्धये पूर्व्वविलुप्तानपि देवभोगाग्रहारान्पालयता–' ही वाक्ये व विनयादित्याच्या प्रस्तुत व इतर बनावट ताम्रपटांतील यासंबंधीची वाक्ये जवळजवळ सारखी आहेत, हेही लक्षात घेतले पाहिजे. इंद्रराजाच्या ताम्रपटांतील कुरुन्दक हे गाव तापी नदीवरील कडोदा असावे असे डॉ. रा. गो. भांडारकर यांचे मत होते. त्याचा विचार करून नंतर श्री. जॅक्सन यांनी हे कुरुन्दक म्हणजे कोल्हापूर जिल्ह्यातील कृष्णा व पंचगंगा नद्यांच्या संगमावरील कुरुंदवाड असावे असे प्रतिपादन केले. तेच मत डॉ. दे. रा. भांडारकर, डॉ. अ. स. अळतेकर आदि संशोधकांनी मान्य केले आहे. डॉ. वा. वि. मिराशी यांनी ते प्रवरासंगमाजवळचे कायगाव असावे असे सुचवले होते. मी स्वतः हे कुरुंदक म्हणजे परभणी जिल्ह्यातील 'कुरुंदा' असावे असे सुचविले होते.[२] या सर्व मतांचा पुनर्विचार केल्यानंतर इंद्रराजाच्या ताम्रपटांतील कुरुंदक म्हणजे कोल्हापूर जिल्ह्यातील पंचगंगा व कृष्णा या नद्यांच्या संगमावरील कुरुंदवाड हेच असावे हे मत मला अधिक ग्राह्य वाटते. विनयादित्याच्या प्रस्तुत व इतर बनावट ताम्रपटांतील कुरुंद हे सुद्धा तेच असावे. कुरुंदवाडचे मूळ नाव 'कुरुंद' हेच असावे. मागाहून त्याला 'कुरुंदवाड' म्हणून संबोधले जाऊ लागले असावे असे वाटते. यादवनृपती द्वितीय सिंघण याने खिद्रापूर शिलालेखाद्वारे जे 'कूडलदामवाड' ग्राम दान दिले आहे ते आजचे कुरुंदवाड असावे असे फ्लीटने सुचविले आहे.[३] ते मान्य केले तर कुरुंदवाडचे १३ व्या शतकात 'कूडलदामवाड' हे नाव होते असे मानावे लागेल. पण शकाच्या ९ व्या शतकातच कुरुंदवाडचे नाव कुरुंदक होते हे उपरोक्त तृतीय इंद्रराजाच्या ताम्रपटावरून दिसून येते. तेव्हा फ्लीटचे मत मान्य करता येत नाही.

---

१ एपि. इं. व्हॉ. ३८, भाग १, पृ. १८.

२ तत्रैव, पृ. १२.

३ J. B. B. R. A. S. Vol. XII, p.7-10.

### दानोल्लेख

प्रस्तुत ताम्रपटाद्वारे ज्याला दान दिले आहे त्याचा व ज्या कारणासाठी दान दिले आहे त्याचा उल्लेख ३२ ते ३८ ओळींत आलेला आहे. त्यात श्रीपद्मशिव राउल व श्रीकपालेश्वरदेव यांचा उल्लेख दोन-दोनदा आलेला आहे. या दानोल्लेखात काही ठिकाणी कन्नड प्रत्ययांचा प्रयोग केलेला असल्यामुळे व क्वचित भाषेच्या अशुद्धतेमुळे त्याचा सुसंगत अर्थ लावणे थोडे कठीण झाले आहे. माझ्या मते त्याचे भाषांतर पुढीलप्रमाणे करता येईल :

'राजविदित (राजमान्य विद्वान) यमनियमादिशीलसंपन्न, तर्कव्याकरणादि अनेक शास्त्रांत पारंगत, आणि श्रीशैवस्थान (शैव सांप्रदायिकांचे आश्रयस्थान) असलेले श्रीपद्मशिव राउल यांच्या, श्रीकोल्लापुर येथील श्रीकपालेश्वरदेवाच्या पूर्वीपासून चालत आलेल्या धार्मिक क्रिया पार पाडण्यासाठी, देवळाच्या खंडित व पडलेल्या भागाच्या जीर्णोद्धारासाठी (डागडुजीसाठी), व तेथे विद्यादान करीत असलेल्या तपोधनांच्या अन्न, वस्त्र व पांघरुणासाठी एडेनाडु सत्तरी विभागातील तावसगावे हे गाव, श्रीस्वयंभू कपालेश्वरदेवाचे आचार्य पद्मशिव राउल यांना, त्यांचे पादप्रक्षालन करून व हातावर पाणी सोडून, छत्रचामरादि सर्व राजचिन्हे व दानपत्र यांसहित वृत्ति म्हणून दान दिले आहे.'

### कोल्लापुरचा निर्देश

या दानोल्लेखात कोल्लापुर, कपालेश्वर व पद्मशिव राउल हे तीन उल्लेख महत्त्वाचे आहेत, त्यांचा विचार करू. प्रस्तुत ताम्रपटात उल्लेखिलेले कोल्लापुर म्हणजे आजचे कोल्हापूर शहर होय. प्रस्तुत ताम्रपटाचा काल, त्यात निर्देशिल्याप्रमाणे शके ५२० (=इ. स. ५९८) होय. या काळात आजच्या कोल्हापूरचा उल्लेख कोल्लापुर म्हणून कोठेच आढळत नाही. महाभारत (अश्व. ८४–११) व बृहत्संहिता (अ. १४–१३) यांत या स्थानाचा 'कोल्लगिरि' म्हणून निर्देश आहे, पण 'कोल्लापुर' असा नाही. देवी भागवत (१–३८–५) व शक्तिसंगमतंत्र (३–७–११) या ग्रंथांत 'कोल्लापुर' चा उल्लेख आहे. पण या दोन्ही ग्रंथांची रचना फार प्राचीन नाही, ते मध्ययुगात लिहिलेले आहेत, असे विद्वानांचे मत आहे. मार्कंडेय पुराण किंवा देवीमहात्म्य या ग्रंथांत 'महालक्ष्मी' चा उल्लेख आहे, पण 'कोल्लापुर' चा नाही. हरिवंश पुराणातही 'करवीर' म्हणून उल्लेख आहे, पण 'कोल्लापुर' असा नाही. वाङ्मयीन ग्रंथात 'कोल्लापुर' असा या शहराचा पहिला विश्वसनीय उल्लेख आढळतो तो इ. स. ११३० मध्ये लिहिलेल्या हेमचंद्राच्या द्व्याश्रयकाव्य या ग्रंथात. त्यापूर्वी हरिषेण या जैन ग्रंथकाराने इ. स. ९३१ मध्ये लिहिलेल्या

'बृहत्कथाकोशा'त आजच्या कोल्हापूरचा उल्लेख 'कोल्लाडगिरिपट्टन' असा आढळतो. त्यावरून १० व्या शतकातही 'कोल्लापुर' हे नाव प्रचारात आले नसावे असे म्हणता येते.[१]

आतापर्यंत उपलब्ध झालेल्या प्राचीन कोरीव लेखांत कोल्हापूरजवळच्या करहाट, करहाडक (कऱ्हाड) चा उल्लेख इ. स. पूर्व बौद्धकालापासून आढळतो, तसा तो कोल्लापुरचा आढळत नाही. या करहाट विभागात दोन हजार (काहींच्या मते चार हजार) गावांचा समावेश होत असे. त्यांतच त्यावेळी आजच्या कोल्हापूरचा अंतर्भाव असावा. इ. स. ५०० ते ७५० या कालात राज्य करणाऱ्या वातापी येथील चालुक्यांच्या कोरीव लेखांतही वनवासी, कुरुंद, रक्तापुर, करहाटक, चिपळूण इत्यादी स्थानांचा उल्लेख आहे, पण 'कोल्हापूर' चा नाही. प्रस्तुत कासार-शिरसी ताम्रपटात तो आहे. याशिवाय विनयादित्याच्या दुसऱ्या एका बनावट ताम्रपटातही तो आहे. हा दुसरा बनावट ताम्रपट 'दिवे-आगर' या ठिकाणी सापडलेला असून त्यात निर्देशिलेला काल शके ५२०, चैत्र वद्य अमावस्या, बृहस्पतिवार असा आहे. यातील कोल्लापुरचा उल्लेख पुढीलप्रमाणे : 'दतिगद्विसहस्रविषयोपलक्षितं **कोल्लापुरं** नाम ग्रामः सवृक्षमालदेयाभ्यंतरं महालक्ष्मीस्छा(स्था)न-नवपुरसहितं ···महानृपतिदत्तं[२]' यावरून हे ताम्रपट बनावट असून फार उत्तर-काळात तयार झाले असावे असे स्पष्ट दिसते. या चालुक्य वंशातील जयसिंह नृपतीच्या इ. स. १०२४ मधील मिरज ताम्रपटात कोल्लापुरचा उल्लेख पहिल्यांदा आढळतो[३]. त्यानंतर शिलाहार नृपती गंडरादित्याच्या कोल्हापूर शिलालेखात (शके १०५८=इ. स. ११३५) आढळतो.[४]

## कोल्लापुर येथील कपालेश्वरदेव

प्रस्तुत ताम्रपटातील दुसरा लक्ष्यवेधी उल्लेख म्हणजे कोल्लापुर येथील कपाले-श्वरदेवाच्या देवळाचा. ताम्रपटात वर्णन केल्याप्रमाणे हे देऊळ एक शैवस्थान

---

१ ही व या पुढील माहिती डॉ. सांकलिया व डॉ. दीक्षित यांच्या Excavations At Brahmapuri (Kolhapur), पृ. १ ते ३१ या व महामहोपाध्याय डॉ. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांच्या 'प्राचीन भारतीय स्थलकोश' (पृ. ३७१) या ग्रंथांच्या आधारे दिली आहे.

२ बी. सी. लॉ व्हाल्यूम, भाग १, पृ. ५००–५०३.

३ डॉ. सांकलिया व डॉ. दीक्षित, एक्स्कॅव्हेशन्स अॅट ब्रम्हपुरी (कोल्हापूर) पृ. १–४

४ डॉ. मिराशी, शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख, पृ. २८१.

होते. तेथे त्यावेळी पद्मशिव राउल आचार्यांच्या नेतृत्वाखाली अनेक तपोधन विद्यादानाचे कार्य करीत होते. त्यांच्या अन्नदान व वस्त्राच्छादनासाठी, त्याचप्रमाणे देवालयाच्या डागडुजीसाठी ज्या अर्थी राजाकडून तावसगावचे वतन देण्यात आले त्या अर्थी हे कपालेश्वराचे देऊळ व तेथील देवस्थान पुष्कळच मोठे असावे. सध्या कोल्हापूरला कपालेश्वर या नावाचे कोणतेही देऊळ नाही. प्राचीन काळापासून कोल्हापूर हे शक्तिपीठ म्हणून प्रसिद्ध आहे, ते तेथील महालक्ष्मीच्या देवळामुळे. या देवीला महालक्ष्मी म्हणून संबोधीत असले तरी मूलतः ते अंबाबाईचे देऊळ आहे. त्याच ठिकाणी कपालेश्वराचे म्हणजेच शिवाचे एखादे मोठे देऊळ असणे असंभवनीय नाही. अंबाबाईमुळे कोल्लापुर हे शक्तिपीठ असले तरी प्रस्तुत ताम्रपटातील उल्लेखानुसार ते एक शैवस्थानही होते व तेथे कपालेश्वराचे म्हणजे शिवाचे देवालयही होते हे स्पष्ट दिसते.

**'करवीर–माहात्म्या'तील उल्लेख**

प्रस्तुत ताम्रपटाप्रमाणेच 'करवीर–माहात्म्य' या ग्रंथातही कपालेश्वर देवालयाचा उल्लेख आढळतो. तो पुढीलप्रमाणे :

तीर्थमन्यत् प्रवक्ष्यामि शूलकुण्डस्य सन्निधौ ।
कपालं स्थापितं यत्र करवीरस्य धीमतः ।
उत्कृत्य तु महेशेन हितार्थं तस्य वै दृढम् ।।
कपालसंज्ञकं तीर्थं कपालेश्वरसन्निधौ ।
तत्र स्नात्वा नरो राजन् मुच्यते ब्रह्महत्यया ।।

(अध्याय ६०–३६, ३७)

महेशाने करवीराची कवटी काढून ती जेथे स्थापन केली ते 'कपाल' नावाचे तीर्थ 'कपालेश्वरा'जवळ असल्याचे यात निर्दिष्ट केले आहे. 'करवीर–माहात्म्य' हा ग्रंथ शके १६५२ (=इ. स. १७३०) मध्ये लिहिला गेला. निदान त्या कालपर्यंत तरी 'कपाल' नावाचे तीर्थस्थान आणि 'कपालेश्वर' नावाचे देवालय कोल्हापुरात होते असे या 'करवीर–माहात्म्या' वरून निश्चित दिसते. त्यानंतर ती केव्हा आणि कशी नष्ट झाली हे सांगता येत नाही. आज मात्र ही दोन्ही स्थाने कोल्हापुरात नाहीत ही वस्तुस्थिती होय.

### कपालेश्वर व कापालिक

'कपालेश्वर' या नावावरून हे देवालय म्हणजे शैव संप्रदायातील 'कापालिक' संप्रदायाचे स्थान असावे, असे म्हणता येईल काय? हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. चालुक्यनृपती द्वितीय पुलकेशीच्या जयसिंहवर्मा नामक धाकट्या बंधूचा पुत्र नागवर्धनराज याने, बलाम्म ठक्कुराच्या विनंतीवरून कपालेश्वराच्या गुग्गुलपूजेसाठी व तेथील महाव्रतींच्या उपभोगासाठी गोपराष्ट्रातील बलेग्राम नावाचे गाव दान दिल्याचा उल्लेख एका ताम्रपटात आहे.[१] त्यातील 'कपालेश्वर' शब्दाचे भाषांतर डॉ. रा. गो. भांडारकर यांनी 'कवटयांच्या (कपालांच्या) माला धारण करणाऱ्यांचा ईश्वर–'स्वामी' (The lord of the wearers of garlands of skulls) असे करून असा निष्कर्ष काढला आहे की, 'Thus there is evidence of the existence in the middle of the Seventh century of the sect of Kapalikas in Maharashtra'.[२] डॉ. भांडारकर यांचे हे भाषांतर व अनुमान बरोबर नाही असे मला वाटते. कपाल म्हणजे कवटी हे खरे, पण कपाल म्हणजे कापालिक (कवटयांची माला धारण करणारा) असा त्याचा अर्थ कसा होऊ शकेल? दुसरे असे की, कपालेश्वर या शिवाच्या नामाचा कवटयांच्या मालेशी काहीही संबंध नाही. वरील ताम्रपटातील दान दिलेले गाव बलेग्राम हे गोपराष्ट्रातील म्हणजे नाशिक भोवतालच्या प्रदेशातील होते. तेव्हा हे दान ज्या कपालेश्वराच्या पूजेसाठी दिले होते ते नाशिक येथील (आजही विद्यमान असलेले) कपालेश्वर देऊळ असले पाहिजे. ब्रम्हदेवाशी वादविवाद करताना रागाच्या भरात शिवाने कापलेले ब्रम्हदेवाचे एक शिर शिवाच्या पाठीला चिकटले. ते गोदावरीच्या पात्रात स्नान केल्याने ज्या ठिकाणी गळून पडले तेथेच आता हे कपालेश्वराचे लिंग व देऊळ आहे, अशी या स्थानाच्या निर्मितीसंबंधीची पौराणिक आख्यायिका आहे[३]. अशीच आख्यायिका काश्मीरातील कपालमोचन तीर्थासंबंधीही आहे[४]. येथे कपाल म्हणजे शिर एवढाच अर्थ आहे, कवटी असा नाही. तेव्हा 'कपालेश्वरा'चा कापालिकाशी संबंध जोडण्याचे काही कारण नाही. पण भांडारकरांनी तो जोडल्यामुळे तशी समजूत मात्र प्रचलित झाली आहे. ह्यामुळेच भारतीय संस्कृति कोशात कापालिक या सदराखाली माहिती

१ JBBRAS, Vol. XIV, p. 26.

२ R. G. Bhandarkar, Vaisnavism, Saivism etc., p. 168.

३ Maharashtra State District Gazetteers, Nasik District, p. 945.

४ डॉ. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, स्थलकोश, पृ. ३४६.

देताना 'नासिक येथे कपालेश्वराचे एक मंदिर आहे. त्या मंदिरात कापालिक लोक वास्तव्य करून असतात. त्याच्या चरितार्थासाठी नागवर्धन या राजाने इगतपुरीजवळचे एक खेडे कापालिकांना दान दिले होते.' असे म्हटले आहे, ते बरोबर नाही.

दुसरे असे की, खुद्द भांडारकरांनीच कालमुख व कापालिक यांची चर्चा करताना 'महाव्रतधारी' शैव हे कालामुख संप्रदायाचे असतात, ते कापालिक नव्हते, असे स्पष्ट केले आहे. नाशिक येथील कपालेश्वर मंदिरातील शैवांना 'महाव्रती' असे म्हटले आहे, तेव्हा ते कालामुख संप्रदायाचे असले पाहिजेत असे दाखविले आहे.[1] सारांश, कपालेश्वराचे उपासक कापालिकच असतात असे नाही. तेव्हा प्रस्तुत ताम्रपटातील कोल्लापुर येथील कपालेश्वरदेवाचा आचार्य हा कापालिक संप्रदायाचा होता असे म्हणता येत नाही. तो कालामुख संप्रदायाचा असावा. गणेशवाडी येथील शिलालेखात[2] अनेक कालामुख तपोधनांची वर्णने आली आहेत. त्यांत त्यांना 'यमनियमस्वाध्यायध्यानधारणमौनानुष्ठानजपसमाधिषडंगोपहारादिसंपन्न' 'अनेक-तर्कादिशास्त्रपारावारपारग'– इत्यादी विशेषणे लावली आहेत. नेमकी तीच विशेषणे प्रस्तुत ताम्रपटातील पद्मशिव राउल आचार्यालाही लावली आहेत. त्यावरून तो कालामुख संप्रदायातील असावा यात शंका नाही. त्याच्या नावानंतर त्याला 'राउल' म्हणून संबोधले आहे. त्यावरून तो पाशुपत-लाकुल संप्रदायाचा होता हे दिसून येते. 'राउल' हा शब्द 'लाकुल' शब्दापासून व्युत्पन्न झालेला आहे असे डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी यांनी दाखवून दिलेले आहे.[3] कालामुख संप्रदाय हा लाकुल-पाशुपत संप्रदायाचाच एक विभाग होय.

## पद्मसिव राउल

सारांश, प्रस्तुत ताम्रपटाद्वारा ज्याला दान दिले आहे तो कोल्लापुर येथील कपालेश्वरदेवाच्या देवळातील शैव पाशुपतांच्या कालामुख संप्रदायाचा आचार्य होता. तो यम, नियम, स्वाध्याय, ध्यान, धारणा, मौन, अनुष्ठान, जप, समाधी व शील या योगातील क्रियांच्या अनुष्ठानात परिपूर्ण होता. तसेच, तो तर्क, व्याकरण इत्यादी अनेक शास्त्रांत पारंगत व वादविवाद करणाऱ्या पंडितरूपी हत्तींना पराजित

---

१ R. G. Bhandarkar, Vaisnavism, Saivism etc., p. 183.

२ विदर्भ संशोधन मंडळ, वार्षिक, १९६९, पृ. १६–८०. (पुढे पृ. १४५-१७८ पाहा)

३ डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी, नाथसंप्रदाय, पृ. १९१–१९७; रा. चिं. ढेरे चक्रपाणि, पृ. २१०.

करणारा सिंह, अर्थात, वादविवादात पंडितांना जिंकणारा होता (ओ. ३२–३४). ज्या कपालेश्वरदेवाच्या संस्थानाचा तो आचार्य होता त्यात अनेक तपोधन विद्या-दानाचे कार्य करीत असत. त्यांच्या अन्न-वसन-आच्छादनाची व देवालयाच्या डागडुजीची जबाबदारी तोच सांभाळीत असे. त्यासाठीच त्याला विनयादित्याकडून तावसगावाचे वतन या ताम्रपटाद्वारा देण्यात आलेले आहे.

**शिलाहारांचा महाप्रधान ?**

'पद्मशिव राउल' हे नाव ठाणे येथील शिलाहार नृपती हरिपालदेवाच्या शके १०७२ च्या आगाशी शिलालेखात (ओळ ८) आढळते. डॉ. वा. वि. मिराशी यांनी आपल्या 'शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख' या ग्रंथात या शिला-लेखाचे वाचन छापले आहे[1] त्यात केवळ 'श्री पद्मसिव' एवढेच नाव आले आहे. त्यापुढील 'राउल' हा शब्द तेथे अनवधानाने गळाला असावा. डॉ. सांकलिया व डॉ. उपाध्याय[2] यांनी, तसेच डॉ. शं. गो. तुळपुळे[3] यांनी संपादन केलेल्या याच शिलालेखात 'श्री पद्मशिव राउल' असे वाचन स्पष्ट आहे. शिलालेखाच्या ठशातही तो शब्द तसाच आढळतो.

आपल्या ताम्रपटातील श्री पद्मशिव राउल व हरिपालदेवाच्या आगाशी शिला-लेखातील 'श्री पद्मशिव राउल' ही एकच व्यक्ति असेल काय ? वरवर पाहाता या भिन्न व्यक्ती असाव्या असे वाटते. कारण, आपल्या ताम्रपटाचा त्यात निर्देशि-लेला काळ शके ५२० असा आहे, तर आगाशी शिलालेख शके १०७२ चा आहे. म्हणजे यात जवळ जवळ साडेपाचशे वर्षांचे अंतर आहे. पण प्रस्तुत ताम्रपट हा निश्चित बनावट असल्यामुळे त्यातील कालनिर्देश प्रमाण म्हणून मानणे योग्य नाही. प्रस्तुत ताम्रपटातील पद्मशिव राउल याला 'राजविदित' (=राजमान्य) हे विशेषण लावले आहे, तर आगाशी शिलालेखातील पद्मसिव राउल हा शिलाहार नृपती हरिपालदेवाचा 'महाप्रधान' होता. कदाचित त्यानेच तर हा बनावट ताम्रपट तयार करून घेतला नसावा ना ? त्याच्याकडे त्यावेळीही कोल्हापूरच्या कपालेश्वर देवाला असलेले तासगावचे वतन असावे, त्याच्या पुष्टयर्थ, फार पूर्वीपासून आपल्या पूर्वजाकडे ही वृत्ती आहे हे दाखविण्यासाठी या बनावट ताम्रपटाची निर्मिती झाली असण्याची शक्यता नाकारता येत नाही. एकाच आचार्य–गादीवर त्याच नावाच्या

---

१ शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख, पृ. १७५.
२ एपि. इं. व्हॉ. २३, पृ. २७३-२७४.
३ प्राचीन मराठी कोरीव लेख, पृ. ५०.

अनेक व्यक्ती असू शकतात. हा ताम्रपट करून घेतल्यानंतर मग तो ठाण्याच्या शिलाहारांकडे आला असावा व आपल्या कर्तृत्वाने त्यांचा महाप्रधान झाला असावा.

**स्थलनिश्चिती**

दान दिलेले तावसगाव ज्या विभागात अंतर्भूत होते त्याचा उल्लेख 'एडेनाडु-सप्तरिया' असा केलेला आहे. 'सप्तरिय' हा शब्द चुकीचा असून तेथे 'सत्तरिय' असा शब्द असावा असे वाटते. 'सत्तरिय' म्हणजे 'सत्तर' अर्थात, या ग्रामसमूहात ७० गावांचा समावेश असून तो विभाग एडेनाडु या नावाने ओळखला जात होता. शासनाच्या सोयीसाठी राज्याचे जे निरनिराळे विभाग पाडावयाचे ते दशमान पद्धती-नुसार पाडावे असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. त्यानुसार राज्याचे विभाग पाडण्याची पद्धत स्थूल मानाने इसवी सनाच्या आठव्या शतकापासून सुरू झाली.[1] शिलाहार नृपती गंडरादित्याच्या ताळले ताम्रपटात (शके १०३३) 'एडेनाडान्तर्गत तीरवाडग्रामे–'[2] (ओ. २५), त्याच्याच हेर्ले शिलालेखात (शके १०४०) 'येडेनाड-बळिय (कन्नड. बळे=मंडल, वर्तुळ) वगुबन हेरिलगे–'[3] (ओ. ३१) असे उल्लेख येतात. त्यावरून त्या काळातही 'एडेनाड' हे अनेक गावांचे मंडल होते असे दिसते त्यानंतर शके ११०४ मधील द्वितीय भोजाच्या कोल्हापूर शिलालेखात (ओ. २९)[4] 'एडेनाड · · ·' चा उल्लेख येतो. त्या पुढील काही अक्षरे खंडित झालेली आहेत. ती 'मंडळ' वाचक असावी असे वाटते. यावरून प्रस्तुत ताम्रपटानुसार चालुक्यांच्या काळात व त्यापुढेही शिलाहारांच्या काळात 'एडेनाडु' हे अनेक गावांच्या समूहाचे मुख्य ठिकाण होते हे दिसून येते. वरील सर्व कोरीव लेखांत आलेली गावे सध्याच्या कोल्हापूर जिल्ह्यात आढळतात. तेव्हा एडेनाडु विभाग हा सध्याच्या कोल्हापूर जिल्ह्याचाच भाग असावा, असे दिसते. तथापि, त्या भागात एडेनाडु या नावाचे किंवा तत्सदृश असे गाव आज आढळत नाही.

ताम्रपटात उल्लेखिलेले, दान म्हणून दिलेले तावसगाव हे हातकणंगले तालुक्यातील तासगाव होय. मनतगे हे सध्याचे मनपाडळ किंवा मनवाड असण्याचा संभव आहे. ताम्रपटात मनतगे हे तावसगावच्या ईशान्येस असल्याचे निर्देशिले आहे, पण वरील दोन्ही गावे वायव्य दिशेस आहेत. ताम्रपटात उल्लेखिलेले

---

१ दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन, भाग १, पृ. ५१, संपा : जी. यझदानी.
२ डॉ. मिराशी, शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख, पृ. २५५.
३ तत्रैव, पृ. २६९.
४ तत्रैव, पृ. ३२२.

तावसगावच्या दक्षिणेस असलेले हेर्रिलगे हे सध्याचे हेरले गाव होय. ते बरोबर तासगावच्या दक्षिणेस सुमारे तीन मैलांवर आहे. हे गाव पूर्वीच्या काळात फार महत्त्वाचे असावे. शिलाहार नृपती गंडरादित्याचा हेर्ले शिलालेख याच गावात सापडला होता. त्यात 'हेर्रिलिगे' गावाचा उल्लेख आहे. त्या शिलालेखात निर्देशिलेले जैन मंदिर आजही तेथे आहे. प्रस्तुत ताम्रपटातील वरगाव हे सध्याचे वडगाव-कसबा असावे. ताम्रपटातील नागाव हे हल्ली त्याच नावाने अस्तित्वात असून ते तासगावच्या नैऋत्येस सुमारे ४ मैलांवर आहे. टोप्पि हे आजचे टोप शहर होय. ताम्रपटात उल्लेखिलेले वलगाव आज अस्तित्वात नाही. तासगावच्या भोवतालच्या दहा-पंधरा मैलांच्या प्रदेशात त्या नावाचे कोणतेही गाव आज आढळत नाही.

### लेखक

ताम्रपटाचा लेखक, चालुक्य वंशात जन्मलेल्या श्रीसत्याश्रयदेवाचा, अर्थात सत्याश्रय विनयादित्याचा 'पादपद्मोपजीवि' (चरणकमलावर उपजीविका करणारा) म्हणजे सेवक, रामभट्ट होय. विनयादित्याचे जे इतर बनावट ताम्रपट आहेत त्यांतील धारवाड ताम्रपट व कोप्पल ताम्रपट यांचा लेखकही हाच रामभट्ट आहे.

## वाचन

### पत्रा पहिला

१ स्वस्तिश्री [ ।।* ] जयत्याविष्क्रि(ष्कृ)तं विष्णोव्वा(र्व्वा)राहं क्षोभि-
ताण्र्ण(र्ण्ण)व(वं) [ ।* ] दक्षिणोन्नतदंष्ट्राग्रविश्रां(श्रां)तभुवनं वपु
[:।।१।।*]

२ श्रीमदा(तां) सकलभुवनजनसंस्तूयमानमानव्या(व्य)सगोत्रहरीतिपुत्राणां
सप्तांबिकामात्रु(तृ)भिस(स्स)प्तमात्रु(तृ)-

३ भिरभिवर्ध्धि(र्द्धि)तानां कार्त्तिकेयपरिरक्षणप्राप्तकल्याणपरंपराणां भगवं(व)-
न्नारायणप्रसादा(द)समासादि-

४ तवराहला(लां)छन (ने) क्षणक्षणवषी(शी) क्रि(कृ)ताषे(शे)षमहीभ्रि-
(भृ)तानां[1] चालुक्यानां कुलमलंकरिष्णोरस्व(श्व)मेद(धा)वभ्रि(भृ)-
त(थ)-

---

१ °महीभृतां—असे वाचावे.

५ स्नानपवित्रीक्रि(कृ)तगात्रस्य जयछत्रचामरसिंहासनमस्तकस्ति(स्थि)त-
वराहसिंहस(श)रभसा(शा)र्दूलास्व(श्व)क-

६ रिमकरमत्स्यमा(मं)डूकझषव्रि(वृ)षभकलष(श)कुलिष(श)हलकक्कुट-
गरुडच(चं)द्रादित्यना-

७ गमहाद्व(ध्व)जविराजितपालिकेतनविचित्रफ(प)णवझल्लरीषं(शं)खकहलभेरी-
म्रि(मृ)दंग-

८ घोषणसमस्तभुवनाध्र(श्र)यश्रीप्रि(पृ)थ्वीवल्लभमहाराजाधिराजपरमेस्व(श्व)-
रपरमभट्टारकश्री-

९ पोलेकेसि(पुलकेशि)वल्लभदेवमहाराजस्य[1] तस्य सुतरा(र)नुपराक्रमकौंतेय-
वनवास्यादिपरन्रि(नृ)पमंडल-[2]

१० प्रणिवध(द्ध)विसु(शु)ध(द्ध)कीर्त्या(र्तिर)नेकन्रि(नृ)पवे[त्र*]दंडमस्त-
कपिंडखंडितप्रचंडदोर्द्दंडसहस्रमंडलाग्र-

११ खरनख[र*]विराजितोत्तुंगकिसो(शो)रकेसरिसमस्तभुवनाध्र(श्र)यश्रीप्रि(पृ)-
थ्वीवल्लभमहाराजाधिराजपरमे-

१२ स्व(श्व)रपरमभट्टारकश्रीकीर्तिवर्म्मदेवमहाराजस्य[3] तस्याग्रजरखिलजन-
वंदनीयसुंदरा-

*पत्रा दुसरा : समोरील बाजू*

१३ रविंदनाभनाभिकुट्(ड्)मलकुटीकोटरसंरंभभुवनभवनमूलस्तंभ [:*] राजसूय-
प्रमुखमखमुखादिदी-

१४ क्षितत्रिसमुद्रांतधरारक्षितसाहसांजनेयरिपुपुरत्रिपुरहरपराजयोपलवुध(लब्ध)-
परमेस्व(श्व)रपर-

१५ माणां[4] परमस्तुत्यसमस्तभुवनाध्र(श्र)यश्रीप्रि(पृ)थ्वीवल्लभमहाराजाधि-
राजपरमेरव(श्व)रपरमभट्टार-

---

१ °महाराजः [।*] तस्य°—असे वाचावे.

२ °पराक्रमाक्रान्तवनवास्यादि°—असे वाचावे.

३ °महाराजः। तस्याग्रज—असे वाचावे.

४ °परमेश्वरापरनामधेयः—असे वाचावे.

१६ कश्रीविजयादित्यदेवपरमेस्व(श्व)र(रः)[।*] तत्सूनु(नुः) समधिगत-निजविजयसमुचितविततराज्यविभवस्य[1] वि-

१७ भवस्य[2] विवुधरसिकसमररिपुगतरिपुनरपतिसमोपलवुध (लब्ध) कीर्त्तिपताका-वभाषि(सि)तदिगंतरा-

१८ लस्य[3] हिमकरकुलविलयहेतुपल्लवपतिपराजयानांतर[4]परिग्रि(गृ)हि(ही)त-कांचीपुरसं-

१९ चूर्ण्णि(र्ण्ण)तचेरचेर[2]चोलपा(पां)ड्यन्रि(नृ)पमणिम(मु)कुटकु(कू)टकिर-णसनि(नी)लाभिषिक्तचरणकम-

२० लस्य[5] समस्तभुवनाश्र(श्र)यश्रीप्रि(पृ)थ्वीवल्लभमहाराजाधिराजपरमेस्व-(श्व)रपरमभट्टारकश्रीविक्रमा-

२१ दित्यदेव(वः) तत्प्रियसुतस्य विनयविनयविनम्रितानेकभूपालमौलिमालालला-लित[6]चारुचरणारविं-

२२ दयुगलकां(कों)कणाद्यानेक[7]मालवगोल्लगूर्ज्जरख(क)लिंगवे(वें)गीषा(शा)दि-न्रि(नृ)पमणिमकुटमरि(री)चिमंजरी-

२३ रंजितपादपीठत्रि(स्त्रि)समुद्रमध्यवर्त्तिभुवनमंडळाधीस्व(श्व)रस्य[8] प्रि(पृ)-थुराज्योपावनीतल[9](ला)षे(शे)षश्चेतानिह-

२४ त्यफलमाविष्ट्रेभ्य(स्य) समधिविषयप्रस(श)मनादिहिततत्रमात्रराज्योपनां-(ना)ष्त्रि(श्रि)त्यांतरतुलत्वदैव्विवु-

---

१ °राज्यविभवः। विवुधरसिक—असे वाचावे.

२ हा शब्द येथे पुनरुक्त व म्हणून अनावश्यक आहे.

३ °दिगंतरालः।—असे वाचावे.

४ °नंतर—असे वाचावे.

५ °चरणकमलः।—असे वाचावे.

६ °मालालालित—असे वाचावे.

७ °कोंकणाद्यनेक—असे वाचावे.

८ °मंडलाधीश्वरः।—असे वाचावे.

९ °राज्योपनीतावनीतल'—असे वाचावे.

*पत्रा दुसरा : मागील बाजू*

२५ धर यि(इ)व श्रीरामतद्वासुदेव यि(इ)व न्रि(नृ)पकंसातुपरसु(शु)राम-
यि(इ)व राजराजाष्र(श्र)य भरत यि(इ)व[1] समस्तमु–

२६ वनाष्र(श्र)यश्रीप्रि(पृ)थ्वीवल्लभमहाराजाधिराजपरमेस्व(श्व)रपरमभट्टार-
कश्रीविनयादित्यसत्याष्र(श्र)यव–

२७ ल्लभनरेंद्रदेवकुष(श)ल(ली) सर्व्वानेव यतः(था)संबंध्यमान(कान्*)-
सौराष्ट्रविषयपतिग्रामकूट(टा)युक्तकमहत्व–

२८ रीनु[2] संविदित(तं) यतः(था) श्रीमलापहारिनद्युत्तरतटे श्रीरक्तापुरराजधाने
स्थिरतरस्वस्ता(स्था)नेन पट्टवं(बं)–

२९ धोत्सवसंपादनान्वितकुरुंदमुपागतेन पू(पु)ण्ययषो(शो)[भि*]व्रि(वृ)द्ध-
(द्ध)ये पूर्व्वविलुप्तानपिदेवभोग(गा)ग्रहारा–

३० नुपालयतः(ता) तत्पालनां विंस(श)त्यो(त्यु)त्तरपंचस(श)ती(ते)षु
स(श)कवर्षप्रतीती(ते)षु काल्युक्तसंव–

३१ त्सर(रे)प्रवर्त्तमाने कार्त्तिकसुकुलत्रयोदस्यानां[3] व्रिहस्पतो(तौ) वारे नवग्रह-
गलेका–

३२ दष(श)षु(शु)भदिनसुमुहूर्तश्रोपुत्रोत्साहपुण्याहमहादानतात्काले राजविदित-
स्वस्ति यमनियमस्वाद्या(ध्या)–

३३ यद्या(ध्या)नधारणमो(मौ)नानुष्टा(ष्ठा)नजपसमाधिसी(शी)लसंपन्नतर्क्क-
व्याकरणादिअनेकषा(शा)स्त्रपार(रा)वारपार–

---

१ विनयादित्याच्या अस्सल ताम्रपटात ही वाक्ये पुढीलप्रमाणे आहेत. 'समस्तविषयप्रशमनाद्विहिततन्मनोनुरञ्जनः अत्यन्तवत्सलत्वाद्युधिष्ठिर इव श्रीरामत्वाद्वासुदेव इव नृपांकुशत्वात्परशुराम इव राजाश्रयत्वाद् भरत इव–'

२ °महत्तरादीन्समादिशत्यस्तु वः।—असे वाचावे.

३ °त्रयोदश्यां—असे वाचावे.

३४ गानां वादिगजकेसरि श्रीसै(शै)वस्ता(स्था)नश्रीपद्मषि(शि)वरावुलानां श्रीकोल्लापुरदश्रीकपालेस्व(श्व)रदेवर–

३५ पूर्व्वधर्मप्रतिपालनां खंडस्पु(स्फु)टितजीण्र्णो(र्णो) धा (द्धा)रविद्यादानतपोधन-(ना)न्नवष(स)नाछा(च्छा)दनक्कं विट्टिव्रि(वृ)त्ति

३६ एडेनाडुसप्तरियाभ्यंतरे श्रीतावसगावेनामग्राम(मः) घटिकासितछत्रचामर–समस्तराजचि–

*पत्रा तिसरा*

३७ ह्नत्रिभोग(गा)भ्यंतरसा(शा)सनसमेत(तं) श्रीस्वयंभुकपालेस्व(श्व)र–देवराचार्य्यपद्मषि(शि)वरावुलनपादप्रक्षा–

३८ ल्य(ल)नं(न)धारापूर्व्वकं सर्व्वनमस्यं महान्रि(नृ)पदत्तं । तद्ग्रामसीमांतरे तस्य यी(ई) शान्यदिषो(शो) भागे मनतगेना–

३९ मग्राम(मः) तत्पश्चिमतः क्रि(कृ)ष्णपाषाणगुत्तिप्रमाण(णं)। तद्दक्षिणतः पाषाणगुत्तिप्रमाणं । तस्याग्नेयतः

४० गिरियु(उ)त्तुंगंश्रि(शृं)गप्रमाण(णं)। तद्दक्षिणतः हेर्रिलगेनामग्राम(मः) [।*] तदुत्तरतः गिरिदक्षिणकंधरप्रमाणं। त–

४१ स्य नैरि(ऋ)त्यदिषो(शो)भागे वरगावेनामग्राम(मः) [।*] तदुत्तरतः भगवतीदेविय दक्षिणदिषो(शो) भागद क्रि(कृ)ष्णपाषा–

४२ णपुंजप्रमाण(णं) । तस्य नैरि(ऋ)त्यदिषो(शो)भागे नागावेनामग्राम [:।*] तस्य यी(ई)षा(शा)न्यदिषो(शो) भागे त्रिग्राम–

४३ सीमासंधिगिरिय पश्चिमकंधरप्रमाण(णं) । तस्य वायव्यदिषो(शो) भागे टोप्पिनामग्राम(मः) [।*] तत्पू–

४४ र्व्वतः पाषाणगुत्तिप्रमाण(णं) । तदुत्तरतः हरिणगुत्ति प्रमाण(णं) । तदुत्तरतः मदनगुत्ति प्रमा–

४५ ण(णं) [।*] तदुत्तरतः त्रिग्रामसंधिक्रि(कृ)ष्णपाषाणपुंजप्रमाण(णं) । तस्य यी(ई)शान्यदिषो(शो) भागे वलगावेनामग्राम [:।*] त–

४६ द्क्षिणतः अचाल्यषे(शे)ले प्रमाण (णं) । तत्पूर्व्वतः कनिष्ट(ष्ठ)स्रा-
(स्रो)तसंगमप्रमाणं(णं) । तत्पूर्व्वतः क्रि(कृ)ष्णपाषा–

४७ णप्रमाण(णं) । तत्पूर्व्वतः त्रिग्रामसंधिपूलीगुत्तिप्रमाण(णं) ।। एवं अष्टा-
घाटोपलक्षितं भूमिप्रमाण(णं) । जलपा–

४८ षाणस्मिमनिद्वयसहस्त्रं ।। स्वदत्तं(त्तां) परदत्तं(त्तां) वा यो हरेति वसुंधरा
(रां) : षष्टिर्व्व(व)र्षसहस्त्राणि विष्टा(ष्ठा)यां जायते क्रि(कृ)–

४९ मि(मिः) ।। श्रीचालुक्यान्वयसंजाता(त)श्रीसत्यास्र(श्र)यदेवतत्पादपद्मोपजी-
विरामभट्टसुलिख्यते [।।*] श्री श्री.*

# ८

# चालुक्य नृपती विजयादित्य याचा कासार–शिरसी ताम्रपट

## उपलब्धी

कासार-शिरसी (तालुका निलंगा, जिल्हा उस्मानाबाद, महाराष्ट्र राज्य) येथील पोलीस पाटील श्री. दिनकरराव बाळाजीराव यांच्या मालकीचा हा ताम्रपट असून, श्री. आस्कर रामचंद्र कुळकर्णी (मुरूम येथील सरकारी हायस्कूलमधील एक शिक्षक) ह्यांच्या प्रयत्नांनी तो औरंगाबाद येथील पुरातत्त्व विभागाच्या अधिकाऱ्यांना प्राप्त झाला. तेथे तो जवळजवळ दोन वर्षे पडून होता. त्यानंतर महाराष्ट्र राज्यातील पुरातत्त्व विभागाचे संचालक डॉ. मो. गं. दीक्षित यांनी तो आपल्या कार्यालयात आणला आणि संपादनासाठी माझ्याकडे पाठविला. या सर्व गृहस्थांचा मी फार आभारी आहे. प्रस्तुत ताम्रपटातील काही शब्दांचे वाचन व अर्थ निश्चित करण्यासाठी श्री. न. लक्ष्मीनारायण राव आणि गुरुवर्य डॉ. मिराशी यांचे मला साह्य झाले आहे, हे कृतज्ञतापूर्वक नमूद करणे मी माझे कर्तव्यकर्म समजतो.

## वर्णन

ताम्रपटाचे एकूण तीन पत्रे असून, प्रत्येक पत्रा साधारणपणे १० इंच लांब व ५ इंच रुंद आहे. कोरलेल्या अक्षरांचे संरक्षण व्हावे म्हणून पत्र्याच्या चारही बाजू किंचित उंचावलेल्या आहेत. पहिल्या पत्र्याच्या वरची बाजू कोरी असून त्याच्या आतील बाजूवरून मजकुराला सुरवात होते. दुसऱ्या पत्र्याच्या दोन्ही बाजूंवर व तिसऱ्या पत्र्याच्या आतील बाजूवर मजकूर कोरलेला आहे. तिन्ही पत्रे एका गोलाकार कडीत गोवलेले असून तिच्या दोन्ही बाजू मुद्रेत फसविलेल्या आहेत. या गोलाकार मुद्रेचा व्यास १.२ इंच असून त्यावर वराहाची मुद्रा आहे. वराहाचे तोंड डावीकडे आहे. ताम्रपट व मुद्रा मिळून त्यांचे वजन ८ किलो ३०० ग्राम आहे.

ताम्रपटाच्या पहिल्या पत्र्यावर ९, दुसऱ्यावर ९, तिसऱ्यावर ११ आणि चौथ्यावर १३ अशा एकूण ४२ ओळींचा मजकूर ह्या ताम्रपटावर कोरलेला आहे. अक्षरे स्पष्ट व खोल कोरलेली आहेत. पहिल्या पत्र्यावरील अक्षरांची उंची साधारणपणे,

·३ ते ·४ इंच आहे. चौथ्या पत्र्यावरील अक्षरे त्या मानाने थोडी लहान आहेत. एका गोष्टीचा मात्र येथे निर्देश केला पाहिजे. शेवटच्या पत्र्यातील ३५ व ३६ व्या ओळीतील मजकूर पूर्वी त्या ठिकाणी असलेला मजकूर मिटवून त्यावर पुन्हा कोरलेला दिसतो. तथापि, एकंदर मजकूर काळजीपूर्वक कोरलेला असल्यामुळे वाचण्याला फारशी अडचण पडत नाही.

ऱ्हस्व व दीर्घ ई साठी स्वतंत्र चिन्हे वापरलेली नाहीत. इकार दर्शविण्यासाठी अक्षरावर एक गोलाकार चिन्ह तेवढे कोरलेले आढळते. त्याचे वळण डावीकडे असल्यामुळे वस्तुतः फक्त ऱ्हस्व इचे ते चिन्ह मानले पाहिजे. तथापि, दीर्घ ई-साठी सुद्धा तसेच चिन्ह सर्वत्र कोरलेले आहे.

### भाषा व लिपी

ताम्रपटाची भाषा संस्कृत आहे. ती सामान्यतः सर्वत्र शुद्ध आहे. काही ठिकाणी ऱ्हस्व उकारासाठी दीर्घ ऊकार आढळतो, पण ती कोरकाची चूक असावी. संधीचे नियम सर्वत्र योग्य रीतीने पाळलेले आहेत. पण पहिल्या ओळीतील 'विष्णोः वाराहम्' आणि ३५ व्या ओळीतील 'षडंगविच्च' आणि 'एतेभ्यः' या शब्दांचे संधी मात्र केलेले नाहीत. ३५ व्या ओळीत 'देशे' ऐवजी 'देसे' कोरले गेलेले आहे.

लिपीचे वळण दक्षिण-भारतीय (कानडी) प्रकारचे, चालुक्यांच्या इतर ताम्र-पटांत आढळते तसेच आहे. ३५ व ३६ या ओळींचे वळण मात्र इतर अक्षरांच्या वळणाहून थोडे नंतरचे, म्हणजे अलीकडचे दिसते.

### ताम्रपटाचा काळ

प्रस्तुत ताम्रपटाचा काळ 'एकोन्नविंशत्युत्तरषट्छतेषु शकवर्षेष्वतीतेषु' (ओळ ३२) म्हणजे गत शक ६१९ असा दिलेला आहे. त्यावेळी विजयादित्याचे पहिले राज्यवर्ष होते. ताम्रपटातील दान वैशाख शुद्ध पौर्णिमेला दिल्याचा उल्लेख ३३ व्या ओळीत आहे. शक कालाबरोबरच संवत्सराचा, त्याचप्रमाणे वैशाख शुद्ध पौर्णिमेबरोबर वाराचा निर्देश नसल्यामुळे अन्य रीतीने हा काळ तपासून पाहता येत नाही.

### चालुक्य नृपती : चल्लिकि देशातील घराणे

शक कालाच्या सुमारे ६ व्या व ७ व्या शतकात दक्षिण भारतात राज्य करणाऱ्या नृपतींपैकी चालुक्य नृपती हे विशेष महत्त्वाचे होत. ऐतिहासिक दृष्टीने आज यांच्या तीन शाखा मानण्यात येतात. (१) बादामीचे चालुक्य किंवा पश्चिम चालुक्य, (२) कल्याणीचे चालुक्य, आणि (३) वेंगी येथील पूर्व चालुक्य.

'चालुक्य' हे नाव कसे पडले हे आज निश्चितपणे सांगता येत नाही. एक मत असे आहे की, विष्णूच्या नाभीतून जन्मलेल्या हिरण्यगर्भ ब्रम्ह्याचा पुत्र मनू, त्याचा पुत्र मांडव्य, मांडव्याचा पुत्र हारीत. या हारिताला 'हारिती पंचशिख' या नावाचा मुलगा होता. देवतांना अर्घ्य देत असताना त्याच्या चूलिकेतून म्हणजे ओंजळीतून जन्माला आलेल्या मुलाला व त्याच्या संततीला 'चालुक्य' हे नाव पडले. (बॉम्बे गॅझेटीअर १, भाग २, पृ. ३३९). वेंगी येथील पूर्व चालुक्यांच्या अनेक ताम्रपटांत असे निर्दिष्ट केले आहे की, ब्रम्ह्यापासून निर्माण झालेले चंद्र, पुरुरवा, आयु, शतानीक, उदयन आणि इतर ५९ राजे प्रथम अयोध्या येथे राज्य करीत होते. त्यानंतर या कुळात जन्मलेल्या विजयादित्याने दक्षिणेत जाऊन राज्य स्थापन करण्याचा प्रयत्न केला. त्रिलोचनपल्लव राजाचा युद्धात पराभव केल्यानंतर तो मृत्यू पावला. त्यावेळी गर्भवती असलेल्या त्याच्या पत्नीला कालांतराने झालेल्या मुलाने वयात आल्यानंतर 'चलुक्य' पर्वतावर गौरीची पूजा करून भगवान नारायण आणि सप्तमातृका यांना प्रसन्न केले व राज्य मिळवले. (एपि. इंडि. वर्ष ४, पृ. ३०५; वर्ष ६, पृ. ३३७, ३५२ इत्यादी).

यातील महत्त्वाचा भाग इतकाच की, 'चलुक्य' पर्वतावर तपश्चर्या केल्यानंतर देवतांना प्रसन्न करून घेऊन राज्याधिष्ठित झालेल्या या मुलाला आणि त्याच्या संततीला 'चालुक्य' हे नाव पडले. हा चलुक्य पर्वत कोठे होता हे निश्चित सांगता येत नाही. प्रस्तुत कासार-शिरसी ताम्रपटातील ३५ व्या ओळीत 'चल्लिकि देशे मोरखंडि पश्चिमदिग्भागे बुल्लवादलिमुगुळिग्रामयोर्म्मध्ये जमळगामग्रामो दत्तः' असा निर्देश आलेला आहे. कासार-शिरसीच्या आग्नेय दिशेस आठ मैलावर मोरखंडी हे गाव बिदर जिल्ह्याच्या हुमणाबाद तालुक्यात आहे. त्यावरून या गावाभोवतालच्या प्रदेशाला पूर्वी चल्लिकि देश म्हणत असावेत असे दिसते. सध्याच्या उस्मानाबाद जिल्ह्यातील निलंगा तालुका, आणि बिदर जिल्ह्यातील हुमणाबाद तालुका, हे प्रदेश या चल्लिकि देशात अंतर्भूत असावेत. मोरखंडीच्या उत्तरेस उगम पावून कल्याणीच्या उत्तरेकडून वाहत जाणाऱ्या नदीचे नाव 'चुल्की' असे आहे. शिवाय, कल्याणी गावाच्या पूर्वेस वीस मैलावर 'चल्कापूर' नावाचे खेडेही आहे. तेथील उंच टेकड्यांनाच 'चलुक्य पर्वत' हे नाव असावे. तेव्हा, चालुक्य नृपती मूळचे या प्रदेशातील असून, चल्लिकी देशात राहणारे म्हणून त्यांना चालुक्य नाव पडले असावे असे अनुमान करण्याला हरकत नाही.

कासार-शिरसी आणि इतर ताम्रपटांत चालुक्यांची जी वंशावळ दिलेली आहे, तीत पुढील वर्णन आढळते. चालुक्य नृपती हे मानव्य गोत्राचे हारितीपुत्र असून सप्तलोकांच्या माता असलेल्या सप्तमातृकांकडून त्यांचे पालनपोषण झाले होते.

कार्तिकेयाने संरक्षण केल्यामुळे त्यांचे सतत कल्याण झाले होते. भगवान नारायणाच्या कृपेने, ज्याच्या केवळ दृष्टीक्षेपाने सर्व राजे वश होत असत (पराभूत होत असत) असे वराह चिन्ह त्यांनी प्राप्त करून घेतले होते.

## जयकेशी व रणराग

चालुक्यांच्या कुळात अनेक राजे होऊन गेले. त्यांतून शिलालेखांत ज्याचा उल्लेख आढळतो असा पहिला राजा जयसिंह होय. त्यानंतर त्याचा मुलगा रणराग हा गादीवर बसला. या दोघांचे उल्लेख ऐहोळे शिलालेखात (एपि. इंडिका, वर्ष ६) आणि महाकूट स्तंभलेखात (इंडि. अँटि. वर्ष १९) आलेले आहेत. तथापि, चालुक्यांचे जे अनेक ताम्रपट उपलब्ध आहेत त्यांत मात्र चालुक्यांची वंशावळ जयसिंहापासून सुरू केलेली आढळत नाही. रणरागाचाही त्यांत उल्लेख आढळत नाही. जवळजवळ सर्व ताम्रपटांतील चालुक्यांच्या वंशावळीचा प्रारंभ रणरागाचा पुत्र प्रथम पुलकेशी याच्यापासून केलेला आढळतो.

## प्रथम पुलकेशी (इ. स. ५४० ते ५६६)

कासार-शिरसी व इतर बहुतेक ताम्रपटांत या पुलकेशीला 'चालुक्यांच्या कुळाला भूषणभूत' म्हणून संबोधले आहे.—(ओळ ६). त्यावरून विशेष प्रसिद्ध आणि पराक्रमी असा पहिला चालुक्य नृपती प्रथम पुलकेशी हाच असावा असे दिसते. प्रस्तुत कासार-शिरसी ताम्रपटातही चालुक्यांची वंशावळ त्याच्याचपासून सुरू झालेली आहे. याने अश्वमेध यज्ञ करून अवभृथ-स्नानाने आपले शरीर पवित्र केले होते. (ओळ ६). 'महाराज' ही पदवी ज्याने धारण केली होती (ओ. ७) असा चालुक्य कुळातील तो पहिलाच नृपती होय. यावरून असा तर्क करण्याला हरकत नाही की, त्याचे वडील रणराग आणि आजोबा जयसिंह हे दुसऱ्या कोण्यातरी सम्राटाच्या (बहुतेक कदंबांच्या) आधिपत्याखाली राज्य करणारे मांडलीक असावेत. प्रथम पुलकेशी याने वातापी (आजचे बादामी, जिल्हा विजापूर, कर्नाटक राज्य) शहर काबीज करून तेथे तटबंदी उभारली आणि पुढे तेच चालुक्यांच्या राजधानीचे स्थान बनले. (एपि. इंडिका, वर्ष २८, बादामी शिलालेख) अश्वमेध यज्ञाप्रमाणेच अग्निष्टोम, वाजपेय आणि पौण्डरीक बहुसुवर्ण नावाचे यज्ञही त्याने विधिपूर्वक केलेले होते. मनुधर्मशास्त्र, पुराणे, रामायण आणि महाभारत यांचा त्याने अभ्यास केला होता असा उल्लेख चालुक्य नृपती मंगलेश याच्या नेरूर ताम्रपटात आढळतो. (इंडि. अँटि., वर्ष १९, पृ. ३५६). वल्लभेश्वर, सत्याश्रय, रणविक्रम आणि श्रीपृथ्वीवल्लभ अशी बिरुदे त्याला लावलेली आढळतात. यावरून प्रथम पुलकेशी

हा अत्यंत पराक्रमी, धार्मिक आणि सत्यप्रिय राजा होता असे म्हणावयास हरकत नाही. त्याने केलेल्या पराक्रमांचे किंवा मिळविलेल्या विजयांचे निश्चित असे वर्णन मात्र कोठेही उपलब्ध नाही. बटपूर घराण्यातील दुर्लभदेवी नावाच्या राजकन्येशी त्याने विवाह केला होता. इंदुकांती नावाची दुसरीही एक पत्नी त्याला होती असे दिसते.

## कीर्तिवर्मा (इ. स. ५६६ ते ५९७)

प्रथम पुलकेशी याला दोन मुले होती. पहिला कीर्तिवर्मा आणि दुसरा मंगलेश. कीर्तिवर्मा हा ज्येष्ठ पुत्र असल्यामुळे प्रथम पुलकेशीनंतर तोच गादीवर बसला. आपल्या कारकीर्दीत त्याने वनवासी येथील व इतर शत्रू राजे यांना आपल्या पराक्रमाने जिंकून घेऊन फार मोठी कीर्ती मिळविली होती (ओळ ७ व ८). महाकूट स्तंभ-लेखावरून असे कळते की, अंग, वंग, कलिंग, वट्टूर, मगध, मद्रक, केरळ, गंग, मूषक, पाण्डय, द्रमिळ, चोळीय, अळुक, वैजयंती इत्यादी देशांच्या राजांना त्याने जिंकले होते. ऐहोळे शिलालेखावरून त्याने नल, मौर्य आणि कदंब राजे यांनाही जिंकले होते, असे दिसून येते. नल-नृपती यांचा अंमल बस्तर, उडीसा आणि वऱ्हाड विभागावर होता. मौर्य राजे कोकणात राज्य करीत होते. यावरून महाराष्ट्रावर स्वामित्व मिळविणारा पहिला चालुक्य नृपती कीर्तिवर्मा होय असे म्हणावयास हरकत नाही. आपल्या राज्यात त्याने कलांना उत्तेजन देऊन अनेक देवळे उभारली आणि लेणी कोरवून घेतली. बहुसुवर्ण आणि अग्निष्टोम यज्ञ त्याने केलेले होते. रणपराक्रम आणि सत्याश्रय अशी बिरुदे त्याला लावलेली आढळतात.

## मंगलेश (इ. स. ५९७ ते ६१०)

कीर्तिवर्म्याच्या मृत्यूनंतर त्याचा धाकटा भाऊ मंगलेश गादीवर बसला. कारण, बहुधा त्यावेळी कीर्तिवर्म्याचा पुत्र द्वितीय पुलकेशी हा लहान असावा. या मंगलेशाचा नामनिर्देश प्रस्तुत ताम्रपटातील वंशावळीत आढळत नाही. ऐहोळे शिलालेख आणि इतर ताम्रपट यांवरून असे दिसते की, मंगलेश अत्यंत पराक्रमी होता. विशेषतः पूर्व आणि पश्चिम समुद्रांच्या प्रदेशावर स्वाऱ्या करून ते त्याने जिंकले होते. रेवती द्वीपावर (रत्नागिरी जिल्ह्यातील वेंगुर्ला गावापासून ८ मैलांवरील 'रेदी') सुद्धा त्याने स्वामित्व स्थापन केले होते. सावंतवाडी जवळील नेरूर गावी याचा एक ताम्रपट मिळाला असून त्यात कोंकण विषयातील कुंडिवाटिका नावाचे गाव त्याने दान दिल्याचा उल्लेख आहे (इंडि. अँटि. वर्ष ७, पृ. १६१). आपल्या मागे आपल्या मुलाला गादीवर बसविण्याचे मंगलेशाचे प्रयत्न होते.

**द्वितीय पुलकेशी (इ. स. ६१० ते ६४२)**

ऐहोळे शिलालेखावरून असे दिसून येते की, आपल्या काकाने म्हणजे मंगलेशाने आपल्याविरुद्ध कारस्थान रचल्याचे कळताच द्वितीय पुलकेशीला अज्ञातवासात राहून आपल्या काकाशी लढण्याची तयारी करावी लागली. शेवटी युद्धात मंगलेशाला ठार मारून त्याने आपले सिंहासन प्राप्त करून घेतले. यावरून द्वितीय पुलकेशी हा अत्यंत पराक्रमी असला पाहिजे हे तर दिसतेच, शिवाय तो अत्यंत चतुर राजकारणीही असावा असे दिसून येते.

चालुक्य वंशाचा इतिहास द्वितीय पुलकेशीच्या पराक्रमांनी भरलेला आहे. ऐहोळे येथील शिलालेखात त्याचे सुंदर वर्णन आढळते. तो गादीवर बसला त्यावेळी यादवीमुळे राज्य खिळखिळे झाले होते. त्यामुळे शत्रूंनी उचल खाऊन ते बळकाविण्याचा प्रयत्न केला असल्यास आश्चर्य नाही. भीमरथी नदीच्या उत्तरेकडील भाग अप्पाईक आणि गोविंद नावाच्या मांडलिकांनी बळकाविण्याचा प्रयत्न करताच द्वितीय पुलकेशीने त्यांना मोडून काढले. वरदा नदीच्या तीरावरील वनवासी नावाचे संपन्न शहर त्याने पुन्हा जिंकून घेतले. अळूप आणि गंग राजांनी केलेली बंडे मोडून त्याने त्यांना शरण आणले. कोकणातील मौर्य मांडलिकांचा पराभव करून आपल्या नौदलाच्या साह्यांने त्यांची पुरी नामक राजधानी पादाक्रांत केली. हे सर्व राजे पूर्वी चालुक्यांच्या स्वामित्वाखाली होते; पण मंगलेश आणि द्वितीय पुलकेशी यांच्यातील यादवीचा फायदा घेऊन त्यांनी बंडाचा झेंडा उभारला असावा असे दिसते.

त्या वेळी उत्तर भारतात श्रीहर्षवर्धन राजाने आपले संपूर्ण आधिपत्य स्थापन केले होते आणि आता त्याची नजर दक्षिण भारताकडे वळली होती. त्याला तोंड देण्यासाठी आपले प्रबल सैन्य घेऊन द्वितीय पुलकेशीने कूच केले. श्रीहर्षवर्धन आणि द्वितीय पुलकेशी यांच्या सैन्यांची गाठ विंध्य पर्वतातील रेवा (नर्मदा) नदीच्या तीरावर पडली, आणि त्यात पुलकेशीने हर्षवर्धनाचा पराभव करून (ओळ ९ व १०) त्याचे असंख्य हत्ती काबीज केले. या पराक्रमामुळे त्याला ९९००० नी संपन्न असलेल्या तीन महाराष्ट्रकांवर प्रभुत्व प्राप्त झाले. त्यामुळे त्याने परमेश्वर ही यथार्थ पदवी आपणाला लावून घेतली. आपल्या पराक्रमाने त्याने कोसल, कलिंग आणि पल्लव नृपती यांचाही पराभव केला.

त्यानंतर त्याने आपल्या राज्याची व्यवस्थित घडी बसविण्याला सुरुवात केली. त्याचा धाकटा भाऊ विष्णुवर्धन हा पूर्वी सातारा विभागातील अधिकारी म्हणून काम करीत होता. त्याला युवराज ही पदवी देऊन त्याने वेंगी प्रदेशावर सर्वाधिकारी म्हणून पाठविले. पुढे बहुधा द्वितीय पुलकेशीच्या

संमतीनेच विष्णुवर्धन हा वेंगी येथे स्वतंत्रपणे राज्य करू लागला. तेव्हा-पासूनच वेंगी येथील पूर्वेकडील चालुक्यांचे एक नवे राज्य उदयाला आले. सत्याश्रय इंद्रवर्मा नावाच्या आपल्या दुसऱ्या एका नातेवाइकाला रेवती द्वीप आणि त्याभोवतालचा प्रदेश यावर त्याने सर्वाधिकारी नेमले. श्रीवल्लभ सेनानंदराज नामक सेंद्रक कुळातील तिसऱ्या एका नातेवाइकाला त्याने उत्तर कोकणातील चिपळूण विभागावर सर्वाधिकारी नियुक्त केले. अशा रीतीने सर्वत्र दिग्विजय मिळवून आणि संपूर्ण दक्षिण भारतावर प्रभुत्व स्थापन करून द्वितीय पुलकेशीने अपूर्व कीर्ती संपादन केली आणि चालुक्य वंशाचे नाव भारताच्या इतिहासात अजरामर करून सोडले. प्रस्तुत ताम्रपटातील आणि इतर ताम्रपटांतील वंशावळीत द्वितीय पुलकेशीचा निर्देश 'सत्याश्रय श्रीपृथ्वीवल्लभ' एवढाच येतो.

द्वितीय पुलकेशीच्या काळातच प्रसिद्ध चिनी यात्रेकरू ह्यूएनत्संग याने भारताला भेट दिलेली होती. त्याने लिहून ठेवलेल्या आपल्या यात्रेच्या वर्णना-वरून त्या वेळच्या भारताची राजकीय आणि सामाजिक परिस्थिती चांगली कळून येते. पुलकेशीच्या कर्तृत्वाचा उल्लेख त्याने केलेला आहे. पुलकेशी हा क्षत्रीय राजा असून त्याचे कल्याणकारी राज्य दूरवर पसरलेले होते आणि त्याचे मांडलीक अत्यंत निष्ठेने त्याची सेवा करीत होते, असे ह्यूएनत्संगाने म्हटलेले आहे.

आपल्या कारकिर्दीच्या पूर्वकाळात द्वितीय पुलकेशीने पल्लव नृपतींचा पराभव केला असला तरी पल्लवांचे चालुक्यांशी वैर पुढेही चालूच राहिले. त्याच्या कारकीर्दीच्या अखेरीस त्या वेळचा पल्लव नृपती नरसिंह याने चालुक्यांच्या वातापी नगरावर आकस्मिक आक्रमण करून ते काबीज केले असावे असे दिसते. याच युद्धात द्वितीय पुलकेशी मारला गेला असावा असे इतिहासकारांचे म्हणणे आहे.

## प्रथम विक्रमादित्य (इ. स. ६५५ ते ६८१)

द्वितीय पुलकेशीनंतर जवळजवळ तेरा वर्षे चालुक्यांच्या राज्याला खग्रास ग्रहण लागले होते. त्याचा मोक्ष होऊन इ. स. ६५४ च्या सुमारास त्याचा पुत्र प्रथम विक्रमादित्य गादीवर बसला. 'अवनिपतित्रितयान्तरितां स्वगुरो: श्रियम्' असा उल्लेख प्रस्तुत ताम्रपटात आहे (ओळ १३ व १४). त्यावरून चालुक्यांशी शत्रुत्व करणाऱ्या कोणत्यातरी तीन राजांनी एकत्रित येऊन चालुक्य राज्य जिंकून घेतले होते व त्यामुळे राज्यलक्ष्मी चालुक्यांना अंतरली होती,

असे स्पष्ट दिसते. पण बुद्धिमान विक्रमादित्याने केवळ आपल्या एकट्याच्या खड्गाच्या साह्याने चित्रकंठ नावाच्या वेगवान तुरंगमावर आरूढ होऊन या तिन्ही राजांना जिंकून घेतले आणि त्यांच्या ताब्यात गेलेली चालुक्यांची राज्यलक्ष्मी परत मिळविली (ओळ १२ व १३). यानंतर त्याने आपल्या पराक्रमाने पाण्डय, चोळ, केरळ, कळभ्र प्रभृती नृपतींचे द्रुतगतीने दलन केले आणि नंतर कांची येथे राज्य करणाऱ्या नृपतीला आपल्या पायाशी शरण आणले. (ओळ १४ ते १६) यावरून प्रथम विक्रमादित्याच्या पराक्रमाची उत्तम कल्पना येईल. काही ताम्रपटांवरून असे दिसते की, या अनेक युद्धांत त्याला त्याचा पुत्र विनयादित्य याचे साह्य झाले होते. प्रथम विक्रमादित्याला चंद्रादित्य नावाचा वडील बंधू होता. तो फारसा पराक्रमी नसावा आणि म्हणूनच आपल्या पराक्रमाने राज्य परत मिळवणाऱ्या आपल्या धाकट्या बंधूच्या, म्हणजे विक्रमादित्याच्या सिंहासनाधिरोहणाला त्याने मान्यता दिली असावी. बहुधा त्याची ही अनुकूलता लक्षात घेऊनच विक्रमादित्याने त्याला कोंकण प्रांताच्या अधिकारावर नेमले असावे.

## विनयादित्य (इ. स. ६८१ ते ६९६)

प्रथम विक्रमादित्यानंतर त्याचा पुत्र विनयादित्य गादीवर बसला. आपले वडील विक्रमादित्य यांच्याविरुद्ध त्रैराज्य नृपतींनी आणि कांचीपतीने उठाव केला असताना तो मोडून काढण्यात विनयादित्याने फार मोठे साह्य केले होते, हे वर आलेच आहे. याशिवाय विनयादित्याने कमेर, पारसिक, सिंहळ इत्यादी द्वीपांच्या स्वामींना नमविले आणि त्यांच्याकडून खंडणी वसूल केली (ओळ १९, २०). याच काळात संपूर्ण उत्तर भारताच्या स्वामीने चालुक्याविरुद्ध पुन्हा आक्रमण केले होते असे दिसते. पण विनयादित्याने आपल्या पराक्रमाने त्याचे दमन करून पालिध्वज आदि सम्राटपदाची सर्व चिन्हे प्राप्त करून घेतली. (ओळ २०, २१). विनयादित्याच्या पराक्रमाची ही वर्णने केवळ अलंकारिक असावीत असे काही संशोधकांचे म्हणणे आहे, कारण त्यांना उपोद्बलक असा ऐतिहासिक पुरावा अद्याप मिळालेला नाही.

## विजयादित्य (इ. स. ६९६ ते ७३३)

विनयादित्यानंतर त्याचा पुत्र विजयादित्य हा गादीवर बसला. प्रस्तुत कासार-शिरसी ताम्रपट हा विजयादित्याच्या प्रथम राज्यवर्षात दिलेला आहे. त्यावरून शके ६१८–६१९ मध्ये तो राज्यावर आला असे म्हणावयास हरकत

नाही. शके ६५५ पर्यंत त्याने राज्य केले. बादामी चालुक्यांच्या वंशात सर्वांत दीर्घ काळपर्यंत राज्य करणारा नृपती विजयादित्यच होय. आजोबांच्या आणि वडिलांच्या हाताखाली सर्व शस्त्रास्त्रांचे व शास्त्रांचे शिक्षण त्याला लहानपणीच मिळाले होते (ओळ २३). आपले आजोबा म्हणजे प्रथम विक्रमादित्य दक्षिण दिशेकडील राजांवर विजय मिळविण्यासाठी गेले असताना त्यांच्याबरोबर राहून सर्व शत्रुरूपी कंटकांना त्याने मुळासकट उपटून टाकले होते. (ओळ २४); आणि त्याचे वडील म्हणजे विनयादित्य उत्तरापथावर (=उत्तर भारतावर) विजय मिळविण्यासाठी चालून गेले असताना त्यांच्यापुढे राहून विजयादित्याने शत्रूंचे हत्तींचे सैन्य आपल्या तलवारीच्या धारेने पराभूत केले होते (ओ. २५). सर्व युद्धप्रसंगी विजयादित्य नेहमी पुढे असायचा. युद्धात पराक्रम दाखविण्याची त्याला मुळातच आवड होती. शत्रूंच्या समुदायाला त्याने मोडून काढले होते आणि गंगा, यमुना, पालिध्वज आणि ढक्क इत्यादी शत्रुचिन्हे आणि माणिके व हत्ती यांची अगणित संपत्ती त्याने शत्रूपासून हिसकावून घेतली होती (ओ. २६). एक वेळ, पळून जाणाऱ्या शत्रूंनी उलटून अकस्मात त्याच्यावर हल्ला केला आणि दुर्दैवाने त्यात तो शत्रूंच्या हाती पडला असावा असे दिसते. परंतु, वत्सराजाप्रमाणे कुणाचीही मदत न घेता शत्रूंचा आपल्या पराक्रमाने नाश करून त्याने आपली मुक्तता करून घेतली, असे या ताम्रपटातील २७–२९ ओळींतील वर्णनावरून दिसते. विजयादित्य तिन्ही शक्तींनी युक्त होता. शत्रूंचा गर्व त्याने जिरविला होता. तो अत्यंत उदार आणि गुणी असल्यामुळे जणू सर्व भुवनांना आश्रयभूत झाला होता आणि त्यामुळेच सम्राटपदाची उज्ज्वल चिन्हे त्याने धारण केली होती (ओ. ३०, ३१).

### स्थलनिश्चिती : रासेनपुर

हाच विजयादित्य 'रासेनपुर'* येथे असताना प्रस्तुत कासार-शिरसी ताम्रपटातील दान त्याने दिलेले आहे. विजयादित्याच्या एका नेरूर ताम्रपटात (शके ६२२=इ. स. ७००) त्या वेळी तो 'रासेननगर' नावाच्या आपल्या

---

* राष्ट्रकूट नृपती तृतीय गोविंद याच्या राधनपूर ताम्रपटात (इंडि. अँटि., वर्ष ६, पृ. ६८) 'रासियन भुक्ति' (विभाग) उल्लेखिली आहे. 'रासियन' म्हणजे सध्याचे राशिन. चालुक्यांचा उपरोक्त ताम्रपटातील 'रासेन'पुर किंवा नगरही तेच होय.

विजयी राजधानीत तळ देऊन होता असे म्हटले आहे (इंडि. अँटि., वर्ष ९, पृ. १२८). नेरूर ताम्रपटातील ते 'रासेननगर' आणि प्रस्तुत कासार-शिरसी ताम्रपटातील 'रासेनपुर' बहुधा एकच असावे. नगर आणि पुर हे दोन्ही शब्द समानार्थक असल्यामुळे त्यांचा उपयोग एकाच गावाच्यासंबंधी केला असणे अशक्य नाही. हे रासेननगर म्हणजे अहमदनगर जिल्ह्यातील रासीन (तालुका) होय, असे फ्लीटने म्हटले आहे. कासार-शिरसी आणि उपरोक्त नेरूर ताम्रपट यांवरून असे दिसून येते की, शके ६१९ मध्ये विजयादित्य रासेनपूरला तळ ठोकून होता, त्याचप्रमाणे शके ६२२ मध्येही तो तेथे होता. एक तर शके ६१९—६२२ पर्यंत सतत तो या ठिकाणी राहिला असावा किंवा राज्यावर बसल्यानंतर स्वारीला निघाला असताना त्याने रासेनपूर जिंकून तेथे प्रथम शके ६१९ मध्ये तळ दिला असावा आणि नंतर पुन्हा शके ६२२ मध्ये दुसऱ्या स्वारीच्या वेळी त्याने तेथे तळ दिला असावा.

**मोरखंडी**

दान दिलेले 'जमळगाम' हे 'चल्लिकी' देशात 'मोरखंडी' च्या पश्चिमेस बुल्लवादलि आणि मुगुळि या दोन गावांच्या मध्ये होते. चल्लिकि देशासंबंधी विवेचन यापूर्वी केलेलेच आहे. 'मोरखंडी' गाव कासार-शिरसीपासून आग्नेय दिशेस सुमारे आठ मैलांवर असून सध्या ते कर्नाटक राज्यातील बीड जिल्ह्याच्या हुमणाबाद तालुक्यात मोडते. त्या गावाजवळील रानात एक-दोन पडकी देवळे असून प्राचीन काळी तेथे 'मृकुंड' ऋषी तपश्चर्या करीत होते अशी समजूत आहे. मृकुंड ऋषींचे स्थान म्हणूनच या गावाला 'मृकुंडी' हे नाव मिळाले असून 'मोरखंडी' हा त्याचाच अपभ्रंश असावा.

राष्ट्रकूट नृपती तृतीय गोविंद याची राजधानी 'मयूरखंडी' येथे होती असे त्याच्या अनेक ताम्रपटांवरून कळते. हे मयूरखंडी गाव म्हणजे नाशिक जिल्ह्यातील मोरखंड होय असे बूल्हर यांचे म्हणणे आहे (इंडि. अँटि., वर्ष ७, पृ. ६४). डॉ. मिराशी यांच्या मते चंद्रपूर (चांदा) जिल्ह्यातील, वैनगंगेच्या काठावरील 'मार्कंडी' गाव हे राष्ट्रकूटांचे मयूरखंडी नावाचे राजधानीचे ठिकाण असावे. (एपि. इंडिका., वर्ष २३, पृ. १३). मार्कंडी येथे प्राचीन देवालये आहेत; शिवाय मार्कंडी व मोरखंडी या नावांत ध्वनिसाम्यही आहे. तथापि हे मत काहींना मान्य नाही. मार्कंडी हे स्थान राष्ट्रकूटांच्या राज्याच्या पूर्वेकडील सीमेवर येईल, त्यामुळे राज्याच्या राजधानीचे ठिकाण म्हणून ते सोयीचे असणे शक्य नाही; आणि म्हणून मार्कंडी म्हणजे मयूरखंडी असणे संभवत नाही असे त्यांना वाटते.

प्रस्तुत ताम्रपटातील मोरखंडी ही राष्ट्रकूट नृपतींची मयूरखंडी असेल काय ? हा प्रश्न अवश्य विचार करण्यासारखा आहे. राष्ट्रकूट नृपतींचे मूल स्थान प्राचीन लत्तलूर म्हणजे सध्याचे लातूर (जिल्हा उस्मानाबाद) होय असे म्हणतात. लातूर-पासून प्रस्तुत मोरखंडी फक्त ६० मैलांवर आहे. तसेच राष्ट्रकूट नृपती प्रथम अमोघवर्ष याने ज्या मान्यखेटला, म्हणजे सध्याच्या मालखेडला आपली राजधानी नेली तेथूनही मोरखंडी फार दूर नाही. मोरखंडी आणि मालखेड यातील अंतर ५० मैल आहे. या गोष्टी विचारात घेतल्या तर राष्ट्रकूटांची मयूरखंडी बहुधा प्रस्तुत मोरखंडी असावी असे वाटते. हा एक तर्क मी अभ्यासकांसमोर मांडला आहे. त्याचा विचार व्हावा.

### जमळगाम व मुगुळी

बुल्लवादलि आणि मुगुळि या गावांच्या मध्ये असलेले, दान दिलेले 'जमळगाम' कोणते ? मोरखंडीच्या पश्चिम विभागात बुल्लवादलि गाव आढळत नाही. जवळगा आणि मुगुळि या नावाची गावे मात्र अनेक आहेत. कासार-शिरसीच्या ईशान्येस १५ मैलांवर कल-मुगुळी गाव असून त्याच्या पश्चिमेला १० मैलांवर हरि-जवळगा गाव आहे. मोरखंडीच्या पश्चिमेला १२ मैलांवर जाजन-मुगळी असून त्याच्या वायव्येला १५ मैलांवर बेट-जवळगा आहे. 'जमळगाम'चेच रूपांतर जवळगा असावे. बहुधा बेट-जवळगा हेच प्रस्तुत ताम्रपटातील जमळगाम असावे.

### गृहीतसहस्र म्हणजे सामवेदी ब्राम्हण

ज्याच्या विनंतीवरून 'जमळगाम' गावाचे दान दिलेले आहे तो नरेंद्रादित्य कोण असावा हे सांगता येत नाही. बहुधा तत्कालीन चल्लिकि देशावरील तो अधिकारी असावा.

ज्यांना हे गाव दान दिलेले होते त्यांची नावे कोत्तिशर्मा, प्रभाकर आणि दुसरा प्रभाकर अशी आहेत. कोत्तिशर्मा हा कौशिक गोत्राचा होता, प्रभाकर याचे गोत्र भारद्वाज होते, आणि दुसरा प्रभाकर बभ्रुव गोत्राचा होता. कोत्तिशर्मा आणि पहिला प्रभाकर यांना 'गृहीतसहस्र' असे म्हटले आहे. या शब्दाचा सर्वसाधारण अर्थ ब्राम्हण असा होतो. हा शब्द शब्दकोषात मला आढळला नाही. ज्याने सहस्र म्हणजे एक हजार (ऋचा) गृहीत (म्हणजे घेतलेल्या, प्राप्त केलेल्या, अर्थात अभ्यासलेल्या आहेत) तो, असा गृहीतसहस्र याचा अर्थ संभवतो. एक हजार (गायींचे) दान ज्याला प्राप्त झाले आहे, किंवा या दानाला जो पात्र आहे तो गृहीत-सहस्र असाही याचा अर्थ करता येईल. सामवेदाच्या एक हजार शाखा

आहेत.[1] त्या ज्याने अभ्यासलेल्या आहेत तो, अर्थात सामवेदी ब्राम्हण असा याचा अर्थ करणे अधिक बरोबर होईल.

शिलाहार नृपती अपराजित याच्या जंजिरा ताम्रपटात (ओळ ७३) 'गृहीत-सहस्रहरदेवसुताय' असा उल्लेख येतो. शिलाहार नृपती द्वितीय भोज याच्या कोल्हापूर ताम्रपटात (ओळ ११) 'प्रभाकर घैसास' आणि 'वाणिअण घैसास' अशी दोन नावे आली आहेत. प्राकृत ताम्रपटात 'गहिअसाहस' असा उल्लेख येतो. गृहीतसहस्र या संस्कृत शब्दाचेच ते प्राकृत रूप असावे आणि त्यापासून घैसास हे आधुनिक रूप उत्क्रांत झाले असावे असे दिसते.

### ताम्रपटाचा लेखक : श्रीराम पुण्यवल्लभ

प्रस्तुत ताम्रपटाचा लेखक श्रीराम पुण्यवल्लभ हा आहे. विजयादित्याच्या राजसभेत तो 'महासान्धिविग्रहिक' म्हणजे युद्ध आणि शांतता मंत्री होता. शक संवत ६१६ मध्ये विजयादित्याचे वडील विनयादित्य याने दिलेल्या हरिहर ताम्र-पटाचाही लेखक हाच श्रीराम पुण्यवल्लभ होय. त्याच्यानंतर अनुक्रमे निरवद्य पुण्यवल्लभ, अनिवारित पुण्यवल्लभ आणि धनंजय पुण्यवल्लभ हे ताम्रपटांचे लेखक म्हणून निर्देशिलेले आढळतात. त्यावरून श्रीराम, निरवद्य, अनिवारित व धनंजय पुण्यवल्लभ अशी ही परंपरा असल्याचे दिसून येते. पुण्यवल्लभ हे त्याच्या कुळाचे नाव असावे.

## वाचन

### पत्रा पहिला

१. स्वस्ति [।।*] जयत्याविष्कृतं विष्णोः [2]वाराहं क्षोभितार्ण्णवं [।*] दक्षिणोन्नतदंष्ट्राग्रविश्रान्तभू(भु)–
२. वनं वपुः [।।*] श्रीमतां सकलभुवनसंस्तूयमानमानव्यसगोत्राणां हारि–
३. तिपुत्राणां सप्तलोकमातृभिस्सप्तमातृभिरभिवर्द्धितानां कार्त्तिकेयपरि–
४. रक्षणप्राप्तकल्याणपरम्पराणां भगवन्नारायणप्रसादसमासादि–

---

१ 'एकविंशतिसाहस्रमृग्वेदं मां प्रचक्षते ।
सहस्रशाखं यत्साम ये वै वेदविदो जनाः ।।'
(महाभारत, शांतिपर्व, अ. ३४३–९८).

२ 'विष्णोर्व्वाराहं'—असे वाचावे.

५. तवराहलाञ्छनेक्षणक्षणवशीकृताशेषमहीभृतां चलिक्यानां
६. कुलमलंकरिष्णोरश्वमेधावभृथस्नानपवित्रीकृतगात्रस्य
७. श्रीपुलकेशिवल्लभमहाराजस्य सूनुः पराक्रमाक्रान्तवनवास्यादि–
८. परनृपतिमण्डलप्रणिबद्धविशू(शु)द्धकीर्त्ति[:*] श्रीकीर्त्तिवर्म्मपृथिवीवल्लभ–
९. महाराजस्तस्यात्मजस्समरसंसक्तसकलोत्तरापथेश्वरश्रीहर्ष–

## पत्रा दुसरा : पहिली बाजू

१०. वर्द्धनपराजयोपात्तपरमेश्वरशब्दस्य सत्याश्रयश्रीपृथिवी–
११. वल्लभमहाराजाधिराजपरमेश्वरस्य प्रियतनयस्य प्रज्ञातन–
१२. यस्य खड्गमात्रसहायस्य चित्रकण्ठाभिधानप्रवरतुरंगमेणैके–
१३. नैवोत्सारिताशेषविजिगीषोरवनिपतित्रितयान्तरितां स्वगु–
१४. रोः श्रियमात्मसात्कृत्य प्रभावकुलिशदलितपाण्ड्यचो–
१५. ळकेरळकळभ्र[1] प्रभृतिभूभृदभ्रविभ्रमस्यानन्यावनत–
१६. काञ्चीपतिमकुटचुंबितपादांबुजस्य विक्रमादित्यसत्याश्र–
१७. यश्रीपृथिवीवल्लभमहाराजाधिराजपरमेश्वरभट्टार–
१८. कस्य प्रियसूनोः पितुराज्ञया बा[ले]न्दुशेखर[स्य*]–

## पत्रा दुसरा : दुसरी बाजू

१९. तारकारातिरिव दैत्यबलमतिसमुद्धतं त्रैराज्यकाञ्चीपतिबलमवष्टभ्य क–
२०. रदीकृतकमेरपारसिकसिहळादि[2] द्वीपाधिपस्य सकलोत्तरापथनाथ–
२१. मथनोपार्ज्जितोर्ज्जितपालिध्वजादिसमस्तपारमैश्वर्य्यचिह्नस्य विनया–
२२. दित्यसत्याश्रयश्रीपृथिवीवल्लभमहाराजाधिराजपरमेश्वरभट्टारक–
२३. स्य प्रियात्मजश्शैशव एवाधिगताशेषास्त्रशास्त्रो दक्षिणाशाविजयि–
२४. नि पितामहे समुन्मूलितनिखिलकण्टकसंहतिरुत्तरापथविजिगीषोर्गुरोर–
२५. ग्रत एवाहवव्यापारमाचरन्नरातिगजघटापाटनविशीर्य्यमाणकृपाणधारस्समग्र–

१ नेरूर ताम्रपट (क्रमांक २) मध्ये 'कळभ्र' हा शब्द नाही.
२ रायगड ताम्रपट आणि नेरूर ताम्रपट (क्रमांक २, ४ व ५) **यांमध्ये** 'सिंहळादि'—असा शब्द आहे.

२६. विग्रहाग्रेसरस्सन्साहस[1] रसिक${}^{\times}$[2]पराङमुखीकृतशत्रुमण्डलि[3] (लो) गंगायमु-
न [।*] पालिध्वजपडढकम[4]–
२७. हाशब्दचिह्नकमाणिक्यमतंगजादीन्पितृसात्कुर्वन्परै${}^{\times}$[5]पलायमानैरासाद्य कथमपि वि–
२८. धिवशादपनीतोपि प्रतापादेवविषयप्रकोपमराजकमुत्सारयन्वत्सराज इवान-पेक्षि–
२९. तापरसहायकस्तदवग्रहान्निर्गत्य स्वभुजावष्टम्भप्रसाधिताशेषविश्वम्भरः

पत्रा तिसरा

३०. प्रभुरखण्डितशक्तित्रयत्वाच्छत्रुमदभञ्जन[त्वा]दुदारत्वान्निरवद्यत्वाद्यस्समस्त-भुवनाश्रयस्सन(क)लपारमैश्व–
३१. र्य्यव्यक्तिहेतुपालिध्वजाद्युज्वलप्राज्यराज्यो विजयादित्यसत्याश्रयश्रीपृथि-वीवल्लभमहाराजाधिराजपरमे–
३२. श्वर[भ]ट्टारकस्सर्वानेवमाज्ञापयति [।।*] विदितमस्तु वोस्माभिरेका (को)–न्नविंशत्युत्तरषट्छतेषु शकवर्षेष्वतीतेषु
३३. प्रवर्द्धमानविजयराज्यसंवत्सरे प्रथमे वर्त्तमाने रासेनपुरमधिवसति विजय-स्कन्धावारे वैशाखपौ–
३४. र्णमास्यां नरेन्द्रादित्यविज्ञापनया कौशिकगोत्रकोत्तिशर्म्मगृहीतसहस्त्रः भारद्वाजगोत्रप्रभाकरगृहीतसह–
३५. स्त्रः [व]भ्रुवगोत्रः प्रभाकरषडंगविच्च एतेभ्यस्त्रिभ्यः चल्लिकिदेसे(शे) मोरखंडिपश्चिमदिग्भागे बुल्लवादलिमुगुळिग्रा–
३६. मयोर्म्मध्ये जमळगामग्रामो दत्तः सभोगः [।।*] तदागामिभिरस्मद्वंश्यै-रन्यैश्च राजभिरा–

---

१ रायगड आणि नेरूर ताम्रपटात 'सत्साहस' असा पाठ आहे. प्रस्तुत ताम्रपटातील 'सन्साहस' हाच पाठ बरोबर आहे.

२ उपध्मानीय उच्चाराचे चिन्ह. 'रसिकः पराङ्मुखी°—असे वाचावे.

३ वरील सर्व ताम्रपटात '—मण्डलो' असा पाठ आहे आणि तोच बरोबर आहे.

४ उपरोक्त नेरूर ताम्रपटात 'पडडक्का' असे शब्द आहेत. नेरूर ताम्रपट क्र. २ मध्ये 'महाशब्द' हा शब्द आढळत नाही.

५ उपध्मानीय उच्चाराचे चिन्ह. 'परैः पलायमानैः'—असे वाचावे.

३७. युरैश्वर्य्यादीनां विलसितमचिरांशुचंचलमवगच्छद्भिराचन्द्रार्कधरार्ण्णवस्थिति–

३८. समकालं यशश्चिचीषुभि[:*] स्वदत्तिनिव्वि(र्व्वि)शेषं परिपालनीयमु–
(म्।।उ)क्तञ्च भगवता वेदाव्यासे–

३९. न व्यासेन बहुभिर्वसुधा भुक्ता राजभिस्सगरादिभिर्यस्य यस्य यदा भूमिस्त–

४०. स्य तस्य तदा फलं [।।*] स्वन्दातुं सुमहच्छक्यं दुःखमन्यस्य पालनं [।*]
दानं वा पा–

४१. लनं वेति [दा]नाच्छ्रेयोनुपालनं [।।*] स्वदत्तां परदत्तां वा यो हरेत वसु–

४२. न्धरां [।*] षष्टिवर्षसहस्राणि विष्ठायां जायते क्रिमिः [।।*] महा-
सान्धिविग्रहिकश्रीरामपुण्यवल्लभेन लिखित[म्]

# १

# धर्मापुरी शिलालेख

### उपलब्धी

प्रस्तुत शिलालेख सापडल्याची माहिती धर्मापुरी (जि. बीड, महाराष्ट्र) येथील त्यावेळचे सरपंच श्री. धोंडीरामजी यांनी पुरातत्त्व विभाग, महाराष्ट्र शासन, औरंगाबाद कार्यालयाकडे इ. स. १९६१ च्या डिसेंबर महिन्यात पाठवली. त्यानंतर विभागीय अधिकाऱ्यांनी धर्मापुरी येथे जाऊन प्रस्तुत शिलालेखाचे ठसे काढून आणले. पुराभिलेख व पुरातत्त्व विभागाचे संचालक कै. डॉ. मो. गं. दीक्षित यांनी संपादनासाठी इ. स. १९६८ मध्ये ते माझ्या स्वाधीन केले. ठसे अस्पष्ट असल्यामुळे माझ्या विनंतीवरून औरंगाबाद येथील पुरातत्त्व विभागाचे सहाय्यक संचालक श्री. वि. प्र. रोडे यांनी पुन्हा नवीन ठसे काढवून मला उपलब्ध करून दिले. त्यांच्या साह्याने मी या लेखाचे संपादन करीत आहे. वरील सर्व सद्गृहस्थांचा, तसेच श्री. वि. गो. खोबरेकर, संचालक, पुराभिलेख व पुरातत्त्व विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई, यांचा मी फार आभारी आहे. प्रस्तुत शिलालेखाच्या वाचनात व संपादनात गुरुवर्य म. म. डॉ. वा. वि. मिराशी यांचे बहुमोल मार्गदर्शन मला मिळाले या गोष्टीचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणे मी माझे कर्तव्य समजतो.

### वर्णन

प्रस्तुत कोरीव लेखाच्या शिळेची उंची ११५ सें. मी. असून रुंदी ६५ सें. मी. आहे.[१] शिळेची वरची बाजू अर्धगोलाकार आहे. या अर्धगोलात उजवीकडे चंद्र, मध्यभागी एक उभी मूर्ती आणि डावीकडे सूर्य यांच्या आकृती आहेत. अर्धगोला-नंतरचा शिळेचा उजव्या बाजूचा काही भाग तुटलेला आहे. त्यामुळे पहिल्या चौदा ओळींतील आरंभीची काही अक्षरे नष्ट झालेली आहेत. शिळेच्या खालच्या डाव्या

१. ही शिळा मी प्रत्यक्ष पाहिलेली नाही. श्री. न. शे. पोहनेरकर यांचा लेख (पाहा : प्रतिष्ठान मासिक, औरंगाबाद, सप्टेंबर १९७०, पृ. २३) व माझ्या-जवळील ठसे यांच्या आधारे हे वर्णन येथे दिले आहे.

बाजूवर गध्देगाळीचे शिल्प कोरलेले आहे. कोरीव लेखाच्या एकंदर ४५ ओळी असून[1] प्रत्येक ओळीत साधारणपणे ४४–४५ अक्षरे आहेत. प्रत्येक अक्षराची उंची स्थूलमानाने १·५ सें. मी. आहे. अक्षरे मुळात चांगली ठसठशीत कोरली असावी. पण शिळा अनेक ठिकाणी खराब झाल्यामुळे बरीच अक्षरे दुर्वाच्य झालेली आहेत. पुष्कळ दिवस मातीत व उन्हापावसात राहिल्यामुळेही अनेक अक्षरे अस्पष्ट झालेली आहेत. त्यामुळे संपूर्ण लेखाचे निर्दोष व असंदिग्ध वाचन जवळजवळ अशक्य झाले आहे. त्याला इलाज नाही.

## लिपी व अक्षरवटिका

लेख नागरी लिपीत कोरलेला असून अक्षरांचे वळण उत्तर–भारतीय स्वरूपाचे आहे. **इ** या स्वतंत्र स्वराचे चिन्ह वाचनात मला कोठेही आढळले नाही. **ए** चे चिन्ह त्रिकोणाकृती आहे. पाहा : '**ए**ते आदाया' ओ. ४३. **औ** या स्वतंत्र स्वराचे चिन्ह आजच्या **अ** सारखे आहे. पाहा : **औ**दास्य–(ओ. ८), **औ**दार्य–(ओ. २३). अनुनासिकासाठी अनेक ठिकाणी अनुस्वाराचा उपयोग केलेला आहे. उदा. **शं**खेन्दु (ओ. २), **पुं**गवानां–(ओ. ३), वसुं**ध**रायां–(ओ. १२), **कं**दर्प्परूपो–(ओ. २१). भु**जं**गे–(ओ. २४), **बं**धो–(ओ. २६), इत्यादी. एरवी परसवर्णाने अनुनासिक दाखविले आहे. उदा. शंखे**न्दु**–(ओ. २), विश्रा**न्त**दिग**न्त**कीर्ति–(ओ. ४), चतुर**ङ्ग**–(ओ. ४), शार**ङ्ग**–(ओ. ६), पत**ङ्गो**–(ओ. ११) इत्यादी. अनुस्वार व विसर्ग यांसाठी कोरलेली टिंबे चांगली ठसठशीत व पोकळ गोलाकृती आहेत.

व्यंजनांतर्गत स्वरांची चिन्हे नेहमीसारखी आहेत. दीर्घ **ऊ**काराच्या आकारात बराच फरक आढळतो. उदा. बभूव–(ओ. ५), भूमिपाले–(ओ. ७), आहूय–(ओ. २०) इत्यादीतील **ऊ**काराची आणि **रू**प–(ओ. २०), अपूर्व–(ओ. २३), **सू**रिणा–(ओ. ४५) इत्यादीतील **ऊ**काराची चिन्हे पाहा. एकार व ओकार यांसाठी कधी शिरोरेषेवर मात्रा दिली आहे, तर कधी पृष्ठमात्रेचा उपयोग केला आहे. उदा. जगद्देव–(ओ. ८), अन्तरि**क्षे**–(ओ. १५), नयते–(ओ. १५), का**ले**–(ओ. १६) इत्यादी शब्दांत शिरोरेषेवर मात्रा आहे ; तर जगद्देव–(ओ. १०), मुख्येषु–(ओ. ११), प्रव्रज**तो**–(ओ. १५), कोपका**ले**–(ओ. ९) इत्यादीत पृष्ठ-मात्रेचा उपयोग केलेला आहे. **ऐ**कार व **औ**कारांच्याही बाबतीत बहुधा शिरोरेषेवर दोन मात्रा–उदा. **दै**व–(ओ. ११), **नै**कोपि–(ओ. २०), **सौ**ख्यं–(ओ. २),

---

१ एकूण ओळी ३७ आहेत असे श्री. पोहनेरकर त्यांच्या वर उल्लेखिलेल्या लेखात लिहितात. अर्थात, ते बरोबर नाही.

**कौ**मारकाले–(ओ. १६) इत्यादी, तर क्वचित एक शिरोमात्रा व एक पृष्ठमात्रा योजलेली आढळते. उदा. का**मैं**रिव **कौ**तुकेन–(ओ. १९), **यौ**वनानां–(ओ. २०), **नैं**कोपि–(ओ. २०) इत्यादी.

व्यंजनांच्या बाबतीत पुढील काही बाबी आपले लक्ष वेधून घेतात. **च** आणि **व** या अक्षरांची वळणे सारखी आहेत. त्यांत फरक करणे कठीण जाते. उदा. **चा**लुक्य–(ओ. ३), संख्यो**चि**त–(ओ. १२), **चा**तुर्य–(ओ. २३) या शब्दांतील **च** आणि तत्रै**व** विश्रान्त–(ओ. ४), भुवनैक**वी**र–(ओ. ४) यांतील **व** पाहा. विशेषत: **व्वीं**–(ओ. २) आणि **च्च**–(ओ. ४) पाहा. **ब** अक्षराचे वळण आजच्या **प** सारखे आहे. उदा. **बि**भरां **ब**भूव–(ओ. ५), **बि**भ्रति–(ओ. ७), **ब**भूव–(ओ. २०). **ब** साठी **प** सारखे स्वतंत्र चिन्ह असूनही अनेक ठिकाणी **ब** साठी **व** हे अक्षर वापरले आहे. उदा. **संवा**(बा)धयामास, **व**(ब)लं–(ओ. १०), दाना**द्व**(द्ध)लि–(ओ. २०), **वा**(बा)हु**व**(ब)लि–(ओ. २८). यावरून **ब** चा उच्चार **व** सारखा होत असावा असे दिसते. **ब** प्रमाणे **भ** अक्षराचीही दोन निराळी वळणे आढळतात. उदा. श्रीमान**भू**दा–(ओ. ३), ब**भू**व–(ओ. ५), **भू**लोकमल्ल–(ओ. ५, ७) इत्यादीतील **भ** चे चिन्ह पाहा, आणि **भू**मिभारं–(ओ. ५), बि**भ**रां–(ओ. ५) यांतील **भ** चे चिन्ह पाहा. **ण** या अक्षराचीही अशीच भिन्न रूपे या लेखात आढळतात. सामान्यत: तीन उभ्या रेषा, त्यांतील पहिली लांब व टोकाला बाकदार, मधली आखूड व शेवटची किंचित लांब ओढून **ण** कोरला जातो. उदा. वार**णा**नां–(ओ. ६), रम्याप**णे**–(ओ. १५), पौरुषे**ण**–(ओ. १७), नाराय**णो**–(ओ. २२) यांतील **ण** पाहा. या उभ्या रेषांवर एक आडवी शिरोरेषा आढळते. पण, **म**णि–(ओ. २), क्षो**णी**पति–(ओ. ४), क्ष**ण**–(ओ. २६), **गण**कर–(ओ. ३४), सूरि**णा**–(ओ. ४५) इत्यादी शब्दांतील **ण** स्थूलमानाने **ल** सारखा आहे, आणि १३ व्या ओळीतील '**धर्मेण**' या शब्दातील **ण**चे वळण तर अगदी आजच्या **ण** सारखे दिसते. **थ**चीही दोन रूपे दिसून येतात. प्र**थि**त: पृ**थि**व्यां–(ओ. ३), अधिना**थ**:–(ओ. ११), म**थु**रा–(ओ. २२), यांतील **थ** पाहा. द्वित्त **व** सारखे त्याचे रूप आहे; तर य**था** शची–(ओ. २४), यातील **थ** चे वळण जवळजवळ आजच्या **थ** सारखे आहे. त्याच ओळीतील पहिल्यांदा आलेल्या य**था** शब्दातील **थ** शी तुलना करून पाहा, म्हणजे फरक लक्षात येईल.

**कालनिर्णय**

लेखाच्या पहिल्याच ओळीत प्रस्तुत शासन–लेखनाचा काळ 'शाके संवत १०५६ आनंदसंवत्सरान्तर्गत आषाढ वदि १५ सोमे' असा दिला

आहे.[१] दिवाण बहादूर स्वामी कन्नु पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे हा उल्लेख अगदी बरोबर आहे. गतशक १०५६ ला आनंद संवत्सर असून त्या वर्षातील आषाढ वद्य १५ म्हणजे अमावस्येला सोमवार येतो. त्या दिवशी सूर्यग्रहण होते असे पिल्ले यांच्या जंत्रीत नमूद केले आहे. या सूर्यग्रहणाचा निर्देश शिलालेखात नाही. अशा प्रकारची दाने पर्वकाळी दिली जातात, हे लक्षात घेता प्रस्तुत शासनलेख उपरोक्त सूर्यग्रहण पर्वाच्या दिवशी दिला असावा असे म्हणण्यास हरकत नाही. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे त्या दिवशी इंग्रजी तारीख इ. स. ११३४ जुलै २३ असून दिवस सोमवार होता.

### भाषा

लेख संस्कृत भाषेत लिहिलेला आहे. ओळ २ ते २७ आणि ४४ ते ४५ या ओळींतील मजकूर पद्यात असून बाकीचा गद्यात आहे. पहिले २५ श्लोक इंद्रवज्रा व उपजाति वृत्तांत असून शेवटचे दोन श्लोक अनुष्टुभ वृत्तात आहेत. लेखाची शिळा अनेक ठिकाणी फुटलेली असल्यामुळे लेखाचे वाचन पूर्णपणे होऊ शकले नाही. त्यामुळे लेखातील भाषेविषयी, विशेषतः तिच्या शुद्धाशुद्धतेविषयी निश्चित विधाने करणे इष्ट होणार नाही. तथापि, जो मजकूर नीट लागला आहे त्यावरून काही गोष्टीकडे अभ्यासकांचे लक्ष वेधण्याचा प्रयत्न करतो.

संस्कृत मजकुराच्या लेखनात आलेली रेफेनंतरची व्यंजने बहुधा द्वित्त केलेली आढळतात. उदा. तनोर्म्मुरारे–(ओ. २), दिगन्तकीर्त्ति–(ओ. ४), दुर्ग्गाधिपते–(ओ. १०), पतङ्गोर्च्चिमुखं–(ओ. ११), धर्म्मेण–(ओ. १३), धर्म्मपुरी–(ओ. १४, १५), पूर्व्व–(ओ. २०), इत्यादी. याला अपवादही अनेक आहेत. उदा. संवत्सरांतर्गत–(ओ. १), मार्ग–(ओ. ९), जनावकीर्णा–(ओ. १६), इत्यादी. मल्ल्हराज–(ओ. १७) या शब्दात ल द्वित्त करून मग त्याला ह् जोडला आहे, तर तोच शब्द ओ. १८ व १९ मधे 'मल्हराज' असा लिहिला आहे. क्वचित श साठी स योजलेला आहे. उदा. देसिजनैः–(ओ. २७), तथापि ओ. ४० व ४३ मधे मात्र 'देशि' असा शब्द कोरला आहे. 'देसिजनैश्च सार्द्धैः ॥'–ओ. २७, यातील 'सार्द्धैः' रूप चुकीचे असून ते 'सार्द्धम्' असे पाहिजे.

---

१ शकाचा आकडा श्री. पोहनेरकर १२५६ असा वाचतात. 'वदि' हा शब्द त्यांनी 'सुदि' असा वाचला आहे. त्यांचे या दोन्ही ठिकाणचे वाचन बरोबर नाही. (प्रतिष्ठान मासिक, औरंगाबाद, सप्टेंबर १९७०, पृ. २३ पाहा).

**विषय व आशय**

चालुक्य नृपती तृतीय सोमेश्वर याच्या कारकीर्दीत, त्याच्या राज्यातील धर्मपुरी या नगरीत त्याने नेमलेल्या श्रीपती नावाच्या अधिकाऱ्याने मुरारीचा (श्रीकृष्णाचा) मठ बांधला. त्या मठाला नगर आणि देशिजनांनी दिलेल्या वृत्ती व दाने नमूद करणे हा या शिलाशासनाचा प्रमुख विषय होय.

पहिल्या ओळीतील शककालनिर्देशानंतर प्रार्थनापर श्लोकाने प्रस्तुत शिलाशासनाचा आरंभ झाला आहे. त्यानंतरच्या श्लोकात सुप्रसिद्ध चालुक्य वंश आणि त्यात होऊन गेलेल्या **आहवमल्ल** राजाचा निर्देश आहे. (श्लोक २). प्राचीन काळी दक्षिण भारतात राज्य करणाऱ्या राजवंशांमध्ये चालुक्य वंश विशेष प्रसिद्ध होता. हाच वंश पश्चिम चालुक्य म्हणूनही ओळखला जातो. शककालाच्या ६ व ७ व्या शतकांत दक्षिण भारतात यांचे विशेष प्रभुत्व होते. वातापी म्हणजे आजचे बादामी शहर ही त्यांची राजधानी होती. त्यामुळे त्यांना बदामीचे चालुक्य राजे म्हणूनही संबोधतात. प्रथम पुलकेशी, कीर्तिवर्मा, मंगलेश, सत्याश्रय (द्वितीय पुलकेशी), प्रथम विक्रमादित्य, विनयादित्य, विजयादित्य, द्वितीय विक्रमादित्य, द्वितीय कीर्तिवर्मा, हे बादामी येथील चालुक्य वंशातील प्रसिद्ध नृपती होते. ७ व्या शतकानंतर राष्ट्रकूट राजे उदयाला आले. त्यामुळे चालुक्यांचा प्रभाव फारसा राहिला नाही. तथापि, दहाव्या शतकात त्यांनी पुन्हा डोके वर काढले. इतकेच नाही तर पूर्वीप्रमाणेच दक्षिणेत आपले प्रभुत्व स्थापन केले. हे चालुक्य राजे कल्याणी (ता. हुमणाबाद, जिल्हा बिदर, कर्नाटक राज्य) येथून राज्य करीत होते, म्हणून त्यांना कल्याणीचे पश्चिम चालुक्य असे म्हणतात. प्रथम तैल, द्वितीय तैल, सत्याश्रय, पाचवा विक्रमादित्य, अय्यण, द्वितीय जयसिंह, प्रथम सोमेश्वर, द्वितीय सोमेश्वर, सहावा विक्रमादित्य, तृतीय सोमेश्वर, जगदेकमल्ल, तिसरा तैल आणि चतुर्थ सोमेश्वर हे कल्याणीच्या चालुक्य वंशातील प्रमुख नृपती होत. त्यांचे स्थूलमानाने शककालाच्या दहाव्या व अकराव्या शतकांत दक्षिण भारतात प्रभुत्व होते.

आहवमल्ल हा या कल्याणीच्या पश्चिम चालुक्यवंशापैकी होय. शिलालेखात हे नाव स्पष्टपणे आलेले नाही. तथापि, श्लो. ३ मधे परमर्दिदेवाचा उल्लेख करताना आरंभी 'तस्यापि पुत्रः'–असे शब्द आलेले आहेत. त्यावरून दुसऱ्या श्लोकातील वणन परमर्दिदेवाच्या पित्याचे असले पाहिजे हे स्पष्ट होते. तिसऱ्या ओळीच्या शेवटी **आ** (श्रीमान्+अभूत्+आ–) हे अक्षर आले आहे. त्यावरूनही संकल्पित नाव **आ** या अक्षरापासून सुरू होते हे दिसून येईल. यामुळे मी हे हरवलेले नाव 'आहवमल्ल' असे सूचित केले आहे. ते मान्य होण्यास हरकत नसावी. हा आहवमल्ल म्हणजे कल्याणीच्या पश्चिम चालुक्य वंशातील **प्रथम सोमेश्वर** नृपती

होय. वस्तुतः आहवमल्ल हे त्याचे बिरुद होते; पण शिलालेख-ताम्रपटादिकांत अनेकदा या बिरुदांनीच त्या त्या नृपतींचा उल्लेख करण्यात येत असे हे लक्षात ठेवले पाहिजे. इ. स. १०४३ ते १०६८ हा त्याचा राज्यकाल मानण्यात येतो.

आहवमल्ल ऊर्फ प्रथम सोमेश्वर याचा पुत्र **परमर्ददेव** याचे वर्णन पुढील श्लोकात आलेले आहे. (श्लो. ३). वस्तुतः सोमेश्वराला तीन पुत्र होते. सोमेश्वर, विक्रमादित्य, आणि जयसिंह. प्रथम सोमेश्वराच्या मृत्यूनंतर त्याचा वडील पुत्र द्वितीय सोमेश्वर गादीवर बसला (इ. स. १०६८ ते १०७६). परंतु पुढे आठ वर्षांनी त्याचा धाकटा भाऊ विक्रमादित्य याने त्याला पदच्युत करून राज्य हिसकावून घेतले व तो गादीवर बसला. हा **सहावा विक्रमादित्य** या नावाने प्रसिद्ध आहे. त्याचेच 'पर्माडिदेव' किंवा 'परमर्ददेव' हे दुसरे नाव[1] होते. त्याचा उल्लेख या तिसऱ्या श्लोकात आलेला आहे. आहवमल्लानंतर द्वितीय सोमेश्वराचा उल्लेख न करता परमर्ददेवाचा उल्लेख करण्याचे कारण एवढेच दिसते की, येथे चालुक्य राजांची वंशावळ देण्याचा हेतू नसून प्रस्तुत शिलालेख ज्याच्या काळात कोरला गेला त्या भूलोकमल्लाची पितृपरंपरा नमूद करणे हा होय. या परमर्ददेवाने, अर्थात सहाव्या विक्रमादित्याने शके ९९८ पासून शके १०४८ (इ. स. १०७६ ते ११२६) पर्यंत राज्य केले. विक्रमांकदेवचरित्र लिहिणारा बिल्हण कवी याचाच आश्रित होता.

या परमर्ददेवाचा म्हणजे सहाव्या विक्रमादित्याचा पुत्र **भूलोकमल्ल** याचा उल्लेख त्यापुढील श्लोकात आला आहे. (श्लो. ४). भूलोकमल्ल म्हणजे विक्रमादित्या-नंतर गादीवर बसलेला त्याचा पुत्र **तृतीय सोमेश्वर** होय. (इ. स. ११२६ ते ११३८). भूलोकमल्ल हे त्याचे बिरुद असून पूर्वी सांगितल्याप्रमाणे या बिरुदाचाच उपयोग शिलालेखादिकांतून विशेषनामाप्रमाणे करण्यात आला आहे. श्लोक ४ ते ११ पर्यंत या भूलोकमल्लाचे व त्याच्या कारकीर्दीतील एका महत्त्वाच्या प्रसंगाचे वर्णन आलेले आहे. भूलोकमल्लाला 'चतुरंगमल्ल' असे विशेषण लावलेले आहे. 'चतुरंग' म्हणजे हत्ती, अश्व, रथ आणि पायदळ ही सैन्याची चार अंगे. या चारही अंगांच्या युद्धात भूलोकमल्ल प्रवीण होता. त्याचा वर्ण मेघाप्रमाणे कृष्ण होता. आपल्या हातात धनुष्य घेऊन जेव्हा तो रणांगणात उभा राही तेव्हा शारंग धनुष्य धारण करणाऱ्या श्रीकृष्णाप्रमाणे तो शोभून दिसत असे. (श्लो. ४). तो युद्धावर जायला निघाला म्हणजे हत्ती, अश्व (रथ आणि पायदळ) यांनी संपन्न अशा

---

१ पाहा. समुद्धतो येन महाभुजेन द्विषां विमर्दात्परमर्दिदेवः।
अस्यापि चालुक्यकुलप्रदीपः कल्याणराज्येपि स एव येन ।। (चतुर्वर्गचिंतामणी)

सैन्याच्या धुळीने सर्व आकाश आणि सूर्याचे तेज झाकून जात असे. (श्लो. ५). हा भूलोकमल्ल नृपती राज्य करीत असताना राज्यासाठी त्याचा, **जगद्देव** ज्यांचा पुढारी होता अशा (सामंतांशी किंवा राजांशी) विरोध निर्माण झाला. याचा अर्थ असा की, भूलोकमल्लाचे राज्य हिरावून घेण्यासाठी जगद्देव आणि त्याचे अनुयायी यांनी भूलोकमल्लाबरोबर संघर्ष सुरू केला. (श्लो. ६). त्या वेळी सर्वसामान्य प्रजा अत्यंत उदासीन होती, (आणि प्रमुख सामन्त राजे बंड करून उठले होते), त्यामुळे क्रुद्ध होऊन भूलोकमल्लाने, आपल्यावर एकजुटीने चालून येणाऱ्या जगद्देवादिक शत्रूंचा मार्ग अडवला आणि त्यांना पळवून लावले. (श्लो. ७). त्यावेळी राजाने, अर्थात भूलोकमल्लाने रणांगणात आपल्या शत्रूंना (त्यांचा पराभव करून) पिटाळीत पिटाळीत सह्यगिरीमध्ये नेले व तेथील दुर्गात कोंडल्यानंतर त्याने त्यांना कडक बंधनात ठेवले. (श्लो. ८). तेव्हा जगद्देवाला साह्य करून, त्या मालवराजाला सोडवण्यासाठी (कोणी एक राजा) आपल्याबरोबर सैन्य घेऊन, पतंग ज्याप्रमाणे अग्नीमध्ये प्रवेश करण्यासाठी (धावून येतो व स्वतःच्या नाश करून घेतो) त्याप्रमाणे धावून आला (आणि त्याने आपला नाश करून घेतला) (श्लो. ९). दुर्दैवाने तो ठार मारला जाऊन दिवंगत झाल्यामुळे दुर्गातील शत्रू हताश होऊन शेवटी भूलोकमल्लाला शरण गेले (श्लो. १०). ते सर्व राजे शरण आल्यानंतर भूलोकमल्लाने दुर्गाबाहेर पडून इतर मुख्य मुख्य नृपतींचेही निर्दलन केले. अशा रीतीने आपले राज्य निष्कंटक झाल्यावर आपल्या वडिलोपार्जित राज्यावर तो धर्माने शासन करू लागला. (श्लो. ११).

## ऐतिहासिक महत्त्व

इतिहासाच्या दृष्टीने ४ ते ११ श्लोकांतील हा भाग विशेष महत्त्वाचा ठरेल असे वाटते. कारण, चालुक्य नृपती तृतीय सोमेश्वर ऊर्फ भूलोकमल्ल याच्या कारकीर्दीतील एक महत्त्वाचा प्रसंग यात वर्णन केलेला आहे. भूलोकमल्ल राज्य करू लागल्यानंतर जगद्देवाने इतर काही राजांच्या साह्याने त्याच्यावर स्वारी केली. तेव्हा सोमेश्वराने स्वतः त्यांच्याशी युद्ध करून त्यांना सह्यगिरीत पिटाळून लावले, इतकेच नाही तर तेथील किल्ल्यात कैद करून ठेवले. मालवराजाला अर्थात जगद्देवाला सोडवण्यासाठी दुसरा कोणी नृपती सैन्य घेऊन आल्यावर युद्धात तो मारला गेला. त्यामुळे सोमेश्वराच्या कैदेतील जगद्देवादि बंडखोर हताश होऊन शेवटी सोमेश्वराला शरण गेले (श्लो. ६–१०). या प्रसंगाचा उल्लेख अन्यत्र अजून कोठेही आढळत नाही. त्यामुळे तो सर्वस्वी नवीन आहे असे समजण्यास

हरकत नाही. यातील जगद्देवाला 'मालवराज' म्हटले असल्यामुळे तो मालवाधिपती उदयादित्याचा पुत्र होय यात शंका नाही.

## चालुक्य व परमार यांचे संबंध

मालवराज जगद्देव व चालुक्य नृपती यांचे संबंध लक्षात येण्यासाठी थोडा पूर्वेतिहास देणे अप्रस्तुत होणार नाही. माळवा प्रदेशावर धार येथून भोजराजा राज्य करीत होता (इ. स. १००० ते १०४७). आपल्या कारकीर्दीच्या आरंभी त्याने कलचुरी गांगेयदेव आणि तंजावर येथील राजेंद्र चोल यांच्या साह्याने कल्याणीचा चालुक्य नृपती जयसिंह (इ. स. १०१५ ते १०४३) याच्या राज्यावर स्वारी केली. आरंभी त्यांना काही विजय मिळाले असले तरी शेवटी जयसिंहाने त्यांचा पराभव केला. चालुक्य नृपती जयसिंहानंतर गादीवर बसलेला त्याचा पुत्र प्रथम सोमेश्वर (इ. स. १०४३ ते १०६८) याने भोजाच्या उपरोक्त कारस्थानाबद्दल त्याला धडा शिकविण्यासाठी माळव्यावर स्वारी करून त्याची धारा, उज्जयिनी व मांडू ही नगरे लुटली. भोजानंतर त्याचा पुत्र जयसिंह माळव्याच्या गादीवर बसला. पण कलचुरी नृपती गांगेयपुत्र कर्ण आणि गुजराथमधील चौलुक्य नृपती भीम यांनी एकत्र येऊन माळव्यावर स्वारी केली व जयसिंहाला पदच्युत केले. तेव्हा जयसिंह प्रथम सोमेश्वराकडे आला व त्याने त्याच्याजवळ मदतीची याचना केली. कलचुरी आणि चौलुक्य प्रबळ होऊ नयेत म्हणून सोमेश्वरानेही पूर्वीचे वैर विसरून आपला धाकटा पुत्र विक्रमादित्य याला जयसिंहाच्या मदतीला पाठविले. विक्रमादित्याने कर्ण आणि भीम यांचा पराभव करून जयसिंहाला पुन्हा माळव्याच्या गादीवर बसवले. तेव्हापासून जयसिंह विक्रमादित्य चालुक्याचा मित्र व चाहता बनला. प्रथम सोमेश्वरानंतर त्याचा वडील पुत्र द्वितीय सोमेश्वर (इ. स. १०६८ ते १०७६) गादीवर बसला. आपला धाकटा भाऊ विक्रमादित्य (सहावा) हा आपणाला पदच्युत करून गादी बळकविण्यासाठी कारस्थाने करीत आहे व त्याला मालवनृपती जयसिंहाचे साह्य आहे या शंकेमुळे द्वितीय सोमेश्वराने कलचुरी नृपती कर्ण व गांग नृपती उदयादित्य यांच्याशी संधान बांधले व या तिघांनी मिळून माळव्यावर स्वारी केली. या युद्धात जयसिंह मारला गेला. या कठीण प्रसंगी दिवंगत भोजराजाचा भाऊ उदयादित्य याने पुढे येऊन सर्व शत्रूंचा मोड केला व मालव राज्याचे संरक्षण केले.[१] त्यानंतर मालव राज्याच्या गादीवर तो बसला (इ. स. १०८० ते १०८६). या उदयादित्याचे व चालुक्य विक्रमादित्याचे संबंध सलोख्याचे होते.

---

१ संशोधन मुक्तावलि (डॉ. मिराशी) सर ३, पृ. १७६.

**जगद्देव व चालुक्य विक्रमादित्य**

या उदयादित्याला लक्ष्मवर्मन व नरवर्मन या नावाची दोन मुले होती. पण त्यांच्यावर त्याचे प्रेम नसावे. म्हणून नवीन पुत्रासाठी त्याने शंकराची आराधना केली. त्यामुळे त्याला आणखी एक पुत्र झाला. त्याचे नाव जगद्देव.[१] आपल्यानंतर माळव्याची गादी जगद्देवाला मिळावी अशी योजना करून उदयादित्याने जगद्देवाला मालव राज्याचाच एक भाग जो जेजकभुक्ती (आजचे बुंदेलखंड) येथे अधिकारी नेमले. सहाव्या विक्रमादित्याच्या हुणसी हदगळी येथील कानडी शिलालेखात त्याला 'जज्जुगि जगदेव' म्हटले आहे.[२] जज्जुगि म्हणजे जेजक भुक्तीवरील अधिकारी. उदयादित्याच्या मृत्यूनंतर, वडिलांच्या योजनेनुसार 'राज्यलक्ष्मी'चा स्वीकार करणे शक्य असूनही वडील बंधूंच्या आधी (राज्यलक्ष्मीशी) विवाह करण्याच्या 'परिवित्ति' नामक पातकाच्या भीतीमुळे जगद्देवाने तिचा स्वीकार केला नाही. त्यामुळे उदयादित्याच्या मृत्यूनंतर त्याच्या वडिल पुत्रांपैकी प्रथम लक्ष्मवर्मन व नंतर नरवर्मन यांनी राज्य केले. यांनी पूर्वी चालुक्यांच्या ताब्यात असलेला चांदा जिल्ह्याचा प्रदेश जिंकून आपल्या राज्याला जोडला होता.[३] त्यामुळे चालुक्याशी त्यांचे संबंध बिघडले होते. सहाव्या विक्रमादित्याने इ. स. १०९७ च्या शेवटीशेवटी माळव्यावर स्वारी करून धारा नगरी उध्वस्त केली. यानंतर विक्रमादित्य व जगद्देव यांची भेट झाली.[४] लौकरच जगद्देवाने मालव राज्याचा त्याग केला व तो दक्षिणेत आला. कुन्तलाधिपति सहावा विक्रमादित्य याने त्याचे स्वागत केले, इतकेच नाही तर त्याला आपला ज्येष्ठ पुत्र मानून आपल्या राज्यातील एका विषयाचे (=विभागाचे) स्वामी केले.[५] मेरुत्तुंगाचार्यांनीही प्रबंधचिंतामणि ग्रंथात म्हटले आहे की, जगद्देवाच्या शौर्यवीर्यादि गुणांनी वश होऊन परमर्दिदेवाने म्हणजे सहाव्या विक्रमादित्याने त्याला आपल्याकडे बोलावून घेतले आणि त्याचा गौरव करून एका देशाचा अधिपती म्हणून नेमले.[५] त्यानंतर जगद्देवाने विक्रमादित्याच्या बाजूने अनेक लढायांत भाग घेतला. होयसळ नृपतीच्या

---

१ संशोधन मुक्तावलि. सर तिसरा, पृ. १७९, १८२.

२ Jainism in South India—P. B. Desai, p. 245.

३ एपि. इंडिका, वर्ष २, पृ. १८०; तत्रैव. वर्ष २४, पृ. ११७.

४ Jainism in south India, p. 245.

५ संशोधन मुक्तावलि. सर तिसरा (डॉ. मिराशी) पृ. १८१–१८३.

शिलालेखात[१] विक्रमादित्याच्या सेनापतींमध्ये मालवेश्वर जगद्देवाचे नाव आढळते. वीर बल्लाळाचा त्याच्याशी जो युद्धप्रसंग झाला त्याचे मोठे रोमहर्षक वर्णन त्यात आलेले आहे. तेथे जगद्देवाला 'मालवेश्वर' म्हटले असल्यामुळे तो मालवाधिपती उदयादित्याचा पुत्र होय. आपल्या या धर्मापुरी शिलालेखातील जगद्देवालाही मालवराज म्हणून संबोधले आहे. (श्लोक ९) तेव्हा तो उदयादित्याचा पुत्र म्हणून प्रसिद्ध असलेला जगद्देव होय यात शंका नाही.

या जगद्देवाचे तीन शिलालेख उपलब्ध आहेत. एक शके १०३४ (इ. स. १११२) मधील डोंगरगाव[२] (जि. यवतमाळ) येथील, दुसरा अदिलाबाद जिल्ह्यातील जयनद[३] येथील, व तिसरा राणी सावरगाव येथील.[४] राज्यत्याग करून दक्षिणेत आल्यावर कुन्तलाधिपतीने (विक्रमादित्याने) जगद्देवाचे स्वागत केल्याचा उल्लेख डोंगरगाव शिलालेखात आहे. जयनद येथील त्याच्या शिलालेखात या गोष्टीचा उल्लेख येत नाही. त्या लेखात कालनिर्देशही नाही. तथापि, तो डोंगरगाव शिलालेखाच्या नंतरचा असावा असे वाटते. कारण, डोंगरगाव शिलालेखात जगद्देवाच्या कोणत्याही विजयाचे वर्णन नाही. जयनद शिलालेखात जगद्देवाने आंध्राधीश, चक्रदुर्ग नृपती, दोरसमुद्र, गुर्जरवीर जयसिंह आणि त्रिपुरी येथील कलचुरी नृपती कर्ण यांच्याशी युद्धे करून त्यांच्यावर विजय मिळविल्याचे वर्णन आहे. त्या काळी आंध्र प्रदेशावर कुलोत्तुंग चोल राज्य करीत होता. चक्रदुर्ग म्हणजे बस्तर प्रदेशातील चक्रकोट शहर होय. तेथे त्यावेळी नागवंशातील राजे राज्य करीत होते. दोरसमुद्र (म्हैसूर प्रांतातील आजचे हलेबीड नावाचे शहर) ही होयसळांची राजधानी होती. त्यावेळी वीर बल्लाळ तेथे राज्य करीत होता. त्याच्याशी झालेल्या युद्धात जगद्देवाने त्याच्या सैन्याचा मोठ्या प्रमाणात विध्वंस केला. गुर्जरवीर जयसिंह याच्याशीही त्याने लढाई केली. सहाव्या विक्रमादित्याशी जयसिंहाची लढाई होऊन तीत त्याने विक्रमादित्याचा पराभव केल्याचा निर्देश आढळतो. बहुधा याच युद्धात विक्रमादित्याच्या बाजूने जगद्देवाने जयसिंहाशी सामना देऊन त्याच्या सैन्याचा विध्वंस केला. या दोघांच्याही वर्णनात त्यांनी विजय मिळवल्याचे वर्णन आहे, ते अतिशयोक्त असावे. जगद्देवाने ज्याचा पराभव केला तो कर्ण म्हणजे त्रिपुरी

---

१ एपि. कर्नाटका. भाग २, पृ. ३४९.

२ संशोधन मुक्तावलि (डॉ. मिराशी) सर तिसरा, पृ. १७१–१८३.

३ एपि. इंडिका, वर्ष २२, पृ. ५४–६३.

४ प्रस्तुत ग्रंथातील पृ. १४४–१५० पाहा.

येथील कलचुरी नृपती (गांगेयदेवाचा पुत्र) कर्ण होय.[1] परमार नृपती जयसिंह धारच्या गादीवर असताना ज्या तीन शत्रूंनी माळव्यावर चढाई करून जयसिंहाला मारले त्यांत कर्ण होता. या तिघांचाही उदयादित्याने पराभव केल्याचा निर्देश पूर्वी केला आहे. बहुधा त्याचवेळी आपल्या वडिलांच्याबरोबर जगद्देवाने या कर्णाशी लढाई करून विजय मिळवला असावा.

चालुक्य नृपती सहाव्या विक्रमादित्याबरोबर जगद्देवाचे संबंध सलोख्याचे व प्रेमाचे होते. त्याच्याच बाजूने जगद्देवाने अनेक लढाया केल्या. असे असताना विक्रमादित्याच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र तृतीय सोमेश्वर याच्याशी जगद्देवाने युद्ध का करावे हे गूढ आहे. इतके मात्र खरे की, उदयादित्यानंतर मालव नृपती दक्षिणेत आपले पाय पसरू लागले होते व त्यात त्यांना यशही मिळाले होते. शके १००९ मध्ये कोरलेला विक्रमादित्य चालुक्याचा सीताबर्डी शिलालेख[2] उपलब्ध आहे. हा शिलालेख मूळचा भांदक (जिल्हा चांदा) येथील विंध्यासन टेकडीजवळचा होय, असे औरंगाबादकरांच्या रिपोर्टात म्हटले आहे. यावरून नागपूर प्रदेश त्यावेळी चालुक्यांच्या ताब्यात होता असे दिसते. विक्रमसंवत ११६१ (शके १०२६) चा दुसरा एक नागपूर म्युझियम शिलालेख[3] आहे. तोही बहुधा भांदक येथून आणून नागपूर म्युझियममध्ये ठेवला असावा.[4] कारण त्यात माळव्याचा परमार नृपती नरवर्मन याने, आपला वडील भाऊ लक्ष्मणवर्मन याने पूर्वी दिलेल्या गावाच्या ऐवजी मोखलपाटक (आजचे नाव मोखाळा, जिल्हा चांदा) या नावाचे गाव दान दिले आहे. अर्थात, यावेळी, किंबहुना त्यापूर्वी काही वर्षे अगोदर, हा प्रदेश चालुक्यांपासून माळव्याच्या परमारांनी जिंकून घेतला होता असे दिसते. याच प्रदेशाला लागून पूर्वेकडे यवतमाळ जिल्ह्यात डोंगरगाव आहे, त्याच्या पलीकडे ६० मैलांवर अदिलाबाद जिल्ह्यात जयनद गाव आहे, आणि त्याला लागून परभणी जिल्ह्यात राणी सावरगाव आहे. या तिन्ही ठिकाणी जगद्देवाचे शिलालेख सापडले असल्याचा निर्देश केलेलाच आहे. तेव्हा हाही भाग परमारांच्या ताब्यात होता. कदाचित असेही असेल की, डोंगरगाव-जयनद-राणी सावरगावचा प्रदेश पूर्वीपासूनच परमारांच्या ताब्यात असावा. राज्यत्याग करून जगद्देव दक्षिणेत आल्यावर (आपल्या भावाच्या संमतीने) त्या प्रदेशाचे स्वामित्व त्याला देण्यात आले असावे व विक्रमादित्याने

१ एपि. इंडिका, वर्ष २६, पृ. १७९.
२ एपि. इंडिका वर्ष ३, पृ. ३०४.
३ एपि. इंडिका, वर्ष २, पृ. १८०–१९४.
४ एपि. इंडिका, वर्ष २४, पृ. ११७, टिपणी ५.

त्याला मान्यता दिली असावी. त्यानंतर जगद्देवाने विक्रमादित्याच्या बाजूने ज्या लढाया केल्या त्या, त्याचा मांडलीक किंवा सेवक म्हणून नव्हे, तर एका स्वतंत्र प्रदेशाचा स्वामी या नात्याने, विक्रमादित्याचा सहाय्यक मित्र म्हणून. पुढे विक्रमादित्याच्या मृत्यूनंतर तृतीय सोमेश्वर गादीवर आल्यानंतर हा प्रदेश आपल्या ताब्यात घेण्याचा सोमेश्वराने प्रयत्न केला असणे शक्य आहे. त्यातून जगद्देवाचे सोमेश्वराशी वैर उद्भवून हा युद्धप्रसंग घडला असावा असे वाटते.

### युद्धाची कारणमीमांसा

कदाचित याच निमित्ताने चालुक्याविषयीचा वैरभाव उसळून येऊन त्याचा वचपा काढण्याची कल्पना जगद्देवाच्या मनात आली असण्याची शक्यता नाकारता येत नाही. माळव्याचे परमार आणि कल्याणीचे चालुक्य यांच्यात सतत संघर्ष चालू असे. परमार नृपती मुंज याने चालुक्य नृपती द्वितीय तैलप याच्या राज्यावर स्वाऱ्या करून त्याचा सहा वेळा पराभव केला, पण शेवटच्या युद्धात मात्र तैलपाने मुंजाला पकडून कैदेत टाकले व त्याला अत्यंत अपमानास्पद रीतीने वागवून शेवटी त्याचा क्रूरपणाने शिरच्छेद केला होता.[१] मुंजाचा धाकटा भाऊ सिंधुराज याने तैलपाविरुद्ध चढाई करून त्याचा पराभव केला व आपल्या भावाच्या अपमानाचा वचपा काढला. चालुक्य नृपती प्रथम सोमेश्वर व त्याचा वडील पुत्र द्वितीय सोमेश्वर यांच्या, परमार नृपती भोज व जयसिंह यांच्याशी झालेल्या संघर्षाचा इतिहास यापूर्वी वर्णन केलेलाच आहे. द्वितीय सोमेश्वरानंतर गादीवर बसलेल्या (सहाव्या) विक्रमादित्याने पूर्वी वडिलांच्या आज्ञेवरून जयसिंह परमारला[२] साह्य केलेले असले तरी त्याने माळव्यावर एक वेळ नव्हे तर तीन वेळ स्वाऱ्या करून त्यांची उज्जैन, धारा व मांडू ही शहरे लुटली होती.[३] हे सर्व जगद्देव विसरला असेल असे वाटत नाही. पण असे असेल तर जगद्देवाने विक्रमादित्याबरोबर दक्षिणेत येऊन, त्याच्याशी सलोख्याने वागून त्याच्या बाजूने अनेक लढायात भाग का घ्यावा, असा प्रश्न उपस्थित होणे शक्य आहे. कदाचित तो जेजुक भुक्तीवर राज्य करीत असताना त्याचे, आपले बंधू लक्ष्मवर्मन व नरवर्मन यांच्याशी संबंध बिघडले असावे. पण अशी कल्पना करण्यास पुरावा नाही. त्यापेक्षा, दक्षिणेतील परमारांचा मुलुख केवळ अधिकाऱ्यांच्या हाती न सोपवता तेथे प्रत्यक्ष राजकुलातील पुरुषांनी जाऊन तो सांभाळावा

१ दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (यज्ञदाणी), पृ. ३२३.
२ हिस्टरी ऑफ दि परमार डायनेस्टी (डी. सी. गँगुली), पृ. १२४.
३ जैनिझम् इन साऊथ इंडिया (पी. बी. देसाई), पृ. २४४.

हा अंतस्थ हेतू मनात बाळगून जगद्देव विक्रमादित्याबरोबर दक्षिणेत आला असावा अशी कल्पना करणे अधिक तर्कसंगत होईल. विक्रमादित्य जिवंत असेपर्यंत (इ. स. ११२६) जगद्देवाने हे संबंध सलोख्याचे ठेवले. त्यानंतर ते बिघडत जाऊन इ. स. ११३४ मध्ये त्याचे युद्धात पर्यवसान झाले होते असे प्रस्तुत शिलालेखावरून दिसते. या युद्धात जगद्देवाशी लढण्यासाठी तृतीय सोमेश्वर स्वतः आला असावा असे श्लो. ७-११ वरून स्पष्ट दिसते. बहुधा त्याचमुळे प्रशस्ति–लेखकाने 'शारंगधन्वेव रराज संख्ये' (श्लो. ५) असे त्याचे व नंतर त्याच्या चतुरंग सैन्याचे वर्णन केलेले असावे. यानंतर इ. स. ११३५ च्या सुमारास वेळनाण्टी चोड गोंक द्वितीय याच्याशी झालेल्या युद्धप्रसंगीही सोमेश्वर स्वतः रणांगणात उतरला होता. पण त्यावेळी त्याला फार मोठा पराभव स्वीकारावा लागला होता.[१]

## 'धराधिनाथ' कोण ?

शिलालेखातील ११ व्या ओळीचा आरंभीचा भाग नष्ट झाला आहे. तेथील '⌣–धिनाथः' या अक्षरांच्या अनुषंगाने तेथे 'धराधिनाथ' शब्द असावा असे मी सुचविले आहे. मालवराज जगद्देवाला सोडविण्यासाठी आपले सैन्य घेऊन 'धराधिनाथ' आला, असे श्लो. १० मध्ये म्हटले आहे. हा 'धराधिनाथ' कोण असावा ? या शब्दाचा सामान्य अर्थ 'पृथ्वीचा स्वामी—राजा' असा होतो. पण येथे तो 'धरा' (=धारा) नगरीचा अधिनाथ (=स्वामी) या अर्थाने वापरला असेल काय ? 'धारा' या शब्दाचे 'धार' असे रूप आढळते, तसेच 'धर' हेही रूप असणे अशक्य नाही.[२]

---

१ अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (यज्ञदाणी), पृ. ३७१.

२ बंगालमध्ये आजही 'धार' हे आडनाव 'धर' असेही प्रचलित आहे. परमारांच्या शिलालेखात 'धराधिपत्यम्' 'धरामंडल' असे शब्द येतात (डॉ. अमरचन्द मित्तल. परमार अभिलेख. पृ. १७९, ३४०). त्यातील 'धरा' शब्द 'धारा'–नगरीसाठी असणे असंभवनीय नाही. चंदेलनृपती, वीरवर्म्मन याच्या सुवर्ण-नाण्यावर 'श्रीमद्वीरवर्म्म धरादेवो' असा लेख येतो (डॉ. मिराशी. स्टडीज इन इन्डोलॉजी. व्हॉ. ३, पृ. १२७) तेथेही 'धरादेव' हा शब्द 'धारादेव' (धारा नगरीचा स्वामी) या अर्थाने असावा, असे वाटते. परमार आणि चंदेल नृपती एकमेकांच्या प्रदेशावर नेहमी स्वाऱ्या करीत. त्यातील एखाद्या स्वारीत वीरवर्म्याने धारा नगरी जिंकली असावी व त्या विजयाच्या स्मरणार्थ बहुधा ही नाणी पाडली असण्याचा संभव नाकारता येत नाही. या प्रश्नाचा अधिक विचार होणे अवश्य आहे.

आणि तेच वृत्तसुखार्थ प्रस्तुत श्लोकात वापरले असावे. तेव्हा, 'धराधिनाथ' म्हणजे धारा नगरीचा स्वामी, असा या ठिकाणी अर्थ करण्याला हरकत नाही.

माळव्याच्या गादीवर नरवर्मदेवाचा पुत्र यशोवर्मन इ. स. ११३३ मध्ये बसला. अर्थात, त्या किंवा त्यापूर्वीच्या वर्षी नरवर्मदेवाचा मृत्यू झाला असावा. तो कोणत्या रीतीने झाला याचा उल्लेख आढळत नाही. प्रस्तुत धर्मापुरी शिलालेख इ. स. ११३४ चा आहे. त्यातील युद्धप्रसंग त्यापूर्वी ११३३ मध्ये झाला असावा. तेव्हा त्यात वर्णिलेला, जगद्देवाला साह्य करण्यासाठी आलेला 'धराधिनाथ' नरवर्मदेव असणे अशक्य नाही. भिलसा (मध्यप्रदेश) येथील बिजा मंदिर मशिदीतील एका खांबावरील कोरीव लेखात या नरवर्मनचा उल्लेख धाराधिपति असाच केलेला आहे.[१] असे असेल तर माळव्याचे राज्य आपल्या वडील बंधूच्या स्वाधीन करून जगद्देव दक्षिणेत आला तो त्यांच्याशी विचारविनिमय करून, दक्षिणेतील परमारांचा प्रदेश आपल्या ताब्यात ठेवण्याच्या अंतःस्थ हेतूनेच आला असावा असे म्हणण्यास हरकत नाही. नरवर्मदेव व जगद्देव यांच्यातील फरक दाखविण्यासाठीही नरवर्मदेवाला 'धराधिनाथ' व जगद्देवाला 'मालवराज' ही विशेषणे या श्लोकात योजिली असावी.

## युद्धाचे स्थळ : धर्मापुरी

जगद्देव व तृतीय सोमेश्वर यांच्यात झालेले, प्रस्तुत शिलालेखात निर्देशिलेले युद्ध कोणत्या ठिकाणी झाले असावे ? 'आपल्या शत्रूंचा मार्ग अडवून राजाने त्यांना सह्य पर्वतात नेले (पिटाळले)' असे या लेखात म्हटले आहे. (ओ. १०) जेथे हा शिलालेख मिळाला ती धर्मापुरी ज्या पर्वतराजीत आहे ती आजही सह्याद्री म्हणूनच ओळखली जाते. सह्याद्रीच्या ज्या अनेक रांगा आहेत त्यातील एक हरिश्चंद्र गडापासून तो अहमदनगर व बीड, आणि तेथून बिलोलीपर्यंत पसरलेली आहे[२]. त्याच रांगेत बीडपासून सुमारे ३५ मैलांवर धर्मापुरी आहे. तेव्हा, हे युद्ध धर्मापुरी जवळच्या भागातच झाले असावे, असे म्हणण्यास हरकत नाही. म्हणूनच 'धर्मापुरी'च्या या शिलालेखात त्याचे वर्णन आलेले आहे.

---

१ प्रोग्रेस रिपोर्ट, आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया (वेस्टर्न सर्कल), १९१४, पृ. ५९.

२ अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (यझदाणी), पृ. ६–७.

## धर्मपुरी

भूलोकमल्ल सोमेश्वर चालुक्याच्या राज्यात जगप्रसिद्ध अशी 'धर्मपुरी' नावाची एक नगरी होती. शिलालेखाच्या ओ. १३ ते १६ मध्ये तिचे वर्णन आहे. ते काव्यमय आहे. ही नगरी म्हणजे जणु पृथ्वीच्या कपाळावरील तिलक. अनेक तडाग, विहिरी आणि वनराजी यांनी ती आच्छादिलेली होती. नगरीत अनेक उंच प्रासाद होते. त्यावर मयूर विराजमान होते. गावात सुंदर बाजार होते. त्यांतील रस्त्यांतून रथ धावत असत. रस्ते लोकांनी गजबजलेले असत. प्रासादांच्या गच्चीवर उत्तम प्रकारचे नृत्यगायन चाललेले असे. सारांश, ही धर्मपुरी इंद्रनगरीशी स्पर्धा करणारी होती.

कवीने केलेले धर्मपुरीचे हे वर्णन वाचले म्हणजे तिच्या प्राचीन वैभवाची चांगली कल्पना येते. प्रस्तुत शिलालेख महाराष्ट्रातील बीड जिल्ह्यातील आंबेजोगाई तालुक्यात असलेल्या 'धर्मापुरी' या गावात सापडला. अर्थात, शिलालेखातील धर्मपुरी ती हीच, यात शंका नाही. मूळ नाव 'धर्मपुरी', पण लौकिकात आज ते 'धर्मापुरी' झाले आहे. आजची धर्मापुरी एक लहानसे खेडे आहे. प्राचीन वैभवाची चिन्हे अशी काही जुनी देवळे तेथे आहेत. इतर अनेक भग्नावशेष इतस्ततः विखुरलेले सर्वत्र आढळतात. श्री. न. शे. पोहनेरकर यांनी 'मराठवाड्याची प्राचीन सौभाग्य-लेणी: धर्मापुरी' या आपल्या लेखात[१] या गावाचा विस्तृत परिचय करून दिलेला आहे. त्यावरून चालुक्य नृपतींचे काही कानडी लेख तेथे उपलब्ध झाल्याचे कळते. तेथील हेमाडपंथी पद्धतीच्या केदारेश्वर मंदिरात अनेक सुंदर शिल्पाकृती आहेत. त्यावरून चालुक्यांच्या काळात हे नगर अत्यंत वैभवसंपन्न असले पाहिजे यात शंका राहत नाही. प्रस्तुत शिलालेखात केलेले धर्मपुरीचे वर्णन वास्तव असावे असे वाटते.

## श्रीपती

धर्मपुरी नगरीची व्यवस्था बळकट केल्यानंतर भूलोकमल्लाने ती मल्हराजाच्या स्वाधीन केली (ओ. १७). भूलोकमल्लाच्या कृपाप्रसादाने संपत्ती, दान, पराक्रम, कुल, शक्ती इत्यादी बाबतीत उत्कर्ष पावलेला मल्हराजाशिवाय दुसरा कोणीही पुरुष त्यावेळी पृथ्वीत (राज्यात) नव्हता (श्लो. १६). त्याची कीर्ती ऐकून संतुष्ट झालेले देव एकत्रित येऊन या महात्मा मल्लराजाला स्वर्गात घेऊन गेले (श्लो. १७) अर्थात त्याचा मृत्यू झाला. इंद्रनगरीत वास्तव्य करणाऱ्या

---

१ प्रतिष्ठान मासिक (औरंगाबाद), सप्टेंबर १९७०.

त्या मल्हराजाला **लक्ष्मराज** या नावाचा मुलगा होता. तो अत्यंत पराक्रमी होता. रूप, विद्या, धन, यौवन इत्यादी गुणांनी तो संपन्न होता (श्लो. १८). दातृत्वाच्या बाबतीत त्याने बली आणि सूर्यपुत्र कर्ण यांना जिकले होते. त्याचे सौंदर्य मदनासारखे असल्यामुळे कामलोलुप कामिनीची अंतःकरणे तो जिकून घेई (श्लो. १९). गृहवासाचा पुत्र **नारायण** नावाचा मथुरेतील एक ब्राम्हण त्याचा अधिकारी होता. त्याच्या धाकट्या भावाचे नाव **श्रीपती**. याने लक्ष्मराजाची लक्ष्मी (संपत्ती, योग्यता) वृद्धिगत केली होती (श्लो. २०). धर्मपुरीमधेच त्याला त्याच्या स्वामीने (लक्ष्मराजाने), अधिकारी म्हणून नेमले होते. आपल्या प्रजेचे तो पित्याप्रमाणे न्यायाने संरक्षण करीत असे. औदार्य, चातुर्य, दया इत्यादींनी संपन्न असलेला आणि आपल्या स्वामीचे कार्य (उत्तम रीतीने) करणारा श्रीपती-सारखा अधिकारी त्याच्यापूर्वी दुसरा कोणीही झाला नाही (श्लो. २१). श्री आणि सरस्वती यांचे आपसात वैर असते असे म्हणतात, पण श्रीपतीच्या ठिकाणी या दोघीही आनंदाने नांदत होत्या (श्लो. २२). श्रीपतीच्या पत्नीचे नाव **पद्मा**. ती कमलाप्रमाणे सुंदर असून आपल्या पतीची जणु छाया होती (श्लो. २३). संपत्ती क्षणभंगूर आहे, आयुष्य चंचल आहे, ते केव्हा संपेल हे सांगता येत नाही, तारुण्यही असेच अस्थिर होय, हे लक्षात घेऊन (आपल्याकडून काही पुण्य घडावे म्हणून) त्याने मुरारीचा (श्रीकृष्णाचा) मठ बांधला (श्लो. २४).

यात वर्णन केलेला मल्हराज हा भूलोकमल्लाने नेमलेला त्या प्रदेशावरील अधिकारी असून त्याचे मुख्य स्थान धर्मपुरी हे असावे. मल्हराजाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा लक्ष्मराज गादीवर आला. यालाच श्लो. २१ मध्ये प्रभु म्हटलेले असल्यामुळे तो चालुक्यांचा मंडलेश्वर किंवा सामन्त असावा. श्रीपती हा तेथील स्थानिक महत्त्वाचा अधिकारी दिसतो. पुढे ओ. ४१ मध्ये निर्देशिलेला श्रीपती हाच असावा. त्याला तेथे नायक म्हटले आहे. त्याने मुरारीचा मठ बांधला यावरून तो वैष्णव असावा.

**नगर, पंचनगर, देशिजन**

या नंतर या मुरारी मठाला 'नगर' आणि 'देशिजन' यांनी संतोषपूर्वक दिलेल्या दानांचा उल्लेख नावनिशीवार केलेला आहे (श्लो. २५). येथे '**नगर**' शब्दाचा अर्थ नेहमीप्रमाणे गाव किंवा शहर असा नसून 'व्यापाऱ्यांची श्रेणी' किंवा 'सहकारी संस्था' असा आहे. कानडी शिलालेखात या अर्थाने 'नगर' किंवा 'नगरत्तार' हे शब्द योजलेले आढळतात.[1] धर्मपुरी ही चालुक्यांच्या राज्यात होती. तेथे

१ एपि. इंडिका, वर्ष २१, पृ. १०४, १७६; वर्ष ३४, पृ. २९२.

काही कानडी शिलालेखही उपलब्ध झाल्याचे वर निर्देशिले आहे. तेव्हा या व इतर काही कानडी प्रशासन शब्दांचा उपयोग तेथे होत असणे स्वाभाविक होय. 'नगर' या शब्दाप्रमाणेच पुढे २९ व्या ओळीत आलेला '**पंचनगरम्**' हा शब्दही कानडी शिलालेखांत आढळतो[१]. त्याचा अर्थ, नगरातील म्हणजे व्यापारी संस्थेतील पंच म्हणजे प्रमुख महाजन. याच अर्थाने तो शिलालेखांतही योजलेला आहे. 'दृष्टांतपाठा'तील बांदीकाराचा दृष्टांत[२] यातही तो आलेला आहे. '**देशि**' हा शब्दही[३] सामान्यतः त्याच अर्थाने वापरला जात असावा. '**देशिजन**' म्हणजे स्थानिक व्यापारी-श्रेणीतील लोक, सभासद. धर्मपुरी येथील मुरारी मठाच्या व्यवस्थेसाठी तेथील व्यापारी श्रेणींनी आणि त्यांतील सभासदांनी आपल्या उत्पन्नातून दाने व वृत्ती दिल्या होत्या. त्यांचा तपशील शिलालेखाच्या उत्तर भागात आलेला आहे.

## मुरारी मठाला दिलेल्या दानांचा तपशील

धर्मपुरी येथील 'पंचनगरा' मध्ये (महाजनांमध्ये) नायक सिद्ध पै, नायक सोमैआ, श्रेष्ठि बाहुबली, गांधी धोर पै, श्रेष्ठि कडुआल चामलिक इत्यादींचा समावेश होता. त्यांनी मठाला दरवर्षासाठी सात गद्याण देण्याचे मान्य केले होते. **नायक** ही पदवी मोठ्या अधिकाऱ्यांना लावीत असत. उदा. ओ. ५१ मधे धर्मपुरीचा अधिकारी श्रीपती यालाही नायक हेच विशेषण लावलेले आहे. सिद्ध पै आणि सोमैया हे असेच राज्यातील किंवा धर्मपुरीतील श्रेष्ठ अधिकारी असावे. **पै** हे आडनाव आजही प्रचलित आहे. 'अप्पय्य' या शब्दाचा तो अपभ्रंश असावा. **श्रेष्ठी** म्हणजे सावकार किंवा व्यापारी. **चामलिक** शब्दाचा अर्थ नीट लागत नाही. बहुधा ते आडनाव असावे. यांनी दिलेले दान सात गद्याणांचे होते. '**गद्याण**' हे ४८ रती किंवा ८५ ग्रेन वजनाचे एक सोन्याचे नाणे होते. हे सात गद्याण या पाचांनी मिळून की प्रत्येकाने दरवर्षी देण्याचे कबूल केले होते ते सांगता येत नाही. यातून भद्रासाठी २ कपर्दक, माळांच्यासाठी माळ्याला २, तेलासाठी तेल्याला २, आणि धुण्यासाठी रजकाला म्हणजे धोब्याला २ कपर्दक (द्यायच्या होत्या). '**कपर्दक**' हेही त्या

---

१ ॲन्युअल रिपोर्ट ऑन इंडियन एपिग्राफी, १९५६–५७.बी, क्रमांक १९० पृ. ६२.

२ लीळाचरित्र (कोलते) उत्त. १७६.

३ एपि. इंडिका. वर्ष ११, पृ. ४२.

काळात प्रचारात असलेले एक हलके नाणे होते. ८० कवड्या किंवा ४ कपर्दकांचा एक 'पण' (=एक नाणे) होत असे. अर्थात, एक कपर्दक म्हणजे २० कवड्या किंवा एक चतुर्थांश 'पण'. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात (अ. २–१२) एक तांब्याचे नाणे म्हणून 'कपर्द' चा उल्लेख आढळतो. 'कपर्दक' नाण्याचा उल्लेख शेरगड (जिल्हा कोट, राजस्थान) येथील सोमनाथ देवालयाच्या शिलालेखातही आढळतो.[१] 'कपर्दी' आणि 'द्यूत-कपर्द' या नाण्यांचे उल्लेख द्वितीय युवराजदेव या कलचुरी नृपतीच्या बिलहरी शिलालेखात[२] आढळतात. 'कपर्दी', 'कपर्द' आणि 'कपर्दक' ही तीन निरनिराळी नाणी होती की एकाच नाण्यासाठी हे तीन शब्द पर्यायाने वापरण्यात येत होते हे निश्चित सांगता येत नाही.

व्यापारी श्रेणी व त्यांचे महाजन किंवा पंच यांनी गावातील काही संस्थांतून कराच्या रूपाने जे उत्पन्न मठाला लावून दिले होते त्याचा निर्देश यानंतर आला आहे. '**टंकशालायां**' म्हणजे टाकसाळीमध्ये प्रत्येक धड्याला (एकवेळ वजन करताना) निश्चित कर किती होता ते सांगता येत नाही, कारण, तेथील वाचन दुर्बोध आहे (ओ. ३०). टाकसाळीतून पूर्वी असा कर घेत असत. '**पर्णशाळे**'मध्ये दर महिन्याला २० पानांच्या प्रत्येक भाराला किंवा जुडीला २ द्र म्हणजे द्रम्म, कर म्हणून वसूल करीत. द्र हे द्रम्म या शब्दाचे संक्षिप्त रूप होय. **द्रम्म** हेही एक नाणे होते. राष्ट्रकूटांच्या कान्हेरी शिलालेखात सुवर्ण द्रम्मचा उल्लेख आढळतो हे खरे, पण सामान्यतः द्रम्म हे चांदीचे नाणे असल्याचे दिसून येते. ग्रीसमधील 'ड्राक्मा' नाण्याच्या वजनाचे ते असे म्हणून त्याला द्रम्म म्हणत असत. त्याचे वजन ६५.५ ग्रेन होते. द्रम्म या शब्दावरूनच मराठीत दाम हा शब्द आला. '**पर्णशाळा**' याचा नेहमीचा अर्थ गवताचे खोपटे किंवा कुटीर, पण तो येथे लागू नाही. विड्याच्या पानांच्या दुकानांची ओळ, असा अर्थ येथे असावा. पूर्वोक्त शेरगड येथील सोमनाथ देवालयाच्या शिलालेखातील 'तथा पन्नसालायां धूपनिमित्त कपर्दकवोडी(ड्री) दिनं प्रति आचन्द्रार्कं यावत्' या वाक्यात हा शब्द आला आहे. डॉ. अळतेकरांनी 'पर्णशाळेत धूप जाळण्यासाठी दर दिवसाला एक कपर्दक बोडीचे दान दिले' असा भावार्थ कल्पिला आहे, तो बरोबर नाही. त्याच लेखात जी निरनिराळी दाने दिली आहेत ती 'मंडपिकादायात्', 'मार्गादायात्' म्हणजे मंडईवरील, मार्गावरील करातून दिली

---

१ एपि. इंडिका. वर्ष २३, पृ. १३७–१४१.

२ कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिक्यारम्, व्हॉ. ४, भाग १, पृ. २२३, प्रस्ता. CLXXXIX

आहेत. हे लक्षात घेता धूपानिमित्त दिलेले त्या लेखातील दान पर्णशाळेवरील करातून दिले असावे हे स्पष्ट दिसते. जिथे किंवा ज्यावर कर बसवला असेल त्या शब्दाची सप्तमी विभक्ती वापरल्याचे अन्यत्रही दिसून येते. उदा. 'पत्तनमंडपिकायां। लवणस्य खंडिकायां षोडशिका धाणकेच षोडशिका तैलस्य मासि मासे दिनमनुच युगायुगेच पौरस्तु ', येथे शहरात मंडईमध्ये जो कर बसवला होता त्याचे वर्णन आहे. तसेच उपरोक्त शेरगड येथील शिलालेखात पर्णशाळेमध्ये जो कर बसवला होता त्याचे वर्णन असले पाहिजे हे स्पष्ट दिसते. आपल्या प्रस्तुत धर्मपुरी शिलालेखातील या वाक्यातही ते तसेच आहे. याच अर्थाने आपल्या लेखात यापूर्वी 'टंकशालायां' (ओ. २९) असा, आणि यानंतर 'भक्तमंडपिकायां' (ओ. ३०), 'मंडपिकायां' (ओ. ३२) असे प्रयोग केले आहेत. तेव्हा उपरोक्त शेरगड शिलालेखातील वाक्यात 'पर्णशाला' शब्द झोपडी किंवा कुटीर या अर्थाने वापरलेला नाही, तसाच तो आपल्या शिलालेखातील या वाक्यातही नाही. जेथून कर वसूल करता येईल अशी ही शाला म्हणजे गृह किंवा दुकानांची ओळ असावी. ती विडयाच्या पानांच्या दुकानांची ओळ असावी. त्या बाजारात बसवलेल्या करातून धर्मपुरी येथील या मुरारीच्या मठाला हे दान दिले होते.

मठाच्या आत व बाहेर धूप जाळण्यासाठी व दिवे लावण्यासाठी २ गद्याणांचे दान दिलेले आहे (ओ. ३०) त्यासाठी 'भक्तमंडपिका' मध्ये मंजूर केलेल्या (मान्य) करासाठी (कर), प्रत्येक गाडीमागे (वह्य) प्रमाण (मान) २५ वृषभ ठरवले होते. **मंडपिका** म्हणजे मंडई, बाजार. **भक्तमंडपिका** म्हणजे तांदळाचा, धान्याचा बाजार. त्यात धान्याच्या प्रत्येक गाडीवर २५ वृषभांचा कर बसवला होता. येथे '**वृषभ**' याचा अर्थ नेहमीप्रमाणे बैल असा नसून बैलाचे चिन्ह किंवा आकृती ज्यावर कोरलेली आहे असे नाणे. ज्यावर वराहाची आकृती कोरलेली आहे अशा नाण्याला ज्याप्रमाणे 'वराह' म्हणत त्याप्रमाणे ज्यावर वृषभाची (बैलाची) आकृती कोरलेली असे त्या नाण्याला वृषभ असे नाव असावे. वराह नाणी उपलब्ध आहेत ; पण वृषभ नावाने अंकित अशी नाणी मात्र अजून सापडलेली नाहीत. पण त्यांचे उल्लेख मात्र सापडतात. उदा. पूर्वोल्लिखित शेरगड येथील शिलालेखातच 'श्रीसोमनाथ देवाय चंदनधूपनिमितं कौप्तिकवरंगेन(ण) मार्ग्गादायात् दत्त वृषभ ५ आचन्द्रार्कं यावत्' असा उल्लेख आहे. त्या लेखाच्या संपादनात डॉ. अ. स. अळतेकर यांनी 'वृषभ' म्हणजे वृषभाकृती असलेले एक नाणे, असाच अर्थ केलेला आहे. शेरगड शिलालेख हा तेथील मालव नृपतींच्या काळातील आहे. पाचव्या शतकात स्कंदगुप्ताने

१ तत्रैव. पृ. २१५.

पाडलेल्या नाण्यांवर एका बाजूला बैलाचे चिन्ह कोरलेले असे. मालव नृपतींनीही अशी नाणी पाडली असावी.[1] धर्मपुरी येथे ज्या अर्थी वृषभ नाणे चालू होते त्या अर्थी तो प्रदेश त्यापूर्वीच्या काळापासून मालव नृपतींच्या ताब्यात असावा असे अनुमान करण्यास हरकत नाही. हे नाणे कोणत्या धातूचे होते, त्याचे वजन व मूल्य काय होते हे आज निश्चित सांगता येत नाही.

यानंतर 'पूगफल' म्हणजे सुपाऱ्यांच्या व्यापारातील (कर्मणि) विक्रीवरील करातून गोल्हणाने दर महिन्याला १२ द्रम्म दिल्याचा निर्देश आहे. (ओ. ३१). **गोल्हण** हा सुपाऱ्यांच्या व्यापाऱ्यांचा प्रमुख असावा. पुढील वाक्यात '**घृतकेणि**' म्हणजे तुपाच्या विक्रीवरील करातून मासिक दोन दामाच्या दानाचा निर्देश आहे. 'केणि' हा शब्द संस्कृत क्रेणि या शब्दाचा अपभ्रंश असावा. क्रेणि=खरेदी, विक्री. '**लि(सि)गवटी**' (ओ. ३२) म्हणजे काय ते निश्चित कळत नाही. तेथील उत्पन्नातून मासिक ४ दाम दिलेले आहेत. **पंचहतति** (ओ ३२) हा शब्द 'पंचहन्तति' असावा. 'पंचाहन' म्हणजे पांचाळ, लोखंडाची कामे करणारे कारागीर, यांच्या दुकानांच्या ओळीला 'पंचहन्तति मंडपिका' म्हणत असावे. त्यांच्यावर लावलेल्या करातून मासिक ४ दाम, आणि '**मुक्तीकृत वृषभ** मुद्रा २५' शुल्की गुणाकराने दिल्या होत्या. 'गुणाकर' हे विशेष नाम असावे. '**शुल्की**' म्हणजे कर वसूल करणारा अधिकारी. वृषभ हे एक प्रकारचे नाणे असल्याचे यापूर्वी दाखवलेच आहे. या ठिकाणी 'वृषभ मुद्रा २५' असे म्हटले असल्यामुळे वृषभ हे नाणे असावे याविषयी शंका राहात नाही. या वृषभांना (मुक्तीकृत) असे विशेषण लावले आहे. त्यावरून मोकळ्या सुटलेल्या सांडाची आकृती त्यावर असावी. काही (वृषभ) नाण्यांवर बसलेल्या वृषभाचे, नंदीचे चिन्ह असते, त्याहून हे मुक्तीकृत वृषभ नाणें वेगळे असावे.

३३ व्या ओळीतील आरंभीचे शब्द स्पष्ट नाहीत विम्याकार (?) केणीतून महिन्याला दोन दाम, तसेच आम्बकूंज (आंब्यांचो बाजारपेठ?) यातून २५ मुक्तभरा (?) नायक दोधलाल आणि श्रीधर या दोघांनी मिळून दिल्याचे दिसते '**मुक्तभरा**' हे एक प्रकारचे नाणे असावे. तेलाच्या व्यापारातील उत्पन्नातून (**तैलकेणि**) दर महिन्याला दोन दाम दिले होते (ओ. ३४). त्याचप्रमाणे 'तैलंगी' (सं. तैलिक) म्हणजे तेलव्यापाऱ्यांच्या मंडळावरील प्रमुखाने दोन दाम द्यायचे होते. '**मुद्रा-पण**' (ओ. ३४) म्हणजेच नाणेबाजार, जेथे नाण्यांची देवघेव होते अशा सराफांची ओळ. तेथून मठासाठी प्रत्येक महिन्याला दोन दाम देण्यात आले होते. तेथील गणकर म्हणजे मोजणारे, रोकडिये, यांनी (प्रत्येक महिन्याला) एक 'गुली'

---

१ एपि. इंडिका. वर्ष २३, पृ. १३८.

देण्याचे मान्य केले होते. 'गुली' हे एक प्रकारचे नाणे असावे. 'गुलीका' नावाचे नाणे पूर्वी दक्षिणेत प्रचलित होते.[1] 'गुन्ती' हे त्याचेच दुसरे रूप दिसते. 'किरकोला' (ओ. ३४) म्हणजे मालाची किरकोळ विक्री करणाऱ्यांच्या 'केणी'तून म्हणजे बाजारपेटेतून दर महिन्याला १ दाम देण्यात आला होता 'किरुकलं' हा मूळ शब्द होय. त्याचेच रूपांतर 'किरकोळ' असे झालेले आहे. यादव काळात देखील किरकोळ विक्रीवरील हा कर आकारण्यात येत होता असे दिसून येते.[2] 'मरिचबोभा' (ओ. ३५) यातील 'बोभा' शब्दाच्या अर्थ लक्षात येत नाही. मिऱ्यांच्या विक्रीवरील करातून दर महिन्याला १ दाम देण्यात आला होता असे वाटते 'मुराये' (या जातीच्या किंवा घोडबाजारात ?) प्रत्येक घोडयाच्या विक्रीवर विक्रेता व ग्राहक यांच्याकडून २ दाम वसूल करायचे होते. 'मार्गादाय' म्हणजे रस्त्यावरून बाहेर जाणाऱ्या व आत येणाऱ्या मालावर लावलेली जकात. त्यातून अर्धा दाम द्यायचे ठरले होते. **सत्र(यज्ञ)केणी**(भूमि) वर दर महिन्याला दोन दाम कर लावला होता. (ओ. ३५) यावरून यज्ञासाठी जी भूमी उपयोगात आणायची त्यावर हा कर असावा असे वाटते. 'तंत्रिकाटलालान्नकेणी' म्हणजे काय ते लक्ष्यात येत नाही. कोणत्या तरी प्रकारच्या अन्नाच्या विक्रीवर दर महिन्याला दोन दाम कर बसवला असावा असे दिसते. '**वलारदन्त**' या कराचीही काही कल्पना येत नाही.

यानंतर मठाच्या निर्वाहासाठी लाट देशातील किंवा लाड जातीच्या स्थानिक व्यापाऱ्यांच्या श्रेणीतील व्यक्तींनी दिलेल्या दानांचा निर्देश आहे. त्यातील काहींची नावे पुढीलप्रमाणे : नायक भालल, राणक महीपाल, वील्हे, नायक विल्हे (?), नायक भीमदेव, पोढदेव, कानारदेव, महुमहूण, नायक वामदेव इत्यादी व्यक्ती 'अमर' म्हणून संबोधल्या आहेत. 'अमर' म्हणजे जहागीर, राजाने अधिकाऱ्यांना दिलेली जमीन किंवा त्यावरील उत्पन्न. हे भोगणाऱ्या अधिकाऱ्यांनी प्रसंगविशेषी राजाला सैन्य उभे करून (किंवा अन्य रीतीने) मदत करायची असे. अशा अधिकाऱ्यांना 'अमर नायक' म्हणत असत. वर, उल्लेखलेल्या व्यक्ती 'अमर नायक' होत्या. त्यांना नायक ही पदवी आरंभी लावलेली आहे, या नायकांना विड (विडा, नजराणा, द्रव्य) मिळत असे. ते 'निःकास' म्हणजे कररहित असे. (कास=कर). या करमुक्त नजराणा द्रव्याच्या उत्पन्नातून प्रत्येक शंभर (गद्याणाच्या उत्पन्नातून) १० गद्याण मठासाठी द्यायचे होते. (ओ. ३८). यानंतरची अक्षरे फार अस्पष्ट आहेत. पुढील ३९ व्या ओळीत वाकट, भाण्डप, अनन्त इत्यादी नावे आली आहेत. त्यांनी १ द्रम्म

१ अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (यज्ञदाणी), पृ. ७९९.
२ म्हैसूर इन्स्क्रिप्शन्स, नं. ३७, पृ. ७३.

(प्रत्येकी?) द्यायचा आहे, तो कोणत्या करातून तेही स्पष्ट होत नाही. नायक जल्हण आणि नायक कीर्ती, धर्मपुरी येथील या दोन स्थानिक व्याप्याऱ्यांनी आणि भांड, शाली, शान्ति इत्यादींनी १०० (गद्याणांचे) दान दिले (ओ ४०).

यानंतर (ओ. ४१) राणक.....इत्यादींनी, तसेच नायक श्रीपतीने दिलेल्या दानांचा उल्लेख आहे. वाचनाच्या दुर्बोधतेमुळे या दानांचे स्वरूप स्पष्ट होत नाही, राणक नागरसेनाच्या प्रदेशातील १०० निवर्तनांची जमीन, तसेच तनग्रामात आंछआक राणकाने १० निवर्तनाची जमीन दिली होती. पुढील वाक्यातील दानाचे स्वरूप लक्षात येत नाही.

हे आदाय (कर) नगर व्यापारी श्रेणींनी आणि स्थानिक व्यापाऱ्यांतील अधिकारी पुरुषांनी पाळले पाहिजेत असा आदेश देऊन शासनलेख संपविला आहे. जो नीच पुरुष या शासनाचा लोप करील (पाळणार नाही) त्याला हजार गाईंची हत्या करण्याचे आणि ब्रम्हहत्येचे पातक घडेल हे शापवचन शेवटी निर्दिष्ट केले आहे. (ओ. ४४).

लेखक

हा शासनलेख यशोधवलाचा पुत्र महीपति सूरी याने रचला आणि त्यानेच (शिळेवर) लिहिला, असे शेवटच्या ओळीतील श्लोकावरून दिसून येते. या नावावरून हा लेखक जैन धर्मानुयायी असावा असे दिसते.

## वाचन

[वृत्ते: श्लो. १ ते ४, ७, १०, १३, १५, १७–२०, २४–इंद्रवज्रा;
श्लो. ५, ६, ८, ९, ११, १२, १४, १६, २१–२३, २५–उपजाती;
श्लो. २६, २७–अनुष्टुभ.]

१. ––––पुरुषोत्तमाय।। शाके संवत १०५६ आनन्दसंवत्सरान्तर्गताषाढवदि १५ सोमे––[१]

२. –⏑–नतनोर्म्मुरारेः पु[च्छा]हतिर्व्वा विदधातु सौख्यं। शंखेन्दुलक्ष्मीमणिरत्नमुख्य प्रदा–

३. –⏑–(स*)मुद्रजातिः ।।१।। अस्ति त्रिलोकीप्रथितः पृथिव्यां चालुक्यवंशो नृपपुंगवानां। श्रीमानभूदा–

१ येथे अक्षराचे अस्पष्ट चिन्ह आहे. ते दुर्वाच्य आहे.

२ येथील अक्षर दुर्बोध आहे.

४. [हवमल्ल*]नामा तत्रैव विश्रान्तदिगन्तकीर्त्तिः ।।२।। यस्माच्च [ज*][1]-
ज्ञे भुवनैकवीरः क्षोणीपतिः श्रीपरमद(र्द्द)-

५. [देवः । विश्रा*]न्तिहेतोरिव दिग्गजानां यो भूमिभारं बि[भ]रांबभूव ।।३।।
तस्यापि पुत्रश्चतुरङ्गमल्लो भूलोकम-

६. [ल्लो नृपति*]र्ब्बभूव । यश्चापभृन्नीरदनीलकान्तिः शारङ्गधन्वेव रराज
संख्ये ।।४।। तस्य प्रयाणे वरवारणानां हयोत्तमानां

७. ⏑⏑–⏑–[र्व्वः] । सेनासमुद्भूतरजोन्तरिक्षं संछादयामास रवेश्च तेजः ।।५।।
तस्मिन्भुवं बिभ्रति भूमिपाले भूलोकमल्ले

८. ⏑⏑–⏑–रे । समं जगद्देवपुरोगमानां जज्ञे विरोधः किल राज्यहेतोः ।।६।।
औदास्यमुच्चैः प्रकृतौ गतायां सामन्तमुख्येथ(षु)

९. [च संमुखे*]षु । यः कोपकालं ह्यधिरुह्य मार्गं विद्रावयामास रिपून्समेतान्
।।७।। तस्मिन्क्षणे भूमिपतिः स्वशत्रून्रणे

१०. ⏑–[स*]ह्यगिरिं निनाय । दुर्ग्गाधिपते[ष्वे]षु ततोतिमात्रं संवा(बा)-
धयामास नरेन्द्रमुख्यः ।।८।। ततो जगद्देवसहायतां यो व(ब)लं समादा-

११. [य धरा*]धिनाथः । आजग्मिवान्मालवराजमुक्तो(क्तौ) यथा[2] पतङ्गो-
च्चिमुखं विविक्षुः ।।९।। तस्मिन्दिवं दैववशात्प्रपन्ने मुख्येषु रा[ज्या*]-

१२. [भिमुखेषु*]तेषु । संख्योचिते दुर्ग्गवरे हताशा भूलोकमल्लं विविशुः शरण्यं
।।१०।। तेषु प्रविष्टेषु विहाय दुर्गं भूपालमुख्यान्दलयां ब(ब)-

१३. [भूवा*] वसुंधरायां हतकंटकायां धर्म्मेण राज्यं प्रशशास पैत्रम् ।।११।। तस्यैव
राज्ये जगतिप्रसिद्धा पुर्य्यस्ति भूमेस्ति-

१४. लकायमाना । तडाकवापीवनराजिछन्ना श्रीधर्म्मपुर्य्युत्तमसौधरम्या ।।१२।।
सौधाग्रनृत्ये शिखि[घातभी[3] भीत्या रथं]

१५. रवेः प्रव्रजतोन्तरिक्षे । यत्रांक[पौलीमिव] वावनद्धं श्रीधर्म्मपुर्यां नयतेतिदूरं
।।१३।। रम्यापणे घूर्ण्णवतां रथानां दिशान्तरा या-

---

१ शिळा फुटली असल्यामुळे येथील अक्षर नष्ट झाले आहे.

२ य या अक्षराच्या उजव्या बाजूला खाली पोकळ गाठ दिसते. ती चुकून कोरली गेली असावी.

३ 'भी' पुढील अक्षर कोरतांना शिळेचा टवका निघाल्यामुळे ती जागा सोडून 'भी' हे अक्षर चुकून पुन्हा कोरावे लागलेले दिसते.

१६. च जनावकीर्णा । प्रासादसौधोत्तमनृत्यगीतैः संस्पर्द्धयामास पुरीमिवैन्द्रीम्
॥१४॥ कौमारकाले प्रतिपन्न[मत्यौ] संस्मृत्य राजा

१७. प्रद्दौश्च(च)[प्रा*]स्थात् । काले व्यवस्थां सुदृढां विधाय श्रीमल्लहराजाय
पुरीम[--⌣]म् ॥१५॥ वित्तेन दानेन न पौरुषेण न वर्द्धितो ना–

१८. पि कुलेन शक्त्या । नृपप्रसादाच्च न कश्चिदस्ति श्रीमल्लहराजेन समः
पृथिव्यां ॥१६॥ तत्कीर्त्तिमाकर्ण्य [नितान्तयज्ञैः] संहृष्ट–

१९. कामैरिव कौतुकेन । श्रीमल्हराजस्त्रिदशैः समेत्य यो नायितः स्वर्गमितो
महात्मा ॥ १७ ॥ तस्यापि वस्वैकपरः प्रतापो श्रीलक्ष्मरा–

२०. जस्तनयो बभूव । यं रूपविद्याधनयौवनानां नैकोपि पूर्व्वैः स्पृहयां[1] बभूव
॥१८॥ आहूय दानाद्व(द्ब)लिसूर्यपुत्रौ श्री–

२१. लक्ष्मराजेन जितौ धरित्र्यां । कंदर्परूपो रतिलालसानां यः कामि[नी*][2]नां
हरते मनांसि ॥१९॥ तस्याधिकारी गृहवाससूनु–

२२. र्नारायणो भून्मथुराद्विजन्मा । यस्मानुजः श्रीपतिनामध(धे)यो यो लक्ष्मराजस्य
ततान लक्ष्मीम् ॥२०॥ श्रीधर्म्मपुर्यां प्रभुणा

२३. नियुक्तः पितेव लोकान्विधिना ररक्ष । औदार्यचातुर्यदयाधिको यः
सौ[भा*]ग्यरूपः[3] प्रभुकार्यकर्त्ता ॥२१॥ यथाम्वु(म्बु)धौ वारि [च]

२४. वाडवश्च विषं च रत्नं च यथा भुजंगे । श्रीश्रीपतौ श्रीश्च सरस्वती च मिथो
विरुद्धे वसतस्तथात्र ॥२२॥ यथा शची जंभभिदो[4]–

२५. नुरूपा हरस्य देवी गिरिराजपुत्री । लक्ष्मीर्म्मुरारे[रिव] भर्त्तृसाया पद्मेव
पद्माभवदस्य भार्या ॥२३॥ कल्लोललोलाः क्ष–

२६. णभंगुराः श्रियः आयुश्चलं यो(यौ)वनमध्रुवं च मत्वेति नूनं नवलग्नबंधो
यः कारयामास मठं मुरारेः ॥२४॥ तस्मै प्रदत्तः

२७. नगरेण तोषाद्दायस्त्वयं देसिजनैश्च सार्द्धः(र्द्धम्) । तल्लिख्यते नामपुरःसरं
हि प्रजाभिहेतोर्म्मठवृत्तिजातं ॥२५॥ तद्य–

---

१ हृ या अक्षरासमोर एक काना कोरलेला आहे. तो चुकीने कोरला असावा.

२ कोरताना हे अक्षर चुकून गळले आहे.

३ या शब्दातील भा हे अक्षर कोरताना चुकून गळालेले दिसते.

४ या शब्दातील भ हे अक्षर हृ सारखे दिसते, ते तसे चुकीने कोरले गेले असावे.

२८. था। नगरमध्ये नायक सिद्ध पै। ना सोमैआ। श्रेष्ठि वा(बा)हुव(ब)लि। गांधी धोर पै। श्रेष्ठि कडुआल चामलिक। पंचकम(म्)–

२९. प्रभृतिपंचनगरेण दत्त वर्षप्रति ग ७ भद्रं[1] प्रति कपर्दक २ माला २ तेली २ रजक १ [।*] टंकशालायां धडा प्रति...

३०. डा १ [।*] पर्णशालायां मासं प्रति द्र २ भागं प्रतिपर्णं[2] २०। वा(बा)-ह्याभ्यन्तरध(धू)पनदीपालिकां प्रति ग १ [।*] भक्तमंडपिकायां

३१. वह्यमान वृषभ २५ करो मान्यः। पूगफलक[र्म]णि गोल्हणेन मासं प्रति द्र १२ [।*] कोडिआ [मलेंद्रप] घृतकेणि मासं प्रति

३२. द्र २ [।*] [लिं]गवटी मासं प्रति द्र ४ [।*] पंचहत्त(न्त)ति मंडपिकायां शुल्की गुणाकरेण मासं प्रति दत्त द्र ४ तथा मुक्तीकृतवृषभमुद्रा २५ [।*]

३३. [अणे]उदैआकीय विभ्याकारकेलि मासं प्रति द्र २ [।*] आम्वाकुंजस–लहराधारोप्रमुख मुक्त[भरा] २५ नायक दोधलाल

३४. [श्री]धराभ्यां। तैलकेणि द्र २ मासं प्रति तथा तैलंगी १२ मुद्रापणे[2] मासं प्रति द्र २ [।*] गणकरं प्रतिगुली १ [।*] किरकोला

३५. केणि मासं प्रति द्र १ [।*] मरिचवोभा मासं प्रति द्र १ [।*] मुराये घोटकं प्रति दायक ग्राहक द्र २ [।*] मो[3][मा]र्ग्गादाये द्र० ।। सत्रकेणी मासं

३६. प्रति प्र(द्र) २ [।*] तंत्रिकाटलालाञ्नकेणी मासं प्रति द्र २ [।*] वलारदन्त-केणे कोडी ४ द्र १ [।*] श्रीपदय्यविडानिःकासेना वामदेवधान्त ...[4]

३७. ग १ [।*] तथा लाटदेशिमथे(ध्ये) ना भालल। राणक महीपाल। वीलहे[5]। ना विल्हे ना। भीमदेव पोढदेव। कानारदेव

---

१ भ हे अक्षर ह सारखे दिसते. कोरकाच्या चुकीमुळे असे झाले असावे.

२ येथील ण हा ल सारखा दिसतो. णे असे वाचणे इष्ट. अन्यत्र ण असाच कोरलेला आढळतो.

३ मावर दिसणारी मात्रा शिळा फुटल्यामुळे दिसत असावी. त्यामुळे येथील अक्षरे सरळ रेषेत नसून थोडी खाली कोरली आहेत. 'मार्ग्गादाये' हे वाचन इष्ट.

४ येथे आणखी दोन अक्षरे आहेत. ती अस्पष्ट असल्यामुळे नीट वाचता येत नाहीत.

५ येथील अक्षर नीट वाचता येत नाही.

३८. महुमहूण ना । वामदेवाद्यमरैर्व्विडनिःकासदाने शतं प्रति ग १० तर्ण्णराव मा [–ना रा ल व ला स–][1]

३९. वाकट । भाण्डप अनन्ता(न्त)वडैः प्रवेशनिःकाशेन–[2] लव प्रदत्त द्र १ ना । जल्हण । ना कीर्त्तीधर्म्मपुरी–

४०. श्रोभयदेशिभाण्डशालीशान्तिप्रभृतिभिर्दत्तशतं थ–तिउसदेसमहाकयणकंषुरु ०।। वराड जेणो

४१. राणकस्त्वम--कामैआप्रभृतिभिर्निःकास प्रवेशे भरा १० द्र १ नायक श्रीपति-नामतोत्रगृहीत्वा मनोरथ–[3]

४२. वृन्दोत्र प्रदत्त ।। राणक नागरसे[नानां] प्रदेशमथदत्तभूमिनिवर्त्तनः १०० [।*] तनग्रामे राणेनांछआकेन दत्तभूमिनि[व]–

४३. र्त्तंग १० [।*] छीपानगरेण पंचवनानि [खरवट कोडी] प्रति माहु [।*] एते आदाया नगरेणोभयदेशिनां राजपुरुषैश्च

४४. प्रतिपालनीयाः ।। य[श्च नो] लोपयेन्मोहात्पापीयः पुरुषाधमः । गोसहस्त्रवधस्तस्य व्र(ब्र)ह्महा च भवि–

४५. ष्यति ।। [२६।।*] श्रीयशोधवलपुत्रेण श्रीमहीपतिसूरिणा । रचितं लिखितं चेदं शासनं वर्त्ततां चिरम् ।। [२७।।*]

● ● ●

१ ही अक्षरे नीट वाचता येत नाहीत.

२ येथे शिळा फुटली आहे. तेथे एखादे अक्षर असल्यास ते नष्ट झाले आहे.

३ येथे एखादे अक्षर असावे असे दिसते. असल्यास ते स्पष्ट नाही.

# १०

# जगद्देवाचा राणी सावरगाव शिलालेख

## प्रास्ताविक

'भारतीय इतिहास आणि संस्कृति' या त्रैमासिकाच्या, जानेवारी १९७३ च्या अंकात श्री. अ. म. शिराळकर यांनी 'जगद्देव ह्याचा राणी सावरगाव शिलालेख' प्रसिद्ध केला आहे. (पृ. ४४ ते ४९) जगद्देवाचा हा नवीन शिलालेख उपलब्ध करून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानणे अवश्य आहे. या शिलालेखाचे त्यांनी केलेले वाचन, त्याचा अर्थ लावताना त्यातील शब्दांची आणि त्यांच्या व्याकरणरूपांची त्यांना करावी लागलेली ओढाताण, त्यामुळे शिलालेखातील श्लोकाचा कवी अश्वत्थाम यावर, त्याचे संस्कृत भाषेवर प्रभुत्व नसल्याचा त्यांनी केलेला आरोप इत्यादीमुळे शिलालेखाच्या वाचनात व म्हणून त्याचा अर्थ लावण्यात त्यांची काही चूक तर होत नसेल ना, अशी शंका मनात आली. लेखासोबत शिलालेखाचा ठसा छापलेला नसल्यामुळे त्यांनी केलेले वाचन ताडून पाहाता आले नाही. महाराष्ट्र राज्याच्या औरंगाबाद येथील पुरातत्त्व विभागाचे अधिकारी, श्री. कावडकर यांना पत्र लिहून मी शिलालेखाचा छाप मागविला, तो त्यांनी तावडतोब पाठविला. श्री. अ. म. शिराळकर यांनीही माझ्या विनंतीवरून शिलालेखाचे छायाचित्र मला उपलब्ध करून दिले. याबद्दल या दोघांचाही मी आभारी आहे. त्यांच्या आधारे शिला-लेखाचे पुनर्वाचन करून ते व त्यावरील चर्चा या लेखात करीत आहे. वाचन ताडून पाहाता यावे म्हणून सोबत शिलालेखाच्या ठशावरून घेतलेले छायाचित्रही जोडले आहे. गुरुवर्य डॉ. मिराशी यांनी केलेल्या मार्गदर्शनाबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

## वाचन

शिलालेखाचा ठसा व त्याचे छायाचित्र यांवरून शिलालेखाचे वाचन पुढीलप्रमाणे करता येईल असे मला वाटते :—

१. **स्वस्ति ।। सत्रासे कालिदासे द्रव–**

२. **ति विगलति क्वापि कर्ण्णाटदण्डे**

३. पाण्ड्चे कुध्रस्य रंध्रं पटति झटि-
४. ति च भ्रश्यति स्वेपि सैन्ये [।*] भानौ
५. पूर्व्वाद्रिसानौ भ्रमति भुजबलः श्री-
६. न(ज)गद्देवदेवो लक्षं धीरः प्रवी[रः]
७. [अ]जयदिह् वृढः कालमेघाधि-
८. रूढः ।। अश्वच्छामकवेः श्लोकः ।

श्री. शिराळकर यांनी पहिल्या ओळीतील 'कालिदासे' हा शब्द 'क्षोणिदासे' असा वाचला आहे. वस्तुतः तसे वाचन करण्याचे काही कारण नव्हते. या शब्दातील आरंभीची दोन्ही अक्षरे 'कालि' अशी स्पष्ट आहेत. त्यातील क, क्ष म्हणून वाचता येणे अशक्य आहे. सहाव्या ओळीतील लक्ष या शब्दातील क्ष बरोबर तो ताडून पाहिल्यास हे स्पष्ट होईल. तीच गोष्ट त्यातील ल या अक्षराविषयी. अन्यत्र अनेक शब्दांत ल आलेला आहे. त्यासारखाच या शब्दातील ल सुद्धा स्पष्ट आहे. दुसऱ्या ओळीतील शेवटचा शब्द 'दत्ते' असा नसून 'दण्डे' असा आहे. त्यातील शेवटच्या अक्षरात त् ला त लावलेला नसून ण् ला ड जोडलेला आहे. तिसऱ्या ओळीतील दुसरे अक्षरही याच रीतीने ण्ड्चे असे कोरलेले आहे. त्यापूर्वीचे अक्षर पा हे रा म्हणून वाचण्याचेही कारण नाही. पाण्ड्चे असाच तो शब्द स्पष्ट आहे. त्यापुढील शब्द शिराळकरांनी 'क्रूद्धस्वर' असा वाचला आहे. त्यातील पहिली तीन अक्षरे 'कुध्रस्य' अशी वाचली पाहिजेत, हे शिलालेखाच्या ठशावरून स्पष्ट होईल. चौथ्या ओळीतील पहिल्या अक्षरानंतरचा शब्द 'वर्षस्यति' असा त्यांनी का वाचला ते कळत नाही. त्यांनी वाचलेले त्यातील पहिले अक्षर व नसून ते च आहे. आणि त्यापुढील तीन अक्षरांचे वाचन 'भ्रश्यति' असे स्पष्ट आहे. त्यांच्या वाचनातील महत्त्वाच्या शब्दांकडेच येथे लक्ष वेधले आहे. या श्लोकाच्या आलंकारिक अर्थाच्या कल्पनेने त्यांच्या मनाचा वेध घेतलेला असल्यामुळे असे चुकीचे वाचन त्यांच्याकडून झाले असावे असे वाटते.

### मालवराव जगद्देव

प्रस्तुत श्लोकाचा अर्थ पाहण्यापूर्वी त्यात उल्लेखिलेला जगद्देव कोण, हे आधी पाहू. कारण त्यामुळे श्लोकाचा अर्थ लावण्याला मदत होईल. सहाव्या ओळीतील आरंभीचे अक्षर, तेथील शिळा फुटली असल्यामुळे 'न' असे दिसते; पण वस्तुतः ते 'ज' आहे. तेथील शब्दाचे वाचन श्री. शिराळकरांनी 'जगद्देव' असे केले आहे. ते बरोबर आहे. श्री. शिराळकर यांनी या जगद्देवाचा शोध घेण्याचा

प्रयत्न केला आहे. परंतु, सत्याच्या अगदी जवळ जाऊनही शेवटी 'प्रस्तुत शिलालेखातील जगद्देव व अनुल्लिखित राजा कोण असावा हे ठामपणे सांगता येत नाही' असे म्हणून त्यांनी तो प्रश्न अनिर्णीत ठेवला आहे. त्यांनी आरंभी म्हटल्याप्रमाणे 'जगद्देव हा मालव नृपती उदयादित्याचा मुलगा आहे.' हेच खरे आहे. त्याचे एक महत्त्वाचे कारण असे: मालवराज जगद्देव याचे दक्षिण प्रांतात आतापर्यंत तीन शिलालेख उपलब्ध झालेले आहेत. एक, यवतमाळ जिल्ह्यातील पुसद गावापासून सुमारे १० मैलांवरील डोंगरगाव येथे. दुसरा, आंध्र प्रदेशातील अदिलाबाद जिल्ह्यातील जयनद या गावी, आणि तिसरा, बीड जिल्ह्यातील धर्मापुरी या गावी. डोंगरगाव येथील शिलालेखाचा काळ शके १०३४, तर धर्मापुरी येथील शिलालेखाचा काळ शके १०५६. त्यावरून, शकाच्या अकराव्या शतकात डोंगरगाव (यवतमाळ जिल्हा) ते धर्मापुरी (बीड जिल्हा) या प्रदेशात परमार नृपती मालवराज जगद्देवाचे राज्य होते, असे दिसून येते. प्रस्तुत शिलालेखाचे प्राप्तिस्थळ राणी सावरगाव या विभागातच आहे. राणी सावरगाव परभणी जिल्ह्यात असून ते धर्मापुरीच्या पूर्वेस सुमारे ७५ मैल आहे. यावरून तेथे सापडलेल्या या शिलालेखात निर्देशिलेला जगद्देव हा परमारनृपती मालवराज जगद्देवच असावा असे अनुमान करणे चुकीचे होणार नाही.

या अनुमानाला निश्चिती प्राप्त करून देणारा महत्त्वाचा पुरावा असा की, या शिलालेखातील जगद्देवाच्या पराक्रमाची स्तुती करणाऱ्या श्लोकाच्या कर्त्याचे नाव '**अश्वच्छामकवेः श्लोकः**' असे शिलालेखाच्या शेवटी आले आहे. आतापर्यंत उपलब्ध झालेल्या जगद्देवाच्या उपरोक्त तीन शिलालेखांपैकी जयनद येथील शिलालेखातील जगद्देवाची प्रशस्तीही याच कवीने लिहिलेली आहे. त्यातील शेवटचा श्लोक असा :

**लभतां जगतां श्रोत्रैः संगमं हृदयंगमा ।**
**सज्जनन्यस्तभारेयमश्वत्थामकवेः कृतिः । ॥२०॥**

(एपि. इंडिका. व्हॉ. २२. पृ. ६२)

या दोन्ही शिलालेखांतील प्रशस्तींचा लेखक अश्वत्थाम कवी हाच असल्यामुळे राणी सावरगाव शिलालेखातील जगद्देव हा जयनद शिलालेखातील परमारनृपती मालवराज जगद्देवच असावा असे निश्चितपणे म्हणण्याला हरकत नाही. राणी सावरगाव शिलालेखात, जयनद शिलालेखाप्रमाणेच कालनिर्देश नसला तरी तो शकाच्या अकराव्या शतकाच्या पूर्वार्धात लिहिला गेला असावा असे स्थूल मानाने म्हणावयास हरकत नाही.

श्लोकाचा अर्थ

कोणत्या तरी शत्रूवर (त्याचे नाव श्लोकात आलेले नाही) कालिदास, कर्णाट-दण्ड, पांड्य, जगद्देव इत्यादी मिळून चाल करून गेले असताना त्यांतून फक्त जगद्देवाने एकट्याने शत्रूला जिंकले, असे वर्णन करण्याचा कवीचा आशय असावा असे वाटते. भयभीत झालेला कालिदास पळू लागला असताना, कर्णाटांचे सैन्य (दण्ड) थकून भागून गेल्यामुळे पराभूत होत असताना, पांड्य (राजा किंवा त्याचा सेनासमूह) (पराजित होऊन) पर्वताच्या (कुध्रस्य) छिद्रात, अर्थात दऱ्याखोऱ्यांत शिरले असताना, किंवा दऱ्याखोऱ्या झाकून टाकीत असताना, इतकेच नाही तर आपले स्वतःचे (जगद्देवाचे) ही सैन्य माघार घेत असताना, उदयाचलाच्या शिखरावर म्हणजेच पूर्व दिशेला भानू (सूर्य) भ्रमण करीत असताना आपल्या बाहूंच्या बळावर पराक्रम गाजविणाऱ्या धैर्यशील वीरश्रेष्ठ श्रीजगद्देवाने, कालमेघावर अढळ आरूढ होऊन आपले लक्ष्य जिंकले, (त्याच्यावर विजय मिळवला), असा या श्लोकाचा भावार्थ आहे.

चालुक्यनृपती विक्रमादित्य सहावा याच्या एका सेनापतींचे नाव कालिदास असे होते. आहवमल्ल सोमेश्वर पहिला याचा मधुवरस नावाचा एक सेनाधिपती होता. त्याचा हा मुलगा. कालिदास-द्वितीय म्हणून तो प्रसिद्ध आहे. (अर्ली हिस्टरी ऑफ दी डेक्कन–यज्ञदानी. पृ. ३९६). गणेशवाडी शिलालेखातील भीमनाथ प्रशस्तीचा कवी 'कालिदास दंडनायक' तो याहून वेगळा होय. मधुवरसपुत्र कालिदास विक्रमादित्याच्या कारकीर्दीत प्रसिद्ध होता. राणी सावरगाव येथील प्रस्तुत शिलालेखात निर्देशिलेला कालिदास हाच असावा.

'कर्णाटदण्ड' हा शब्द होयसळ नृपतींच्या सैन्याला उद्देशून वापरला असणे शक्य आहे. 'दण्ड' म्हणजे सैन्य, असा त्या शब्दाचा एक अर्थ आहे. 'विश्व' कोशात 'दण्डो यमे मानभेदे लगुडे **दमसैन्ययोः**' असे या शब्दाचे अनेक अर्थ दिले आहेत. दण्डाधिप, दण्डाधिकारी हे शब्द सेनापती या अर्थाने योजले जातात ते याचमुळे. 'कर्णाटदण्ड' म्हणजे कर्नाटकांचे सैन्य. 'कर्णाट' हा शब्द कानडी प्रदेशातील चालुक्य नृपतीसाठी जसा वापरतात तसा तो होयसळ नृपतीसाठीही वापरतात. कारण त्यांचेही राज्य (दक्षिण) कर्नाटकातच होते. होयसळनृपती द्वितीय नरसिंह याला जिंकणाऱ्या एका पल्लव नृपतीला 'कर्णाटभूपमानमर्दन' हे विशेषण लावलेले आढळते. (एपि. इंडिका, व्हॉ. २२, पृ. ४५) त्यावरून 'कर्णाटदण्ड' हा शब्द होयसळांच्या सैन्याला उद्देशून वापरला असणे शक्य आहे, असे वाटते.

तथापि, 'कर्ण्णाटदण्ड' हा शब्द चालुक्यांच्या सैन्याला उद्देशूनही वापरला असणे शक्य आहे. तसे मानल्यास श्लोकाच्या अर्थात थोडा बदल होईल. चालुक्य विक्रमादित्याचा सेनापती कालिदास भयभीत होऊन पळत असताना (द्रवति), आणि त्याचे कर्ण्णाट सैन्य थकून भागून गेल्यामुळे पराभूत होत असताना—असा पहिल्या ओळीचा अर्थ करता येईल. अर्थात, त्यामुळे, चालुक्य, पांड्य आणि जगद्देव कोणत्या तरी शत्रूवर चाल करून गेले असताना केवळ जगद्देवाने एकटयाने शत्रूला जिंकले, असा भावार्थ घेता येईल. असे केल्यास या युद्धप्रसंगाची ऐतिहासिक संगती लावून, ज्यावर जगद्देवाने विजय मिळवला तो शत्रू कोण हेही निश्चित करता येईल असे वाटते. हा शत्रू होयसळ नृपती वीर बल्लाळ (शके १०२२ ते १०३२) असावा. होयसळ हे स्वतःला चालुक्यांचे मांडलीक म्हणवीत असले तरी त्यांच्यातील स्पर्धा प्रसिद्ध आहे. चालुक्यांचा प्रदेश जिंकण्याचा त्यांचा नेहमी प्रयत्न असे. वीर बल्लाळ आणि मालवेश्वर जगद्देव यांच्यातील एका भीषण युद्धाचे वर्णन होयसळांच्या शिलालेखात आढळते. (एपि. कर्नाटका, भा. २, पृ. ३४९) त्याच प्रसंगाचा उल्लेख प्रस्तुत जगद्देव-प्रशस्तीच्या श्लोकात असावा. यावेळी विक्रमादित्य सहावा हा पूर्वेकडील चोल नृपती कुलोत्तुंग याच्यावरील स्वाऱ्यांत गुंतला होता. बहुधा, हे लक्षात घेऊनच 'भानौ पूर्व्वाद्रिसानौ भ्रमति'—हा उल्लेख कवीने केला असावा. विक्रमादित्य पूर्वेकडील स्वाऱ्यांत गुंतलेला पाहून वीर बल्लाळ होयसळाने त्याच्या प्रदेशावर स्वारी केली असताना चालुक्य सेनापती कालिदास, त्याच्या आधिपत्या-खाली असलेले कर्ण्णाट सैन्य, पांड्य नृपती व जगद्देव यांनी मिळून त्यांचा प्रतिकार केला असावा. त्यावेळी जगद्देवाने एकटयाने मिळविलेल्या यशाचे वर्णन प्रस्तुत श्लोकात आहे, असे म्हणता येते.

'पाण्ड्य' नृपतीचे राज्य भारताच्या दक्षिण टोकाच्या पूर्व बाजूकडील तामिळ प्रदेशात होते हे इतिहासज्ञांना ठाऊक आहेच. या श्लोकातील 'भानौ पूर्व्वाद्रिसानौ भ्रमति' हे केवळ निसर्गवर्णन समजायचे की एखाद्या राजाला उद्देशून हे शब्द योजले असावे हा प्रश्न आहे. मला असे वाटते की, 'भानु' हे उपमेय चालुक्यनृपती विक्रमादित्य सहावा याला उद्देशून वापरले असावे. त्याच्या नावातील 'आदित्य' या शब्दाचाच पर्याय 'भानु' होय. उदयाचलाच्या शिखरावर सूर्य भ्रमण करीत असताना; म्हणजेच विक्रमादित्याचा उदय होऊन तो राजसिंहासनावर बसला असताना; किंवा, यापूर्वी सुचवल्याप्रमाणे पूर्वेकडील नृपती कुलोत्तुंग चोल याच्या प्रदेशात तो भ्रमण करीत असताना—असा अर्थ कवीला अभिप्रेत असावा. आपला वडील भाऊ द्वितीय सोमेश्वर चालुक्यांच्या सिंहासनावर असताना विक्रमादित्याने

इतर अनेक राजांशी संगनमत करून त्याला पदच्युत करून कैदेत टाकले व आपण सिंहासन बळकावले हा इतिहास प्रसिद्ध आहे. यावेळी द्वितीय सोमेश्वर आणि कुलोत्तुंग चोल एक झाले होते ; तर त्यांच्या विरुद्ध लढण्यासाठी विक्रमादित्याने होयसळ, पांड्य इत्यादींचे साह्य मिळवून विरोधाची फळी उभारली होती असे इतिहासावरून दिसून येते. युद्ध संपून विक्रमादित्य सिंहासनावर बसल्यानंतरही ठिकठिकाणी लहानमोठ्या लढाया चालू होत्या. अशा एखाद्या प्रसंगी विक्रमादित्य पूर्वेकडे कुलोत्तुंग चोलाशी युद्ध करण्यात गुंतला आहे हे पाहून होयसळ वीर बल्लाळाने चालुक्यांच्या एखाद्या भागावर स्वारी केली असताना विक्रमादित्याचा सेनापती कालिदास याने चालुक्य, पांड्य, जगद्देव इत्यादिकांच्या सैन्याच्या साह्याने त्याला तोंड दिले. परंतु या लढाईत कालिदास हा स्वतः भयभीत होऊन पळून जाऊ लागला, त्याचे सैन्य पराभूत होऊन गळून गेले, पांड्य राज्याचे सैन्य दुभंगून सैरावैरा पळत असताना जवळच्या पर्वतातील दऱ्याखोऱ्या त्यांनी व्यापल्या, त्यांचा त्यांनी आश्रय घेतला; इतकेच नाही त्याच वेळी खुद्द जगद्देवाचेही सैन्य भ्रष्ट झाले, पराभूत झाले. शत्रूकडून सर्वांची अशी दाणादाण होत असताना धैर्यशाली आणि शूरवीर जगद्देव स्वतः समरांगणात उतरला. कालमेघाप्रमाणे असलेल्या त्या सर्व सैन्याला काबूत आणून, किंवा 'कालमेघ' नावाच्या आपल्या घोड्यावर दृढपणे आरूढ होऊन त्याने स्वतःच्या बाहुबलाने—पराक्रमाने आपल्या 'लक्ष्या'वर—शत्रूवर विजय मिळवला. अशी जगद्देवाच्या पराक्रमाची प्रशस्ती प्रस्तुत श्लोकात कवीने गुंफली आहे.

ही प्रशस्ती त्याने आलंकारिक रीतीने केली आहे यात शंका नाही. त्याने वापरलेल्या 'द्रवति', 'विगलति', 'पटति' इत्यादी वर्तमानकालवाचक धातुसाधितांवरून व 'कालमेघाधिरूढः' या जगद्देवाला लावलेल्या विशेषणावरून दिसून येईल. 'कालमेघोधिरूढः' असे या शब्दांचे वाचन न करता ते 'कालमेघाधिरूढः' असेच केले पाहिजे. शिलालेखाच्या ठशात या शब्दातील **घा** वर जी मात्रा म्हणून वाचली गेली आहे ती वस्तुतः मात्रा नसून वरील ओळीतील **प्र** या अक्षराचा तो लांबलेला दंड होय. अन्यत्र ज्या मात्रा कोरलेल्या आहेत त्यांचे वळण डावीकडे झुकलेले दिसते. तसे येथे मुळीच नाही. त्यामुळे हा शब्द 'कालमेघाधिरूढः' असाच वाचला पाहिजे. जगद्देवाचे ते विशेषण आहे. ज्यावर आरूढ होऊन त्याने आपल्या लक्ष्यावर विजय मिळवला ते कालमेघ म्हणजे कालिदास, कर्णाटदण्ड, पाण्ड्य आणि स्वसैन्य. (कालमेघ हे कदाचित जगद्देवाच्या घोड्याचे नावही असेल). असे असल्यामुळेच त्याचे पराभव वर्णन करण्यासाठी द्रवति, विगलति इत्यादी द्व्यर्थी शब्दांची योजना कवीने केली आहे. **द्रु**=गळणे, वाहणे, पलायन करणे; **विगल्**=गळणे;

पराभूत होणे, **पट्**=दुभंगणे; शिरणे इत्यादी. 'भ्रश्' या शब्दाचाही खाली पडणे, गळणे आणि पराभूत होणे अशा दोन अर्थांनी येथे उपयोग केलेला आहे. असा त्यांचा अर्थ लावला म्हणजे या श्लोकाचे सौंदर्य व कवीला अभिप्रेत असलेला अर्थ कळून येईल. तो व्यक्त करीत असताना व्याकरणाच्या दृष्टीने कोणतीही सदोष रूपे त्याने वापरली नाहीत. अर्थात, 'त्याला भाषेचा व्यवस्थित वापर करता आला नाही' किंवा त्याचे संस्कृत भाषेवर प्रभुत्व नव्हते असे लांछन कवीला लावण्याचे कारण नाही.

# ११

## चालुक्य नृपती सहाव्या विक्रमादित्याच्या काळचे गणेशवाडी शिलालेख

(चालुक्य विक्रम संवत २४)

### उपलब्धी व वर्णन

गणेशवाडी (ता. निलंगा, जिल्हा उस्मानाबाद) येथील केशव भारती समाधी-जवळच्या या शिलालेखाची माहिती तेथील सरपंचाकडून महाराष्ट्र शासनाच्या औरंगाबाद येथील पुरातत्त्व विभागाला इ. स. १९६४ मध्ये मिळाली, तेव्हा कार्यालयातील संशोधन–सहायक श्री. न. शे. पोहनेरकर व श्री. हरिहर ठोसर यांनी तेथे जाऊन लेखांचे ठसे घेतले आणि त्यांचे वाचन करून एक त्रोटक टिपण तयार केले. ते त्यावेळी वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाले. त्यानंतर मात्र त्यावर कुणीही काही लिहिले नाही, किंवा शिलालेखांचे संपादन केलेलेही आढळले नाही. म्हणून महाराष्ट्र शासनाच्या पुरातत्त्व व पुराभिलेख विभागाचे संचालक कै. डॉ. मो. गं. दीक्षित यांना प्रस्तुत शिलालेख संपादन करण्याची मी परवानगी मागितली. त्यांनी ती मोठ्या आनंदाने दिली. इतकेच नाही तर शिलालेखांचे स्वच्छ ठसे मला उपलब्ध करून दिले. याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. त्या ठशां-वरून प्रस्तुत शिलालेखांचे संपादन मी करीत आहे.

या कोरीव लेखांच्या दोन शिळा आहेत. पहिल्या शिळेचा आकार १५० × ८० सेंटीमीटर असून तिच्यावर प्रारंभी चंद्र, सूर्य, मंगल कलश आणि सवत्स धेनू यांच्या आकृती व त्यानंतर नागरी लिपीत संस्कृत भाषेत ५२ ओळींचा मजकूर कोरलेला आहे. दुसऱ्या शिळेचा आकार १५३ × ६४ सेंटीमीटर असून तिची जाडी ३३ सेंटीमीटर आहे. या शिळेच्या समोरील बाजूवर प्रारंभी नंदी, शिवलिंग व त्या-समोर उभा असलेला एक विनम्र भक्त यांच्या आकृती कोरलेल्या असून त्यानंतर नागरी लिपीतील संस्कृत भाषेत ५० ओळींचा मजकूर कोरलेला आहे. याच शिळेच्या जाडीच्या डाव्या बाजूवर ५२ ओळींचा मजकूर नागरी लिपीत व संस्कृत भाषेत कोरलेला आहे.

या दोन्ही शिळांवरील मजकुराचे निरीक्षण केले म्हणजे असे दिसून येते की, कल्याण येथील चालुक्य नृपती विक्रमादित्य सहावा याचा सेनापती भीम याची प्रशस्ती यावर प्रामुख्याने कोरलेली आहे. पहिल्या शिळेवर तिची सुरवात होते व दुसऱ्या शिळेच्या समोरच्या बाजूवरील १२ व्या ओळीत ती संपते. त्यानंतर शिवलिंगी संतानातील काही आचार्यांची वर्णने त्यात आलेली आहेत. या शिळेच्या जाडीच्या डाव्या बाजूवर भीमनाथाचा दानलेख कोरला असून तो अपूर्ण असावा असे वाटते. कारण त्यातील शेवटच्या ओळीत शेवटी 'पुनरपि' असा शब्द आलेला आहे. त्यावरून त्यापुढे आणखी काही मजकूर निश्चित असला पाहिजे. या शिळेवर दुसऱ्या कोणत्याही ठिकाणी तो आढळत नाही. एखाद्या तिसऱ्याच शिळेवर कदाचित तो कोरण्यात आला असावा. पण सध्या तरी अशी तिसरी शिळा त्या ठिकाणी आढळत नाही. विवेचनाच्या दृष्टीने सोयीचे व्हावे म्हणून प्रथम या दानलेखाचे संपादन करीत आहे.

१

## भीमनाथाचा दानलेख

### वर्णन

गणेशवाडी येथील केशवभारती यांच्या समाधीजवळील क्र. २ च्या शिळेच्या डाव्या बाजूवर भीमनाथाचा प्रस्तुत दानलेख कोरलेला आहे. शिळेच्या या बाजूकडील उंची १५३ सेंटीमीटर व रुंदी ३३ सेंटीमीटर आहे. तिच्या वरील भागाकडील उजवी बाजू फुटलेली असल्यामुळे आरंभीच्या २० ओळींच्या शेवटची काही अक्षरे नाहीशी झालेली आहेत. या कोरीव लेखाच्या एकूण ५२ ओळी असून त्या स्पष्ट व ठसठशीत मोठ्या अक्षरांत कोरलेल्या आहेत. प्रत्येक ओळीत साधारणपणे १६ ते १८ अक्षरे असून प्रत्येक अक्षर सुमारे २ सें. मी. उंच व १.५ सें. मी. रुंद आहे. त्यावरून अक्षराच्या आकाराची चांगली कल्पना येईल. कोरकाने लेख काळजीपूर्वक कोरलेला आहे. अनवधानाने काही चुका झाल्या आहेत त्या नगण्य होत. उदा. दुसऱ्या ओळीतील 'जाधिराजः' या अक्षरातील दुसऱ्या **ज** ला शेवटी उभा दंड चुकीने कोरला आहे. त्यामुळे तेथील **ज** या अक्षराचे वळण बिघडले आहे. १८ व्या ओळीत धू ऐवजी बू आणि ४३ व्या ओळीत दु ऐवजी बु ही अक्षरे चुकीने कोरली गेली आहेत. '**चालुक्य**' (ओ. ३, २२) या शब्दातील **क्य** हे जोडाक्षर कोरताना संपूर्ण **क** ला **य** जोडलेला आहे हे विशेष लक्षात घेण्यासारखे आहे.

## अक्षरवटिका

शिलालेखाची लिपी नागरी असून अक्षरांचे वळण उत्तर–भारतीय अक्षरांसारखे आहे. **ए** चे चिन्ह लंबत्रिकोणाकृती आहे. (पाहा. ओ. १२, ४०). व्यंजनांना जोडलेले **ए**कार व **ओ**कार यासाठी सामान्यतः सर्वत्र पृष्ठमात्रांचा उपयोग केलेला आहे. ऐकार व औकार यासाठी मात्र एक पृष्ठमात्रा व दुसरी शिरोरेषेवरील मात्रा यांचा उपयोग आढळतो. **त** आणि **भ** या अक्षरांचे वळण सामान्यतः सारखे आहे. वस्तुतः **भ** च्या चिन्हात दंडापूर्वी आडवी रेषा व तिला जोडून खाली आलेली उभी सरळ रेषा असायला पाहिजे. तशी ती अनेक ठिकाणी आहे. उदा. **भु**वनाश्रय, १ ; त्रि**भु**वन, ११; **भू**म्यां, २७ इत्यादी. तथापि, उभ्या दंडाला जोडलेल्या चिन्हाला क्वचित अर्धवर्तुळाकार आल्यामुळे तो **भ** ऐवजी **त** दिसतो. उदा. 'स्थिता **भू**मिः' ओ. ४० यातील **त** व **भ** पाहा. उलट **त** च्या चिन्हाचा अर्धवर्तुळाकार स्पष्ट नसल्यामुळे ते **भ** सारखे दिसते. उदा. **त**स्याः ओ. २९, **त**तो–ओ. ३५ या शब्दांतील **त** पाहा. चिन्हांच्या साम्यामुळे **ख**–ओ. ३५, **श्च**–ओ. १६, आणि **श्च**–ओ. १७, ३१, ३७ यांच्या वाचनातही संभ्रम निर्माण होण्याचा संभव उद्भवतो. **ध** अक्षराच्या चिन्हाचे वैशिष्टय असे की, त्यावर शिरोरेषा नाही. पण **ध** ला आकाराचा काना जोडताना मात्र **ध** चा उभा दंड व काना यांच्या मध्यभागी एक आडवी रेषा जोडलेली असते. उदा. प्र**धा**नं–ओ.७, नि**धा**न–ओ. ९, वि**धा**नार्थं–ओ. १८, इत्यादी शब्दांतील **धा** पाहा. **स्थ** हे जोडाक्षर लिहिताना **स** च्या खाली जोडलेल्या **थ** अक्षराचे वळण पाहण्यासारखे आहे. ते आजच्या दंडविरहित **ळ** अक्षरासारखे दिसते. उदा. व्यव**स्थि**तायाः–ओ. ३३ ; **स्था**पितं–ओ. ३५, ४१ इत्यादी शब्दांतील **स्थ** पाहा. **ब** साठी सर्वत्र **व** हे अक्षर कोरलेले आढळते. उदा. पदा**ब्ज**–ओ. १२ ; **ब्र**ह्म–ओ. १६ इत्यादी. मा**र्ग्ग**–ओ. ३२. या शब्दातील **र्ग** या जोडाक्षराचे चिन्हही लक्षात घेण्यासारखे आहे. तेथे **ग** च्या दंडाला खाली अर्ध्या **न** चे चिन्ह जोडले आहे. कदाचित ते अर्ध्या **ग** चे चिन्ह असेल; पण तसे दिसत नाही. कारण त्याची गाठ वर वळलेली नसून खाली वळलेली आहे. **ग्न** या जोडाक्षराचे चिन्हही अगदी त्याचसारखे आहे. उदा. आ**ग्ने**य–ओ. ३४, ५१, या अक्षरातील **ग्न** चे चिन्ह पाहा. **ग्ग** मधील अर्ध्या **न** सारखे दिसणारे ते चिन्ह द्वित्तदर्शक असावे असे वाटते. अकराव्या शतकातील ताम्रपटात **ण्ण** हे जोडाक्षर कोरताना **ण** च्या खालीही तसेच चिन्ह जोडलेले आढळते. (विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९६८, पृ. ५४, ५६ पाहा). **ज** आणि **ज्ञ** यांच्या चिन्हांतही काही फरक आढळत नाही. उदा. ओ. ९, १०, १४ पाहा.

**भाषा**

या कोरीव लेखाची भाषा संस्कृत असून ती शुद्ध आहे. अनुनासिकासाठी परसवर्ण न वापरता बहुधा सर्वत्र अनुस्वार दिलेला आढळतो. अपवाद फक्त सामन्त–ओ. ८, ग्रामाभ्यन्तरे–ओ. १५, तदन्तर्गत–ओ. २३, या शब्दांचा आहे. र पूर्वी आलेली व्यंजने काही ठिकाणी द्वित्त केलेली आहेत. उदा. मार्त्तंडः–ओ. १०, निवर्त्तनानां–ओ. २७, मार्ग्ग–ओ. ३२, नैर्ऋत्य–ओ. ४६. तथापि, मार्गशीर्षे–ओ. २३ या शब्दातील **ग** अक्षर मात्र द्वित्त करून लिहिलेले नाही.

**कालनिश्चिती**

या दानलेखाचा काळ 'श्रीमच्चालुक्यविक्रमनृपकाले चतुर्विंशतितमे प्रमाथि संवत्सरे तदन्तर्गत मार्गशीर्षे मासे पौर्णमास्यां सोमवारे सोमग्रहणपर्वणि'—असा ओ. २२ ते २४ मध्ये निर्दिष्ट केलेला आहे. हा 'चालुक्य विक्रमनृप काल' म्हणजे काय हे प्रथम पाहिले पाहिजे. प्राचीन कोरीव लेखांत सामान्यतः प्रसिद्ध शक वर्षाचा निर्देश आढळतो. चालुक्य वंशातील विक्रमादित्य सहावा याच्या कारकीर्दीपूर्वीही कालगणनेसाठी बहुधा या शक वर्षाचाच उपयोग करण्यात येत असे. पण सहाव्या चालुक्य विक्रमादित्याने ती पद्धती मोडून आपल्या नावाने नवीन शक सुरू केला. तो 'चालुक्य विक्रम शक' या नावाने प्रसिद्ध आहे. या विक्रमादित्याच्या २३ व्या राज्यारोहण वर्षात कोरल्या गेलेल्या गदग येथील कानडी शिलालेखात (एपि. इंडिका, वर्ष २५ क्रमांक २४ पृ. ३५१) त्याच्या या कर्तृत्वाचा मोठा गौरवपूर्ण उल्लेख केलेला आढळतो. तो पुढीलप्रमाणे—

> **'एसव शकवर्षमंमाणिसि विक्रमवर्षमेंदु तन्नय पेसरं वसुमतिगे नेगळचिद साहसिगं जगदेकदानि धर्म्मविनोद ॥'**

याचा भावार्थ असा : 'सुप्रसिद्ध शकवर्षाचा अंत आणि विक्रम वर्ष सुरू करून पृथ्वीतलावर आपले नाव दैदीप्यमान करणारा तो वीर होता. तसेच तो जगदेकदानि म्हणजे जगातील एक अपूर्व दानी व धर्मकार्यात आनंद मानणारा होता.'

वडगेरी (जिल्हा सोरापूर, कर्नाटक) येथील शिलालेखात 'नल संवत्सरातील फाल्गुन शुद्ध पंचमी, गुरुवार' रोजी आपल्या पट्टबंधमहोत्सवाच्या वार्षिकोत्सव प्रसंगी या विक्रमादित्याने दिलेल्या दानांचा उल्लेख आहे. नल संवत्सर शकवर्ष ९९८ मध्ये होते. त्यावरून विक्रमादित्याचा राज्यारोहण काल, आणि अर्थात

चालुक्य विक्रमशकाचा प्रारंभ काल (epoch) शकवर्ष ९९७ (=इ. स. १०७५–७६) हा समजण्यात येतो. यावरून दिसून येईल की, चालुक्य विक्रम शककालात ९९७ मिळविले म्हणजे चालू शक वर्ष, आणि त्यात ७८ मिळविले म्हणजे इसवी सन काढता येतो. प्रस्तुत कोरीव लेखातील दान चालुक्य विक्रम शकाच्या २४ व्या वर्षी (चतुर्विंशति) दिलेले आहे. अर्थात, ९९७+२४ = शकवर्ष १०२१ (= इ. स. १०९९) हा या दानलेखाचा काळ ठरतो. पिल्ले यांच्या जंत्रीवरून संवत्सरचक्रगणनेच्या दाक्षिणात्य पद्धतीनुसार प्रमाथी संवत्सर शके १०२१ मध्ये होते असे दिसून येते. पण गत शक १०२१ प्रमाथी संवत्सराच्या मार्गशीर्ष महिन्यातील पौर्णिमेला जंत्रीनुसार बुधवार येतो. त्या दिवशी चंद्रग्रहण होते. तेव्हा शिलालेखातील कालनिर्देश वाराच्या दृष्टीने बरोबर ठरत नाही. 'सोमवार' याऐवजी या ठिकाणी **सौम्यवार**' असा शब्द असावा व कोरकाने तो चुकीने 'सोमवार' असा कोरला असावा असे वाटते. या दिवशी इंग्रजी तारीख इ. स. १०९९, नोव्हेंबर ३०, बुधवार ही होती.

**विषय**

चालुक्यनृपती विक्रमादित्य (सहावा) याच्याकडून त्याचा महाप्रधान भीमनाथ याने पिप्पलग्राम हे गाव मिळविले व तेथे भीमसमुद्र नावाच्या सरोवराच्या काठावर ब्रम्हा-विष्णु-महेश्वरादि देवतांची देवालये बांधली. त्यांच्या पूजा-अर्चेसाठी, व तेथील सरस्वती मंडपातील तपस्वी आणि विद्यार्थी यांच्या अन्न-धान्यसंवर्धनासाठी पिप्पलग्राम येथील पाचशे निवर्तने भूमी तत्पुरुष पंडिताला दान दिली. त्याचप्रमाणे भीमेश्वर देवाच्या 'पुरविधानार्थ' गावात राहण्यासाठी जागा दिली, हे नमूद करणे हा या दानलेखाचा मुख्य विषय आहे.

प्रारंभी त्रिभुवनमल्लदेव अर्थात विक्रमादित्य याचा निर्देश आहे. (ओ. १–४) 'त्रिभुवनमल्लदेव' या शब्दानंतर 'अभिनव' हा शब्द आलेला असून त्यापुढची अक्षरे नाहीशी झालेली आहेत. तथापि, त्यांतील पहिले अक्षर ऱ्हस्व इकारयुक्त असावे हे स्पष्ट दिसते. अवशिष्ट चिन्हावरून ते **वि** असावे असे मला वाटते. ते लक्षात घेता तेथे 'विक्रमः' किंवा 'विक्रमार्कः' असा शब्द असावा. तसे असल्यास हा संपूर्ण शब्द 'अभिनवविक्रमार्कः' असाही पूर्ण करता येईल. विक्रमादित्यासाठी 'विक्रमार्क' हा शब्द पुढील भीमनाथ प्रशस्तीत (ओ. ४) वापरला आहे. चालुक्यांच्या वंशात विक्रमादित्य नावाचे अनेक राजे होऊन गेले, त्यात हा 'अभिनव' म्हणजे अपूर्व, पूर्वीच्या विक्रमादित्यापेक्षा विशेष

कर्तृत्ववान होता. म्हणून त्याचा नामनिर्देश 'अभिनव–विक्रमार्कः' या शब्दाने केलेला असावा असे म्हणण्यास हरकत नाही.

त्रिभुवनमल्लदेवाचा अर्थात सहाव्या विक्रमादित्याचा निर्देश करताना समस्त-भुवनाश्रय, परमभट्टारक, महाराजाधिराज, परमेश्वर, सत्याश्रयकुलतिलक, चालुक्याभरण ही त्याची बिरुदे निर्दिष्ट केली आहेत. विक्रमादित्य आणि त्याचे मांडलीक यांचे जे अनेक शिलालेख उपलब्ध झाले आहेत त्या सर्वात विक्रमादित्याच्या नावामागे या बिरुदांचा उल्लेख केलेला आढळतो. तथापि, ही केवळ विक्रमादित्याचीच बिरुदे होती असे नाही. त्याच्या पूर्वीच्या अनेक चालुक्य नृपतींच्या नावामागेही हीच बिरुदे आढळतात. उदा. सहाव्या विक्रमादित्यापूर्वी राज्य करणारा प्रथम सोमेश्वर याचा पुलगुंट शिलालेख (ए. इं. वर्ष १६. क्र. ९, पृ. ५४), तडखेल शिलालेख (इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम नांदेड डिस्ट्रिक्ट. पृ. ६), गवरवड शिलालेख (ए. इ. वर्ष १५ क्र. १३, पृ. ३३९) इत्यादी पाहा. विक्रमादित्य सहावा याच्या कोरीव लेखांत 'त्रिभुवनमल्लदेव' हे त्याचे नाव असले तरी वस्तुतः तेही त्याचे बिरुद होय. त्यापूर्वीच्या नृप-तींनीही अशी बिरुदे धारण केली होती व त्याच बिरुदांनी त्यांचा प्रामुख्याने उल्लेख होत होता. उदा. प्रथम सोमेश्वर याचे बिरुद 'आहवमल्ल' व 'त्रैलोक्यमल्ल' होते, द्वितीय सोमेश्वराचे बिरुद 'भुवनैकमल्ल' होते., त्याच-प्रमाणे सहाव्या विक्रमादित्याचे बिरुद 'त्रिभुवनमल्ल' होते. त्यामुळे या बिरुदानंतर 'अभिनव (विक्रमार्कः)' असे त्याचे नाव असावे या तर्काला पुष्टी मिळते. 'सत्याश्रयकुलतिलक' या बिरुदातील 'सत्याश्रय' म्हणजे हर्षवर्धनाचा पराभव करणारा द्वितीय पुलकेशी होय. त्याचे अपूर्व पराक्रम लक्षात घेता नंतरच्या चालुक्य नृपतींनी आपणाला 'सत्याश्रयकुलतिलक' म्हणवून घ्यावे यात द्वितीय पुलकेशीच्या पराक्रमांचा यथार्थ गौरव होय.

विक्रमादित्य सहावा सुखसमाधानाच्या कथांनी विनोदात कल्याणपूर येथून आपल्या साम्राज्यलक्ष्मीचे शासन चालवीत होता. त्यावेळी भीमनाथ हा त्याचा महाप्रधान होता. ७ ते ११ या ओळींत त्याच्या बिरुदांचे वर्णन आहे. त्यावरून आपल्या कर्तृत्वाने त्याने पाच महाशब्दांचा मान राजाकडून प्राप्त करून घेतला होता असे दिसते. 'पंचमहाशब्द' म्हणजे पाच विशाल वाद्यांचा आवाज. सेनापती, मांडलीक इत्यादींना आपल्या घरासमोर, मिरवणूक किंवा उत्सवप्रसंगी मोठा आवाज करणारी वाद्ये वाजवू देण्याचा सन्मान राजाकडून मिळत असे. ही पाच वाद्ये किंवा हे पाच आवाज कोणते यासंबंधी मतभेद आहेत. फार मोठ्या व्यक्तींनाच हा मान प्राप्त होत असे. तसा तो भीम-

नाथाने विक्रमादित्याकडून प्राप्त करून घेतला होता. तो महासामंताधिपती, व महाप्रचंडदंडनायक होता. दंडनायक म्हणजे सेनापती. महाप्रचंड दंड-नायक हे मोठ्या सेनापतींवरसुद्धा अधिकार असलेल्या महाप्रधानासारख्या श्रेष्ठ अधिकाऱ्यांना प्राप्त होत असलेले बिरुद असावे असे दिसते.

या बिरुदानंतर भीमनाथाच्या व्यक्तिगत गुणांचे वर्णन करणारी काही विशेषणे योजली आहेत. त्यांवरून असे दिसून येते की, भीमनाथ हा शिष्ट म्हणजे सद्‌गुणसंपन्न आणि सन्मान्य अशा लोकांना त्यांनी इच्छिलेले फळ प्राप्त करून देत असे. तो सत्यनिधान अर्थात सत्याचा ठेवा होता. (ओ. ९) सौजन्यरूपी नीलकमलाला (वनज) प्रफुल्लित करणारा तो सूर्य (मार्तंड) होता. सज्जनांच्या ठिकाणी आढळणारे दयालुत्व, नम्रता इत्यादी गुण त्याच्या ठिकाणी होते. इतकेच नाही तर आपल्या आचरणाने इतरांच्याही ठिकाणी हे गुण तो निर्माण करीत असे. (ओ. १०) काश्मीरदेशाच्या मुखावरील तो अलंकार होता. अर्थात, त्याच्यामुळे काश्मीर देशाचे मुख उजळून निघाले होते. या-वरून हा भीमनाथ मूळचा काश्मीर देशातील होता हे स्पष्ट दिसते. (ओ. १०) पुढे संपादिलेल्या भीमनाथाच्या प्रशस्तीवरून याला दुजोरा मिळतो. आपल्या स्वामीची फसवणूक करणाऱ्यांचा तो शिरच्छेद करणारा होता. (ओ. ११) यावरून भीमनाथाची स्वामिभक्ती तर दिसून येतेच, पण त्याने अशा काही राजद्रोह्यांचा निःपात केला असल्याचेही सूचित होते. हे स्वामीवंचक कोण असावेत याविषयी उपलब्ध साधनांवरून तरी माहिती मिळत नाही. त्याच्या या कर्तृत्वामुळे व तो सेनापती असताना त्याने केलेल्या धाडसामुळे त्याला 'साहसोत्तुंग' असे म्हटले आहे. (ओ. १२) याशिवाय अंतःपुरातील सेवकांचाही तो अधिकारी होता (सौविदल्ल=अंतःपुरातील सेवक). अर्थात, राजप्रासादातील अंतःपुराच्या व्यवस्थेचे काम त्याच्याकडे होते असे यावरून दिसून येते. (ओ. १३).

## एक कानडी शिलालेख

या भीमनाथाची माहिती ज्यावरून मिळते असा एक कानडी शिलालेख यापूर्वी लक्ष्मेश्वर (जि. धारवाड) येथे उपलब्ध झालेला आहे. (एपि. इ. वर्ष १६, पृ. ३२) तो चालुक्य विक्रम कालाच्या २७ व्या वर्षीचा (शके १०२४= इ. स. ११०२) असून त्यात या भीम सेनापतीचा 'पादपद्मोपजीवी' माधव भट्ट याने दिलेल्या दानांचा उल्लेख आहे. आपला प्रस्तुत शिलालेख हा उपरोक्त लक्ष्मेश्वर शिलालेखाच्या तीन वर्षे आधीचा आहे. लक्ष्मेश्वर शिलालेखात

भीमनाथाला भीम, भिवणय्या अशा नावांनी संबोधले असून आपल्या शिलालेखातील सर्व बिरुदे त्याच्या नावामागे लावली आहेत. 'सत्यनिधान' या शब्दाऐवजी 'नुडिदंते गंडं' आणि 'सौविदल्लानाम्' ऐवजी 'सावासिगळ' हे कानडी शब्द वापरले आहेत. आपल्या शिलालेखातील माहितीशिवाय लक्ष्मेश्वर शिलालेखातून अधिक माहिती मिळते ती अशी की, तो (राजप्रासादातील) घरादारावरील प्रमुख (मनेवर्गडे) व प्रांतिक नोंदणी अधिकारी (पट्टळेकरण) असून त्यावेळी ७॥ लक्ष अछुपन्नाय कर देणाऱ्या पळसिगे–१२ हजार या प्रदेशावर शासन करीत होता. आपला प्रस्तुत गणेशवाडी शिलालेख हा लक्ष्मेश्वर शिलालेखाच्या ३ वर्षे आधीचा आहे. कदाचित त्यावेळीही तो पळसिगे प्रदेशावर शासन करीत असणे शक्य आहे.

प्रस्तुत गणेशवाडी शिलालेख व उपरोक्त लक्ष्मेश्वर शिलालेख यांच्याही पूर्वी चालुक्य विक्रम शकाच्या २३ व्या वर्षीचा हुणसि हदडलि येथील देवळातील आणखी एक शिलालेख उपलब्ध आहे (देसाई, पी. बी. जैनिझम इन साउथ इंडिया, पृ. २४१). त्यात या भीमनाथाला भिवणय्या म्हटले असून त्याला महाप्रधान, मनेवर्गडे (गृहखात्यावरील अधीक्षक); सहवासिगळ अधिष्ठायक (=सौविदल्लानामधिष्ठायकः); पट्टळेकरण, मन्नेयरध्यक्ष (=कनिष्ठ प्रमुखांचा अध्यक्ष) आणि दंडनायक ही विशेषणे लावली आहेत. याशिवाय विजापूर जिल्ह्यातील इ. स. १०९५ च्या शिलालेखात या भिवणय्याचा उल्लेख आहे. तसेच धारवाड जिल्ह्यातील गदग येथील शिलालेखातही उपरोक्त लक्ष्मेश्वर शिलालेखातील वर्णनाप्रमाणेच त्याचे वर्णन केलेले आढळते (साऊथ इंडियन इन्स्क्रिपशन्स, वर्ष ११, क्रमांक १३९ आणि क्र. १५०).

या भीम सेनापतीच्या वंशाची व गुणांची अधिक माहिती पुढे दुसऱ्या विभागात संपादिलेल्या भीमनाथ प्रशस्तीवरून मिळते. तिचा त्या ठिकाणी विचार करू.

### तत्पुरुष पंडिताला दान

या कोरीव लेखातील दान ज्याला देण्यात आले आहे त्याचे नाव तत्पुरुष पंडित. पिप्पलग्राम येथील देवालये व पाठशाळा यांवरील तो कुलपती असावा हे स्पष्ट आहे. किव्वग्राम येथे राहणाऱ्या वादिरुद्रपंडिताचा शिष्य क्रियाशक्ती पंडित याचा तो शिष्य होता. तो शिवलिंगी संप्रदायाचा असून लाकुलीश्वर आगमाचा अनुयायी होता. त्याची विशेष माहिती येथे संपादन केलेल्या तिसऱ्या भागात आलेली आहे ती पाहावी.

**स्थलनिश्चिती**

विक्रमादित्य सहावा जेथून राज्य करीत होता ते **कल्याणपुर** म्हणजे सध्याचे कल्याणी (जिल्हा बिदर, कर्नाटक राज्य) नावाचे गाव होय. दान दिलेले गाव **पिप्पलग्राम** म्हणजे सध्याचे **हिप्पळगाव** (ता. निलंगा, जिल्हा उस्मानाबाद, महाराष्ट्र राज्य.) सुप्रसिद्ध लातूर या गावाच्या आग्नेय दिशेला १० मैलांवर आहे. संस्कृत शब्दातील **प** चा उच्चार कानडी भाषेत अनेकदा ह होतो. उदा. पुलिकर<हुलिगेरे ; त्याचप्रमाणे पिप्पलग्राम या शब्दाचे हिप्पळगाव हे उच्चारांतर झाले आहे. पूर्वीचे त्या गावाचे हे कानडी नाव अजून चालू आहे. कित्येकदा याच्या उलट प्रकारही झालेला आढळतो. नांदेड जिल्ह्याच्या देगलूर तालुक्यात एक पिप्पळगाव आहे. त्याचे नाव कानडी शिलालेखात हिप्पळगावे असे आढळते. (इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम नांदेड डिस्ट्रिक्ट, क्र. २४). अर्थात तेथे कानडी नावाचे मराठीकरण झाल्याचे आढळून येईल. आपल्या या हिप्पळगावाभोवती पूर्वी प्राकार (वेस) असावा असे ओ. ४६, ४७, ४८ यावरून दिसून येते. ज्या ठिकाणी हे शिलालेख सापडले ते **गणेशवाडी** गाव महाराष्ट्रातील खेड्यांची वर्णक्रमी या पुस्तकात नाही. कारण तो हिप्पळगावाचाच एक भाग समजला जातो. गणेशवाडीलाच हिप्पळगावची वाडी असे म्हणण्यात येते. ती हिप्पळगावच्या दक्षिणेला दोन मैलांवर आहे. पिप्पलग्रामच्या दक्षिण सीमेवर निर्दिष्ट केलेले **शिलाकर ग्राम** म्हणजे सध्या हिप्पळगावच्या दक्षिणेला पण किंचित नैऋत्य दिशेला ४ मैलांवर असलेले **सलगर** हे गाव असावे. उत्तर सीमेवरील **शुष्कग्राम** म्हणजे सध्याचे **सुगाव** असावे. ते हिप्पळगावच्या उत्तरेस पण किंचित वायव्य दिशेला असून ४ मैल अंतरावर आहे. शुष्कग्राम>सुकेगाव>सुगाव असा हा अपभ्रंश झाला असावा किंवा त्या काळातील या गावाचे नाव सुकेगाव असून त्याचे संस्कृत रूप शुष्कग्राम केलेले असण्याचीही शक्यता वाटते.

२

## भीमनाथ प्रशस्ती

एकाच बाजूवर कोरलेल्या क्रमांक १ या शिळेवर प्रारंभ होणाऱ्या लेखाचा आता विचार करू. हा लेख क्रमांक २ च्या शिळेवरील समोरच्या बाजूवर १२ व्या ओळीत संपतो. त्यातील समाप्तिलेखात 'प्रशस्तिमिति शुभम्' असे शब्द आहेत. समाप्तिलेखापूर्वीच्या शेवटच्या श्लोकात देखील 'दिर्गपिता स्वस्तिमत:

प्रशस्तिः' असे शब्द आहेत. त्यावरून हा प्रशस्तिलेख होय यात शंका नाही. ही प्रशस्ती भीमनाथाची होय असे मूळ मजकुरावरून दिसून येते. तेव्हा या लेखाला 'भीमनाथ प्रशस्ती' असे यथार्थ नाव देण्याला हरकत नाही.

## लिपी व अक्षरांचे वळण

शिलालेखाच्या या विभागाचीही लिपी नागरी असून अक्षरांचे वळण उत्तर-भारतीय अक्षरांच्यासारखे आहे. आजच्या देवनागरी वळणाला ते बव्हंशी जुळणारे आहे. यातील वैशिष्टये शिलालेखाच्या पहिल्या विभागातील वैशिष्टयांसारखीच आहेत. त्यामुळे त्यांची पुनरुक्ती करीत नाही. त्यात न आलेल्या काही अक्षरांच्या वैशिष्टयांचा तेवढा उल्लेख या ठिकाणी करतो.

'**ओं** नमः' हे शब्द ओ. १, ६५ व १०२ या ओळींत आलेले आहेत. त्यांतील **ओं** पाहा. आजच्या उ सारख्या चिन्हाने तेथे **ओ** कोरलेला असून त्यावर अनुस्वार दिलेला आहे. त्यावरून आजच्या **उ** सारखे दिसणारे चिन्ह त्याकाळी **ओ** साठी वापरले जात असावे असे दिसते. **उ** हे अक्षर ओ. १ व ५२ मधे आलेले आहे. तेथील **उ** सुद्धा आजच्या **उ** सारखाच आहे, पण त्याच्या पोटात गाठ आहे. त्यावरून **उ** व **ओ** मधील फरक लक्ष्यात येईल. **इ** या स्वराचे लेखन वर दोन व खाली दोन अशी चार पोकळ शून्ये कोरून आणि वरील दोन शून्ये आडव्या पण किंचित तिरप्या रेषेने एकमेकांना जोडून केलेले आहे. (ओ. १७, २४ व ६२ पाहा.).

**य** या अक्षराचे वळण वस्तुतः अतिशय सुंदर आहे. 'जा**यं**ते' ओ. ५४, '**य**दन्न–', 'ध्रि**यं**ते–' ओ. ५६, 'भू**य**स्त्वाद–' '**या**वद**यं**' ओ. ५९ इत्यादी शब्दांतील **य** पाहिल्यास ते दिसून येईल. 'निल**य**त**यं**'–ओ. ४६, 'श्रि**या**'–ओ. ४८, समार्प**य**च्च–ओ. ५०, इत्यादी शब्दांतही ते आढळते. पण हे वळण सर्वत्र सारखे राहिलेले नाही. **य** च्या खालील भागातील गोलाकार व आडवी रेषा नाहीशी होऊन अन्यत्र त्या सर्व भागाला गोलाकार आलेला आहे. उदा. '**यि**या**स**त्व:'– 'पाल**यं**त्विदम्'–ओ. १, इत्यादी शब्दांतील **य** पाहा; आणि जोडाक्षरातील **य** मध्ये तर ही सुंदरता पूर्णपणे नाहीशी होऊन क्वचित त्याला **प** चे आणि क्वचित खाली गोलाकार दिलेल्या दोन उभ्या दंडांचे स्वरूप आलेले आहे. उदा. 'क्षित**यां**', –ओ. १९, 'शकल**स्य**' –ओ. ३, 'प्रत्**यर्थि**'–ओ. ७, 'फल**स्य**'–ओ. १२, 'प्रियस्य' –ओ. १९, '**व्या**कुलाभि'–ओ. ५७, 'शक्नोम्यहम्'–ओ. ५९ यांतील **य** पाहा.

सामान्यतः अनुनासिकासाठी सर्वत्र अनुस्वाराचा उपयोग केलेला आहे. परसवर्णाचा उपयोग अपवादात्मक आहे. उदा. युध्यन्ति–२५, अन्तः–३२, जायन्ते–५४ इत्यादी. अनुस्वाराचा उपयोग करण्याच्या प्रवृत्तीमुळेच 'समुत्पन्ना', 'किन्नर'–हे शब्द 'समुत्पंना'–१२, 'किंनर'–१९ असे लिहिले गेलेले आढळतात.

## भाषा

शिलालेखाची भाषा संस्कृत असून ती निर्दोष आहे. ही संपूर्ण प्रशस्ती श्लोकबद्ध पद्यात्मक आहे. फक्त ओ. ६१ ते ६४ या ओळींतील प्रशस्तिलेखक कवीचा निर्देश गद्यात आहे.

## विषय : भीमनाथ प्रशस्ती

प्रस्तुत लेखात भीमनाथ प्रशस्ती कोरलेली आहे, याचा निर्देश पूर्वीच केलेला आहे. कोरीव लेख क्रमांक १ च्या दानलेखातील दाता भीमनाथ आणि या प्रशस्तीचा नायक भीमनाथ हे एकच होत. कारण, हा भीमनाथ विक्रमादित्याचा प्रधान होता असे दानलेखात (ओ. ७) जसे म्हटले आहे तसेच या प्रशस्तीतही म्हटले आहे. (ओ. १०). राजाजवळून पिप्पलग्राम मिळवून ते तत्पुरुष पंडिताला दान केल्याचा उल्लेख दानलेखातील १४ ते २९ ओळींत आढळतो. त्याच दानाचा उल्लेख प्रशस्तिलेखातील ४४ व ४५ या ओळींतही आढळतो. भीमनाथाने पिप्पलग्राम येथे ब्रम्हा–विष्णु–महेशाची देवळे बांधली हा उल्लेख दोन्हीकडे आहे. (पाहा, दानलेख ओ. १६, १७; भीमनाथ प्रशस्ती, ओ. ४५ ते ४७.) तेव्हा या दोन्ही लेखांतील भीमनाथ ही एकच व्यक्ती होय यात संशय नाही.

प्रस्तुत लेखात भीमनाथालाच भीम (ओ. २४), भीम सेनापती (ओ. १०, १९, ५७), भीमचमूपती (ओ. २१) या नावांनीही संबोधिले आहे. सेनापती, चमूपती या शब्दांनी त्याच्या केवळ अधिकारपदाचा उल्लेख केलेला असावा. मूळ नाव 'भीम' असेच असले पाहिजे. भीमनाथ (ओ. ११, १४, ६१) या शब्दाच्या मुळाशीही मुख्य शब्द 'भीम' हाच होय. तेव्हा तेच त्याचे मूळ नाव असावे. लक्ष्मेश्वर शिलालेखातही त्याला भीम याच नावाने संबोधले आहे (एपि. इंडिका, व्हॉ. १६, पृ. ३२). त्याच लेखात त्याला 'भिवणय्या' असेही म्हटले आहे. ते त्याचे कानडी नाव होय. अर्थात, भीम, भीमनाथ, भिवणय्या, भीमसेनापती, भीमचमूपती ही एकाच व्यक्तीची नावे होत.

### पूर्वपीठिका

या भीमनाथाची पूर्वपीठिका व कौटुंबिक माहिती ११ ते १६ व ३६ ते ४० या ओळींत सविस्तर आलेली आहे. त्यावरून असे दिसून येते की, भीमनाथाचे गोत्र आत्रेय असून (ओ. ११) त्याचे मूळ घराणे हिमालय पर्वतातील काश्मीर देशचे (ओ. १२ व १४). या घराण्यातील विद्वान ब्राम्हणांच्या घोषांनी सर्व दिशा दुमदुमून गेल्या होत्या. भीमनाथाच्या पणजोबांचे नाव आदित्यभट्ट. तो आत्मशास्त्र व वेदार्थविज्ञान यांत पारंगत होता. काश्मीर देशात अत्यंत धर्मनिष्ठ म्हणून सर्व लोक त्याची स्तुतिस्तोत्रे गात असत (श्लो. १३). मोठमोठे यज्ञ करून त्याने आपली पापे नष्ट केली होती. उत्तम गृहस्थाश्रम आचरल्याने त्याचा प्रभाव सर्वप्रसिद्ध होता. वितस्तेला संतुष्ट केल्यामुळें त्याला स्वर्ग दोन बोटे उरला होता. शंकराला संतुष्ट करून त्याने आपल्या कुळाची उन्नती प्राप्त करून घेतली होती (श्लो. १४). यावरून दिसून येईल की, आदित्यभट्ट हा शिवोपासक असून त्याचे गाव काश्मीरमधील वितस्ता (आजचे नाव झेलम) नदीच्या काठावर कुठे तरी असले पाहिजे.

या आदित्यभट्टाचा मुलगा **शीयुभट्ट** हा भीमनाथाचा आजोबा. तो पवित्र धर्मकार्ये करणारा अग्निहोत्री होता. त्यामुळे त्याने सर्व पापे नाहीशी करून त्रैलोक्यात कीर्ती मिळविली होती (श्लो. १५). शीयुभट्टाचा पुत्र वल्लभट्ट हा भीमनाथाचा पिता. अनेक गुणरत्नांची तो खाण असून त्याच्या कीर्तीची पताका उंच होती (श्लो. १६). वल्लभट्टाच्या पत्नीचे नाव जयावती (श्लो. ३२). कृतयुगातील वीरसुता दिती हिने त्रेतायुगात रामनृपतीच्या मातेचा म्हणजे कौसल्येचा अवतार घेतला. द्वापरयुगात तीच देवकीच्या रूपाने आणि आता कलियुगात जयावतीच्या रूपाने अवतरली (श्लो. ३२). वल्लभट्ट आणि जयावती या दांपत्याच्या पोटी **भीमनाथाचा** जन्म झाला. भीमनाथाच्या पत्नीचे नाव जोगलदेवी (श्लो. ३३) अथवा जोगवा. ती पतिव्रता, धर्मपरायण व अतिशय रमणीय असून तिने आपल्या विविध चारित्र्यगुणांनी विशुद्ध कीर्ती मिळविली होती (श्लो. ३५). अनेकांवर तिने उपकार केले होते.

### चालुक्यनृपतो विक्रमादित्य

या प्रशस्तीच्या आरंभी, संसारसमुद्राच्या पार जाण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनी हे 'शिवलिंगी संतान शासन' पाळावे (श्लो. १) अशी आदेशवजा विनंती केली आहे. नंतर चालुक्यांचे दैवत असलेला वराह अर्थात वराहावतार आणि गणेश यांच्या प्रार्थना आलेल्या आहेत (श्लो. २ व ३). त्यानंतर

४ ते ७ या श्लोकांत चालुक्यवंशातील विक्रमार्क म्हणजे विक्रमादित्य नृपतीचे स्तुतिस्तोत्रांनी भरलेले वर्णन आहे. ते नेहमीप्रमाणे अतिशयोक्तिपूर्ण असून त्यावरून ऐतिहासिक स्वरूपाची अशी कोणतीही नवीन माहिती उपलब्ध होत नाही. विक्रमादित्याचे सौंदर्य (श्लो. ४), औदार्य (श्लो. ५), राज्यकर्तृत्व (श्लो. ६) आणि शौर्य (श्लो. ७) यांचे मोठे काव्यमय वर्णन या श्लोकांत आढळते.

हा विक्रमार्क म्हणजे पश्चिम चालुक्यवंशातील सहावा विक्रमादित्य नृपती होय. त्याने इ. स. १०७६ पासून ११२७ पर्यंत राज्य केले. याची कारकीर्द प्राचीन इतिहासात प्रसिद्ध आहे. राज्यकर्तृत्वाबरोबरच त्याचे रसिकत्वही सर्वमान्य होते. अनेक विद्वान आणि कवी याच्या आश्रयाला होते. सुप्रसिद्ध कवी बिल्हण याच्याच दरबारात होता. बिल्हणाने लिहिलेले विक्रमांकदेवचरित हे महाकाव्य याच विक्रमादित्याच्या चरित्राचे वर्णन करणारे होय. आपला प्रशस्तिनायक भीम हा काश्मीर देशातून येऊन याच्या आश्रयाला राहिला असावा. तेथे असताना भीमाने विक्रमादित्याची सेवा करून आपला भाग्योदय करून घेतला असे 'लब्धोदयो भानुपदार्चनेन' (श्लो. १८) या श्लिष्ट वाक्याने प्रशस्तिलेखकाने मोठ्या मार्मिकपणे सूचित केले आहे. क्रमांक १ च्या दानलेखात भीमनाथाला जी बिरुदे आणि विशेषणे लावली आहेत त्यांवरून त्याच्या कर्तृत्वाची चांगली कल्पना येईल.

या प्रशस्तीतही त्याच्या अनेक गुणांचे काव्यमय वर्णन केलेले आढळते तो विक्रमादित्याचा प्रधान असून सेना, विद्वान, धर्म इत्यादिकांतही शिरोमणी होता. त्याचे शौर्य, कलाप्रियत्व, गांभीर्य, दयालुत्व, शैत्य, क्षांती, वाक्पटुत्व, बुद्धिमत्ता इत्यादिकांचे मोठे सुंदर वर्णन या प्रशस्तीत आलेले आहे. प्रशस्तीलेखकाच्या मते तो सर्वगुणसंपन्न होता असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

### भीमनाथाची धर्मकृत्ये व दाने

या भीमनाथाने केलेल्या धर्मकृत्यांचे व दिलेल्या दानांचे वर्णन ३७ ते ५१ या श्लोकात आलेले आहे. (१) **मेघंकर** येथे भीमविक्रम नावाची विशाल शाला म्हणजे सभागृह बांधले. ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर यांच्या मूर्ती तयार करवून त्यांची त्याने तेथे स्थापना केली आणि त्यांना, अर्थात त्या देवतांच्या पूजाअर्चेसाठी **पिप्परिकखेट** नावाचे गाव दान दिले. (२) गोदावरी नदीच्या काठावरील **नांदातट** या गावी प्रतापनवभीम नावाची शाळा अर्थात देवालय बांधून तेथे त्रिपुरुषांची म्हणजे ब्रह्माविष्णुमहेशांची स्थापना केली, आणि त्याच्या

पूजाअर्चेसाठी **वग्घिका** नावाचे गाव दान दिले. (३) **भुवनाचल** येथे बलभीम नावाचे विष्णूचे देवालय बांधले. (४) **शिवपुर** येथे शिवाचे मंदिर उभारले. (५) **कल्याणपुर** येथे भीमेश्वराचे देऊळ बांधून त्याला **मुरंबिका** नावाचे गाव दान दिले. (६) **कल्लुंबरक** येथे त्याने एक सरोवर तयार केले. (७) राजाजवळून **पिप्पलग्राम** नावाचे गाव मिळवून तेथील भूमी त्याने धर्मपरायण ब्राह्मणांना अर्पण केली. तेथे त्याने त्रिवदन त्रिलोचनाची तीन देवळे उभारली आणि त्यांना सहस्र (निवर्तनांच्या) भूमीचे दान दिले. भीमार्क नावाचे देवालयही बांधले. भीमसमुद्र नावाचे तडाग तयार केले. हेरंबधाम अर्थात गणेशमंदिर उभारले. आपल्या तडागाच्या म्हणजेच भीमसमुद्राच्या काठावर क्षेत्रपाळाचे देऊळ बांधून तेथील विहिरीमध्ये बारा देवतांच्या देवळ्या तयार केल्या. दुसरी एक विहीर बांधली. चंडीचे देऊळ बांधून त्याला सहस्र (निवर्तनांच्या) भूमीचे दान दिले.

आपल्या देशात (राज्यात) जेथे जेथे म्हणून एखादे तीर्थ किंवा मोठे शहर असेल तेथे तेथे भीमनाथाने यज्ञयाग करून अन्नसत्रे घातली. त्यांतील अन्नाच्या भोजनाने हजारो ब्राह्मण पवित्र झाले (श्लो. ४८—५०). सारांश, विक्रमादित्य नृपतीचे कोषागार लक्षावधी सुवर्णमुद्रांनी समृद्ध करणाऱ्या सेनापती भीमाच्या परोपकारकार्याला सीमाच नव्हती. प्रशस्तिलेखक म्हणतो की, भीम सेनापतीच्या गुणांची गणना करण्याची आपली इच्छा आहे खरी, पण त्या गुणांच्या अगणितत्वामुळे आणि आपल्या वाणीच्या अतितुच्छतेमुळे त्यांचे वर्णन करणे आपल्याला शक्य नाही (श्लो. ५१). जोपर्यंत आकाश, ब्रह्मदेव, शंकर आणि कृष्ण आहेत तोपर्यंत लोकांना श्रवणसुख देणारी स्वस्तिमान भीमाची ही प्रशस्ती टिकून राहो (श्लो. ५२) अशी शुभेच्छा व्यक्त करून लेखकाने मूळ प्रशस्ती संपविली आहे.

### स्थलनिश्चिती

ओ. १४ मध्ये **कश्मीर** देशाचा व **वितस्ता** (नदीचा) उल्लेख आला आहे. पहिल्या विभागातील दानलेखात 'काश्मीर' (ओ. १०) असा शब्द आला आहे. अर्थात, कश्मीर व काश्मीर अशी दोन्ही रूपे त्या काळी वापरली जात होती असे दिसते. झेलम नदीचा उल्लेख ११ व्या शतकातील या शिलालेखात पूर्वीच्या 'वितस्ता' या नावानेच केलेला आढळतो हे लक्ष्यात ठेवण्यासारखे आहे.

श्लोक ३७ मध्ये उल्लेखिलेले **मेघंकर** म्हणजे आजचे मेहकर (जिल्हा बुलडाणा, महाराष्ट्र राज्य) गाव होय. मेघंकर हे वस्तुतः एका राक्षसाचे नाव होय.

त्याच्या अपकृत्यांनी त्रस्त झालेल्या प्रजेचे संरक्षण करण्यासाठी भगवान विष्णूने शाङर्गधराचे रूप घेऊन त्याला ठार मारले, अशी दंतकथा आहे. त्यामुळेच या स्थानाला मेघंकर हे नाव मिळाले. प्राचीन काळापासून हे एक क्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. मत्स्यपुराण, अध्याय २३ मध्ये या क्षेत्राचे माहात्म्य वर्णन केलेले आढळते. पद्मपुराण, गीता–माहात्म्य, अध्याय १८५ मध्येही त्याचा निर्देश येतो. महानुभावपंथ–संस्थापक श्रीचक्रधरस्वामी यांच्या चरित्राचे वर्णन करणाऱ्या 'लीळाचरित्र' या ग्रंथातही मेहकर या गावाचे नाव 'मेघंकर' म्हणून आढळते. (लीळाचरित्र, पृ. १४४; स्थानपोथी, पृ. ११ पाहा) या गावी भीमनाथाने बांधलेल्या ब्रम्हाविष्णुमहेश्वरांच्या देवळाला त्याने जे **पिप्परिकखेट** नावाचे गाव दान दिले होते ते आजचे पिंपरखेड असावे. ते मेहकरपासून नैॠत्य दिशेस सुमारे २५ किलोमीटर अंतरावर आहे. तेथून जवळच पिंपरखेड नावाचे आणखी एक गाव आहे, पण ते आज ओसाड आहे.

जिच्या पाण्याने महापापांचे समूह धुवून निघतात त्या गोदावरी नदीच्या काठावरील **नांदीतट** गाव म्हणजे आजचे नांदेड (जिल्हा नांदेड, महाराष्ट्र राज्य) होय. नांदेडचा 'नांदीतट' या नावाने उल्लेख कंधार येथे उपलब्ध झालेल्या दहाव्या शतकातील राष्ट्रकूटांच्या शिलालेखात देखील आढळतो (एपि. इंडिका. ३५, पृ. १०५). 'नांदीतट माहात्म्य' ग्रंथात तर तो अनेक ठिकाणी आहे. चवथ्या शतकातील वाकाटक वंशातील द्वितीय विंध्यशक्तीच्या वाशिम ताम्रपटातील 'नांदीकड' शहराचा उल्लेख या नांदेड शहराचाच असावा. 'नांदीकड' हे 'नांदीकट' या शब्दाचे प्राकृत रूपांतर होय. अर्थात, आजचे नांदेड शहर पूर्वी 'नांदीतट' या नावाने आणि त्याहीपूर्वी 'नांदीकट' अथवा 'नांदीकड' या नावाने ओळखले जात होते हे स्पष्ट दिसते. (वाकाटक नृपती आणि त्यांचा काल –डॉ. मिराशी, पृ. ३३२). नांदीतट येथील देवळाला व शाळेला दान दिलेले **वग्घि** नावाचे गाव म्हणजे आजचे 'वाघी' नावाचे खेडे होय. ते नांदेडपासून पश्चिमेकडे सहा किलोमीटर अंतरावर गोदावरी नदीच्या काठावरच आहे.

**भुवनाचल** गाव निश्चित कोणते ते सांगता येत नाही. परभणी जिल्ह्याच्या परतूड तालुक्यात 'भुवन' नावाचे खेडे आहे. बहुधा तेच हे असावे. कदाचित भुवनाचल=भुवनगिरी=भोंगीर (हैद्राबादपासून ४० मैलांवर) हे भुवनाचल असावे असे श्री. सेतुमाधवराव पगडी यांनी सुचवले आहे. या तर्कपद्धतीने विचार केला तर उस्मानाबाद जिल्ह्याच्या भूम महालातील 'भोनगिरी' म्हणजे भुवनाचल असणे अधिक शक्य वाटते. शिलालेखातील **शिवपुर** (श्लो. ३९)

म्हणजे औरंगाबाद जिल्ह्याच्या गंगापूर तालुक्यातील शिवपूर असावे. ते गोदावरी व कौम नदीच्या संगमापासून उत्तरेस सहा मैलांवरील शिवपुर, किंवा नांदेड जिल्ह्याच्या हदगाव तालुक्यातील शिवपुरी हे गाव असावे. ते नांदेडच्या ईशान्येस २३ मैलांवर आहे. **कल्याणपुरी** (श्लो. ४०) म्हणजे चालुक्यांच्या राजधानीचे शहर कल्याणी होय. ते सध्या बिदर जिल्ह्याच्या हुमणाबाद तालुक्यात आहे. भीमनाथाने तेथे बांधलेल्या भीमेश्वर देवळाला दान दिलेले **मुरुंबिका** (श्लो. ४०) गाव म्हणजे आजचे 'मुरुम' (उस्मानाबाद जिल्हा, उमरगा तालुका) हे असावे. येथे चालुक्यांचे अनेक कानडी शिलालेख उपलब्ध झालेले आहेत. नांदेड जिल्ह्यातील कंधार तालुक्यात कंधारच्या पश्चिमेकडे १० मैलांवर मुरंबी नावाचे खेडे आहे. कदाचित शिलालेखातील मुरुंबिका म्हणजे हे मुरंबी असू शकेल. या मुरंबीच्या जवळपास असलेल्या कंधार, अर्धापुर वगैरे गावीही चालुक्यांचे काही शिलालेख उपलब्ध झालेले आढळतात. शिलालेखातील **कल्लुंब्बर** (श्लो. ४०) म्हणजे आजचे कलंबर गाव असावे. ते नांदेड जिल्ह्यातील कंधार तालुक्यात असून मुरंबीच्या पूर्वेस सुमारे १५ मैलांवर व कंधारच्या ईशान्येस १० मैलांवर आहे. विक्रमादित्य सहावा याच्या काळातील शके ११२२ चा एक कानडी लेख नांदेड जिल्ह्याच्या देगलूर तालुक्यातील बिमरा गावी उपलब्ध झालेला आहे. त्यात कल्लकुंबरी गावाचा उल्लेख आलेला आहे (इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम नांदेड डिस्ट्रिक्ट–संपा. रट्टी–शेळके; पृ. १४८, १५०). अवरवाडी विभागातील कल्लकुंबर गावातून वाजी कुलातील पुरुष करडकल्लु येथे येऊन राहिले होते. यातील अवरवाडी म्हणजे सध्याचे अवराळा. (ता. बिलोली, जि. नांदेड) त्याच्या जवळील कुंबरगाव हे पूर्वीचे कल्लकुंबर असावे असे संपादकांनी म्हटलेले आहे. त्याऐवजी वर निर्देशिलेले कलंबर (ता. कंधार, जि. नांदेड) हे कल्लकुंबर असावे असे मानणे अधिक योग्य. या गावाचे संस्कृत नाव कल्लुंबरक, कानडी नाव कल्लकुंबर आणि मराठी नाव कलंबर ही संगती लावणे बरोबर ठरेल. ध्वनिशास्त्रदृष्टयाही कल्लकुंबरचे कलंबर हे रूपांतर योग्य ठरेल. **पिप्पलग्राम** (श्लो. ४१) संबंधीची माहिती यापूर्वीच्या विभागात दिलेली आहे ती पाहावी.

### लेखक

या प्रशस्तीचा लेखक कालिदास दंडनायक असून (ओ. ६४) प्रस्तुत प्रशस्तीचा नायक भीमनाथ याचाच तो मुलगा होता (ओ. ६२). त्याला लावलेल्या विशेषणांवरून तो गुरूची सेवा करण्यात तत्पर, श्रेष्ठ कवीरूपी कुमुदिनींना आनंद देणारा चंद्र, ऋग्वेदचूडामणी आणि अभिनव कालिदास होता. त्याचे स्वतःचे

नाव कालिदास हे तर खरेच, पण त्याच्या उत्कृष्ट काव्यगुणांमुळे 'अभिनव कालिदास' म्हणून तो विक्रमाच्या दरबारात प्रसिद्ध असावा. दंडनायक ही सुद्धा त्याची पदवी असावी. त्यावरून न्यायदानाचे किंवा सेनेवरील अधिकाऱ्याचे काम त्याच्याकडे असावे असे दिसते. ओ. ६१ व ६२ मध्ये आलेली विशेषणेही त्यालाच अनुलक्षून असली पाहिजेत. तेथेही त्याला 'नव कालिदास' असे म्हटले आहे.

३

## शिवलिंगी–संतान आचार्य

### प्रास्ताविक

क्रमांक २ च्या शिळेवर 'भीमनाथ-प्रशस्ति' संपल्यानंतर गणेशवाडी शिलालेखातील तिसरा विभाग सुरू होतो. तो या शिळेवरील तेराव्या ओळीपासून सुरू होऊन शेवटच्या ओळीत पूर्ण झालेला आहे. दोन्ही शिळांवरील एकत्रित लेखनाची गणना केल्यास हा तिसरा विभाग ६५ व्या ओळीपासून सुरू होऊन १०१ या ओळीत संपतो असे दिसून येईल.

हा विभाग गद्यपद्यमिश्रित आहे. प्रामुख्याने तो गद्यात्मक आहे. पण ओ. ७० ते ७२ मध्ये वादिरुद्र पंडिताची कीर्ती वर्णन करणारा एक श्लोक आणि ओ. ९४ ते १०२ मध्ये तत्पुरुष पंडित आणि श्रीकंठ मुनी यांची कीर्ती वर्णन करणारे पाच श्लोक एवढा भाग पद्यमय, अर्थात श्लोकबद्ध आहे. या विभागातील गद्यसुद्धा काव्यलंकारपरिपूर्ण असून अत्यंत नादमधुर आहे. संस्कृत गद्यलेखनाचा तो सुंदर नमुना होय.

### विषय

या तिसऱ्या विभागातील लेखनाचा मुख्य विषय पिप्पलग्राम येथे भीमनाथाने बांधून दिलेल्या देवळातील व सरस्वती मंडपातील प्रमुख आचार्य तत्पुरुष पंडित (विभाग १, ओ. १६ ते २९) याची गुरुपरंपरा वर्णन करण्याचा आहे. ॐ नमः या मंगलाने सुरवात करून प्रथम वादिरुद्र पंडिताचे वर्णन केलेले आहे. हा वादिरुद्र पंडित यम, नियम, स्वाध्याय, ध्यान, धारणा, जप, समाधी आणि षडंगोपहार यांनी संपन्न होता. तर्क आदिकरून अनेक शास्त्ररूपी समुद्राच्या दुसऱ्या टोकाला गेलेला (=सर्व शास्त्रांत पारंगत), विशुद्ध कीर्तीचा, निष्कलंक चारित्र्याचा, दुष्ट आणि गर्विष्ठ पंडितांच्या गळयाला लागलेला फास- (त्यांचा

गर्व हरण करणारा), वाद करणाऱ्या दिगंबर (= जैन) आणि बौद्ध पंडितांच्या कुळांचा नाश करणारा (त्यांना पराभूत करणारा) धूमकेतू होता. **पर्वतावली** (संप्रदायातील) **कालमुख** (विभागाच्या) तपस्व्यामध्ये अग्रगण्य, किव्व नावाच्या गावात वसती करून राहिलेला, **शिवलिंगी संतान**रूपी कुमुदिनीला प्रफुल्लित करणारा तो चंद्र होता. प्रत्यक्ष रुद्राने (शंकराने) त्याला सन्मानित केले होते (शंकराचा त्याला साक्षात्कार झालेला होता.).

यानंतर, 'त्यांचीच कीर्ती' (तेषामेव कीर्त्तिः–ओ. ६९) असा निर्देश करून एक श्लोक आलेला आहे. या श्लोकातील शेवटच्या चरणावरून दिसून येईल की, हा श्लोक लकुलीश्वराच्या गौरवार्थ लिहिलेला आहे ('लकुलीश्वरो विजयते'– ओ. ७२); प्रत्यक्ष वादिरुद्र पंडिताच्या गौरवार्थ तो नाही. वादिरुद्र पंडित म्हणजे प्रत्यक्ष लकुलीश्वरच होय असे वर्णन करण्याचा कवीचा उद्देश दिसतो. हा लकुलीश्वर सर्वशास्त्रपारंगत होता. काणाद (=वैशेषिक) दर्शनात तो प्रत्यक्ष कणाद मुनी, बृहस्पतीप्रणीतशास्त्रात (अर्थशास्त्रात) प्रत्यक्ष वाचस्पती (=बृहस्पती), कापिल (कपिलमुनीप्रणीत सांख्य) दर्शनात प्रत्यक्ष कपिल मुनी सौगत (सुगत=बुद्ध, त्याच्या शास्त्रात अर्थात बौद्ध) शास्त्रात श्रेष्ठ आचार्य; मीमांसाशास्त्रात प्रत्यक्ष जैमिनी, न्यायशास्त्रात प्रत्यक्ष अक्षपाद (=गौतम), शब्दशास्त्रात प्रत्यक्ष ब्रम्हा, आणि शैव दर्शनात प्रत्यक्ष शिव म्हणून सांप्रत हा लकुलीश्वर शोभून दिसतो. (ओ. ७०–७२). अर्थात लकुलीश्वराच्या ठिकाणी असलेली सर्व शास्त्रांतील पारगतता वादिरुद्र पंडिताच्या ठिकाणी होती. तो स्वतः लकुलीश्वरच होता.

**लकुलीश्वर=वादिरुद्र ?**

या बाबतीत एक विचार मनात येतो तो येथे फक्त सुचवून ठेवतो. या ५३ व्या श्लोकात 'लकुलीश्वरो विजयते' असे म्हटले आहे आणि वादिरुद्र पंडित हा लकुलीश्वर होय असे सूचित केले आहे. पश्चिम चालुक्यनृपती द्वितीय जयसिंहाच्या काळातील इ. स. १०३५ चा बळगामी येथे उपलब्ध झालेला एक शिलालेख आहे (म्हैसूर इन्स्क्रिप्शन्स, पृ. १४६) त्यात लकुलीश्वर पंडिताला दिलेल्या दानाचे वर्णन आहे. या लकुलीश्वर पंडिताला जी अनेक विशेषणे लावली आहेत त्यांतील पुढील काही विशेषणे पाहा. 'वादिरुद्र', 'समस्ततर्कादिशास्त्र-पारावारपारग', 'अवदातकीर्तिध्वज', 'अमलिनचरित्र', 'दुष्टदर्पिष्टपंडित-गलकालपाश', 'वादिदिगंबरधूमकेतु' ही विशेषणे आपल्या शिलालेखातील वादिरुद्र पंडितालाही लावलेली आहेत. कदाचित वादिरुद्र पंडिताचे मूळ नाव

लकुलीश्वर पंडित असून वादिरुद्र हे त्याचे विशेषण असावे व पुढे त्याच नावाने तो ओळखला जाऊ लागला असावा.

### लकुलीश्वर

या वर्णनावरून लक्षात येईल की, वादिरुद्र पंडित हा लकुलीश्वर मताचा अनुयायी असून तो पर्वतावली (संप्रदाया) तील कालमुख तपस्वी आणि शिवलिंगी संतानातील सर्वश्रेष्ठ मुनी होता. या शिलालेखात लकुलीश्वर (ओ. ७२), लकुलीश्वरागम (ओ. ७२), लाकुलागम (ओ. ८२, ८९) असे शब्द आलेले आहेत. लकुलीश्वर यालाच नकुलीश्वर, लकुलीश, नकुलीश असेही संबोधण्यात येते. त्याने प्रतिपादन केलेले शास्त्र तो लकुलीश्वरागम किंवा लाकुलागम होय. सायणाचार्यांच्या षड्दर्शनसंग्रहात त्यालाच नकुलीश्वर दर्शन असे म्हटले आहे. या नकुलीश्वरासंबंधीची सुसंगत व सविस्तर माहिती प्रथम डॉ. दे. रा. भांडारकर यांनी 'अॅन एकलिंगजी स्टोन इन्स्क्रिप्शन' (दि जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच, रॉयल एशियाटिक सोसायटी, १९०६. पृ. १५१–१६७) व 'लकुलीश' (आर्कि. सर्व्हे ऑफ इंडिया, अॅन्युअल रिपोर्ट, १९०६-७) या आपल्या संशोधनलेखांत मांडली. अलीकडे श्री. यज्ञदानी यांनी संपादित केलेल्या 'दि अर्ली हिस्ट्री ऑफ दि डेक्कन' या ग्रंथात प्रा. नीलकंठशास्त्री व डॉ. वेंकटरमणय्या यांनी लिहिलेल्या लेखातही (भाग २, पृ. ७०४–७१३) याविषयी काही माहिती आलेली आहे. विशेष जिज्ञासूंनी ती पाहावी. आवश्यक तेवढी माहिती या लेखांच्या आधारे येथे देत आहे.

वायुपुराण (अ. २३) आणि लिंगपुराण (अ. २४) यांवरून असे दिसून येते की, कृष्णाने ज्यावेळी वासुदेवाचा अवतार धारण केला त्यावेळी कायारोहण क्षेत्रात स्मशानातील एका मृत शरीरात ब्रम्हचारी शिवाने प्रवेश करून लकुलीचा अवतार धारण केला. **कायारोहण** हे क्षेत्र सध्या कारवान (जि. दाभोळ, गुजराथ राज्य) म्हणून प्रसिद्ध आहे. शिवाचे एकूण अठ्ठावीस अवतार झाले. त्यांना योगाचार्य म्हणतात. श्वेताचार्य हे पहिले योगाचार्य असून लकुली किंवा लकुलीश हे शेवटचे म्हणजे अठ्ठाविसावे योगाचार्य होत. कलियुगात शैव मताच्या व धर्माच्या प्रचाराचे कार्य त्यांनीच केले. कुशिक, गर्ग, मित्र व कौरुष्य असे त्यांचे चार शिष्य होते. त्यांना 'पाशुपत' असे म्हटले आहे. त्यावरून लकुलीशाने प्रतिपादन केलेल्या शास्त्राला प्रारंभी पाशुपत दर्शन म्हणत असत. हेच लाकुलीश दर्शन असून त्यालाच लकुलीश्वर आगम किंवा लाकुलागम म्हणतात.

लकुल म्हणजे लाकूड, काठी, दंड. तो धारण करणारा तो लाकुली. लाकुलीशाच्या कोरीव मूर्ती आजही उत्तर व दक्षिण भारतात अनेक ठिकाणी आढळतात.

शिवाच्या मंदिरात दरवाजावर व अन्य ठिकाणी त्या असतात. मानवाकृती-प्रमाणे त्या केवळ दोन हाताच्या असून मूर्तीच्या एका हातात एखादे फळ आणि दुसऱ्या हातात लाकूड किंवा दंड धारण केलेला दाखविलेला असतो. त्यावरून लकुलीश ही ऐतिहासिक व्यक्ती असावी हे स्पष्ट होते. पुराणे व उपलब्ध शिलालेख यांच्या आधारे डॉ. दे. रा. भांडारकर यांनी त्याचा काळ इसवी सनाचे पहिले शतक असा ठरविला आहे, तो योग्य वाटतो.

**लकुलीश्वर दर्शन : आचार**

या लकुलीश्वराने प्रतिपादन केलेल्या लकुलीश्वर अर्थात पाशुपत दर्शनाचे अनुयायी तात्त्विक दृष्टचा इतर दर्शनांतील जीवाप्रमाणे स्वतःला (जीवाला) परमेश्वराचा दास मानीत नाहीत. कारण, तसे मानल्यास जीवाला इष्ट असलेला दुःखाचा नाश संभवत नाही. म्हणून लकुलीश्वर मताचे अनुयायी जीवाला परमेश्वराप्रमाणेच मानतात, व योग आणि विधी यांच्या साधनांनी त्रिविध दुःखांचा नाश करून मोक्ष प्राप्त करून घेतात. यम, नियम, आसन, स्वाध्याय, ध्यान, धारणा, मौन, अनुष्ठान, जप व समाधी या साधनांचा योगात अंतर्भाव होतो. विधी अनेक आहेत. त्यांत प्रामुख्याने त्रिकाल भस्मस्नान व षडंगोपहाराचे आचरण यांचा समावेश होतो. हे षडंगोपहार कोणते? सामान्यतः शम, दम, उपरती, तितीक्षा, समाधान व श्रद्धा यांचा त्यांत अंतर्भाव होतो असे मानतात. पण लकुलीश संप्रदायातील षडंगोपहाराचे वर्णन पुढीलप्रमाणे केलेले आढळते. 'हसित-गीत-नृत्य-हुडुक्कार-नमस्कार-जप्य-षडंगोपहारेण उपतिष्ठेत' (सर्वदर्शनसंग्रह. नकुलीशपाशुपतदर्शन. ओ. ८९) हसित=हा हा हा असा आवाज काढून हसणे, गीत, नृत्य, हुडुक्कार=हुडुक् असा आवाज करणे, नमस्कार व जप. ओ. ६५ मध्ये वादिरुद्र पंडिताला लावलेल्या विशेषणांतील षडंगोपहार ते हेच होत. विधीमध्ये पुढील क्रियांचाही आणखी अंतर्भाव होतो. क्रथन=जागेपणीही निद्रालुत्व दाखवणे, स्पंदन=पक्षाघात झाल्या-प्रमाणे शरीर हलवीत राहणे, मंडण=पाय व इतर शरीरावयव पंगू असल्याप्रमाणे चालणे, शृंगारण=सुंदर स्त्रीला पाहून जणू आपण तिच्यावर प्रेम करतो असा आविर्भाव करणे, अवितत्करण=इतरांनी निषिद्ध मानलेल्या गोष्टींचे आचरण करून जणू आपण विधिनिषेधांच्या पलीकडे आहोत असे दाखवणे आणि अवितद्भासन=मूर्खासारखी बेताल बडबड करणे. अशा आचरणामुळेच सर्व दुःखान्त होऊन साधकाला सर्वज्ञत्वाची व सर्वकर्तृत्वाची शक्ती प्राप्त होते असे लकुलीश्वर दर्शनानुयायी मानतात. (सर्वदर्शनसंग्रह. नकु० दर्शन. ओ. ९३-९९).

## कालमुख संप्रदाय

कालमुख हा लकुलेश्वर (पाशुपत-शैव) मताचा एक संप्रदाय होय. काही शिलालेखांत व ग्रंथांत 'कालमुख' ऐवजी 'कालामुख' असे या शब्दाचे रूप आढळते. म्हैसूर राज्यातील हलकूर, बळगामी इत्यादी ठिकाणच्या शिलालेखांत हे कालामुख मुनी लाकुलागम समयाचे अनुयायी असल्याचे स्पष्ट म्हटले आहे (एपि. कर्ना. व्हॉ. ५, पृ. १३५ व व्हॉ. ७, पृ. ६४ पाहा.) तथापि, 'कालामुख' हा शब्द 'कालमुख' असाही अनेक ठिकाणी आढळतो. गुणरत्नसूरीच्या तर्करहस्यदीपिका या ग्रंथात 'शैवापाशुपताश्चैव महाव्रतधरास्तथा। तुर्याः **कालमुखा** मुख्या भेदा एते तपस्विनः ।।' असा उल्लेख येतो. त्यात 'कालमुख' असेच रूप योजलेले आहे. द्वितीय अम्मराजाच्या तण्डिकोण्ड ताम्रपटात (एपि. इंडि. व्हॉ. २३, पृ. १६९) व अब्लूर शिलालेखातही त्यांचा निर्देश कालमुख म्हणूनच केलेला आहे (एपि. इंडिका. व्हॉ. ५, पृ. २२०-२२१). आपल्या शिलालेखातही तेच रूप आढळते (ओ. ६८). यावरून 'कालामुख' व 'कालमुख' एकच होत असे मानण्यास हरकत नाही. हातात दंड धारण करणे, चिताभस्म लावणे, चिताभस्म खाणे, प्रेताच्या करवंटीत जेवणे, मद्याचे भांडे बाळगणे आणि जणू त्या मद्याच्या भांड्यात ईश्वर आहे या भावनेने उपासना करणे हा कालमुखांचा आचार डॉ. रा. गो. भांडारकरांनी वर्णन केला आहे (कंप्लीट वर्क्स ऑफ आर. जी. भांडारकर. भाग ४, पृ. १८१). पण तो बरोबर वाटत नाही. हा आचार कापालिकांचा होय. कालमुख आणि कापालिक एकच, अशा समजुतीने हे वर्णन केले असावे. कापालिक हे नरकपालांचा (कवटयांचा) आपल्या आचारधर्मात वापर करतात. कालमुखांचा तसा आचार असल्याचे आपल्या या शिलालेखावरून तरी दिसत नाही.

## पर्वतावली : शिवलिंगी संतान

आचार धर्माच्या कमीअधिक फरकामुळे कालमुख संप्रदायाचे पुढे जे विभाग झाले ते आवली किंवा आम्नाय या नावाने ओळखले जाऊ लागले. 'पर्वतावली' हा कालमुख संप्रदायाचा असाच एक विभाग होय. श्रीपर्वत येथील मल्लिकार्जुन शिलामठ हे त्यांचे प्रमुख स्थान होते असे दिसते. अब्लूर शिलालेखात त्याचाच निर्देश 'पर्वताम्नाय' म्हणून आलेला आहे (एपि. इंडि. व्हॉ. ५, पृ. २२०, २२१). त्यानंतर या आवलीत किंवा आम्नायातही काही पोटविभाग पडले. त्यांतील प्रत्येक विभाग 'संतान' या नावाने संबोधला जाऊ लागला. उपरोक्त अब्लूर शिलालेखात कालमुखांच्या पर्वताम्नायातील 'मूवरकोणेय' व अन्यत्र

'वेळ्ळेय' संतानाचा उल्लेख आहे. त्याचप्रमाणे आपल्या शिलालेखात 'शिवलिंगी' संतानाचा उल्लेख आढळतो. यावरून दिसून येईल की, वादिरुद्र पंडित हा लकुलीश्वर-पाशुपत मताचा अनुयायी असून तो कालमुख संप्रदायाच्या पर्वतावली विभागातील शिवलिंगी संतानातील एक श्रेष्ठ मुनी होता. 'षड्-दर्शन समुच्चय' नामक जैन ग्रंथावर गुणरत्नसूरीने 'तर्करहस्यदीपिका' नावाची टीका लिहिली आहे. त्यात शिवाच्या अठरा अवतारांत जसे नकुलीचे नाव आहे तसेच 'संतान' हेही एक नाव आहे. त्यावरून 'संतान' हा शिवाचा एक अवतार होता असे दिसते. 'शिवलिंगी संतान' या नावात 'संतान' हा शब्द या शैव अवताराचा द्योतक म्हणून वापरला आहे काय, अशी शंका येणे स्वाभाविक आहे. तथापि, ओ. १, ६८, ८४ यांतील 'शिवलिंगी संतान' शब्दाच्या योजनेवरून तेथे 'संतान' शब्द एखाद्या शैवावताराचे विशेषनाम म्हणून वापरला नसून एक परंपरा, संप्रदाय किंवा विभाग या अर्थाने वापरलेला असल्याचे दिसून येते. अर्थात, कालमुखांच्या 'मूवरकोणेय' 'संताना' प्रमाणेच 'शिवलिंगी' हा दुसरा 'संतान' म्हणजे विभाग होता असे स्पष्ट दिसते.

'शिवलिंगी' हे नाव कसे पडले असावे ते निश्चित सांगता येत नाही. शैवांच्या आचार धर्मात शिवलिंगपूजा सर्वत्र आहे. काही शैव केवळ शिवलिंग-पूजेवर संतुष्ट न राहता आपल्या हातात, जटेत किंवा गळचात शिवलिंग धारण करीत असावेत असे दिसते. गुणरत्नसूरीच्या उपरोक्त टीकेत 'ते च पञ्चाग्निसाधनपराः करे जटादौ च प्राणलिङ्गधराश्चापि भवन्ति' असा काहींचा उल्लेख आढळतो. वाकाटकांच्या बहुतेक सर्व ताम्रपटांत ज्या भार-शिवांचा उल्लेख येतो ते आपल्या खांद्यावर शिवलिंग धारण करीत असत. किंबहुना, भारशिव राजाचा वंश त्यांनी आपल्या खांद्यावर शिवलिंग धारण केल्यामुळे संतुष्ट झालेल्या भगवान शंकराने उत्पन्न केला होता असे म्हटले आहे. ('अंसभारसन्निवेशितशिवलिङ्गोद्वहनशिवसुपरितुष्टसमुत्पादितराजवंशानां . . .भारशिवानां'–) तेव्हा शिवलिंग धारण करण्याची ही प्रथा फार जुनी होती असे दिसून येते. लकुलीश्वर मताच्या कालमुखसंप्रदायातील शिवलिंग (हातात किंवा जटाजूटात) धारण करणाऱ्या शिवोपासकांचा स्वतंत्र विभाग 'शिवलिंगी संतान' म्हणून ओळखला जाऊ लागला असावा असे दिसते. त्यांचे मुख्य स्थान पिप्पलग्राम हे असावे. पुढे शिवलिंग गळचात धारण करणाऱ्या वीर-शैवांचा स्वतंत्र संप्रदाय निर्माण झाला. शिवलिंगी संतान आणि वीरशैव संप्रदाय यांचे परस्पर संबंध अभ्यासले गेले पाहिजेत.

### क्रियाशक्ति पंडित

वादिरुद्र पंडिताचा शिष्य **क्रियाशक्ति पंडित**. त्याचे वर्णन ७२ ते ७८ ओळींत आलेले आहे. या क्रियाशक्ति पंडिताला 'भारतीकर्णपूर' असे एक विशेषण लावलेले आहे (ओ. ७७). तेही त्याचे एक नाव असावे असे वाटते. 'श्रीमद्भारतीकर्ण्णपूरनाम्नां क्रियाशक्तिमहामुनीश्वराणां शिष्याः श्रीमत्तत्पुरुषपंडिताः' (ओ. ९३) म्हणजे भारतीकर्णपूर नावाच्या क्रियाशक्ति महामुनीश्वराचे शिष्य 'तत्पुरुष पंडित'—यावरून हे स्पष्ट दिसून येते. भारती कर्णपूर हे बहुधा त्याचे मूळ नाव असावे आणि कालमुख संप्रदायाच्या पर्वतावली विभागातील शिवलिंगी संतानाचे आचार्य वादिरुद्र पंडित याचे शिष्यत्व स्वीकारल्यावर त्याला क्रियाशक्ति पंडित हे नाव ठेवण्यात आले असावे असे दिसते. अर्थात, एके ठिकाणी त्याला 'पंडित देव' म्हटले आहे, तर दुसऱ्या ठिकाणी 'महामुनीश्वर' म्हटले आहे. पण तेवढ्यावरून ह्या भिन्न व्यक्ती होत्या असे मानण्याचे कारण नाही. क्रियाशक्ति पंडित हा लकुलीश्वर आगमरूपी मानससरोवरात विहार करणारा राजहंस, सरस्वतीच्या कानातील अलंकार, कलिकालाच्या भीतीने पळू लागलेल्या धर्माचा आश्रय, गुरुकुलाचा उद्धारक, यमनियमरूपी वृक्षांच्या आळ्यात तुडुंब पाणी भरून ठेवणारा योग्य असा काल (=वर्षा ऋतू), धारणा, जप, समाधी यांच्या विधींत निपुण, संसाराची भीती हरण करणारा, गुरुजनांच्या ठिकाणी विनम्र, आपल्या संप्रदायाचे भूषण, विद्वानांचा पक्षपाती, तर्कादिशास्त्रांत दक्ष, नित्य विरक्त, केवळ परहितासाठीच संसारात राहणारा, वाणीचे कर्णभूषण, नरकाच्या भीती-पासून दूर असणारा, त्रिभुवनकीर्ती, महेश्वर शंकराची प्रत्यक्ष मूर्तीच आणि महापुरुषदेखील ज्याची भक्ती करतात असा होता.

या क्रियाशक्ति पंडिताचे दोन धाकटे भाऊ असावेत. एक त्रिलोचनाचार्य पंडित व दुसरा तत्पुरुष पंडित. 'अनुजाः' (ओ. ७८) या शब्दाच्या योजने-वरून त्रिलोचनाचार्य पंडित हा क्रियाशक्ति पंडिताचा धाकटा भाऊ होता याविषयी शंका राहात नाही. त्याचे वर्णन संपताच तत्पुरुष पंडिताचे वर्णन सुरू झाले आहे (ओ. ८५). त्यावरून त्रिलोचनाचार्य पंडिताप्रमाणेच तत्पुरुष पंडित हाही त्याचा धाकटा भाऊ होता असे वर्णन करण्याचा हेतू असावा. तसे असल्यास 'अनुजाः' हा शब्द केवळ आदरार्थी बहुवचन नसून अनेकवचनी वापरलेला आहे असे म्हणावे लागेल. त्रिलोचनाचार्य हा क्रियाशक्ति पंडिताचा शिष्य होता असे स्पष्ट म्हटले नाही. तथापि, क्रियाशक्तीनंतर तो सरस्वती मंडपातील प्रमुख असावा असे दिसते. त्याच्यानंतर तत्पुरुष पंडिताकडे

प्रमुखत्व आले असावे. त्याने मात्र क्रियाशक्ति पंडिताचे शिष्यत्व स्वीकारले होते.

## त्रिलोचनाचार्य पंडित

त्रिलोचनाचार्य पंडित अनेक गुणालंकृत असून सर्व लोक त्याची स्तुती करीत. तो शंकराच्या चरणकमलावरील भ्रमर (चरणावर आसक्त) व दशधर्मरूपी निर्मल रत्नांचा समुद्र होता. येथे उल्लेखिलेले दशधर्म कोणते ते निश्चित सांगता येत नाहीत. तथापि, 'यमादिधर्मसंपन्नो' (ओ. ९९) आणि 'यमादि-धर्मनिरत:' (ओ. १०२) यावरून हे दशधर्म 'यमादि' असावेत असे मानता येते. ओ. ६५ मध्ये 'यम, नियम, स्वाध्याय, ध्यान, धारण, मौन, अनुष्ठान, जप, समाधी आणि षडंगोपहार' हे दहा विधी वर्णन केले आहेत. तसेच ओळ ८५ मध्ये यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी हे आठ विधी वर्णन केले आहेत. यांतून ओ. ६५ मधील दहा विधी हे दशधर्म असावेत असे वाटते. कदाचित या दोहोंच्या मिश्रणातून त्यांची निवड करण्यात आली असेल. या त्रिलोचनाचार्य पंडिताच्या कीर्तीने सर्व ब्रह्मांड भरून गेले होते. तो सरस्वतीच्या कानातील कुंडल, विद्वज्जनरूपी कमळांना आनंदित करणारा सूर्य, उत्पन्न झालेला कामोन्माद चिरडून टाकणारा प्रचंड, लाकुलागम-रूपी कमळवनात विहार करणारा राजहंस, आपल्या संप्रदायाला भूषविणारा अलंकार, कलिदोषविरहित, विद्यारूपी अन्नदान करण्यात विनोद मानणारा, सर्व मुनींचा सांभाळ करण्यात आनंद घेणारा आणि शिवलिंगी संतानरूपी कुमुदिनींना प्रफुल्लित करणारा चंद्र, असा तो होता (ओ. ७८-८५). या विशेषणांवरून त्रिलोचनाचार्य पंडित हा लकुलीश्वर मताच्या शिवलिंगी संतानातील अनुगृहीत होता हे दिसून येईल.

## तत्पुरुष पंडित

क्रियाशक्ति पंडिताचा दुसरा भाऊ आणि शिष्य **तत्पुरुष पंडित** होय. हाही यम, नियम, आसन इत्यादी विधींमध्ये निपुण असून तर्कादि अनेक शास्त्रांत पारंगत होता. कवित्व, वादपटुत्व इत्यादींमध्ये तो प्रवीण होता. त्याच्या कीर्तीचा ध्वज सर्व दिशांत फडकत होता. विद्यारूपी अन्नाचे दान करणे हाच त्याचा विनोद होता. विद्वज्जनरूपी कुमुदिनींना प्रफुल्लित करणारा तो चंद्र असून अत्यंत पुण्यवान व श्रेष्ठ मुनींमध्ये अग्रगण्य होता. गुरुजनांच्या चरण-कमलावर भ्रमराप्रमाणे तो लुब्ध होता. लाकुलागम शास्त्र व संप्रदाय

यांचा तो उद्धारक असून सर्व मुनींचे आश्रयस्थान, आश्रितांचा कल्पवृक्ष आणि आपल्या संप्रदायाचे सारसर्वस्व होता. स्वर्ग आणि मोक्ष यांचे मार्ग त्याला चांगले माहीत असून दोषांचा त्याला स्पर्शही होत नसे. त्याचे अंतःकरण करुणेने ओथंबलेले असून परहित साधण्यात तो नेहमी तत्पर असे. भारती कर्णपूर नावाच्या क्रियाशक्ति पंडिताचा हा शिष्य सर्वगुणसंपन्न असून शंकराचा भक्त होता (ओ. ८५-९२).

यापुढे या तत्पुरुष पंडिताची प्रशस्ती गाणारे तीन श्लोक आहेत. त्यांत असे म्हटले आहे की, विविध उद्यानांनी सुशोभित अशी तळी, ऐश्वर्यपूर्ण आणि विद्यादानाची सोय असलेली अत्यंत सुशोभित देवळे व मुनींना राहण्यासाठी उंच घरे या तत्पुरुष पंडिताने तयार केली (श्लो. ५४). हे वर्णन अतिशयोक्त दिसते. कारण पिप्पलग्राम येथे ब्रह्मा-विष्णु-महेश्वरादी सर्व देवळे भीमनाथाने तयार करवून घेतली (दान लेख ओ. १५-१७, आणि भीमनाथ प्रशस्ती, ओ. ४४ ते ५२) असे स्पष्ट म्हटले आहे. कदाचित असे असेल की, या देवालयांच्या उभारणीसाठी आवश्यक तो पैसा भीमनाथाने देऊन या तत्पुरुष पंडिताच्या देखरेखीखाली ती बांधून घेतली असावी. त्याच्या कीर्तीचा ध्वज दशदिशांत फडकत होता. तो सर्व शास्त्रांत पारंगत असून शिष्ट, याचक व विद्वज्जन यांचा कल्पवृक्ष होता. अनेक सज्जन, कवी इत्यादी त्याची सेवा करीत असत. अत्यंत पुण्यवान आणि त्यामुळे एखाद्या पवित्र तीर्थाप्रमाणे तो झाला होता (ओ. ९४ ते ९९).

### श्रीकंठ मुनी

शेवटच्या दोन श्लोकांत (श्लो. ५७ व ५८) **श्रीकंठ मुनीचे** वर्णन आले आहे. तत्पुरुष पंडितानंतर तो उदयाला आला, अर्थात तो तेथील मठाधीश झाला असावा. हा तत्पुरुष पंडिताचा शिष्य होता की काय ते स्पष्ट सांगितलेले नाही. श्रीकंठ मुनीही यमनियमादि धर्मांनी युक्त असून मुनींमध्ये श्रेष्ठ, सर्व विद्या आणि गुण यांचा आधार होता. संसारात मृत्यूच्या भीतीने संतापित झालेल्या प्राण्यांवर आपल्या कारुण्यामृताचा शिडकाव करून त्यांना तो आनंद देत असे. याचकांना त्यांचे इच्छित प्राप्त करून देत असे, विद्वान गुरूंच्या मोक्षाचे रक्षण करण्यात तो तत्पर असे, विद्यारूपी अन्नदान करीत असे आणि यमनियमादि धर्मांच्या आचरणात नेहमी मग्न असे (ओ. ९८-१०१).

यावरून दिसून येईल की, पिप्पलग्राम येथे लकुलीश्वर मताच्या पर्वतावली संप्रदायातील कालमुख विभागाच्या शिवलिंगी संतानातील मुनींचा मठ असून

त्याठिकाणी वादिरुद्र पंडित, क्रियाशक्ति पंडित, त्रिलोचनाचार्य पंडित, तत्पुरुष पंडित व श्रीकंठ पंडित हे श्रेष्ठ मुनी होऊन गेले. शिवलिंगी संतानाचा उल्लेख अन्यत्र मला आढळला नाही. बहुधा प्रस्तुत शिलालेखातच त्यांचा उल्लेख आढळतो. तसे असल्यास त्याही दृष्टीने हा शिलालेख महत्त्वाचा ठरेल.

## वाचन

### –१–

### [दान लेख]

१. स्वस्ति [।*] समस्तभुवनाश्रयश्री[पृथ्वीवल्लभमहारा*]-
२. जाधिराजः परमेश्वरः परमभ[ट्टारकः सत्याश्र*]
३. यकुलतिलक चालुक्याभरण[: श्री*]
४. मत्त्रिभुवनमल्लदेवः अभिनव[विक्रमार्कः*]
५. तस्मिन्ननेकसुखसंकथाविनो [?]
६. रसनवरतं कल्याणपुरे साम्राज्यश्रि[यमधिशा*]–
७. सति । तन्महाप्रधानं(नः) [।*] स्वस्ति समधिगतपं[चमहाशब्दः *]
८. महासामन्ताधिपतिर्महाप्रचंडदंडनाय[कः शिष्टे*]–
९. ष्टजनाभीष्टफलप्रदायकः सत्यनिधान[: सौजन्य*]–
१०. वनजमार्त्तंडः काश्मीरविषयमुखमंडन[: स्वामि*]–
११. वंचकशिरःखंडनः श्रीमत्त्रिभुवनमल्ल[देवप*]–
१२. दाव्ज(ब्ज)भृंगः साहसोत्तुंग एतन्नामादिसमस्त[प्रशस्ति*]–
१३. सहितः सौविदल्लानामधिष्ठायकः सर्वाधि[कारसं*]–
१४. पन्नः श्रीमद्भीमनाथो रा[ज्ञः] सकाशात्पिप्प[लग्रा*]–
१५. मं संप्राप्य तत्र ग्रामाभ्यन्तरे भीमसमु[द्र*]–
१६. तीरे च व्र(ब्र)ह्मविष्णुमहेश्वरादिसमस्त[दे*]–
१७. वतालयांश्च कारयित्वा तद्देवतानां नि[त्य*]–
१८. नैमित्तिकविशेषपूजाविधानार्थं वू[धू]प[दीप*]–
१९. नैवेद्यादिप्रदानार्थं च चंदनकुंकुमाद्यंग[भो*]–
२०. गप्रवर्त्तनार्थमपि च तत्रैव सरस्वतीमंडपे

२१. तपस्विनां विद्यार्थिनां चान्नदानसंवर्द्धनार्थं स्व[स्ति*]
२२. श्रीमच्चालुक्यविक्रमनृपकाले चतुर्विंशति[तमे*]
२३. प्रमाथिसंवत्सरे तदन्तर्गतमार्गशीर्षे मा[सि] पौ[र्णमा*]-
२४. स्यां सोमवारे सोमग्रहणपर्वणि मंडलविधा-
२५. नादिना धारापूर्वकं कृत्वा सर्वनमस्यत्वेन श्रीम-
२६. त्तत्पुरुषपंडितेभ्यः उज्वलंवायां मानदंडप्रमा-
२७. णेन पिप्पलग्रामभूम्यां निवर्त्तनानां पंचशता(त)-
२८. संख्यया अंकतोपि तत्संख्यया ५०० जलपा-
२९. षाणसहितां संमितां सुभूमिं प्रादात्। तस्याः
३०. पुनराघाटः [।*] दक्षिणतः शिलाकरग्रामसीमा [।*]
३१. पश्चिमतः शुष्कग्रामसीमैव। उत्तरतः शुष्कग्रा-
३२. मात्पिप्पलग्रामं गतो मार्ग्गः। ततो ग्रामाद्वा-
३३. यव्यदिग्भागे व्यवस्थितायाः पुष्करिण्याः सकाशा-
३४. द् ग्रामादाग्नेयदिग्भागाभिमुखं वक्रं गता भूः (।*)
३५. तत्र शिलाशासनं स्थापितं (।*) ततो दक्षिणाभिमुखं
३६. गत्वा भीमसमुद्रसन्निहितमहावनादुत्तर-
३७. तः शिलाशासनं तिष्ठति। ततः पश्चिमाभिमु-
३८. खं स्रोतो विलंघ्य तत्रापि शासनशिला स्थि-
३९. ता [।*] ततो दक्षिणाभिमुखं शिलाकरग्रामसी-
४०. मावधिः स्थिता भूमिः। एवं सम[न्ता]दाघाटविशु-
४१. ध्य(द्ध्य)र्थं सर्वासु दिक्षु तत्र तत्र शिलाशासनं स्था[पि*]-
४२. तमिति। अपि च श्रीभीमनाथो भीमेश्वरदेवा-
४३. नां पुरविधानार्थं ग्राममध्ये निवेशनभूमिं
४४. ददौ। तस्याः प्रमाणं [।*] मैलारदेवगृहाव(दु)त्तर-
४५. रदिग्व्यवस्थितपरिलूनभित्तिः [।*] पश्चिमाभि-
४६. मुखं पुरस्य नैर्ऋत्यां दिशि शिलाशासनं स्थि-
४७. तं। तदुत्तराभिमुखं पुरप्राकारसन्निधाने वाय-
४८. व्यतः शिलाशासनं। ततः पूर्वाभिमुखं पुरप्राका-
४९. राद्ब(द्ब)हिरैशान्यां दिशि पुरप्राकारसंश्लिष्टशासनं।
५०. ततो दक्षिणाभिमुखं पुरद्वाराद्दक्षिणदिग्भागे
५१. प्राकारसन्निधौ आग्नेयां दिशि शिलाशासनमे(म्।ए)-
५२. वं पुरस्य सर्वासु दिक्षु शासनं स्थापितं। पुनरपि

–२–

[भीमनाथ प्रशस्ती]

[वृत्ते—अनुष्टुभ १, १०, १२, २३, २४, ३१, ४९, ५०, ५८; वसंततिलका २-४, १७, ३७-३९; मालिनी ५; मंदाक्रांता ६, २१; शार्दूलविक्रीडित ७, ८, १९, २०, २२, २५, २६, २७, ४२, ५१, ५४, ५५, ५९; इंद्रवज्रा ९, ११, १३, १८, ४४; उपेंद्रवज्रा ३६; उपजाति १४-१६, २८, २९, ३२-३४, ३५, ४१, ४५-४७, ५२, ५६; वंशस्थ ४०, ४३; द्रुतविलंबित ३०, ५७; स्रग्धरा ४८; पुष्पिताग्रा ५३]

१. स्वस्ति श्री ॥ ये संसारसमुद्रस्य पारं संतो यियासवः [।*] ते शिवलिंगि-संतानशासनं पालयंत्विदम् ॥ [१*] ओं नमः । उक्षि(त्क्षि)प्तभूमि-रवताद्भवतो वि-

२. पत्तेः श्रीमानचर्यचरितः स महावराहः [।*] यत्कोपह्लिरसुरेंद्रवनान्यधा-क्षीद्वृंदारकानिललवैः परिवर्द्धमानः ॥ [२॥*] अव्याद्गणाधिपतिरर्च्चित-तपादपीठो ।

३. विघ्नोपशांतिकरणेप्सुभिरार्यवर्यैः [।*] सिंदूरपिंजरसमुन्नतकुंभभित्तिरुत्तं-सितेंदुशकलस्य सुतश्चिरं वः ॥ [३॥*] श्रीमच्चलुक्यनृपवंशसमुद्भवो-भूदुद्गीय–

४. मानचरितः कविवुं(बं)दिवृंदैः [।*] श्रीविक्रमार्क इति विश्रुतचारुनामा रामाविकाशिनयनोत्सववत्सलश्रीः ॥ [४॥*] विविधफलविधाता सज्जना-नां य आशी[र्वचन]–

५. सलिलसेकोद्भूतशाखासहस्रः [।*] विमलतरविसर्पत्कीर्त्तिवल्लीवितानः सुरतरुरिति लोकैः शंकितस्त्यक्तनाकः ॥ [५।*] यः साम्राज्यं ज–

६. लधिपरिखामेखलालंकृतोर्व्यां चक्रे क्रांताखिलरिपुगणो विप्रवर्याभिषिक्तः [।*] एकच्छत्रं सुरपतिरिव स्वर्गलोके फणींद्रः पाताले वा परिसरवधू–

७. लोचनाघातपात्रं ॥ [६॥*] प्रत्यर्थिक्षितिपालचक्रमसकृन्निर्मथ्य यस्याहवे विश्राम्यद्भुजयोः कृपाणलतिकाकांतिच्छटासंक्रमः [।*] कृत्तानेकशिरःसरोरु-

८. हलुलन्मालारजःपिंजरो रेजे स्वःसरितो र्य(य)मस्वसुरिवात्यंताद्भुतः संगमः ॥ [७॥*] अर्थादानविचारकः परिजनात्प्रीतिं परां प्रा–

९. पयन्नौदार्यो(र्या)हवयोर्य एव निलयो रक्षन्प्रजाः सर्वतः [।*]धर्म्मैकप्रति-भूरगम्यमहिमा दुःपा(दुष्पा)रगंभीरिमा तस्यासीद–

१०. परच्छलेन हृदयं श्रीभीमसेनापतिः ॥ [८॥*] तस्य प्रधानं विजितप्रधानः सेनाप्रधानं विदुषां प्रधानं [।*] धर्मप्रधानं जगतां प्रधानं

११. श्रीभीमनाथः समभूद्यशस्वी ॥ [९॥*] व्र(ब्र)ह्मणो मानसः पुत्रः ऋषीणां सप्तमो मतः [।*] अत्रिर्द्धमस्य संपत्तिर्यद्गोत्रादिरभून्मुनिः ॥ [१०॥*] सेव्यं
१२. मुनींद्रैर्विदितात्मतत्त्वैर्यद्गोत्रमात्रेयमतीवरम्यं [।*] विद्वत्प्रकांडैर्व(र्ब)हुपुण्यभाग्भिराराव्ध(ब्ध)मत्यर्थफलस्य सिद्धयै ॥ [११॥*] हिमाचलसमुत्पंना(त्पन्ना)
१३. यस्य वंशावलिर्व(र्ब)भौ [।*] द्विजध्वनितघोषेण पूरिताशेषदिग्मुखा ॥ [१२॥*] आदित्यभट्टो विदितात्मशास्त्रो वेदार्थविज्ञानपरः शुचि-
१४. श्च [।*] लोकस्तुतो यत्प्रपितामहोभूत्कश्मीरदेशेष्वतिधर्मनिष्ठः ॥ [१३॥*] महाध्वरध्वस्तसमस्तपापो गार्हस्थ्यधर्मप्रथितप्रभावः [।*] तुष्यद्वितस्ताप्तवित-
१५. स्तिनाकः पिनाकितोषाप्तकुलर्द्धिवृद्धिः ॥ [१४॥*] पितामहो यस्य व(ब)भूव भूमौ श्रीशीयुभट्टः शुचिधर्मकर्मा [।*] हुताग्निहोत्रस्त्रिजगत्पवित्रं(त्रः)
१६. संत्रासिताघस्त्रिदिवाप्तकीर्त्तिः ॥ [१५॥] श्रीवल्लभट्टो गुणरत्नभूमिः पिता व(ब)भूवोच्चयशःपताकः [।*] संसारपाथोनिधिपारयान[प्ल]वोस्य सद्गोत्रपरं-
१७. परायाः ॥ [१६॥*] धीभंगिसंगलहरीहतपापकूलो गांभीर्यवान्सुकृतिभिः परिसेवितात्मा [।*] सन्मार्गमार्गनिरतोतिपवित्रचर्यो गंगाप्रवाह इव पू-
१८. रितधर्मपाथाः ॥ [१७॥*] शौर्याकरश्चंद्रकलाकलाविल्लव्धो(ब्धो)दयो भानुपदार्चनेन [।] लक्ष्मीप्रियो नाशितशत्रुचक्र आक्रांतलोकत्रितयप्रतापः ॥ [१८॥*] मे-
१९. रौ किंनरनायिकाः सुरपतेरास्थानसंस्थाः पुरः पातालेप्यहिकन्यका अहरहः क्षित्यां क्षितीशांगनाः [।*] कीर्त्तिय(र्य)स्य जनप्रियस्य विततां श्रीभी-
२०. मसेनापतेर्न्नीहारेंदुसितारविंदधवलां गायंति गीतैर्मुहुः ॥ [१९॥*] गांभीर्येण महोदधिः सुदयया साक्षाच्च धर्मात्मजः शौर्येणार्ज(र्जु)न-
२१. विक्रमो रविनिभः शश्वत्प्रतापोदयैः [।*] शैत्येनेंदुसमानशीलनिलयः क्षांत्या पृथिव्या समः श्रीमान्भीमचमूपतिः समभवत्सर्वस्य ह-
२२. र्षोदयः ॥ [२०॥*] वाग्भिः कीर्तेस्त्रिभुवनपदारोहनिःश्रेणिकाभिस्तत्वार्थत्वात्सकलविदुषो भीतिदत्वाद्विषश्च [।*] प्रीतिप्राप्तेः क्षितिपतिसमं घूर्ण्ण-
२३. यन्नर्ण्णवांभ आस्थाने यो वदति महति क्ष्माभृतां सभ्यशोभ्ये ॥ [२१॥*] आरात्संगतमानसं च सुमहत्पद्माकरोल्लासितं गौरीवीरवतां स-
२४. भा सुमनसां गर्जन्वृषो वर्त्तते [।*] भीमे वि(बि)भ्रति भूर्भ्रिदभवने सान्निध्यमत्यद्भुत्(त)न्नासीच्छक्तिधरो विनायक इतो भूतानि सम्य-

२५. ग्न(ङ्न)च ॥ [२२॥*] यस्मिन्घोरभया[गा]रे प्रेतसंघाः परस्परं [।*] युद्धे युध्यति युध्यन्ति रक्तमांसाभिलाषिणः ॥ [२३॥*] शास्त्रे धर्मे सुराच्चार्यां
२६. सदाचारे सदीक्षणे [।*] राजकार्ये सतां कार्ये समोत्कर्षान्मुनिः स्फुटम् ॥ [२४॥*] सर्वाशाः परिपूरयन्व(न्ब)हुविधस्वर्णांवु(बु)धा-
२७. रोत्करैर्द्धाराधारमजीजयत्त्रिभुवने सत्वात्तपोन्तं ततः [।*] कुर्वन्क्ष्माधरमंकुरैरतिमुदः प्रोज्जृंभितं सत्फलैः सांद्रैर्विद्रुतदुष्टजं-
२८. तुनिकरं रात्रिन्दिवं सर्वदा ॥ [२५॥*] पृथ्वीं व्याप्य विभावरीमिव शशी यत्कीर्तिपुंजः स्फुरन्देवाधीशनिकेतनं प्रति ययौ तत्रा-
२९. प्यसानागतः [।*] नागेन्द्रालयमप्यपूरयदनावाप्तावकाशस्ततस्तस्थावुच्चलितः पयोंवु(बु)धिलुलद्वेलानुकारं दधन् ॥ [२६॥*] औदार्यं
३०. कृपणेषु शौर्यमरिषु प्रत्यग्रता धर्मणि प्रौढिर्वाच्यभिरामता च वपुषि श्वैत्यं यशस्युन्नते [।*] रूढिः सर्वजगत्त्रये चतु-
३१. रता वु(बु)द्धिक्रमे विक्रमे शुच्यत्वं नितराममी गुणगुणा एतेषु यस्यासत ॥ [२७॥*] विघूर्णयन्संसदि सभ्ययोधानु(न्) व्यूढेप्य-
३२. रंध्रं नृपनायकेन [।*] अन्तःस्पृशो यो सृजदुक्तिकांडान् सपक्षवृत्तीन्सफना-(ला)नशंकः ॥ [२८॥*] सा दिग्न(दिङ्न) जाता न जनिष्यते या
३३. तस्यातिदुःसाधतया प्रतीता [।*] चरित्रसंचारिगुणो यदीयोप्यपूरयद्व्र(ब्र)-ह्मसदः समस्तम् ॥ [२९॥*] त्रिवु(बु)धवर्यवने विहरन्मुहुः कृत-
३४. कवा(बा)णगणं विससर्ज यः [।*] सपदि कृष्णमृगं चपलाकृतिं प्रतिवचो मृगयुर्विजिघांसया ॥ [३०॥*] लक्ष्मीं विष्णो(ष्णो)र्यशः शंभोर्गंभी-
३५. र्यं च पयोदधेः [।*] क्षमां क्षोण्या जहारान्यैः सत्यमेषु तु याच्यते ॥ [३१॥*] कृते दितिर्वीरसुता व(ब)भूव त्रेतायुगे रामनृपस्य
३६. माता [।*] या देवकी द्वापरगोचरा सा जयावती यज्जननी कलौ च ॥ [३२॥*] श्रीमत्यभूज्जोगलदेविकाख्या ख्यातावदाताजितदानकीर्त्तिः [।*]
३७. विभूषयंती वपुषोर्द्धमस्य व(ब)भावुमेवेंदुकलाधरस्य ॥ [३३॥*] पतिव्रता धर्मपरातिरम्या धर्मार्जिता धर्मरताप्तधर्मा (।*) विचित्रचारित्रवि-
३८. शुद्धकीर्त्तिः श्रीजोगवा यस्य व(ब)भूव पत्नी ॥ [३४॥*] पद्मेव विष्णो-र्भुवनाधिपस्य शंभोरुमेवामितविक्रमस्य [।*] रतिश्च कामस्य हे(ह)रेः शचीव
३९. हिमांशुबिं(बिं)व(ब)स्य च रोहिणीव ॥ [३५॥*] कृतोपकारा व(ब)हुभिः प्रकारैरुदारतारापतिकांतवाग्भिः [।*] अनुग्रहेणात्मपरिग्रहस्य मही-
४०. तलव्यापिमहागुणौघा ॥ [३६॥*] मेघंकरे विवु(बु)धवर्यगणोपसेव्ये यो भीमविक्रमसमाख्यविशालशालां [।*] निर्माय केशवपिताम-

४१. हरुद्रमूर्तोः संस्थाप्य पिप्परिकखेटमदादमूभ्यः ।। [३७।।*] गोदावरीसलिल-
धौतमहाघसंघे नांदीतटे त्रिपुरुषैः कृतसुप्रतिष्ठां [।*] चक्रे प्रता-
४२. पनवभीमसमाख्यशालां ग्रामं ददौ विपुलवैभववग्घिकाख्यम् ।। [३८।।*]
योसौ महन्निजभुजोद्व(द्ब)लभीमनाम विष्णोश्चकार स-
४३. दनं भुवनाचले च [।*] भीमांकनाम विकसद्यशसां निधानं चक्रे तथा शिवपुरे
शिवकीर्त्तनं यः ।। [३९।।*] चकार भीमेश्वरदेवतालयं क-
४४. ल्याणपुर्युन्नतिचित्रमुज्वज्ज्वलं [।*] मुरुंवि(बि)काग्राममदात्सविस्तरं चकार
कल्लुंव्व(ब्ब)रकेपि यः सरः ।। [४०।।*] स पिप्पलग्राममवाप्य राज्ञो
४५. ज्ञानामृतक्षालितकल्मषेभ्यः [।*] भुवं ददौ धर्मपरो द्विजेभ्यः पदं स्वकीर्त्तेरिव
विस्फुरंत्याः ।। [४१।।*] चक्रे यस्त्रिविलोचनत्रिव--
४६. दनैः स्फूर्जन्मणिज्योतिषां विभ्राजन्मुकुटत्रयैः सदृशतां वि(बि)भ्रज्जनैरर्च्चितं
[।*] देवानां निलयत्रयं स्वयशसो निश्रे-
४७. णिकासन्निभं प्रत्यग्राहवभीमसंज्ञमपि च प्रादात्सहस्रं भुवः ।। [४२।।*]
भीमार्कनामापि च देवतालयं चकार रोचिःपरिपूरिताचले [।*]
४८. भानोः समानं कनकोज्वज्ज्वलश्रिया प्राचीगिरेः शृंगरुचा विचित्रया ।। [४३।।*]
स निर्ममे भीमसमुद्रनाम तडागमादर्शमिव स्वकीर्त्तेः [।*]
४९. कदाप्यसंक्षोभ्य समुद्रमुद्रां वि(बि)भ्रत्स्वपुण्येंदुसमृद्धिवृ[द्धि] ।। [४४।।*]
विघ्नस्रवंतीपतिपारतारं सेतूपमं भीमव(ब)लाभिधानं [।] हे-
५०. रंव(ब)धामापि विनिर्ममे सः समार्पयच्चापि शतं पृथिव्याः ।। [४५।।*]
स क्षेत्रपालस्य चकार धाम भीमायुधाख्यं स्वतडाग-
५१. तीरे [।*] वाप्यामपि द्वादशदेवतानां चकार धामान्यपरां च वापिम् ।।
[४६।।*] चंड्याः करोत्संगकृपाणपाटवप्र-
५२. पिष्टमाद्यन्महिषासुरद्विषः [।*] चंडारिभीमाभिधमोके(क) उच्चकैश्चकार
भूमेः स ददौ शतं ततः ।। [४७।।*]
५३. यत्र क्वाप्यस्ति तीर्थं महदपि नगरं यत्र चास्ते स्वदेशे योसौ सत्राणि चक्रे प्रति-
पदमनिवा-
५४. र्याणि सर्वासु दिक्षु [।*] यद्दत्ताचावपूर्णा द्विजवरनिकरा वु(बु)द्धवेदार्थशास्त्रा
जायन्तेभीष्ट-
५५. रूपाः परिचितपरमव्र(ब्र)ह्ममार्गा विपापाः ।। [४८।।*] होमधूमलता यस्य
विप्रमंत्रावनीरुहा [।*] यशः-
५६. पुंजप्रसूनाढ्या सदा नवफलाकुला ।। [४९।।*] यदन्नभोजनैः पूताः विप्रा
भुवि सहस्रशः [।*] व्रि(ध्रि)यंते-

५७. मररामाभिर्व्याकुलाभिरभीप्सुभिः ।। [५०।।*] अंतो नास्ति परोपकार-
करणे श्रीभीमसेना–

५८. पतेर्येनापूरि सुवर्ण्णलक्षनिकरैः श्रीविक्रमार्को नृपः [।*] तस्यैवं प्रगुणं गुणेषु
गणनां कर्त्तुं

५९. समीहे परं भूयस्त्वादतितुच्छतः स्ववचसो वक्तुं न शक्नोम्यहम् ।। [५१।।*]
यावन्नभो यावदयं विरिंचि–

६०. र्यावन्मृडो यावदसौ च कृष्णः [।*] तावज्जनश्रोत्रसुखावहास्ता(स्तां)
दिर्गपिता स्वस्तिमतः प्रशस्तिः ।। [५२।।*]

६१. मदमुदितकवींद्रवृंददन्तिदलनहरिः सकलार्थशास्त्र[दृ]ष्टः [।*] सुललितकविता-
नखस्तदी–

६२. यसूनुरकृतकृतिं नवकालिदास एनाम् ।।५३।। इति प्रचंडदंडनायकश्रीभीम-
नाथसूनुः

६३. सूरिजनवृंदानंदसंदोहदः गुरुचरणसपर्यापरायणः कवींद्रकुमुदिनीचंद्रः ऋग्वेद–

६४. चूडामणिः अभिनवकालिदासः का[लि]दासदंडनायकश्चकार प्रशस्तिमिति
शुभम् ।।

—३—

[शिवलिंगी–संतान आचार्य]

६५. ओं नमः ।। स्वस्ति [।*] यमनियमस्वाध्यायध्यानधारणमो(मौ)नानुष्ठान-
जपसमाधिषड(डं)गोपहा–

६६. रादिसंपन्नाः अनेकतर्कादिशास्त्रपारावारपारगाः अवदातकीर्त्तिध्वजाः अमलि-
नचरि–

६७. त्राः दुष्टदर्पिष्ठपंडितगलकालपाशा वादिदिगंव(ब)रमहावा(बौ)द्धकुलधूम-
केतवः पर्वतावा(व)–

६८. ल्यां कालमुखतपोधनाग्रगण्याः किव्वग्रामकृताधिवासश्रीमन्महाशिवलिंगि-
संतानकु–

६९. मुदिनीलसन्निशाकराः प्रत्यक्षरुद्र[द्र]महिताः श्रीमद्वादिरुद्रपंडिताः ।।
तेषामेव की–

७०. र्त्तिः । काणादे कणभुग्वृ(ग्बृ)हस्पतिमते वाचस्पतिः कापिले मार्ग्गे यः कपिलः
स्वयं सु–

७१. गदिते यां(यो) सौगते सद्गुरुः [।*] मीमांसाधिगमे स जैमिनिमुनिर्न्यायेक्षपादः
कृती शव्दे(ब्दे)–

७२. जो लकुलीश्वरो विजयते शैवे शिवः सांप्रतम् ।। [५४।।*] तच्छिष्याः श्रीमल्लकुलीश्वरागममानससरो–
७३. वरराजहंसाः सरस्वतीश्रवणभूषणावतंसाः कलिकालभयपलायितधर्मशरणाः
७४. गुरुकुलसमुद्धरणाः यमनियममहीरुहालवालस्फालवालसमुचितकालाः धार–
७५. णाजपसमाधिविधिनिपुणाः संसारभयहरणाः गुरुजनकृतविनयाः भूषितनिजस–
७६. मयाः वु(बु)धजनकृतपक्षाः तर्कादिशास्त्रदक्षाः सततवीतरागाः परहित-भवभोगाः भा–
७७. रतीकर्ण्णपूराः नरकभयदूराः त्रिभुवनविदितकीर्त्तयः महेश्वरमूर्त्तयः महापुरु–
७८. षकृतभक्तयः श्रीमत्क्रियाशक्तिपंडितदेवाः ।। तदनुजाः ।। स्वस्ति [।*] समस्तलोकसंस्तू–
७९. यमानगुणमणिगणमरीचिमालालंकृताः समस्तलोकसंस्तुता[:] पार्वतीमाता-रमण–
८०. चरणयुगलारविंदमधुकरा[:] दशधर्मनिर्मलरत्नाकराः दिंडीरपिंडपांडुरय–
८१. शःसुधाधवलिताजांडमंडलाः भारतीकर्ण्णकुंडलाः विवु(बु)धजनवनमार्त्तंडाः स–
८२. मुदितमदनमदविदलनप्रचंडाः लाकुलागमसरोजिनीराजहंसाः निजसमया–
८३. वतंसाः कलिमलकलंकपंकांकविरहिताः विद्यान्नदानविनोदाः समस्तमुनिजन–
८४. परिरक्षणकृतिसंपादिताह्लादा(दाः) शिवलिंगिसंतानकुमुदिनीलसन्निशा-कराः ।।
८५. श्रीमत्त्रिलोचनाचार्यपंडिताः ।। स्वस्ति [।*] यमनियमासनप्राणायाम-प्रत्याहारध्यान–
८६. धारणासमाधिविधिसंपन्नाः अनेकतर्कसिद्धांतादिशास्त्रपारावारपारगाः कविग–
८७. मकवादिवाग्मितासंपदाधाराः समस्तदिगन्तराप्तकीर्त्तिध्वजाः अनवरतवि–
८८. द्यान्नदानकेलीविनोदाः विद्वज्जनकुमुदिनीलसच्चंद्राः अगण्यपुण्यान्विताः प्रवर–
८९. मुनिगणाग्रगण्याः गुरुजनपदांभोजयुगलषट्चरणाः लाकुलागमसमयसमुद्ध–
९०. रणाः सकलमुनिजनसमाजाश्रयाः आश्रितजनकल्पवृक्षाः पवित्रितनिजसम–
९१. यसत्वाः(त्त्वाः) सम्यग्विदितात्मतत्वाः(त्त्वाः) परिचितस्वर्ग्गापवर्ग्गमार्ग्गाः विगतदोषसंसर्ग्गाः करुणा–
९२. मृतरसार्द्रचित्ताः अत्यंतपरहितप्रवृत्ताः समस्तगुणगणावासाः महेश्वरदासाः
९३. श्रीमद्भारतीकर्ण्णपूरनाम्नां क्रियाशक्तिमहामुनीश्वराणां शिष्याः श्रीमत्त-त्पुरुषपंडिता–

९४. :।। आरामैर्विविधैस्न(स्त)डागनिवहानत्यंतसंशोभितान्देवानां निलयान-
नंतभिवा–
९५. न्विद्यान्नदानान्वितान् [।*] आवासान्व्रतिनां विमानसदृशांश्चक्रे समंतात्कृती
श्रीमांस्तत्पुरु–
९६. षो मुनिर्द्दशदिशाव्याकीर्ण्णकीर्त्तिध्वजः ।। [५५।।*] समस्तशास्त्रागम-
पारदृश्वा शिष्टार्थिविद्वज्ज–
९७. नकल्पवृक्षः [।*] विचक्षणांभोजवने(नै)कभास्वान्विराजते तत्पुरुषो मुनीशः
।। [५६।।*] जयति स–
९८. ज्जनसूरिसुसंगमैर्द्विजवरैर्मुनिभिः परिसेवितः [।*] विविधपुण्यनिधिः शुभ-
तीर्थतां द–
९९. धदसाविह तत्पुरुषो मुनिः ।। [५७।।*] यमादिधर्मसंपन्नो मुनीनां प्रवरो
महान(न्) [।*] सर्वविद्या–
१००. गुणाधारः श्रीकंठो मुनिरुद्ययौ ।। [५८।।*] कारुण्यामृतशीकरैर्भवमरैः
संतापितप्राणिना–
१०१. माह्लादं जनयन्नभीप्सितफलं संप्रापयन्नर्थिनां [।*] यो विद्वद्गुरुमोक्ष-
रक्षणपरो
१०२. विद्यान्नदानान्वितः सोयं भाति यमादिधर्मनिरत्व:(तः) श्रीकंठनाथो मुनिः ।।
[५९।।*] ओं नमः [।।*]

# १२

## राष्ट्रकूट तृतीय गोविंदराजाचा झरिका ताम्रपट

### उपलब्धी

मूर्तिजापूर (ता. मूर्तिजापूर, जिल्हा अकोला) पासून उत्तरेस तीन मैलावर 'सिरसो' नावाचे एक खेडे आहे. तेथील प्रतिष्ठित सद्‌गृहस्थ श्री. अच्युतराव गुलाबराव देशमुख यांच्या मालकीच्या गढीत प्रस्तुत ताम्रपट सापडला. गढीच्या नैऋत्येकडील बाजूला सुमारे ३० ते ४० फूट उंचीचा एक पडका बुरुज होता. तो तारीख १३ एप्रिल १९५४ रोजी खचला. तेथील माती गोळा करीत असताना हा ताम्रपट मिळाला. श्री. अच्युतराव देशमुख यांचे बंधू श्री. भगवंतराव देशमुख (मुख्य कार्यपालन अधिकारी, जनपदसभा व उपविभागीय पदाधिकारी, आर्वी, जिल्हा वर्धा) यांनी आर्वी येथील आमदार श्री. ज. ब. ऊर्फ नानासाहेब कदम यांच्यामार्फत तो माझ्याकडे पाठविला. या सर्व सद्‌गृहस्थांचा मी अत्यंत आभारी आहे. त्यांच्याच संमतीने प्रस्तुत ताम्रपटाचे संपादन येथे करीत आहे.

### वर्णन

प्रस्तुत ताम्रपटाचे एकूण तीन पत्रे असून ते ·४ इंच जाडीच्या व ३ इंच व्यासाच्या एका कडीत ओवलेले आहेत. कडीची दोन्ही टोके १.८ इंच व्यासाच्या एका वर्तुलाकार मुद्रेत फसविलेली आहेत. मुद्रेवर कमलासनस्थ गरुडाची मूर्ती असून तिने आपल्या दोन्ही हातांत, प्रत्येकी एकेक सर्प धारण केलेला आहे. राष्ट्रकूट सम्राटांच्या इतर ताम्रपटांत जशा मुद्रा आढळतात तशीच ही आहे. ताम्रपट माझ्या हाती आल्यानंतर नागपूर म्युझियमचे मुख्य अधिकारी डॉ. शं. श्री. पटवर्धन यांच्या सल्ल्याने त्यांच्याच कार्यालयात ताम्रपटाची कडी मी कापून घेतली. त्यामुळे ताम्रपटाचे पत्रे वाचनसुलभतेसाठी बाहेर काढता येणे शक्य झाले. या तिन्ही पत्र्यांचे मिळून वजन १७५ तोळे असून मुद्रेचे वजन ५१ तोळे आहे.

ताम्रपटाच्या प्रत्येक पत्र्याची लांबी साधारणपणे ९॥ ते १० इंच असून रुंदी ७ इंच आहे. ताम्रपट हाती आला त्यावेळी त्यावर सर्वत्र कमालीचा जंग चढलेला होता. तो मी स्वच्छ केला. पहिला पत्रा खराब झालेला

असला तरी त्यावरील मजकूर वाचता येतो. इतर दोन्ही पत्र्यांवरील मजकूर ठसठशीत कोरलेला आहे. तथापि दुसऱ्या पत्र्याच्या दुसऱ्या बाजूवरील मधल्या तीन ओळी (क्रमांक ५१, ५२ व ५३) जंगाने बऱ्याच खाऊन टाकल्यामुळे अत्यंत अस्पष्ट व दुर्वाच्य झाल्या आहेत. याच ओळींत दान दिलेल्या गावाच्या चतु:सीमांवरील गावांची नावे असल्यामुळे स्थलनिर्णय करण्याचे काम कठीण झाले आहे. पहिल्या व तिसऱ्या पत्र्याची एकेक बाजू कोरी असून त्यांच्या दुसऱ्या बाजूवर आणि दुसऱ्या पत्र्याच्या दोन्ही बाजूंवर मजकूर कोरलेला आहे. अर्थात, एकूण मजकूर चार पानांवर आलेला आहे. पहिल्या पत्र्याच्या दुसऱ्या बाजूवर १७, दुसऱ्या पत्र्याच्या पहिल्या बाजूवर १९ व दुसऱ्या बाजूवर २०, आणि तिसऱ्या पत्र्याच्या पहिल्या बाजूवर १७ ओळी, याप्रमाणे एकूण मजकूर ७३ ओळींचा आहे. दुसऱ्या पत्र्याच्या पहिल्या बाजूवरील शेवटून दुसरी ओळ (क्रमांक ३५) इतर ओळीपेक्षा १।। इंचाने लहान आहे; आणि शेवटची ओळ तर केवळ १.७ इंच लांब असून तीत फक्त ७ अक्षरे आहेत. दुसऱ्या पत्र्याच्या दुसऱ्या बाजूवरील शेवटची ओळ सुद्धा केवळ १।। इंच लांब असून तीत फक्त पाच अक्षरे आहेत. ही ओळ या पत्र्याच्या शेवटी उजव्या बाजूला कोरलेली आहे. अर्थात, ताम्रपटातील अक्षरांचा आकार सर्वत्र सारखा नाही. अक्षरे साधारणपणे एक तृतीयांश ते एक द्वितीयांश इंच उंचीची आहेत. ७२ व ७३ या ओळींत ती जरा मोठी, तर ३९ व्या ओळीत थोडी लहान आहेत. ताम्रपटाचा मजकूर कोरण्याचे काम काळजीपूर्वक झालेले नाही. कोरताना काही ठिकाणी अक्षरे किंवा शब्द वगळले गेले आहेत. (उदा. २४, २७, ३२, ३४, ४१, ४५ इत्यादी ओळी पाहा); तर काही ठिकाणी त्यांची निष्कारण पुनरावृत्ती झाली आहे. (उदा. ५, १७, १८, ३४, ५७ इत्यादी ओळी पाहा.) ३४ व्या ओळीत तर कोरणाराने बराच घोटाळा उडविलेला आहे.

### अक्षरवटिका

प्रस्तुत ताम्रपट संस्कृत भाषेत लिहिलेला आहे. आरंभीच्या ४४ ओळीं-तील व ६४ ते ७२ ओळींतील मजकूर पद्यात असून ४४ ते ६३ व ७२ आणि ७३ या ओळींतील मजकूर गद्यात आहे. अक्षरांची लिपी देवनागरी आहे आणि तिचे वळण साधारणपणे राष्ट्रकूटांच्या इतर ताम्रपटांतील लिपीशी जुळते आहे.

सामान्यत: अक्षरावरील शिरोरेषेच्या शेवटी डाव्या बाजूला खाली आखूड रेषा कोरून व्यंजनांतर्गत **आ** दर्शविलेला आहे. उदा. मंडलाग्रो-ओ. २; पुनराददीत, दानात्-ओ. ७०; महाक्षपटलाधिप-ओ. ७३. काही ठिकाणी **आ**काराचे चिन्ह असलेली

ही रेषा आजच्याप्रमाणे खालपर्यंत कोरलेली आहे. उदा. निशात–ओ. १२, तथा–ओ. ७३; क्वचित ही आकाराची रेषा शिरोरेषेच्या शेवटी किंचित वर कोरलेली आढळते. उदा. पराक्रम-ओ. १७,-लोलां-ओ. ७१, दत्ता–ओ. ६७; तर क्वचित ती किंचित वर व खाली दोन्हीकडे कोरलेली आढळते. उदा. दत्तानि पुरा, तानि–ओ. ६९. ओ. ६७ मधील 'वसुधा' शब्दातील 'धा' तील आकाराचे चिन्ह तर, शिरोरेषा न कोरता, केवळ वर उभे चिन्ह कोरून दाखविले आहे.

खाली दोन व त्यावर एक अशी तीन टिंबे कोरून 'इ' हा स्वर दाखविला आहे. उदा. इति-ओ. ३, ७१. व्यंजनांतर्गत ऱ्हस्व व दीर्घ इकार सामान्यत: आजच्या-सारखेच आहेत, पण क्वचित व्यंजनाच्या शिरोरेषेवर केवळ गोलाकार चिन्ह कोरून ऱ्हस्व इकार दाखविला आहे, उदा. अभिमुखी–ओ. ३, लिखित–ओ. ७२.

व्यंजनांतर्गत ऱ्हस्व इकाराचे चिन्ह काही ठिकाणी आजच्यासारखेच आहे. उदा. शुष्क-ओ. ६५, कुंभ-ओ. २९, कुक्काय्येन-ओ. ७३; पण काही ठिकाणी दंडाच्या खालच्या डाव्या बाजूला लहानशी आडवी रेषा कोरून ऱ्हस्व इकार दाखविला आहे. उदा. पुरा-ओ. ६९, श्रेयोनुपालनम्-ओ. ७०, दायोनुमन्तव्य:-ओ. ६२, मुद्यत, विधु-ओ. २, सूनु-ओ. २९, इत्यादी. दीर्घ ईकाराचे चिन्ह आजच्यासारखेच आहे; पण ते दंडाच्या खाली उजव्या बाजूला कोरलेले आहे. उदा. पूजापूजित-ओ. ७२; सूनो:-ओ. ७३. ओ. ६० मध्ये शेवटी आलेल्या भूमि शब्दातील भू च्या दीर्घ उकाराचे चिन्ह थोडे वेगळे आहे. ए या स्वराचे चिन्ह त्रिकोणाकृती असून ते ओ. ५२ मधील 'एवम्' व ओ. ६१ मधील 'ऐश्वर्य' या शब्दात आढळते.

**भाषा**

ताम्रपटाची भाषा संस्कृत आहे, ती काही ठिकाणी अशुद्ध आहे. अनेक ठिकाणी स साठी श कोरलेला आहे, उदा. आशीत्–ओ. १, २९ व ३२; श्वविक्रम–ओ. १५; तर उलट अनेकदा श साठी स कोरला गेलेला आहे. उदा. रसना–ओ. २४, प्रसासति–ओ. ३२. क्वचित् ष साठी श कोरला आहे. उदा. जिगीशया–ओ. ३८, विंध्याटवीश्वतोयासु–ओ. ६५. त्र साठी तृ–ओ. ६, व गृ साठी ग्रि–ओ. १२ यांचा उपयोग हाही अशुद्ध होय. अनुनासिकाऐवजी अनु-स्वारांचा उपयोगही केलेला आहे. उदा. मानकान् ऐवजी मानकां–ओ. ४६ पाहा. भोक्तुं साठी भोक्त हे रूपही चुकीचे आहे. कोरताना झालेली वर्ण-विपर्याचीही काही उदाहरणे आढळतात. उदा. गज ऐवजी जग–ओ. २३. –द्योदकादि ऐवजी –द्योतकादि ओ. ५८; प्रपद्योपरि ऐवजी प्रपद्योरपि–ओ. ३४.

**ताम्रपटाचा काल**[१]

प्रस्तुत ताम्रपटाचा काल अक्षरी 'संवत्सरशतेषु सप्तसु षड्विंशत्यधिकेषु' (ओ. ५७) म्हणजे सातशे सव्वीस असा अक्षरात लिहिला असला तरी आकड्यात नमूद करताना तो ७२५ असा कोरला आहे. ही उघड विसंगती आहे. ताम्रपटातील दान कार्तिक पौर्णिमेला चंद्रग्रहणाच्या वेळी तुंगभद्रा नदीत स्नान करून दिलेले आहे. दि. ब. पिल्ले यांच्या भारतीय पंचांगानुसार (Indian Ephemeris) गत शक ७२५ मध्ये कार्तिक शुद्ध पौर्णिमेला चंद्रग्रहण होते. तसे ते श. ७२६ मध्ये, इतकेच नाही तर तदनंतर ८ वर्षांतही नव्हते. शके ७२१ पूर्वीही आठ वर्षात या तिथीला चंद्रग्रहण नव्हते. तेव्हा या ठिकाणी अभिप्रेत असलेला शक (गत[१]) ७२५ हाच होय व तिथी कार्तिक शुद्ध पौर्णिमा ही होय. या मितीला इंग्रजी तारीख २ नोव्हेंबर इ. स. ८०३ ही होती.

**राष्ट्रकूटांची वंशावळ**

या वेळी राष्ट्रकूट नृपती **तिसरा गोविंदराज** हा अलंपुराजवळ तुंगभद्रा नदीच्या काठावर तळ देऊन राहिला होता. तेथून त्याने हा ताम्रपट दिलेला आहे. आरंभीच्या २७ श्लोकांत या गोविंदराजाची वंशावळ दिलेली आहे, ती त्याच्या इतर ताम्रपटांतील वंशावळीप्रमाणेच आहे. राष्ट्रकूट वंशाचा मूळ पुरुष **पहिला गोविंदराज**

---

१ राष्ट्रकूट नृपती गोविंद तिसरा याने दिलेल्या बहुतेक ताम्रपटांत गत शक निर्देशिलेला असतो; तथापि, कधी कधी 'शकनृपकालातीत' म्हणजे 'गत' असे म्हटले असले तरी प्रत्यक्ष चालू असलेला शकही दिलेला आढळतो. उदा. वणी-दिंडोरी ताम्रपटात (इं. अँ. वर्ष ११, पृ. १५९) शक वर्ष (गत) ७३० व्यय संवत्सर—असे नमूद केले आहे; पण व्यय संवत्सर गत ७२९ ला येतो. तसेच बहुलावाड ताम्रपटात (मध्य. इति. साधने, भाग २, पृ. २१) शक वर्ष ७३२ व संवत्सर सर्वधारी दिला आहे; परंतु सर्वधारी संवत्सर गतवर्ष ७३१ मध्ये येतो. अर्थात दोन्ही ठिकाणी 'शकनृपकालातीत' असे शब्द असले तरी 'चालू' शक निर्दिष्ट केलेले आहेत असे दिसते. तसाच प्रकार प्रस्तुत ताम्रपटातील शकाचा आहे. अक्षरी दिलेले शकवर्ष ७२६ गत म्हणून निर्दिष्ट केलेले असले तरी ते 'चालू' वर्ष होते. अर्थात, आकड्यात नमूद केल्याप्रमाणे तेथील अभिप्रेत शक—काल गत ७२५ हाच होय.

(श्लोक २ ते ४) ; त्याचा पुत्र **श्रीकर्कराज** (श्लो. ५) त्याचा मुलगा **इंद्रराज** (श्लो. ६); त्याचा पुत्र **श्रीदंतिदुर्ग**; याने कांची, केरल, चोल, पांड्य, श्रीहर्ष, वज्रट इत्यादी राजांना जिंकणाऱ्या, अजेय अशा कर्नाटक सैन्याला देखील सहज जिंकले होते; आपल्या सामर्थ्याने वल्लभाला जिंकून राजाधिराज आणि परमेश्वर ह्या पदव्या त्याने प्राप्त करून घेतल्या (श्लो. ७ ते १०). त्याच्या मृत्यूनंतर श्रीकर्कराजाचा पुत्र **कृष्णराज** हा राजा झाला. ह्यालाच शुभतुंग व अकालवर्ष अशीही नावे होती. राहप्पाला युद्धात जिंकून यानेही राजाधिराज आणि परमेश्वर अशा पदव्या मिळविल्या (श्लो. ११ ते १७); त्याच्यानंतर त्याचा पुत्र **दुसरा गोविंदराज** हा गादीवर आला. (श्लो. १८). त्याला ध्रुव नावाचा धाकटा भाऊ होता. (दुसरा गोविंद ह्याला दूर करून) हा **ध्रुव** गादीवर आला. तेव्हा या गोविंदराजाने मालवेश आदि शत्रू गोळा केले, त्यांना कांची, गांग आणि वेंगि येथील राजांनी मदत केली. तथापि, ध्रुवाने गोविंदराजाच्या बाबतीतील आपला निश्चय ढळू दिला नाही. त्याने त्याचे रत्नागार व सुवर्णागार हस्तगत केले (श्लो. २१). सामदामादिकांनीही जेव्हा वल्लभ (दुसरा गोविंदराज) संधी करण्याला तयार झाला नाही तेव्हा त्याला व सर्व दिशांतील भूपतींना जिंकून ध्रुवानेही परमेश्वरपदवी प्राप्त केली. या ध्रुवराजाला निरुपम असेही संबोधीत (श्लो. २३). ध्रुवराजाचा पुत्र **तिसरा गोविंदराज** हा होय. त्यानेच हा ताम्रपट दिलेला आहे.

### पैठण, अंजनवती व झरिका ताम्रपट

ही वंशावळ वर्णन करणारे बहुतेक श्लोक शके ७१६ मधील पैठण[१] ताम्रपटांतील श्लोकांप्रमाणेच आहेत. तथापि, प्रस्तुत ताम्रपटातील २०, २४ व २७ हे श्लोक पैठण ताम्रपटात नाहीत, तर पैठण ताम्रपटातील २४, २६ व २७ हे श्लोक प्रस्तुत ताम्रपटात नाहीत. साधारणपणे पैठण ताम्रपटातील वंशावळी–वर्णनाचाच मसुदा अंजनवती[२] ताम्रपटात वापरलेला आहे. पण पैठण ताम्रपटातील ३, ४, १०, १२, १७, २०-२२ व २५-२७ हे श्लोक त्यात नाहीत. प्रस्तुत ताम्रपटातील ३, ४, १०, १२, १७, २० ते २४, २६ व २७ हे श्लोक अंजनवती ताम्रपटात नाहीत, तर अंजनवती ताम्रपटातील १६ वा श्लोक प्रस्तुत ताम्रपटात नाही. विशेष गोष्ट ही की, अन्यत्र कुठेही न आढळणारे पैठण ताम्रपटातील २० व २१ हे श्लोक आपल्या या ताम्रपटात आहेत. या ताम्रपटातील २४ वा श्लोक मात्र इतर कोणत्याही

१ एपि. इं., पु. ३, पृ. १०३.
२ एपि. इं., पु. २३, पृ. ८.

ताम्रपटात नाही. २५ व्या श्लोकातील तिसऱ्या चरणाच्या आरंभीचा भाग घेऊन हा नवीन श्लोक रचण्यात आलेला दिसतो. तो श्लोक केवळ स्तुतिपर आहे. त्यावरून ऐतिहासिक दृष्टया नवीन माहिती काहीच मिळत नाही. वरील वंशावळीवर्णनपर श्लोकांवरून देखील नवीन अशी कोणतीच माहिती मिळत नाही.

**प्रस्तुत ताम्रपटाचे महत्त्व**

तथापि, प्रस्तुत ताम्रपट तिसरा गोविंदराज याच्या दक्षिणेकडील स्वाऱ्यांचा काल निश्चित करण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. शके ७२५ कार्तिक शुद्ध पौर्णिमा (२ नोव्हेंबर इ. स. ८०३) रोजी गोविंदराज अलंपूर गावाजवळ तुंगभद्रेच्या काठी आपल्या सैन्यासह तळ देऊन होता हे आपण पाहिलेच आहे. याला दुसरे एक उपोद्बलक प्रमाण आहे. तिसऱ्या गोविंदाचा मुलगा अमोघवर्ष याने शके ७९३ मध्ये दिलेल्या संजान ताम्रपटात आपल्या वडिलांच्या स्वाऱ्यांचे व पराक्रमाचे विस्तृत वर्णन केलेले आहे. उत्तरेकडील स्वाऱ्या संपवून विंध्याद्रीच्या पायथ्याशी महाराज शर्व याच्या राजधानीत गोविंदराज असताना अमोघवर्षाचा जन्म झाला.[1] द्राविड राजांच्या नाशासाठी तेथून गोविंदराज दक्षिणेकडे वळला.[2] या स्वाऱ्यांत तो मग्न असताना अनेक मंडलाधिपती व विशेषतः वेंगी-नरेश यांनी त्याच्या तळाची जागा साफ केली. (संजान ताम्रपट, श्लो. ३३). त्यापुढील श्लोकात 'हेलापुर' येथे राहून गोविंदराजाने लंकाधिपतीला शरण आणले, असा उल्लेख आहे. त्यावरून, दक्षिणेकडील स्वाऱ्या चालू असताना गोविंदराजाचा मुक्काम हेलापूर येथे असावा असे अनुमान डॉ. दे. रा. भांडारकर यांनी काढले आहे. त्याला प्रस्तुत झरिका ताम्रपटाने दुजोरा मिळतो. या गोविंदराजाने दिलेल्या इतर अनेक ताम्रपटांतील प्रशस्तीत नर्मदेच्या काठावरील श्रीभवन येथे पावसाळा काढल्यानंतर गोविंदराज दक्षिणेत तुंगभद्रेच्या काठावर आला असा उल्लेख आहे. अर्थात, तुंगभद्रेच्या काठावर त्याचा तळ असावा असे त्यावरून सूचित होते. प्रस्तुत झरिका ताम्रपटावरून हा तळ तुंगभद्रेच्या काठाजवळ 'अलंपुर' या गावी होता हे स्पष्ट

---

१ एपि. इं., पु. १८, पृ. २३५.

२ 'नीत्वा श्रीभवने घनाघनघनव्याप्तांबरां प्रावृषं
तस्मादागतवान् समं निजबलैरातुंगभद्रातटम्।
(नेसरी ताम्रपट, श्लो. १८)

दिसते. प्रस्तुत ताम्रपटातील 'अलंपुर' गाव व संजान ताम्रपटातील 'हेलापुर' गाव हे बहुधा एकच असावे.[१]

**दक्षिण दिग्विजयाचा कालनिर्णय**

गोविंदराजाने, तुंगभद्रा नदीच्या काठावरून दिलेला 'ब्रिटिश म्युझियम ताम्रपट' नावाचा आणखी एक ताम्रपट उपलब्ध आहे. त्याची मिती शके ७२६ सुभानु संवत्सर वैशाख कृष्ण पंचमी असून त्या दिवशी इंग्रजी तारीख ४ एप्रिल इ. स. ८०४ ही येते. पल्लव राजाला जिंकून परत येताना तुंगभद्रा नदीच्या काठावरील रामेश्वर-तीर्थ या गावी गोविंदराज त्या दिवशी शिकारीला थांबला होता. अर्थात, २ नोव्हेंबर ८०३ (झरिका ताम्रपट) पासून तो ४ एप्रिल ८०४ (ब्रि. म्यु. ताम्रपट) च्या दरम्यान गोविंदराजाच्या दक्षिणेकडील स्वाऱ्या चालू होत्या त्यावेळी त्याचा तळ अलंपुर येथे होता. तेथूनच त्याने कांची, वेंगी, लंका आदी राज्यांविरुद्ध मोहिमा चालविल्या असे अनुमान झरिका, ब्रि. म्यु. व संजान या ताम्रपटांच्या आधारे काढण्यास काहीही हरकत नाही.

तिसरा गोविंदराज याने दिलेल्या ताम्रपटांचे प्रा. वा. वि. मिराशी यांनी दोन विभाग पाडलेले आहेत. राष्ट्रकूट वंशातील भूतपूर्व राजांच्या प्रशस्तीतील श्लोक अंतर्भूत करून ज्यांत वंशावळी दिलेली आहे असा जुन्या प्रशस्तीचा पहिला विभाग; आणि त्याने केलेल्या पराक्रमांचे वर्णन करणारी प्रशस्ती ज्यांत आलेली आहे अशा ताम्रपटांचा दुसरा विभाग. पहिल्या विभागाचे पैठण (श. ७१६) व अंजनवती (श. ७२२) हे दोन ताम्रपट आतापर्यंत उपलब्ध

---

१ हेलापुर हे गाव म्हैसूरमधील हसन जिल्ह्यातील वेलापूर किंवा बेलूर असावे हा डॉ. दे. रा. भांडारकरांचा तर्क बरोबर दिसत नाही. कारण वेलापूर हे तुंगभद्रा नदीपासून फार अंतरावर आहे.

श्री. पां. देसाई लिहितात : "अलंपूर म्हणजेच हेलापूर हे अनुमान बरोबर आहे. हे गाव निरनिराळ्या नावांनी प्रसिद्ध होते. काकतीयांच्या शिलालेखात (हैद्रा आर्कि. सीरिज, क्र. १३, शिलालेख ५५, पृष्ठ १६७) ते हेलंपूर म्हणून, तर स्थल-पुराणात (प्रबुद्ध कर्नाटक, क्र. ९६, १९४३, पृ. २९) ते हेमलापुरी म्हणून निर्देशिलेले आहे. हेच गाव अठरा शाक्त पीठांत आलापूर म्हणून प्रसिद्ध आहे. (JOR वर्ष १९, पृ. २८७; कन्नड साहित्य परिषद पत्रिका, वर्ष ३७, क्र. १-२, पृ. १३१)."

२ इंडि. अँटि., पु. ११, पृ. १२७.

होते. त्यात प्रस्तुत झरिका (श. ७२५) ताम्रपटाची नवी भर पडली आहे दुसऱ्या विभागात पडणारे ताम्रपट म्हणजे नेसरी[1] (श. ७२७), सीसवै[2] (श. ७२९), वणीदिंडोरी[3] (श. ७२९) वगैरे होत. तिसरा गोविंदराज याचा भाऊ स्तंभ याने गोविंदाच्या संमतीने दिलेल्या मन्ने[4] (श. ७२४) ताम्रपटातही ही नवीन प्रशस्ती आढळते. त्यामुळे त्याचाही अंतर्भाव दुसऱ्या विभागात करता येतो. अर्थात, या दुसऱ्या विभागातील ताम्रपटांचा प्रारंभ मन्ने ताम्रपटापासून झाला आणि त्यांत ज्या अर्थी गोविंदाच्या दक्षिणदिग्विजयाचे वर्णन आले आहे, त्या अर्थी त्यापूर्वीच (म्ह. शके ७२४ पूर्वी) त्याचा हा दक्षिण दिग्विजय पूर्ण झाला असला पाहिजे असे अनुमान प्रा. मिराशी यांनी केलेले आहे.[5]

ह्या मन्ने ताम्रपटाच्या खरेपणाविषयी डॉ. अ. स. अळतेकर[6] यांनी संशय व्यक्त केलेला आहे. त्यांचे म्हणणे असे की, ब्रि. म्यु. ताम्रपटावरून गोविंदाचा दक्षिण दिग्विजय शके ७२६ मध्येही चालू होता असे स्पष्ट दिसते. तेव्हा त्याचे वर्णन शके ७२४ च्या मन्ने ताम्रपटात येणे कसे शक्य आहे? यावर प्रा. मिराशी यांनी असा युक्तिवाद केला की, मन्ने ताम्रपटाच्या काळापूर्वी म्हणजे शके ७२४ पूर्वी गोविंदाची दक्षिणेकडील पहिली स्वारी संपली असावी. ब्रि. म्यु. ताम्रपटाच्या शके ७२६ मध्ये त्याने दक्षिणेकडे 'दुसरी' स्वारी केली असावी. प्रा. मिराशी यांचा हा युक्तिवाद ब्रि. म्यु. ताम्रपटातील एका वाक्याच्या फ्लीटने केलेल्या पुढील भाषांतरावर आधारलेला आहे. "When having at (his) first (visit) approved of the tirtha called Ramesvara, he came (there again) to spear the boars." पण फ्लीटने केलेले हे भाषांतर चुकीचे आहे.[7] अर्थात त्यावर आधारलेला प्रा. मिराशी यांचा युक्तिवादही बरोबर नाही.

---

१ मध्ययुगीन इतिहासाची साधने, भाग १, पृ. १५–२०.

२ एपि. इं., पु. २३, पृ. २०४.

३ इंडि. अँटि., पु. ११, पृ. १५७.

४ एपि. कर्नाटिका, पु. ९, पृ. ५१.

५ एपि. इं., पु. २३, पृ. २९३–२९७.

६ एपि. इं., पु. २३, पृ. २९३.

७ ब्रि. म्यु. ताम्रपटाच्या भाषांतरातील ही चूक फ्लीटने स्वतःच दुरुस्त केलेली आहे. (पाहा.—बॉम्बे गॅझेटियर, भाग १, विभाग २, पृ. ३९७.) श्री. लक्ष्मीनारायण राव यांनी ही माहिती मला दिली. त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

प्रस्तुत झरिका ताम्रपटावरून मन्ने ताम्रपटाच्या खरेपणाविषयी डॉ. अळतेकर यांनी व्यक्त केलेल्या संशयाला पुष्टी मिळते. तिसरा गोविंदराज याने दिलेल्या ताम्रपटांच्या पहिल्या विभागात पैठण (श. ७१६), अंजनवती (श. ७२२) व झरिका (श. ७२५) या तीन ताम्रपटांचा अंतर्भाव होतो हे आपण पाहिले. यांपैकी पैठण व अंजनवती ताम्रपट हे मन्ने ताम्रपटाच्या पूर्वीचे आहेत, पण प्रस्तुत झरिका ताम्रपट (श. ७२५) मात्र मन्ने ताम्रपटाच्या (श. ७२४) नंतर दिलेला आहे. त्यावरून असे दिसून येते की, शके ७२५ मध्ये सुद्धा गोविंदराजाकडून आपल्या ताम्रपटांत जुन्या प्रशस्तीचाच उपयोग करण्यात येत होता. शके ७२४ मध्ये जर प्रशस्तीचा नवीन खर्डा तयार होऊन तो मन्ने ताम्रपटात वापरण्यातही आला असेल तर तदनंतर सुमारे एका वर्षानंतर दिलेल्या शके ७२५ मधील प्रस्तुत झरिका ताम्रपटात प्रशस्तीचा जुना खर्डा वापरण्याची काही आवश्यकता नव्हती. झरिका आणि ब्रि. म्यु. ह्या दोन्ही ताम्रपटांवरून स्पष्ट दिसून येते की, शके ७२५ व ७२६ मध्ये तिसरा गोविंदराज याचा दक्षिण दिग्विजय सुरू होता आणि त्यासाठी त्याने आपल्या सैन्याचा तळ तुंगभद्रेच्या काठावरील अलंपुर या गावी दिला होता. दक्षिण दिग्विजयाची ही मोहीम संपवून परतताना आपल्या प्रशस्तीचा नवा खर्डा त्याने तयार करून घेतला असावा. उपलब्ध पुराव्यावरून हा नवीन खर्डा त्याने प्रथम शके ७२७ च्या नेसरी ताम्रपटात वापरलेला आढळतो. हे लक्षात घेता, गोविंदराजाच्या दक्षिणेकडील स्वाऱ्यासंबंधी प्रा. मिराशी यांनी केलेल्या अनुमानांचा पुनर्विचार होणे आवश्यक ठरते, असे मला नम्रपणे वाटते.

### भट्ट रिसियपाला झरिका ग्राम-दान

प्रस्तुत ताम्रपटातील झरिका हे गाव ज्याला दान मिळालेले आहे त्याचे नाव भट्ट रिसियप असून तो धाराशिव येथील अन्नस्वामी भट्टाचा पुत्र होता. तो त्रैविद्य कुळातील असून ऋग्वेदाचा अभ्यासक होता. लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी की, तिसऱ्या गोविंदराजाकडून याच रिसियपाला आणखी तीन म्हणजे एकूण चार दानपत्रे मिळाली आहेत. श. ७२५ मधील प्रस्तुत झरिका ताम्रपट, ७२९ मधील सीसवै ताम्रपट, ७३२ मधील दशपुर ताम्रपट आणि ७३४ मधील लोहारा ताम्रपट. रिसियप हे त्याचे नाव दशपुर ताम्रपटात 'रिषियप', तर लोहारा ताम्रपटात 'रिषिअप्प' लिहिलेले आहे. त्याच्या वडिलाला प्रस्तुत ताम्रपटात 'अन्नस्वामि', सीसवै ताम्रपटात 'अन्नसावि'

१ एपि. इं., पु. २३, पृ. २१२.

तर दशपुर ताम्रपटात नुसतेच 'अण्णम्' म्हटले आहे. पितापुत्रांच्या नावांतील हे फरक केवळ उच्चाराचे आहेत. रिसियपाच्या आजोबाच्या नावाचा उल्लेख प्रस्तुत झरिका ताम्रपटात नाही. सीसवै ताम्रपटात 'विष्णु चतुर्वेद' असे त्याचे नाव दिलेले आहे. लोहारा व दशपुर ताम्रपटांत त्यालाच मासोपवासी म्हणून म्हटले आहे. मासोपवास हे एका व्रताचे नाव आहे. ते त्याने स्वीकारले असावे म्हणून लौकिकात त्याला मासोपवासी म्हणत असावे. त्याचे मूळ नाव सीसवै ताम्रपटांत दिल्याप्रमाणे 'विष्णु' हेच असले पाहिजे. या चारही ताम्रपटांतील निर्देशांत फक्त एकाच बाबतीत फरक आढळतो. तो असा की, यांतील सर्वात जुन्या सीसवै ताम्रपटात त्याच्या घराण्याला 'चातुर्विद्य' आणि रिसियपाच्या आजोबाला 'चतुर्वेद' असे म्हटले आहे; पण प्रस्तुत झरिका व अन्य ताम्रपटांत मात्र त्याला त्रैविद्य म्हटलेले आहे. एवढा एक फरक सोडला तर या चारही ताम्रपटांतील दाने एकाच रिसिय(अ)पा(प्पा)ला मिळालेली आहेत.

### ताम्रपटाचे लेखक

शेवटच्या दोन ओळींत निर्देशिल्याप्रमाणे प्रस्तुत ताम्रपटाचे लेखन श्रीकुक्कय्य, त्याचप्रमाणे देवय्य यांनी केलेले आहे. देवय्य हा 'महाक्षपटलाधिप' म्हणजे सर्वश्रेष्ठ नोंदणी-अधिकारी (Inspector-General of Records) असल्यामुळे त्याने हा ताम्रपट राजासमोर लिहिला म्हणजे त्याने त्याची 'नोंद केली' एवढाच त्याचा अर्थ संभवतो. मूळ ताम्रपटलेखक श्रीकुक्कय्य हाच असावा. अंजनवती ताम्रपटाचा लेखक 'कुक्कैक' आहे. तो आणि प्रस्तुत ताम्रपटाचा लेखक 'कुक्कय्य' हा एकच असावा. पैठण ताम्रपटाचे वाचन करताना त्याचे संपादक कीलहॉर्न यांना शेवटची ओळ नीट लागली नाही. सूक्ष्मपणे पाहिले असता तिचे वाचन 'लिखितं परमेश्वराज्ञया श्रीकुक्के(क्क)येनेति' असे संभवते. यावरून पैठण ताम्रपटाचाही लेखक श्रीकुक्कय(य्य) हाच दिसतो. याचा अर्थ असा की, तिसऱ्या गोविंदराजाने दिलेल्या ताम्रपटांच्या पहिल्या विभागातील ताम्रपटांचे लेखन श्रीकुक्कय्य ह्या एकाच व्यक्तीने केलेले आहे. दुसऱ्या विभागांतील बहुतेक ताम्रपटांचा लेखक 'अरुणादित्य' होय. श्रीकुक्कय्य, पाच श्रेष्ठ पदव्यांनी विभूषित झालेल्या सेनापती श्रीगौड याचा पुत्र होय. हा 'श्रीगौड' आणि अंजवती ताम्रपटांत कुक्कैकाचा पिता म्हणून निर्देशिलेला 'श्रीगौत' एकच असावे. दोन्ही ठिकाणी त्याला 'बलाधिकृत' म्हणजे सेनापती म्हटलेले आहे. प्रस्तुत झरिका ताम्रपटात त्याला 'पंचमहाशब्दपूजापूजित' हे विशेषण लावलेले आहे, तर अंजनवती ताम्रपटात त्याला 'सामन्त' म्हटलेले आहे.

राष्ट्रकूट काळात ही दोन्ही विशेषणे सेनापतीला लावीत असत, तेव्हा त्यांत विरोध नाही. प्रस्तुत ताम्रपटाचा दुसरा लेखक नोंदणी-अधिकारी 'देवय्य' आणि नेसरी ताम्रपटांत दूतक म्हणून निर्देशिलेला 'देवैयराणक' एकच व्यक्ती असावी असे वाटते.

### स्थलनिर्णय

प्रस्तुत ताम्रपटांतील अलंपुर सध्याच्या आंध्र राज्यात सेंट्रल रेल्वेवरील अलंपुर रोड स्टेशनाजवळ तुंगभद्रेच्या उत्तरेस तीन मैलांवर आहे. दान दिलेले झरिका गाव म्हणजे यवतमाळ जिल्ह्याच्या केळापूर तालुक्यातील 'झरी' हे खेडे असावे. ज्या विषयात म्हणजे जिल्ह्यात हे गाव होते ते 'पोण' म्हणजे वर्धा जिल्ह्याच्या हिंगणघाट तालुक्यातील वर्धा नदीच्या काठावरील 'पोहणा' गाव असावे. झरिका गावाच्या पूर्वेला म्हणून निर्देशिलेली 'तलुती' म्हणजे झरीच्या पूर्वेला ३ मैलांवरील 'तरोडी', दक्षिणसीमेकडील 'विदुराम्र' म्हणजे झरीच्या दक्षिणेस ४ मैलांवर असलेली 'उमरी' आणि उत्तरेकडील 'मारग्राम' म्हणजे झरीच्या उत्तरेला ५ मैलांवर असलेले 'मारेगाव' असावे. पश्चिम सीमेकडील 'तलभी' हे गाव आढळत नाही.

### वाचन

(वृत्ते : श्लो. १, २३, २९, ३०, ३२, ३३, ३५—अनुष्टुभ्; श्लो. २, ३, ५, ६, ८, ९, १५, २४ व २५–वसंततिलका; श्लो. ४, १९–उपजाति; श्लो. ७–गीति; श्लो.–१०, १७, २०–२२–शार्दूलविक्रीडित; श्लो. ११-१४. २६, २८–आर्या; श्लो. १६, १८–स्रग्धरा; श्लो. २७, ३१, ३४—इंद्रवज्रा; श्लो. ३६—पुष्पिताग्रा.)

*पहिला पत्रा*

१. ओं [।*] स वोव्याद्वेधसा धाम यन्नाभिकमलं कृतं(तम्) [।*] हरश्च यस्य न्तं(न्तें)दुकलया कमलंकृतं(तम्) । [१।।*] आशी(सी)ट्वि-(द्वि)षःति(षत्ति)मि–

२. रमुद्यतमंडलाग्रो ध्वस्तिन्नयंन(यन्न)भिमु[खो] रणशर्व्वरीषु भूपः शुचि-र्व्विधुरिवाप्त दिगंतकीर्तिगा(र्गो)विन्दराज

---

१ खुणेने दाखविला आहे.

२ पठण व अंजनवती ताम्रपटांत 'विधुरिवास्त'—असा पाठ आहे, तर अळस ताम्रपटात 'भूपश्शशांकवदवाप्त—' असा पाठ आहे.

३. इति राजसु राजसिंघः[1] ।[।२।।*] दृष्ट्वा चमूमभिमुखी(खीं) सुभटाट्ट-हासामुन्नामितं सपदि येन रणेषु नित्यं(त्यम्) [।*]

४. दस्टा(ष्टा)धरेण दधता भृकुटी(टीं) ललाटे खड्गं कुलं च हृदयं च निजञ्च सत्वं(त्वम्) ।[।३।।*] खड्गं कराग्रान्मुखतश्च शो-

५. भा मानो मनस्त[:*] श(स)ममेव यस्य [।*] महाहवे नाम निशम्य यस्य[2] सद्यस्त्रयं रिपूणां विगलत्यका(कां)डे [।।४।।*]

६. तस्या[त्म]जो जगति विश्रुतदीर्घकीर्त्तिरा[र्त्ता]र्त्तिहारिह[रिविक्र]मधाम-धारी [।*] भूपः तृ[3](पस्त्रि)पि(वि)ष्टपकृता[4]नु-

७. कृतः(तिः) कृताज्ञः[5] श्रीकर्क्कराज इति गोत्रमणिर्व(र्ब)भूव ।[।५।।*] तस्य प्रभिन्नकरटच्युतदानदन्तिदन्तप्रहा-

८. ररुचिरोलि(ल्लि)खितांसपीठः। क्ष्मापः क्षितौ क्षपितशत्रुरभूत(त्त)नूजः सद्राष्ट्रकूटकनकाद्रि(द्रि)रिवे-

९. न्द्रराज[:*] ।[।६।।*] तस्योपार्जितमहसस्तनयश्चतुरुदधिवलयमालिन्या [:।*] भोक्ता भुवः शत-

१०. क्रतुसदृशः श्रीदन्तिदुर्ग्गराजोभूत् ।।[७।।*] काञ्चीशकेरलनराधिपचोल-पाण्ड्यश्रीह-

११. र्षवज्रटविभेद[विधान]दक्ष(क्षम्) । कार्ण्णाटकं व(ब)लमनन्तमजेय-मन्यैर्भृत्यै[:*] कियद्भिरपि य[:*]

१२. सहसा जिगाय ।।[८।।*] अभ्रूविभंगमग्रि(गृ)हीतनिशातशस्त्रमश्रान्त-मप्रतिहताज्ञा(ज्ञ)मपेतय-

१३. त्नं(त्नम्) [।*] यो वल्लभं सपदि दण्डव(ब)लेन जी(जि) त्वा राजा-धिराजपरमेश्वरतामवाप ।। [९।।*] आसेतो-

---

१ 'राजसिंहः' असे वाचावे.

२ हा शब्द येथे चुकून पुनरुक्त झाला आहे.

३ 'भूपस्त्रिविष्टप'—असे वाचावे.

४ पैठण, अंजनवती आणि इतर अनेक ताम्रपटांत 'नृपानुकृतिः' असा पाठ आहे. दन्तिदुर्गाच्या सामनगड ताम्रपटात (इं. अँ., वर्ष ११, पृ. ११०) व धारावर्ष ध्रुवराजाच्या भोर संस्थान ताम्रपटात (ए. इं., पु. २२, १८२) मात्र 'कृतानुकृतिः' असाच पाठ आहे.

५ अन्य बहुतेक ताम्रपटांत हा शब्द 'कृतज्ञः' असा आढळतो.

१४. विपुलोपलावलिलस[ल्लो*]लोर्म्मिमालाजलादाप्रालेयकल(लं)कितामलशिला-
जाला[त्तु]

१५. षाराचला[त् ।*] आपूर्व्वापरवारिराशिपुलिनप्रान्तः(न्त)प्रसिद्धावधेये(यें)नेयं
जगती श्व(स्व)वि–

१६. क्रमव(ब)[लैनै]कातपत्रीकृत[ा]ः[१](ता) ।।[१०।।*] तस्मि दिवं[२] प्रयाते
वल्लभराजे क्षतप्रजावा(बा)धः [।*] श्रीकर्क्कराज–

१७. सूनुर्म्महीपतिः कृष्णराजोभूत(त्) ।।[११।।*] यस्य स्वभुजपराक्रमनिःशेषो-
त्सादितारिदिता[३][क्चक्रम् ।*]

*दुसरा पत्रा : पहिली बाजू*

१८. कृष्णस्येवाकृष्णं चरितं श्रीकृष्णराजस्य ।[।१२।।*] शुभतुंगतुंगतुरगप्रवृद्धरेणू-
र्ध्वरुरुध्व[४]रविकिर[णम् ।*]

१९. ग्रीष्मेपि नभो निखिलं प्रावृट्कालायते स्पष्टं(ष्टम्) ।[१३।।*] दीनानाथ-
प्रणयिषु यथे[ष्ट]चेष्टं समीहितम––

२०. जस्रं(स्रम्) [।*] त[त्*]क्षणमकालवर्षो वर्षति सर्व्वार्त्तिनिर्व्वपणं(णम्) ।
[।१४।।*] राहप्पमात्मभु[ज]जातव(ब)लावलेपमाजौ

२१. विजित्य निशितासिलताप्रहारैः [।*] पालिध्वजावलिशु[भा]मचिरे[ण] यो
हि राजाधिराजपरमे–

२२. श्वरतां त[ता]न ।[।१५।।*] क्रोधादु[त्*]खा[५]तखड्गप्रसृतरुचिचयै[र्भा]-
समानं समंत(ता)दाजावुद्वृत्तवैरिप्र[क]–

२३. टजग(गज)घटाटोपसंक्षोभदक्षं(क्षम्) । शौयं(यँ) त्यक्तारिवर्गो[६] भयचकित-
वपुः क्वापि दृष्ट्वै[वस]–

---

१ विसर्ग अधिक पडला आहे.
२ 'तस्मिन्दिवं' असे वाचावे.
३ हे अक्षर येथे अधिक पडले आहे व पुढील शब्द गळाले आहेत.
४ 'रु' हे अक्षर अधिक पडले आहे. '–°रेणूर्ध्वरुद्धरविकिरणम्' असे वाचावे.
५ आधी 'श' कोरून मग त्याचा 'ख' केलेला दिसतो.
६ पैठण, भोर आदि ताम्रपटांत 'त्यक्तारिवर्गो' हाच पाठ आहे. पण, ब्राह्मणपल्ली, जेठवै (ए. इं., पु. २२, पृ. १०६ व १८२) आदी ताम्रपटात 'त्यक्त्वारिवर्गो' असा पाठ आढळतो. अंजनवती ताम्रपटाच्या संपादनात प्रा. मिराशी यांनी 'त्यक्त्वा–' हाच पाठ गृहीत धरला आहे. त्या दृष्टीने प्रस्तुत ठिकाणी 'त्यक्त्वारिवर्गो' असे वाचले तरी चालेल.

२४. द्यो दर्प्पाध्माता[रि*]चक्रक्षयभ[1](क)रमगमद्यस्य दोर्द्दण्डरूपं(पम्) ।।[१६।।*] पाता [य]श्चतुरम्बु(म्बु)राशिरस[2](श)ना–

२५. लंकारभाजो भुवः त्र[3]याचापि कृतः(त)द्विजामरगुरुप्राज्याज्यपू[जा]दर-[:।*] दाता मानभि(भृ)दग्र–

२६. [णीर्गुण]वता(तां) योसौ श्रियो वल्लभो भोक्तं(क्तुं) स्वर्गफलादि(नि) भूरितपसा स्थानं जगामामरं(रम्) [।।१७।।*]

२७. येन श्वेतातपत्रप्रहतरिपु[4]करा(र)व्रातताप सलीलां[5] जग्मे नासीरधूली-धवलि[त*]

२८. [शि]रसा वल्लभाख्य[:*] सद(दा)ज्ये(जौ) [।*] स श्रीगोविंदराजा-(जो) जितजगदहितत्रै(स्त्रै)णवैधव्यहेतुः । त[6]स्या–

२९. शी(सी)सू(त्सू)नुरेकक्षणरणदलितारातिमत्तेभकुंभ[:।।१८।।*]स्त(त)–स्यानुजः[7] श्रीध्रुवराजनामा महानुभावो

३०. विहित[8]प्रताप[:*] प्रसाधिताशेषनरेन्द्रचक्र[:*] क्रमेण वा(बा)लार्क्कव-पुर्व्व(र्ब)भूव ।। [१९।।*] जाते यत्र च

३१. राष्ट्रकूटतिलके सद्भूपचूडामणो(णौ) गुर्व्वी तुष्टिरथाखिलस्य जगतः सुस्वा-मिनि प्रत्यहं(हम्) ।

---

१ इतर ताम्रपटांत 'क्षयकर' असा पाठ आहे. येथे 'क' ऐवजी 'भ' चुकून कोरला गेला असावा.

२ पैठण व बगुम्रा (इं. अँ., पु. १२, पृ. १७९) ताम्रपटांतहि 'रसना' असाच पाठ आहे. 'रशना' वाचावे.

३ 'भुवस्त्रय्याश्चापि' असे वाचावे.

४ 'रवि' असे वाचावे. पैठण व अन्य सर्व ताम्रपटांत 'रिपु' ऐवजी 'रवि' असाच पाठ आहे.

५ पैठण आणि अंजनवती ताम्रपटांतील पाठाप्रमाणे येथे 'तापात्सलीलं' असे वाचावे.

६ 'हेतुस्तस्या'—असे वाचावे.

७ 'कुंभः ।। तस्यानुजः' वाचावे.

८ पैठण ताम्रपटांत 'प्रहतप्रतापः' असा, तर अंजनवती ताम्रपटांत 'विततप्रतापः' असा पाठ आहे.

३२. सत्यं सत्यमिति प्रसा(शा)सति सति [क्ष्मा]मासमुद्रांतिकामाशी(सी)ध(द्ध)-
र्मपरे गुणामृतनिधौ [सत्यव्रताधिष्ठिते *][1] [॥२०॥*]

३३. श्रीकाञ्चीपतिगांगवेंगिकयुता [ये] मालवेशादय[:*] प्राज्यानामयति स्म ता-
[न्क्षि][ति*]-

३४. भृतो [य: प्रा][2]ज्यानामपि [।*] माणक्य(णिक्या)भरणि(णा)[नि*]
हेमनति[3] यस्य प्रपद्योरपि[4] स्वं येन प्रथितं यतोन्य[5]

३५. [श्चा]तरं(रम्) [॥२१॥*] साम(मा)दे(द्यै)रपि वल्लभा(भो) न हि
यदा स(सं)धिं विधातुन्तदा[6]।[7] चातुर्दन्तरणे विजित्य त-

३६. रसा पश्चात्ततो भू-

*दुसरा पत्रा : दुसरी बाजू*

३७. पतिं(तिम्) (।*) प्रा[च्योदीच्य]पराच्ययाम्यचलसत्प[8](त्पा)लिध्वजैर्भूषितं
चि[ह्नै]र्य[:*] परमेश्वरत्वम[खि]लं लेभे महेभो विभु: [॥२२॥*]

३८. जिताशेषमहीपाल[:*] पुरंदरजिगीश(ष)या । स श्रीनिरुपमो राज(जा)
हित्वा मर्त्ति(र्त्यं) दिवा(वं) गत[:*]।[।२३॥*]दुर्व्वारवैरिवनिता[मु]-

३९. खपंकजानी(नि) [देवे] दिवं गतवति तृ(त्रि)जगत्सु यस्य [।*] अद्यापि
कीर्तिरनुरक्तमिवानुरागा..............यशसा

४०. परिदद्रवीति ।[।२४॥*] तस्या[प्य*]भूद्भुवनभारभृतौ समर्थ: पार्थोपम:
पृथुसमानगुणो गुणज्ञ: [।*] दुर्व्वारवैरिव-

---

१ कोरतांना चुकून सुटलेली ही अक्षरे अन्य उपलब्ध ताम्रपटांतून येथे घेतली आहेत.

२ दुसऱ्या चरणाच्या आरंभीची ही अक्षरे येथे चुकून कोरली गेली आहेत. त्याऐवजी पैठण, भोर आदि ताम्रपटांतील पाठाप्रमाणे 'प्रातिराज्यानपि' असे वाचावे.

३ 'हेमनिचयं' असे वाचावे.

४ 'द्योपरि' असे वाचावे.

५ 'प्रति तं तथापि न कृतं चेतोन्यथा' असे वाचावे.

६ पैठण आणि भोर ताम्रपटातील पाठाप्रमाणे 'व्यधात्तं तदा' असे वाचावे.

७ हा दंड अनावश्यक आहे.

८ 'याम्यविलसत्-' असे वाचावे.

४१. नितातुलतापहेतुर्गोविन्दराज इति सूनुरिनप्रताप[:*] ।।[२५।।*] शशधर-करनिकरनिभ(भं) यस्य यशसः[1] [सुरनगाग्रसानुस्थैः ।*][2] प-
४२. रिगीयतेनुरक्तैर्विद्याधरसुन्दरीनिवहैः [।।२६।।*] हृष्टोन्वहं योर्थिजनाय सर्व्वं(र्व्वं) सर्व्वं समानन्दितव(ब)न्धुवर्ग[:।*]
४३. प्रादात्प्रहृष्टो[3] हरति [स्म] वेगां(गात्) प्राणान(न्य)मस्यापि नितान्त-कीर्त्तिः ।[।२७।।*] येनेदमनिलविद्युचं(च्चं)चलम-
४४. वलोक्य जीवितमसारं(रम्) [।*] क्षितिदानपरमपुण्य[:*] प्रवर्त्तितो व्र(ब्र)ह्मदायोयं(यम्) ।।[२८।।*] स च परमभट्टा-
४५. रकमहाराजाधिराजपरमेश्वरश्रीमद्धारावर्षपादानुध्यात[4]श्रीगोविन्दराजदेव[:*] कु-
४६. शली यथासंव(ब)ध्यमानकां(कान्) विषयपतिराष्ट्रपतिभोगपतिग्रामकूटा-युक्त-
४७. नियुक्तकाधिकाधिकारि[5][क*] महत्तरादिं(दीन्) समादिशत्यस्तु वः संविदितं यथा मया अलं-
४८. प(पु)रनिकटतटतुङ्गभद्रासमावासितविजयस्कन्धावा[रा]वासितेन माता-पित्रोरात्मनश्चैहिकामु-
४९. ष्मिकपुण्ययशोभिवृद्धये पोणविषयान्त[:*]पातिझरिकाभिधानग्रामः धारा-शिववास्त-
५०. व्यतत्रै(त्रै) विद्यसामान्यकाश्यपगोत्रव(ब)ह्वज(च)स्व[स]व्र(ब्र) ह्मचारि-भट्टअन्नस्वामिसुतभट्टरिसिय-
५१. पाय[6] झरिकाग्रामस्य पूर्व्वतः तलुतिसा[व]कं दक्षिणतः [वि]दुराम्रग्रामः पश्चिमतः तलभिग्रामः उ-

---

१ 'यशः' असे वाचावे.

२ कोरताना सुटलेले हे शब्द येथे पैठण ताम्रपटांतून घेतलेले आहेत.

३ जेठवै आणि इतर काही ताम्रपटांत 'प्ररुष्टो' असा पाठ आहे.

४ पैठण आणि अंजनवती ताम्रपटांत ह्यापूर्वी 'परमभट्टारकमहाराजाधिराज-परमेश्वरपृथ्वीवल्लभप्रभूतवर्ष' असे शब्द आहेत. कोरताना ते येथे गळलेले आहेत.

५ 'काधि' या अक्षरांची येथे व्यर्थ पुनरुक्ती झाली आहे. पैठण आणि इतर ताम्रपटांतील पाठाप्रमाणे 'नियुक्तकाधिकारिक' असे वाचावे.

६ या शब्दाचा संबंध पुढे ५९ च्या ओळीतील 'प्रतिदितः' या शब्दाशी आहे.

५२. त्सरतः [मारग्रामः] एवमेत[च्च]तुराघाटकपालव(ब)ध(द्ध)ग्रामः सोद्रंगः सग्रामभोगः [सो]परि–

५३. करः सदशापराधः स[धा]न्यहिरन्या(ण्या)देयोभ्यन्तरसि[द्ध्या]–चाटभटप्रावेश्य[:*] सर्व्वरा–

५४. जकीया[ना]म[हस्त]प्रक्षेपणीयः आचन्द्रावर्का[र्ण]वक्षितिसरित्पर्व्वतसम-कालीनः स–

५५. पुत्रपौत्रान्वयक्रमोपभुज्यमानदेवव्र(ब्र)[ह्म]दायरहितो भूमिच्छिद्रन्यायेन । शकनृपका–

५६. लातीतसम्व(संव)–

*तिसरा पत्रा*

५७. त्सरशतेषु[1] सप्तसु [ष[ड्विं]विं[2]शत्यधिकेषु यत्राङ्कतोपि सम्व(संव)त्सरस-(स्य) ७२५ व(ब)लिवैश्वदेवाग्नि–

५८. होत्रातिथिपंचमहायज्ञादिक्र(क्रि)योत्सप(र्प)णा[र्थं] तुंगभद्रान[दीं](द्यां) स्नात्वाद्योतकादिसर्गेण[3] कार्त(र्त्ति)कपौर्ण्णमाश्यां(स्यां) ग्रहो–

५९. परागे प्रतिप(पा)दितः [।*] यतोस्योचितया व्र(ब्र)ह्मदायस्थित्या भुंजतो भोजयतश्च कृषतो(तः) कर्षयतः प्रतिदिश–

६०. तो वा न कैश्चिदल्पापि प्रतिपंथना[4] कार्या । तथाग्रा(गा)मिभिरपि भद्र-नृप[ति*]भिरश्म(स्म)द्वंशै(श्यै)रन्यैर्व्वा सामान्यं भूमि–

६१. दानप(फ)लमवेत्य विद्युल्लोलान्यनित्यानि ऐश्व[5]य(र्य)सुखानि तृणाग्रल-ग्नजलवि(बि)न्दुचंचलं च जीवितमाकलय्य

६२. स्वदायनिर्व्विशेषो[यम*]स्मदा(द्दा)योनुमन्तव्य[:*] प्रतिपालयितव्यश्च [।*]यश्चाज्ञानतिमिरपटलावृतमतिराच्छिन्द्यादा [च्छि]द्य–

---

१ ताम्रपटाचा हा भाग ठोकन पातळ केलेला आहे. त्यावर ही अक्षरे फार दूर दूर कोरली आहेत.

२ येथील 'विं' हे अक्षर जास्तीचे व म्हणून निरर्थक आहे.

३ 'द्योदकातिसर्गेण' असे वाचावे.

४ पैठण, सीसवै व अन्य ताम्रपटात 'परिपंथना' असा पाठ आहे.

५ 'नित्यान्यैश्वर्य'—असा संधी करून वाचावे.

६३ मानं वामनु मोदेत स पंचभिम(र्म)हापातकैः सोपपातकैश्च प्रतिसंयुक्त-
[:*] स्यादित्युक्तं च भगवता वेद–
६४ व्यासेन व्यासेन। षष्टिर्वष(र्ष)सहस्राणि स्वगे(र्गे) मोदति भूमिदः [।*]
आच्छेत्ता चानुमन्ता च तान्येव नरके वसेत् [॥२९॥*]
६५ विंध्याटवीश्व(ष्व)तोयासु शुष्ककोटरवासिनः। कृष्णाहयो हि जायंते भूमिदायं
हरंति ये ।[।३०॥*] अग्नेरपत्यं प्रथ–
६६ मं सुवर्णं भूर्व्वैष्णवी सूर्यसुताश्च गावः [।*] लोकत्रयं तेन भवेद्धि दत्तं।[2] यः
कांचनं गां च महिं(हीं) च दद्यात् [॥३१॥*]
६७ व(ब)हुभिर्व्वसुधा दत्ता राजभिः सगरादिभिः [।*] यस्य यस्य यदा भूमिस्तस्य
तस्य तदा [फ*]–
६८ लं(लम्) ।[।३२॥*] गामेकां सुवर्ण्णमेकं भूमेद(र)प्येकमंगुलं(लम्)। हरं-
(रन्) नरकमायाति यावदाभूतसंप्लवम् [॥३३॥*]
६९ यानीह दत्तानि पुरा नरेन्द्रैर्दानानि धर्म(र्मा)र्थयशस्कराणि [।*] निर्मुक्तमाल्य-
प्रतिमानि तानि को नाम साधुः
७० पुनराददीत ।[३४॥*] स्वदत्तं(त्तां) परदत्तं(त्तां) वा यत्नाद्रक्ष नराधिप [।*]
महीं महीभृतां श्रेष्ठ दानाच्छ्रे[यो]नुपालनम् [॥३५॥*]
७१ इति कमलदलांवु(बु)विद्युल्लोलां श्रियमधिगम्य मनुष्यजीवितं च [।*]
अतिविमलमनोभिरात्मकामैर्न हि पु–
७२ रुषैः परकीर्त्तयो विलोप्याः ॥ [३६॥*] लिखितं चैतन्महापंचमहाशद्व(ब्द)-
पूजापूजितश्रीगौडव(ब)लाधिकृत–
७३ सूनोः[3] श्रीकुक्काय्येन ॥ तथा महापरमेश्वरप्रत्य[क्ष्य](क्षं) महाक्षपटलाधिप-
देवय्येनेति ॥

● ● ●

---

१ 'म' अनावश्यक. 'वानुमोदेत' असे वाचावे.

२ दंड अनावश्यक.

३ 'सूनुना' असे वाचावे.

# १३

## राष्ट्रकूट नृपती तृतीय गोविंद याचा नेसरी ताम्रपट

### ताम्रपटाची उपलब्धी

प्रस्तुत ताम्रपट मूलतः सातारा (जिल्हा सातारा, मुंबई राज्य) येथील सरदार भीमराव पाटणकर यांच्या मालकीचा आहे. त्यांच्या जवळून प्रथम डॉ. का. बा. पाठक यांच्या हाती तो आला. त्याचे ठसे त्यांनी पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळातील संशोधक श्री. ग. ह. खरे यांच्या स्वाधीन केले. ते ठसे व मूळ ताम्रपट यांच्या साह्याने श्री. खरे यांनी हा ताम्रपट आरंभी भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकात, आणि नंतर 'दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने' (खंड १ ला) या आपल्या ग्रंथात (इ. स. १९३०) प्रसिद्ध केला. झरिका ताम्रपटाच्या निमित्ताने मला त्याचा अभ्यास करावा लागला. त्या वेळीं मूळ ताम्रपट मिळवून त्याचे पुनर्वाचन व संपादन करण्याची आवश्यकता गु. डॉ. म. म. मिराशी यांनी व्यक्त केली. त्यांच्याच मार्गदर्शनाने मी या ताम्रपटाचा छडा लावला. सरदार पाटणकरांनी त्याचा उपयोग करू देण्याचे मला आश्वासन दिले. पण मध्यंतरीच्या काळात त्यांनी तो मुंबई राज्याचे भूतपूर्व मुख्य मंत्री मा. श्री. मुरारजीभाई देसाई यांना नजर केला. त्यांनी तो मुंबई राज्याच्या अभिलेखागारात (दप्तरखान्यात) पाठविला. तेथून डॉ. पु. म. जोशी यांच्या साहाय्याने नागपूर विद्यापीठामार्फत तो माझ्या हातीं आला. या सर्वांच्या कृपेने आणि परवानगीने मी तो आज पुन्हा संपादन करीत आहे.

### ताम्रपटाचे वर्णन

प्रस्तुत ताम्रपटाचे एकूण तीन पत्रे असून साधारणपणे ते चांगल्या स्थितीत आहेत. तथापि, पहिल्या पत्र्याच्या खालच्या भागाच्या उजवीकडील कोपऱ्याचा एक लहानसा तुकडा पडलेला असून तो नाहीसा झालेला आहे. त्यामुळे पहिल्या पानावरील शेवटच्या तीन ओळींच्या आरंभीची काही अक्षरे गेलेलीं आहेत. त्याच पत्र्यावरील सातव्या व आठव्या ओळींच्या मध्यभागीं एक लहानसे छिद्र पडलेले आहे. पण त्यामुळे कोणत्याही अक्षराला हानी पोचलेली नाही. दुसऱ्या पत्र्याच्या डाव्या

बाजूला, साधारणपणे मध्यभागी, मोठा तडा गेलेला असून उजव्या बाजूच्या वरच्या कोपऱ्याचाही एक लहान तुकडा नष्ट झालेला आहे. तिसऱ्या पत्र्याच्या खालील उजव्या कोपऱ्याचा एक तुकडा गेलेला आहे. त्यामुळे तेथील काही अक्षरांना आपण मुकलो आहोत.

प्रत्येक पत्रा साधारणपणे ९.७ इंच लांब व ६.५ इंच रुंद असून त्याच्या कडा, आतील अक्षरांचे संरक्षण व्हावे म्हणून किंचित उंच केलेल्या आहेत. पहिले पान कोरे आहे. दुसऱ्या, तिसऱ्या, चौथ्या, पाचव्या व सहाव्या पानावर अनुक्रमे १९, १९, १६, १५ आणि ५ ओळी कोरलेल्या आहेत. अर्थात, एकूण ओळी ७४ आहेत. हे तिन्ही पत्रे ·९ व्यासाच्या छिद्रातून एका कडीत ओवलेले असून त्या कडीची दोन्ही टोके १.६ इंच व्यास जाड अशा वर्तुलाकार मुद्रेत फसविलेली आहेत. मुद्रेवर कमलासनस्थ गरुड-मूर्ती असून तिच्या प्रत्येक हातात एकेक सर्प आहे. राष्ट्रकूट सम्राटांच्या इतर ताम्रपटांना जोडलेल्या मुद्रेसारखीच हीही मुद्रा आहे. ती थोडी झिजलेली असली तरी तिच्यावरील मूर्ती स्पष्ट दिसतात. कडी आणि मुद्रा यांचे वजन ५५ तोळे, तर ताम्रपटाच्या तिन्ही पत्र्यांचे मिळून वजन १६० तोळे आहे.

## अक्षरवटिका व लेखन

प्रस्तुत ताम्रपट देवनागरी लिपीत लिहिलेला आहे. अक्षरांचे वळण साधारण-पणे राष्ट्रकूटांच्या इतर ताम्रपटांतील वळणासारखेच आहे. प्रत्येक ओळीतील अक्षरांची उंची सामान्यत: ·२ इंच असली तरी ती सर्वत्र सारखी आहे असे मात्र नाही. ३, ४ व ५ या पानांवरील अक्षरे थोडी अधिक उंच आहेत. ६ व्या पाना-वरील अक्षरे तर, जागा पुष्कळ असल्यामुळे बरीच मोठी, उंच व ऐसपैस आहेत.

सर्व मजकूर एकंदरीत शुद्ध व व्यवस्थित कोरलेला आढळतो. तथापि, ताम्र-पटांच्या लेखनात एरवी आढळणारे अनवधानाने झालेले दोष या ताम्रपटाच्या लेखनांतही आहेतच. काही ठिकाणी अक्षरे किंवा शब्द वगळले गेले आहेत उदा. ११, १३, १५, १९, २९, ३४, ४२, ५५, ५९, ६५, ६८ इत्यादी ओळी पाहा. २५ व्या श्लोकातील तर एक पूर्ण ओळ कोरताना राहून गेलेली दिसते. हा श्लोक राष्ट्रकूटांच्या इतर कोणत्याच ताम्रपटात आलेला नसल्यामुळे लेखकाच्या अनवधानाने वरील ओळ गळाल्यामुळे तिच्यातील महत्त्वाच्या माहितीला आपण मुकलो आहोत. काही ठिकाणी अक्षरे किंवा शब्द निष्कारण पुनरावृत्त झालेले आढळतात. उदा. २३, ३६ इत्यादी ओळी पाहा. तिसऱ्या पानावरील ५० व्या ओळीतील पहिल्या तीन अक्षरानंतरची काही अक्षरे मागाहून पुन्हा कोरलेली दिसतात; त्यामुळे तेथे मुळात काही बदल केल्याचा संशय येण्यास पुरेशी जागा आहे.

भाषा

प्रस्तुत ताम्रपट संस्कृत भाषेत लिहिलेला आहे. आरंभी १ ते ४१ ओळींतील मजकूर व शेवटी ६५ ते ७१ ओळींतील मजकूर पद्यात असून राहिलेला मजकूर गद्यात आहे. भाषा एकंदरीत शुद्ध आहे; तथापि, पुढील गोष्टी लक्षात घेण्या-सारख्या आहेत. (१) काही ठिकाणी **श** साठी **स** कोरलेला आहे, उदा. प्रवे**स्य**–ओ. १२, **सु**ध–ओ. १३, दे**सं**–ओ. २७, **स**तेषु–ओ. ५६, रा**सि**, र**स**ना–ओ. ३८, इत्यादी; तर (२) काही ठिकाणी **स** साठी **श** कोरला आहे. उदा. **शु**द्रम्–ओ. १३, **शु**सदृशा–ओ. १७, **श्व**सर्म्मेच्छया–ओ. ३२ इत्यादी. (३) क्वचित् स साठी **ष**–उदा. सप्त**षु**–ओ. ५६, आणि **श** साठीही **ष** कोरला आहे. उदा. विं**ष**ति–ओ. ५६. सारांश, **श**, **ष**, **स** या अक्षरांच्या लेखनात बरीच अशुद्धता आहे. (४) **श्रि** ऐवजी **शृ**, व **त्रि** ऐवजी **तृ** चे लेखनही सदोषच होय–ओ. १४ पाहा. (५) **ज** ऐवजी **य** लिहिला आहे, उदा. **ये**ष्ठ–ओ. ६, **या**ते–ओ. १६, गू**र्य**र–ओ. ३६. उलट **य** ऐवजी **ज**ही लिहिलेला आहे. उदा. दिग्ना**जि**काभि–ओ. ६. (६) अनेकदा सारख्या उच्चारांच्या संयुक्त व्यंजनांपैकी एक व्यंजन गाळलेले आहे. उदा. यो भू**निर्म**ल–ओ. ७, सुध–ओ. १३, सु**लजि**ता–ओ. ८. याउलट **पुन्नः**–ओ. २३ मध्ये 'न' व्यर्थ द्वित्त केला आहे. (७) अन्त्य **न** काही ठिकाणी अनुस्वाराने दाखविला आहे. उदा. आकृष्ट**वां**–ओ. ४, त**स्मि**–ओ. २०; तर काही ठिकाणी तो गाळला आहे. उदा. महत्तरा**दी**–ओ. ४४. (८) एके ठिकाणी **ण** ऐवजी **न** लिहिला आहे. उदा. हिरं**न्य**–ओ. ५३. (९) **ब** ऐवजी बहुधा सर्वत्र **व** लिहिला आहे. ओ. ६, ९, १२, २४, २६ इत्यादी पाहा. (१०) क्वचित् दीर्घ स्वरांऐवजी ऱ्हस्व स्वर–उदा. भृकु**टि**–ओ. २२, **सु**नुना–ओ. ७३ लिहिला आहे; तर क्वचित् ऱ्हस्व स्वराऐवजी दीर्घ स्वर लिहिला आहे. उदा. **ली**ख्यंते–ओ. ५१.

विषय व काल

हा ताम्रपट राष्ट्रकूट नृपती गोविंद तिसरा याने श्रीशूगुट्टरू येथे असताना शके ७२७ तारण संवत्सर पौष कृष्ण त्रयोदशीला संक्रांती महापर्वाच्या सुमुहूर्तावर दिलेला आहे. औत्तरीय कालगणनेप्रमाणे शके ७२७ ला तारण संवत्सर होते. या वर्षीचे मकरसंक्रांतपर्व पौष महिन्याच्या कृष्ण पक्षातील द्वादशीला ५५ व्या घटकेनंतर, म्हणजे रात्री १० वाजल्यानंतर सुरू झाले. अर्थात, पर्वकालीन धार्मिक उत्सव त्रयोदशीला सूर्योदयानंतर सुरू झालेला असणे स्वाभाविक आहे. तदनुसार, ताम्र-पटात उल्लेखिलेली पौष कृष्ण त्रयोदशी ही तिथीही बरोबर आहे. या तिथीला

सोमवार होता. ताम्रपटात वार उल्लेखिलेला नसल्यामुळे पंचांगावरून तो पडताळून पाहता येणे शक्य नाही.

ताम्रपटात निर्देशिलेल्या तिथीतील एका विसंगतीकडे लक्ष वेधणे अवश्य आहे. 'पौषसितत्रयोदस्यां कृष्णपक्षसंक्रांतीमहापर्वणि' यात 'सित'=शुद्धपक्ष आधी निर्देशिला असून पुढे लागलीच 'कृष्ण' पक्ष असे म्हटले आहे. या तिथिनिर्देशात निष्कारण पुनरुक्ती तर आहेच पण त्यांतही विसंगती आहे. 'पौषसित' या ऐवजी 'पौषासित' असे याचे वाचन केल्यास ही विसंगती नाहीशी होऊ शकते. लेखकाला 'पौषासित' हाच शब्द या ठिकाणी अभिप्रेत असला पाहिजे. ताम्रपटातील या मितीला इंग्रजी तारीख २२ डिसेंबर ८०५ ही येते.

या दिवशी राष्ट्रकूट नृपती तृतीय गोविंद याने श्रीशुगुट्टरू येथे असताना मोठ्या शिंदकुलातील श्रीनागहस्ति राजाच्या विनंतीवरून मारिदास चतुर्वेदी नावाच्या ब्राह्मणाला नेसरी हा गाव दान दिला.

## शिंद कुलाचा इतिहास

शिंद कुलातील या नागहस्ति राजाचे नाव अन्य उपलब्ध ताम्रपटांत कोठेच आढळत नाही. प्रस्तुत ताम्रपटात ते पहिल्यांदाच आलेले आहे. येथे त्याचे वणन 'फणींद्र वंशाच्या आकाशात विराजमान झालेला आदित्य (=सूर्य), श्रीरिपुसेव्य (=शत्रूकडून सेवेला पात्र असलेला)' असे केलेले आहे. शिंद वंशातील राजे आपली उत्पत्ती 'फणीन्द्र' म्हणजे सर्पांचा राजा, याजपासून लावतात ही गोष्ट सुप्रसिद्ध होय. मयूरशर्म्याच्या (इ. स. ३३० ते ३६०) चंद्रवल्ली येथील शिलालेखात 'सयिन्दक' हा शब्द प्रथम आलेला आहे. त्यापासूनच 'शिंद' शब्द तयार झाला असावा. या 'सयिन्दक' शब्दाचेच संस्कृत रूप 'सेन्द्रक' होय. यावरून 'सेन्द्रक' आणि 'शिंद' हे बहुधा एक असावेत असे दिसून येते. मिरज संस्थानातील लक्ष्मेश्वर[३] येथील शिलालेखात चालुक्य नृपती सत्याश्रय याचा समकालीन म्हणून दुर्गशक्तीचा उल्लेख असून तो 'भुजगेन्द्रान्वय' म्हणजे सर्पराजाच्या कुलातील विजयशक्तीच्या कुंदशक्ती नामक पुत्राचा मुलगा असल्याचे सांगितले आहे. विजापूर जिल्ह्यातील बागलकोट

१ Mysore Archaeological Survey. A. R. 1929, p. 50.

२ Select Inscriptions (Dr. D. C. Sircar) pp. 449.

३ इंडि, अँटि. वर्ष ७, पृ. १०३

गावाच्या पूर्वेला भैरन्‌मट्टी[1] येथील शिलालेखात सिंद नारायण पुलिकाल (पश्चिम-चालुक्य नृपती तैल दुसरा, इ. स. ९७३-९९७, याला समकालीन) पासून तो पोलसिंद याचा पुत्र सेव्वरस (पश्चिम-चालुक्य नृपती दुसरा सोमेश्वर–इ. स. १०६९ ते १०७६ याला समकालीन) पर्यंत बागडगे (=बागलकोट) येथील सिंद राजकुलाचा सविस्तर वृत्तांत आलेला आहे. सिंद कुलाची, दंतकथांवर आधारलेली उपपत्तिही त्यात दिलेली आहे. हे सिंद राजे स्वतः 'दृष्टिविषकुळतिळक फणामणिकिरणविभासुर नागवंशोद्‌भव' असल्याचे सांगतात. त्यांच्या ध्वजावर किंवा पताकेवर नागचिन्ह असते. त्यांचे लांच्छन व्याघ्राचे असून आपण सर्वश्रेष्ठ अशा भोगावतीचे परंपरागत स्वामी (भोगावतिपुरपरमेश्वर) आहोत असे त्यांचे म्हणणे आहे. या कुलाचा मूळ पुरुष कोणी अजानुबाहू सिंद असून तो सिंधू नदीच्या प्रदेशातील अहिछत्र गावी सर्पराज धरणेंद्राला झालेला मानुष पुत्र होता. त्याचे पालन-पोषण एका व्याघ्राने केलेले होते. एका कदंब राजकन्येशी त्याचे लग्न होऊन तिच्यापासून त्याला तीन मुले झाली. त्यांनीच सिंदवंश रूढ केला. सुमारे शके ११६५ च्या हरिहर[2] येथील शिलालेखात दुसऱ्या एका सिंद कुलाचा वृत्तांत आलेला आहे. त्यातही त्यांचा मूळ पुरुष कोणी आजानुबाहू सिंद असून तो भगवान शिव व सिंधू नदी यांच्या मीलनातून जन्मलेला आणि नागराजाने वाघाच्या दुधावर वाढवलेला म्हणून वर्णन केलेला आहे. त्याने कऱ्हाटक (आजचे कऱ्हाड, जिल्हा सातारा, मुंबई राज्य) येथे स्वतःसाठी स्वतंत्र राज्य स्थापन केले. कऱ्हाटक भोवतालच्या प्रदेशावर त्याचे राज्य होते. बेलरी तालुक्यातील जुनी भात्रहल्ली[3] येथील शिलालेखात शिंद कुलातील एका राजाच्या पदव्यांची मोठी यादी दिली आहे. हा राजा सिंदवाडी (=बेल्लरी, जिल्हा व त्याच्या उत्तरेकडील प्रदेश) येथे राज्य करीत होता. शिलालेखात त्याचे नाव नष्ट झाले आहे. त्याच्या एका पदवीवरून असे दिसून येते की तो 'दृष्टिविष (नागांच्या) वंशात जन्मलेला' होता.

पुणे जिल्ह्यातील जुन्नर येथेही सिंद वंशाची दुसरी एक शाखा राज्य करीत होती असे जुन्नर ताम्रपटावरून दिसून येते. जुन्नर ताम्रपट हा तेथे राज्य करणाऱ्या सिंद आदित्यवर्म्याचा (इ. स. ९६५) एक अपूर्ण ताम्रपट असून त्यात हा आदित्यवर्मा

---

१ एपि. इंडिका. वर्ष ३, पृ. ३३०.

२ Pali, Sanskrit and Old Canarese Inscriptions. No. 119 and Mysore Inscriptions, p. 60.

३ Early Dynasties of Andhradesh, पृ. २९८

'दृष्टिविषफणीन्द्रवंशोद्भव सिन्दान्वयप्रसूतः[१]' म्हणजे दृष्टिविष नागाच्या वंशातून उत्पन्न झालेल्या सिन्द कुळात जन्मलेला असल्याचे म्हटले आहे. सिंद नारायण पुलिकाल यानेही स्वतःला 'दृष्टिविषकुलतिलक' म्हणून संबोधलेले आहे. यावरून आदित्यवर्म्याचा सिंदवंश ही सिंद नारायण पुलिकालच्या वंशाचीच शाखा असावी असे वाटते.

प्रारंभी, सध्याच्या म्हैसूर राज्याच्या प्रदेशातच हे सिंद राजे राज्य करीत असावेत असे दिसते. मयूरशर्म्याच्या पूर्वोक्त चंद्रवल्ली शिलालेखात त्याने 'सिंदियक' प्रदेश जिंकल्याचा उल्लेख आहे. यावरून 'सिंदियक' अथवा 'सिंद' राजे यांनी इ. स. ३३०–३६० पूर्वीच काही वर्षे तरी आपले राज्य स्थापन केले असावे. त्यांच्या राज्याचा निश्चित प्रदेश कोणता तो उल्लेखिलेला नाही. तथापि, डॉ. दिनेशचंद्र सरकार यांनी तळटीपेत म्हटल्याप्रमाणे हा 'सेन्द्रक प्रदेश म्हैसूर राज्यात होता.' पुढे तो प्रदेश कदंब नृपतींनी जिंकला म्हणून शिंद राजांना त्यांचे मांडलिक व्हावे लागले. बेन्नूर[२] ताम्रपटात, कदंब नृपती द्वितीय कृष्णवर्मा हा वैजयंती (सध्याच्या उत्तर कर्नाटकातील बनवासी शहर) येथे जात असताना त्याने 'सेंद्रक' जिल्ह्यातील 'पलमडि' गाव दान दिल्याचे उल्लेखिलेले आहे (भानुस्वामिने सेंद्रकविषयान्तर्गत-पलमडिग्रामे. . . .प्रदत्तवान्). यावरून बनवासीच्या आसपास सेन्द्रकांचा प्रदेश असावा असा तर्क संभवतो. धारवाडजवळील अडूर[३] येथील चालुक्यनृपती पहिला कीर्तिवर्मा (इ. स. ५६६—५९८) याच्या शिलालेखात असे म्हटले आहे की, अडूर येथे माधवती व शिंद राजे यांचे राज्य होते. यावरून सिंदराजांचा प्रदेश धारवाडच्या आसपास असावा असे दिसते. पश्चिम गंग नृपती श्रीपुरुष-पृथ्वी-कोंगुणी याच्या जावळी[४] ताम्रपटात 'सिंद विषया'चा उल्लेख आहे. राइस यांच्या म्हणण्याप्रमाणे हा प्रदेश म्हैसूरच्या उत्तरेला असून तो धारवाड-विजापूरच्या काही भागापर्यंत पसरलेला होता.

---

१ एपि. इंडिका, वर्ष २५, पृ. १६९. मूळ ताम्रपटात 'दृष्टीविषफणीन्द्र-वंशोद्भवसिन्दान्वयप्रसूतः' असे आहे. ते 'दृष्टिविषफणीन्द्रवंशोद्भव[:*] सिन्दान्वयप्रसूतः' असे म. म. मिराशी यांनी दुरुस्त केले आहे. वस्तुतः तसे करण्याची गरज नाही. मूळ सामासिक शब्द जसाचा तसा ठेवून 'दृष्टि-विषफणीन्द्रवंशोद्भव' हे 'सिन्दान्वया'चे विशेषण घेणे अधिक योग्य होईल.

२ एपि. कर्नाट, वर्ष ५, पृ. ५९४.

३ इंडि. अँटि. वर्ष ११, पृ. ६८.

४ एपि. कर्नाटिका, वर्ष ६, पृ. १५१.

प्रस्तुत नेसरी ताम्रपटावरून असे दिसून येते की, शके ७२७ (इ. स. ८०५) मध्ये सिंद राजे त्या भोवतालच्या प्रदेशात राष्ट्रकूट सम्राटांचे मांडलिक म्हणून राज्य करीत होते. श्रीशुगुट्टरू ही बहुधा त्यांची राजधानी असावी. दक्षिण-दिग्विजय संपवून परत येत असताना तृतीय गोविंदाने या गावाला भेट दिली असावी. तेथील राजा नागहस्ति याच्या सिंद कुलाला 'बृहत्' हे विशेषण लावले आहे. त्यावरून मूळ शिंद वंशाच्या या वेळी अनेक शाखा ठिकठिकाणी पसरल्या असून त्यांपैकीच श्रीशुगुट्टरू येथील नागहस्तीची शाखा ही एक मोठी शाखा होती असे दिसते. शिंद वंशाच्या ह्या अनेक शाखा बगडगे (=बागलकोट, मुंबई राज्य), एरम्बर्गे (=एलबर्गा, आंध्र प्रदेश) चक्रकोट (बस्तर जिल्हा), आणि जुन्निनगर अथवा जुन्नर (पुणे जिल्हा, मुंबई राज्य) इत्यादी ठिकाणी राज्य करीत होत्या.

## राष्ट्रकूट नृपती कृष्ण–धोर–गोविंद

मोठ्या शिंद वंशांतील श्रीनागहस्ति राजाच्या विनंतीवरून धारावर्षदेवाच्या चरणांचे चिंतन करणाऱ्या गोविंदराजाने हे दानपत्र दिलेले आहे. या गोविंदाचे आणि त्याच्या पूर्वजांचे वर्णन प्रस्तुत ताम्रपटातील आरंभीच्या २ ते २५ श्लोकांत आलेले आहे. **कृष्णराज** या नावाचा एक राजा होता. त्यालाच वल्लभ असेही नाव होते. (श्लोक ३). त्याने चालुक्य कुलाच्या समुद्रातून मंदरपर्वताप्रमाणे लक्ष्मीला सहज ओढून वर घेतले, अर्थात त्यांना जिंकून त्यांचे राज्य व संपत्ती त्याने हस्तगत केली. त्याला '**धोर**' या नावाचा पुत्र होता. यालाच 'धारावर्ष' म्हणून अन्यत्र संबोधले आहे. वडील बंधूचे उल्लंघन करून आलेल्या राज्यलक्ष्मीने तो युक्त झाला तरी त्याबद्दल तो दोषास्पद ठरला नाही. त्याने **गंग** राजाला दीर्घकाळपर्यंत बद्ध केले (श्लोक ६), **पल्लवांना** नमविले (श्लोक ७), गौड राजांची लक्ष्मी सहज हरण केल्यामुळे उन्मत्त झालेल्या **वत्सराजाला** मरु देशाच्या मध्यभागात हाकून लावून त्याजवळून गौडांची पांढरी शुभ्र अशी दोन छत्रे हरण केली (श्लोक ८). या 'धोरा'-लाच 'निरुपम' असेही संबोधीत. (श्लोक ९). **गोविंदराज** हा त्याचा पुत्र होय (श्लोक १०). सर्वगुणसंपन्न असा हा (गोविंद) राज्य करीत असताना राष्ट्रकूटांचा वंश, यादववंशाप्रमाणे अजिंक्य झाला. त्रैलोक्याच्या संरक्षणाला योग्य असा त्याचा अमानुष आकार पाहून त्याच्या वडिलांनी (धोराने) आपल्या जिवंतपणीच त्याला संपूर्ण राज्याचा अधिकार (राजपद) देऊ केला, पण त्याने तो विनयाने नाकारला (श्लोक १२). वडिलांच्या मृत्यूनंतर पृथ्वीचा (राज्याचा) संहार करण्यासाठी एकत्रित होऊन चालून आलेल्या अनेक राजांना त्याने एकटयाने निस्तेज केले (श्लोक १३). त्याने दीर्घकालपर्यंत बंदिवासात असलेल्या **गंग** राजाला

अत्यंत दयाळू होऊन सोडून दिले व त्याच्या देशाला परत पाठविले. पण स्वदेशी जाताच प्रतिकूल झालेल्या त्या गंगाला, भृकुटी वर होत नाही तोच, तावडतोब जिंकून त्याने पुनः बंदिवासात टाकले (श्लोक १४). पुन्हा स्वप्नात देखील युद्ध पाहणार नाही अशा रीतीने **गुर्जराला** नष्ट केले. (श्लोक १५); मालव देशाच्या राजाने शरण जाऊन त्याला दुरूनच हात जोडून प्रणाम केला (श्लोक १६) ; तो सैन्यासह विंध्याद्रीत आलेला आहे असे आपल्या गुप्त हेराकडून कळताच भीतीमुळे **माराशर्व** राजा तावडतोब त्याजकडे गेला व त्याच्या चरणांना वंदन करून त्याने त्याला अनुकूल करून घेतले. (१७). श्रीभवन येथे पावसाळा काढून मग तो आपल्या सैन्यासह तुंगभद्रेच्या काठावर आला व तेथून त्याने **पल्लवांचे** ऐश्वर्य पुनः हस्तगत केले (१८). तो आलेला आहे हे ऐकताक्षणीच **वेंगी**चा राजाही, आपले कल्याण व्हावे या इच्छेने तेथे येऊन त्याची सेवकाप्रमाणे चाकरी करू लागला. (१९). इतर राजसमूहही हात जोडून त्याला शरण आला, तेव्हा त्याने त्याला अभय दिले (२०). याप्रमाणे अनेक राजांकडून त्यांची राजचिन्हे हरण करून जगत्तुंगाने सर्व पृथ्वी गरुडध्वजांकित करून सोडली (२१–२४). एवंगुणविशिष्ट अशा गोविंदाने हा नेसरी ताम्रपट दिलेला आहे.

वंशावळ व प्रशस्ति-वर्णनाचे प्रस्तुत नेसरी (श. ७२७) ताम्रपटातील बहुतेक श्लोक सीसवै[१] (श. ७२९), राधनपूर,[२] बदनगुप्पे[३] (श. ७३०), बहुलावाड[४] (श. ७३१), भा. इ. सं. मंडळ[५] (श. ७३२) व लोहारा[६] (श. ७३४) ताम्रपटांतील श्लोकांप्रमाणेच आहेत. श. ७२४ मध्ये गोविंदाच्या अनुमतीने स्तंभाने दिलेल्या मन्ने[७] ताम्रपटातही यांतील बहुतेक श्लोक आहेत. यांतील काही ताम्रपटांत एखाददुसरा श्लोक वगळलेला आहे, इतकेच. पण महत्त्वाची गोष्ट अशी की, प्रस्तुत नेसरी ताम्रपटांतील २१ ते २५ हे पाच श्लोक इतर कोणत्याही ताम्रपटांत नाहीत. ते सर्वस्वी नवीन आहेत. दुर्दैवाने २२ व्या श्लोकात २१ व्या श्लोकातील 'वृषभं पल्लवेश्वरात्' हा चरण चुकून पुन्हा कोरला गेलेला असल्यामुळे तेथील मूळ चरण व त्यातील माहिती यांना आपण मुकलो आहोत. २५ व्या श्लोकाचाही

---

१ एपि. इं. पु. २३. पृ. २०४.
२ एपि. इं. पु. ६, पृ. २४४.
३ म्हैसूर आर्कि. सर्व्हे रिपोर्ट १९२७, पृ. ११२.
४ दक्षिण मध्य इति. साधने, भाग २, पृ. १३.
५ दक्षिणच्या मध्य. इति. साधने, भाग ३, पृ. २७.
६ एपि. इं. पु. २३, पृ. २१२.
७ एपि. कर्नाटिका, पु. ९, पृ. ५१.

एक संपूर्ण चरण कोरताना राहून गेलेला दिसतो. त्यामुळे त्या श्लोकाचा सरळ अर्थ लावण्याला अडचण पडते, हे खरे ; तथापि, त्या श्लोकाचे स्वरूप केवळ स्तुतिपर असल्यामुळे त्यातील माहिती नष्ट झालेली आहे असे म्हणता येत नाही. या श्लोकावरून तिसऱ्या गोविंदाने जिंकलेल्या राजांची व त्यांच्याजवळून हिरावून आणलेल्या त्यांच्या ध्वजचिन्हांची जी माहिती मिळते ती अशी :

**पांड्य** देशाच्या राजापासून मत्स्य, **पल्लवेश्वरा**पासून वृषभ, **चोला**पासून व्याघ्र, **गंगा**पासून गज, **केरला**पासून धनुष्याची काठी (श्लो. २१), **अंध्र-चालुक्य-मौर्य** यांच्यापासून वराह, **गुर्जरेश्वरा**पासून ज्यात आर्याची आकृती आहे असा फलक, **पल्लवेश्वरा**पासून वृषभ (श्लो. २२), **कोसल** व **अवंतो** यांच्या स्वामींपासून, तसेच **सिंहला**पासून सुद्धा. . ., **बंगाल** भूमीचा राजा धर्म्म याजपासून सुप्रसिद्ध भगवती तारा (श्लो. २३), याप्रमाणे राजांची ही व इतर चिन्हे काढून घेऊन (व त्या ठिकाणी आपला गरुडध्वज रोवून) जगत्तुंगाने सगळे जग गरुडचिन्हांकित करून सोडले. (श्लो. २४). . .त्या श्रीवल्लभाने आपल्या भुवनातील गरुडाच्या उजव्या बाहूला, त्या त्या चिन्हांनी वेष्टित करून सोडले. (श्लो. २५).

यावरून तिसऱ्या गोविंदाने पांड्य, पल्लव, चोल, गंग, केरल, आंध्र, चालुक्य, मौर्य, गुर्जर, कोसल, अवंती, सिंहल आणि बंगाल या राजांना जिंकून त्यांची राजचिन्हे हरण केली होती असे दिसून येईल. यांपैकी गंग, गुर्जर, पल्लव व आंध्र (वेंगीश्वर) यांजवरील विजयांचा निर्देश याच ताम्रपटातील अनुक्रमे १४, १५, १८ व १९ श्लोकांत आलेला आहे. शिवाय, वरील नामावलीत ज्यांचा उल्लेख नाही असे मालवनायक व माराशर्व यांच्यावरही गोविंदाने विजय मिळविला होता (श्लो. १६ व १७ पाहा). या राजकुलांची राजचिन्हे किंवा मुद्रा कोणत्या होत्या व त्यावेळी गोविंदाला समकालीन असे त्यांच्या घराण्यातील कोणते राजे राज्य करीत होते हा अभ्यासाचा स्वतंत्र विषय आहे. मी त्याचा विचार विस्ताराने अन्यत्र[१] केलेला आहे. येथे एकाच महत्त्वाच्या गोष्टीकडे अभ्यासकाचे लक्ष वेधू इच्छितो. ही गोष्ट म्हणजे, 'बंगाल' या देशनामाचा या ताम्रपटातील स्वतंत्र निर्देश.

### बंगाल चा प्रथम उल्लेख

सामान्य समजूत अशी आहे की, '(वं)वंग' या प्राचीन देशनामापासून सध्याचे 'बंगाल' हे नाव आलेले आहे ; पण वस्तुस्थिती तशी नाही. वंग आणि बंगाल

१ 'Four verses from the Nesari Copper Plates' (Nag. Uni. Historical Bulletin, No. 8-10, Oct. 1956)

ही दोन स्वतंत्र राज्ये होती. अब्लूर[1] (शक सुमारे १२००) येथील शिलालेखात विण्जनराय नावाच्या शूर राजाने **वंग** देशाच्या राजाला जात्यात भरडून आणि **वंगाल**, कलिंग, मगध, पाटश्वर आणि माळवा येथील राजांशी लढून आणि त्यांना ठार मारून, पृथ्वीचे रक्षण केल्याचे वर्णन आहे. यांत वंग आणि वंगाल देशांचे स्वतंत्र उल्लेख आढळतात. विपुलश्री मित्राच्या नालंदा[2] येथील शिलालेखात, तसेच कर्ण-देवाच्या गोन्हवा[3] ताम्रपटातही 'वंगाल'चा निर्देश आहे. 'वंगालचा स्वतंत्र निर्देश कोरीव लेखांत आणि साहित्यात ११ व्या शतकापासून आढळतो' असे सुप्रसिद्ध संशोधक श्री. रमेशचंद्र मुजुमदार[4] यांनी म्हटले आहे. त्यांच्या मते सर्वात प्राचीन निर्देश म्हणजे यापूर्वी उल्लेखिलेल्या अब्लूर येथील शिलालेखातील होय. प्रस्तुत नेसरी ताम्रपटातील 'वंगाल'चा निर्देश लक्षात घेतला म्हणजे हे स्वतंत्र देशनाम म्हणून ९ व्या शतकाच्या प्रारंभीही प्रसिद्ध होते असे दिसून येईल. 'वंगाल' देशाचा इतिहास, याप्रमाणे, प्रस्तुत ताम्रपटाने दोनशे वर्षं मागे नेलेला आहे ही विशेष महत्त्वाची गोष्ट होय.

तिसऱ्या गोविंदाच्या वेळी या वंगालचा राजा 'धर्म' हा होता (श्लो. २३). राष्ट्रकूट नृपती अमोघवर्ष १ याच्या संजान[5] ताम्रपटातही (श्लो. २३) त्याचा 'धर्म्म' असाच निर्देश आढळतो. हा धर्म्म(र्म) म्हणजे पाल वंशातील धर्मपाल राजा होय. बंगालवर तो इ. स. ७७० पासून ८१० पर्यंत राज्य करीत होता. तिसरा गोविंद हा उत्तर-दिग्विजयार्थ संचार करीत असताना चक्रायुध राजाबरोबर हा धर्म(पाल) त्याला शरण गेला होता (संजान ताम्रपट, श्लो. २३). तो बुद्धधर्मा-नुयायी असल्यामुळेच बुद्धधर्मात जिला श्रेष्ठ स्थान प्राप्त झालेले होते अशा भगवती तारेची मूर्ती त्याने गोविंदाला नजर केली असावी असे दिसते.

"तिसरा गोविंदराज याने दिलेल्या ताम्रपटांचे प्रा. वा. वि. मिराशी यांनी दोन विभाग पाडलेले आहेत. राष्ट्रकूट वंशातील भूतपूर्व राजांच्या प्रशस्तीतील श्लोक अंतर्भूत करून ज्यांत वंशावळी दिलेली आहे असा जुन्या प्रशस्तीचा पहिला विभाग; आणि त्याने केलेल्या पराक्रमांचे वर्णन करणारी प्रशस्ती ज्यांत आलेली आहे अशा ताम्रपटांचा दुसरा विभाग." या दुसऱ्या विभागातील पहिला ताम्रपट म्हणून

---

१ एपि. इं. पु. ५, पृ. २४९ व २५७.

२ एपि. इं. पु. २१, पृ. ९७.

३ एपि. इं. पु. ११, पृ. १४२.

४ History of Bengal. पृ. १९.

५ एपि. इं. पु. १८ .२४५.

प्रस्तुत 'नेसरी' ताम्रपटाचे महत्त्व विशेष आहे. झरिका (श. ७२५) व ब्रि. म्यु. (श. ७२६) ताम्रपटांवरून या काळांत गोविंद हा आपल्या दक्षिण दिग्विजयात गुंतला होता असे दिसते. यावेळी त्याचा मुक्काम तुंगभद्रा नदीच्या काठावरील अलंपुर या गावी होता. नेसरी (श. ७२७) ताम्रपटाच्या काळी त्याचा दिग्विजय पूर्ण झालेला होता असे स्पष्ट दिसते. अर्थात, श. ७२७ हे वर्ष तिसऱ्या गोविंदाच्या आयुष्यातील परमोत्कर्षाचे वर्ष म्हणून उल्लेखिता येईल. याच वेळी त्याने 'जगत्तुंग' हे, राष्ट्रकूटांच्या काळात पूर्वी कुणीही धारण न केलेले नवीन बिरूद धारण केले. प्रस्तुत ताम्रपटात 'परमभट्टारक महाराजाधिराज परमेश्वर' 'श्रीवल्लभ' 'श्रीप्रभूतवर्ष' 'नरेंद्रदेव' 'जगत्तुंग' अशी बिरुदे त्याला लावलेली आहेत. त्यातील 'जगत्तुंग' (श्लो. २४) हे सर्वस्वी नवीन बिरुद होय. तृतीय गोविंदाच्या सर्व उपलब्ध ताम्रपटांपैकी फक्त याच ताम्रपटात ते आढळते. त्यावरून संपूर्ण भारतवर्षावरील त्याचे प्रभुत्व सूचित होते. अमोघवर्षाच्या संजान ताम्रपटातील तृतीय गोविंदाच्या प्रशस्तीवरून (श्लो. २९) त्याला पूर्णपणे दुजोरा मिळतो. अमोघवर्षाने आपल्या वडिलांचे 'परमभट्टारक महाराजाधिराज परमेश्वर—**श्रीजगत्तुंगदेव**'—असेच वर्णन त्यात केले आहे. यावेळी राष्ट्रकूट वंश कीर्तीच्या शिखरावर पोचला असून गोविंद तिसरा हा भारताचा यथार्थतः सम्राट झालेला होता असे म्हणण्यास हरकत नाही.

## शिवनागभट्टाला दान

या ताम्रपटान्वये, तिसऱ्या गोविंदाने **इक्षुग्राम** येथे राहणाऱ्या, तीन वेदांचे अध्ययन करणाऱ्या, अंगिरस-बार्हस्पत्य-भारद्वाज–प्रवरान्वित भारद्वाज गोत्राच्या व तैत्तिरीय शाखेच्या ब्रह्मचारी **शिवनागभट्टाला चंदगड** विषयांतील **नेसरिका** गावाचे दान दिलेले आहे. हा शिवनागभट मारिदास चतुर्वेदाचा नातू आणि परिवच्छर चतुर्वेदाचा पुत्र होता. प्रस्तुत गावाचे दान त्याला सर्व अधिकारांसहित कायमचे दिलेले असले तरी त्याने विषयपतीला (जिल्हाधिकाऱ्याला) दरवर्षी 'पाच हजार' द्यावयाचे आहेत. हे पाच हजार काय? नाणी की इतर काही? नाणी असल्यास कोणती?—इत्यादी प्रश्न उद्भवतात. त्यांचा निश्चित निर्णय ताम्रपटात नाही.

प्रस्तुत ताम्रपटाचा 'दूतक' (ताम्रपट प्रत्यक्ष नेऊन देणारा अधिकारी) **देवैय राणक** आणि 'लेखक' वत्सराजाचा पुत्र **अरुणादित्य** होय. झरिका ताम्रपटात 'महाक्षपटलाधिप' म्हणजे सर्वश्रेष्ठ नोंदणी-अधिकारी म्हणून निर्देशिलेला 'देवय्य' व प्रस्तुत ताम्रपटाचा दूतक 'देवैय' हा एकच असावा. या ठिकाणी त्याला 'श्री' हे उपपद लावलेले असून त्याच्या नावासमोर 'राणक' ही उपाधी जोडलेली आहे. त्यावरून गोविंदाजवळ त्याची मान्यता वाढलेली होती असे दिसते. प्रस्तुत ताम्र-

पटाचा लेखक 'अरुणादित्य' हा गोविंदाने शके ७२७ मध्ये व त्यानंतर दिलेल्या उपलब्ध सर्व ताम्रपटांचा लेखक होय. त्याच्या वडिलांचे नाव 'वत्सराज.' संजान ताम्रपटाचा लेखक 'गुणधवल' हाही 'वत्सराजा' चाच पुत्र होता. बहुधा तो आपल्या अरुणादित्याचा बंधू असावा. तसे असल्यास हा अरुणादित्य वालभ येथील कायस्थ वंशाचा होता, असे म्हणण्यास हरकत नाही (संजान ताम्रपट, ओ. ७७).

**स्थलनिश्चय**

दान दिलेले **नेसरिकाग्राम** म्हणजे हल्लीचे 'नेसरी' गाव असून ते मुंबई राज्याच्या कोल्हापूर जिल्ह्यातील गडहिंग्लज तालुक्यात घटप्रभा नदीच्या काठावर वसलेले आहे. पूर्वेला 'नदी संगमकारी' (=घटप्रभा नदीला मिळणारी) 'तारा' नावाची 'वहलीका' (=ओहोळ) आज 'तारव्हा(हो)ळ' नावाने ओळखली जाते. ताम्रपटात निर्देशिलेले नेसरीच्या दक्षिणेकडील '**निट्टूरग्राम**' म्हणजे आजचे 'निटूर' होय. ते नेसरीच्या दक्षिणेला असलेल्या पिवळसर मातीच्या डोंगरापलीकडे असून नेसरीपासून ४ मैलांवर आहे. हा पिवळसर मातीचा डोंगरच 'हेमगिरि' म्हणून निर्देशिलेला असावा. पश्चिम सीमेकडील गावे आज आढळत नाहीत. नेसरीच्या उत्तरेकडे काही टेकड्या आहेत. त्याच 'कृष्णगिरि' म्हणून असाव्यात, असे वाटते. शिवनागभटाच्या वस्तीचे **इक्षुग्राम** (मराठी–ऊसगाव) म्हणजे नेसरीपासून १२ मैलांवर आणि बेळगावच्या पश्चिमेस सहा मैलांवर असलेले 'उचगाव' असावे.

**वाचन**

**(वृत्ते : श्लो. १, २१, २२, २३, २४, २७, २८, २९, ३१–अनुष्टुभ्; श्लो. ३, ४, ५, ७, ८, १० ते २०, २५––शार्दूलविक्रीडित; श्लो. २, ६, ९–वसंततिलका; श्लो. २६–आर्या; श्लो. ३०–इंद्रवज्रा; श्लो. ३२–पुष्पिताग्रा).**

पहिला पत्रा

**१ [ओं][२] स वोव्याद्वेधसा धाम यन्नाभिकमलं कृतं [।*] हरश्च यस्य कांतेंदुकलया कमलंकृतं(तम्) [॥१॥*] भूपो भवद्व(द्बृ)हद्रुरस्थल[रा*]–**

१ सं. वहः=नद ; देशी शब्द वाहळी=ओढा. यापासूनच ओहळ शब्द आला असावा. व(वा)हलीका याचाच अपभ्रंश 'व्हाळ' होय.

२ खुणेने दाखविलेला आहे.

२ जमानश्रीकौस्तुभायतकरैरुपगूढकण्ठ[:।*]सत्यं(त्या)न्वितो विपुलचक्रविनिर्जित-
(ता)रिचत्रोप्यकृष्णचरितो भुवि कृष्ण–

३ राज[:॥२॥*] पक्षच्छेदभयाश्(श्रि)ताखिलमहाभूभृत्कुलभ्राजितादु(द्दु)-
र्लंघ्यादपरैरनेकविमलै[1]भ्राजिष्णुरत्नाविताद् [।*]

४ यश्चालुक्यकुलादनूनविबु(बु)धव्राताश्रयो वारिधेर्ल्लक्ष्मीन्मंदर[2]वत्सलीलमचिरा-
दाकृष्टवं(वा)न्वल्लभः [॥३॥*] तस्याभू–

५ त्तनयः प्रतापविसरैराक्रांतदिग्मण्डलश्चण्डं(ण्डां)शो ।[3][:*] सदृशोप्यचण्ड-
करताप्रह्लादितक्ष्मातलः [।*] धोरो[4] धैर्यधनो विपक्षवनि–

६ तावक्त्रांबु(बु)जश्रीहरो हारीकृत्य यशो यदीयमनिशं दिग्नाजि(यि)काभिर्धृतं-
(तम्) [॥४॥*] ये(ज्ये)ष्ठोलं(ल्लं)घनया(जा)तयाप्यमलया लक्ष्म्या

७ समेतोपि सन्योभूनि(न्नि)र्मलमंडलस्थितियुतो दोषाकरो न क्वचित् [।*]
कर्ण्णाध[:*]स्थितदानसंततिभृतो यस्यान्यदानाधिकं दा–

८ नं वीक्ष्य सुलजि(ज्जि)ता इव दिसं(शां) प्रांते स्थिता ; दिग्गजाः
[॥५॥*] अन्यैर्ण्ण(र्न्न) जातु विजितं गुरुशक्तिसारमाक्रांतभूतलं(ल)मनं-
(न)न्य[समा]–

९ नमानं(नम्) [।*] येनेह व(ब)ध(द्ध)मवलोक्य चिराय गंगं दूरं स्वनिग्रहभि-
येव कलि[5]प्रयातः । [॥६॥*] एकत्रात्मव(ब)लेन वा–

१० रिनिधिनाप्यन्यत्र रुध्वा[6] घनं निष्कृष्टासिभटोध(द्ध)नेन विहरा(र)द्ग्राहाति-
भीमेन च [।*] मातंगान्मदवा–

---

१ 'लै' मधील दोन्ही मात्रा अनावश्यक आहेत. 'विमलभ्राजिष्णु०' असे वाचावे.

२ सीसवै आणि लोहारा ताम्रपटांतील पाठाप्रमाणे 'लक्ष्मीं मंदर'—असे वाचावे. वणी-दिंडोरी ताम्रपटांत मात्र असाच पाठ आहे.

३ येथील दंड अनावश्यक आहे.

४ सीसवै आणि लोहारा ताम्रपटांत 'धीरो' असा पाठ आहे. वणी-दिंडोरी बहुलावार, व भा. इ. सं. मंडळ ताम्रपटांत मात्र 'धोरो' हाच पाठ आढळतो.

५ 'कलिः प्रयातः' असे वाचावे. – लि समोरील चिन्ह उपध्मानीयाचे होय.

६ 'रुद्ध्वा' असे वाचावे.

११ रिनिर्झरमुचᳶ[1]प्राप्यानतात्पल्लवात्तच्चित्रं मदलेशमप्यनुदिनं य[:*] स्पृष्टवान-
(न्न) क्वचित् [।।७।।*] हेलाश्वी(स्वी)कृतगौ[ड*]

१२ राज्यकमलामतं(त्तं) प्रवेस्या(श्या)चिरात् [2]दुर्म्मार्ग्गं मरुमध्यमप्रतिव(ब)लैर्यो
वत्सराजं व(ब)लैः [।*] गौडीयं शरदी(दि)दुपादधवलच्छत्रद्वयं–

१३ केवलं तस्माना(न्ना)हृत तद्यशोपि ककुभां प्रांते स्थितां(तं) त[त्*]-
क्षणात् [।।८।।*] लव्ध(ब्ध)प्रतिष्ठमचिराय कलिं शु(सु)दूरमू(मु)त्सार्य
सु(शु)ध(द्ध)चरितैध(र्ध)–

१४ रणीं(णी)तलस्य[।*] कृत्वा पुनः कृतयुगश्(श्रि)यमप्यशेषं [चि]त्रं कथं
निरुपमः कलिवल(ल्ल)भोभूत् [।।९।।*] प्राभृधै(द्धै)र्यवतस्ततो [नि]रुपमा

१५ दि(दिं)दुर्यथा वारिधे[:*] शुधा(द्धा)त्मापर[मे]श्वरो[न्नतशिरः*] संसवत-
पा[दः] सुतः [।*]पद्मानंदकरः प्रतापसहितो नित्योदयस्सोन(न्न)तेᳶ[3]पूर्वाद्रेरि–

१६ व भानुमां(मा)नभिमतो गोविंदराज[:*] सतां(ताम्) [।।१०।।*] यस्मि-
न्सर्व्वगुणाश्रये क्षितिपतौ श्रीराष्ट्रकूटान्वयो या(जा)ते यादव–

१७ वां(वं)शवं(वन्)मधु[रिपावा*][4]सीदलंघ्यᳶपरैः[5][:।*] दृष्टाशावधयष्कृता[6]
शु(सु)सदृशा दानेन येनोध(द्ध)ता मुक्ताहा[र] विभूषि[ता]-

१८ [स्फुटमिति प्रत्यर्थिनो*][4]र्थ्यर्थिनां(नाम्)[।।११।।*] यस्याकारममानुषं तृ(त्रि)-
भुवनव्यापत्तिरक्षोचितं कृष्णस्येव निरीक्ष्य य[च्छ]ति पि[त]-

१९ [र्यैकाधिपत्यं भुवः । आस्तां ता*][4]त तवै[त]दप्रतिहता दत्ता त्वया कण्ठिका
(किं) नाज्ञेव मया धृतेति पितरं यु[क्तं] वचो

---

१ '°मुचः प्राप्या०' असे वाचावे. मुच समोरील चिन्ह उपध्मानीय चिन्ह होय.

२ 'चिराद्दुर्म्मार्गं' असे वाचावे.

३ 'नित्योदयः सोन्नतेः पूर्व्वा०' असे वाचावे. ते समोरील चिन्ह उपध्मानीयाचे होय.

४ ताम्रपटाचा हा कोपरा तुटलेला आहे. येथील अक्षरे इतर ताम्रपटांच्या आधारे घेतलेली आहेत.

५ '°लंघ्यः परैः—असे वाचावे. य समोरील चिन्ह उपध्मानीयाचे होय.

६ '°वधयः कृता° असे वाचावे. ष सारखे दिसणारे अक्षर जिव्हामूलीय चिन्ह होय.

दुसरा पत्रा : पहिली बाजू

२० योभ्यधा[त् ॥१२॥*] तस्मि(स्मिन्) स्वर्ग्गविभूषणाय जनके याते यशःसे-(शे)षत(ता)मेकीभूय समुद्यतान्वसुमतीसंहारमाधिच्छ(त्स)या [।*] विच्छा [यान्*][1]

२१ सहसा व्यधत(त्त) नृपति(ती)[नें]कोपि यो द्वादशैः[2](श)ख्यातानप्यधिक-प्रतापविसरै[:*] संवर्त्तकोर्क्कानिव [॥१३॥*] येनात्यंतदयालु[नाथ*]

२२ निगडक्लेशादपास्यायतां(तात्) स्वं देशं गमितोपि दर्प्पविसराद्य[3] प्राति-कूल्ये स्थितः [।*] यावन्न भ्रुकुटिं(टी) ललाटफलके

२३ नित्योदयस्सोन्नतेर्विक्षेपेण[4] विजित्य तावदचिराद्व(द्ब)ध(ध्दः) स गंगः पुन्नः (नः) [॥१४॥*] संधायासु(शु) सि(शि)लीमुखां(खान्) स्वसमयाद्वा(द्बा)णा–

२४ सनस्योपरि प्राप्तं वर्द्धितवं(बं)धुजीवविभवं पद्माभिवृ[द्ध्या]न्वितं(तम्) [।*] संनक्षत्रमुदीक्ष्य[5] यं स(श)रद्र(द्)तुं पर्जन्यवद्गूर्जरो न–

२५ ष्ट[:*] क्वापि भयांतथा[6] न समरं स्वप्नेपि पस्ये(श्ये)द्यथा [॥१५॥*] यत्पादानतिमात्रकैकशरणामालोक्य लक्ष्मीं निजां दूरान्मा–

२६ लवनायको नयपरो यं प्राणमत्प्राञ्जलिः [।*] को विद्वां(द्वान्) व(ब)[लिना] सहाल्पव(ब)लकः स्पर्धां(र्द्धां) विधते(त्ते) परां नीतेस्तधि(द्धि) फलं य–

२७ दात्मपरयोराधिक्यसंवेदनं(नम्) [॥१६॥*] विंद्ध्या(ध्या)द्रेष्कटके[7] निविष्ट-[कटकं] श्रुत्वा [चरै]र्यं निजै[:*] स्वंदेसं(शं) समुपागतं ध्रुवमिव ज्ञात्वा भि–

---

१ ताम्रपटाचा भाग येथे तुटल्यामुळे गेलेली अक्षरे अन्य ताम्रपटांच्या आधारे दिली आहेत.

२ येथील विसर्ग अनावश्यक आहे.

३ 'दर्पविसराद्यः प्रातिकूल्ये'—असे वाचावे.

४ सीसवै, लोहारा व अन्य ताम्रपटांतील पाठाप्रमाणे येथे 'यस्योन्नते लक्ष्यते विक्षेपेण–' असे वाचावे. १५ व्या ओळीतील 'नित्योदयस्सोनते°' ही अक्षरे येथे अनवधानाने पुन्हा कोरली गेली असावी असे वाटते.

५ 'सन्नक्षत्र°' असे वाचावे.

६ 'भयात्तथा' असे वाचावे.

७ 'विंध्याद्रेः कटके' असे वाचावे. ष सारखे दिसणारे चिन्ह जिव्हामूलीयाचे होय.

२८ भिया[1] प्रेरितः [:*]माराशर्व्वमहीपतिद्रु(र्द्रु)तमगादप्राप्तपूर्व्वं परैय(र्य)स्येच्छा-
मनुकूलया[2] कुलधनै पा[3]–
२९ दौ प्रणामैरपि [।।१७।।*] नीत्वा श्रीभवने घनाघनघनव्याप्तांव(ब)रां प्रावृषं
तस्मादागतवं(वान्) सम(मं) नि[ज*]व(ब)लै–
३० रातुंगभद्रातटां(टम्) [।*] तत्रस्थ[:] स्वकरस्थितामपि पुनत्रि(स्त्रि)स्ये-
(श्शे)षमाकृष्टवां(वान्) विक्षेपैरपि चित्रमानति(त)रिपु–
३१ यः(र्यः) पल्लवानां श्रियं(यम्) । [।।१८।।*] लेखाहारमुखोदितार्धवचसा
यत्रैत्य वेंगीश्वरो[4] नित्यं किंकरवद्वचधादविरतं क–
३२ र्म्म श्व(स्व)स(श)र्मेच्छया [।*] वाह्यालीवृतिरस्य येन रचिता व्योमा-
ग्रलग्नारुचः[5] रात्रौ मौक्तिकमालिकामिव धृता मूर्ध–
३३ स्थ तारागणै[:।।१९।।*] संत्रासात्परचक्रराजकमगात(त्त)त्पूर्व्वसेवाविधिव्याव-
(ब)धा(द्धा)ञ्जलिशोभितेन शरणं मूर्ध्ना
३४ यदंह्(ह्रि)द्वयं(यम्) [।*] यद्यद्दत्तपरार्ध्यभूषणगणैर्न्ना(र्ना)लंकृतं तत(त्त)-
था मा भैशी(षी)रि[ति*] सत्यपालितयशः स्थित्या यथा
३५ तद्गिरा [।।२०।।*] पाण्डयदेशाधिपान्मत्स्यं वृषभं पल्लवेश्वराच्चोला[6]द्व्याघ्रं
गजं गंगाच्चापयष्टिं च केरला [त् ।।२१।।*] अंध्र–
३६ चालुक्यमौर्येभ्यो वा(व)राहं गूर्य(र्ज)रेश्वरात्फलकं[7] प्रतिव(ब)धा(द्धा)यँ वृषभं[8]-
पल्लवेश्वरात्को(को)[9]सलावंतिनाथा–
३७ भ्यं(भ्यां) सिंहलादपि नाम[कं*] तारां भगवतिं(तीं) ख्यातां धर्मद्वंगालभूमि-
पात् ।। [२३*] इथ्य(त्थ)मेतान्यथान्यानि चिह्नान्यादाय

---

१ यातील भि हे अक्षर येथे चुकून पुन्हा कोरले गेले.

२ '°मनुकूलयन्' असे वाचावे.

३ '°धनैः पादौ प्रणामै°' असे वाचावे.

४ मूळ ताम्रपटात हे व याच्या पूर्वीचे अक्षर यांत अंतर पुष्कळ आहे.

५ राधनपूर, सीसवै आणि लोहारा ताम्रपटांतील पाठाप्रमाणे येथे '°लग्नारु-
चद्रात्रौ' असे वाचावे.

६ 'पल्लववेश्वरात् [।*] चोला°' असे वाचावे.

७ '°रात् [।*] फलकं' असे वाचावे.

८ पूर्वीच्या श्लोकांतील 'वृषभं पल्लवेश्वरात' ही अक्षरे येथे चुकून पुन्हा कोरली
गेली असावीत.

९ '°श्वरात् [।।२२।।*] कोसला°' असे वाचावे.

३८ भूभुजां [।*] गरुडांकां(कं) जगतुं(त्तुं)गो व्यधत्त सकंलं[1] जगत् [।।२४।।*]
यश्चञ्चच(च्च)तुरंवु(बु)रासि(शि)रस(श)नां निष्कृष्टखड्ग

*दुसरा पत्रा : दुसरी बाजू*

३९ स्फुरयति[2] भासुरितेन दक्षिणभुजाञ्चिह्नानि तैस्तैर्धृतं स्वस्यैकं भुवने व्यधत्त
गर(रु)डं श्रीवल(ल्ल)भः

४० [श्री]मुखं। [।।२५।।*] तेनेदमनिलविद्युच(च्च)ञ्चलमवलोक्य जीवितमसारं-
(रम्) [।*] क्षितिदानपरमपुण्यप्रव–

४१ त्तितो व्र(ब्र)ह्मदायोयं(यम्) [।।२६।।*] स च परमभटा(ट्टा)रकमहाराजा-
धिराजपरमेश्वरश्रीमधा(द्धा)रावर्षदे–

४२ वपादानुध्यातपरमभटा(ट्टा)रकमहाराजाधिराजः परमे[श्वरः*] श्रीगोविंद-
राजः श्रीमत्प्रभूतवर्ष–

४३ श्रीश्रीवल(ल्ल)भनेरेंद्रदेव[3] कुशली सर्व्वानिव यथासंव(ब)ध्यमानकां(कान्)
राष्ट्रपतिविषयपतिग्रामकूटा–

४४ युक्तका(क)नियुक्तकाधिकारिकमहत्तरादी[न्*] समादिशत्यस्तु[4] व[:*] संवि-
दितं यथा श्रीशूगुट्टरुसमा–

४५ वासितेन मया मातापित्रोरात्मनश्चैहिकामुष्मिकपुण्ययशोभिवृध(द्ध)ये फणीं-
द(द्र)वंशांव(ब)रवि–

४६ राजितादित्यश्रीरिपुसेव्यवृ(बृ)हच्छिदतिलकुलकेन[5] श्रीनागहस्तिराज्ञा
विज्ञप्तेन स–

४७ ता इक्षुग्रामवास्तव्यतत्रैविद्य[6]सामान्यअंगिरसव(ब)र्हस्पत्य[7]भारद्वाजसगोत्र–

४८ तींत(त्ति)रियसव्र(ब्र)ह्मचारिमारिदासचतुर्व्वेदपौत्राय परिवच्छरचतुर्व्वेद-
पुत्राय शिवनागभटा–

---

१ 'कं' वरील अनुस्वार अनावश्यक. 'सकलं' असे वाचावे.

२ या श्लोकातील जवळजवळ एक संपूर्ण चरण व काही अक्षरे कोरताना राहून गेलेली आहेत. हा श्लोक इतर कोणत्याही ताम्रपटात आढळत नाही.

३ 'नरेंद्र°' असे वाचावे.

४ 'समादिशति [।*] अस्तु' असे वाचावे.

५ '°कुलतिलकेन–' असे वाचावे.

६ 'तत्त्रैविद्य°' असे वाचावे.

७ 'बार्हस्पत्य' असे वाचावे.

४९ य चंदगडे(ड)विषयांतर्गतो नेसरिकाभिधानो ग्रामः तस्य चाघाटनानि पूर्व्वतः तारानदी–

५० संगमः [कारजवहलीका] दक्षिण[तः*] निट्टुरग्रामः हेमगिरिः पश्चिम[तः*] द[र्व्व]णग्रामः प्रपाः उत्तर[तः*] कि–

५१ ण्णगिरि[म]ल्लिका[–त्राणयत्रिग्रामः]व्रा(ब्रा)ह्मणस्य नेसरिकाग्रामश्चा(स्या)-घाटनान्यभिलीं(लि)ख्यंते शो(सो)द्रं–

५२ ग[:*] सपरी(रि)करः सदण्डदशापराधः सभूतोपात(त्त)प्रत्यायः शो(सो)-त्पद्यमानविष्टिक[:*] स–

५३ धान्यहिरं(र)न्या(रण्या)देय[:*] अचाटभटप्रावेश्य[:*] सर्व्वराजकीयानाम-हस्तप्रक्षेपणीय[:*] अ(आ)–

५४ चंद्रार्क्कार्ण्णवक्षितिसरित्पर्व्वतसमकालीन[:*] पुत्रपौत्रान्वयक्रमोपभोग्यः

*तिसरा पत्रा : पहिली बाजू*

५५ पूर्व्वप्रत्त[1] देवब्रा(ब्रा)ह्म[ण*]दायरहितमभ्यंतरसिध्या(द्धया) भूमिच्छिद्रन्यायेन श[क*]नृपकाला–

५६ तीतसंवत्सरस(श)तेषु सप्तषु(सु) सप्ता(प्त)विष(श)त्यधिकेषु तारणाभिधान-संवत्सरे पौष(षा)–

५७ सितत्रयोदस्यां(श्यां) कृष्णपक्षसंक्रांतो(ति)महापर्व्वणि व(ब)लिचर(रु)-वैश्वदेवाग्निहोत्रातिथिप–

५८ ञ्चमहायज्ञक्र(क्रि)योत्सर्प्पणार्थं स्नात्वा ह्योदकातिसर्गेण प्रतिपादितो यतो-स्योचित–

५९ या प्रदायस्थित्या भू(भु)ञ्जतो भोजयतः कृषतः कर्षयतः प्रतिदिशतो वा न कैश्चिदल्पापि

६० परिपंथना कार्या [।*] तथागामिभद्रनृपतिभिरस्मद्वंश्यैरन्यैर्व्वा सामाण्यं(न्यं) भू–

६१ मिदानफलमवेत्य विद्यं(द्यु)लो(ल्लो)लान्यनित्यैश्वर्याणि तृणाग्रलग्नजल-विं(बिं)दु–

६२ चञ्चलञ्च जीवितमाकलय्य स्वदायनिर्व्विशेषोयमस्मदा(द्दा)योनुमंतव्य[:*] प्र–

---

१ सीसवै आणि बहुलावार ताम्रपटांतही 'प्रत्त' असाच पाठ आहे. वणी-दिंडोरी आणि लोहारा ताम्रपटात मात्र 'प्रदत्त' असा पाठ आढळतो.

६३ तिपालयितव्यश्च [।*] यश्चाज्ञानतिमिरपटलावृतमतिराच्छि(च्छि)द्यादाच्छिद्य-
मानकं वानुमोदेत स प-

६४ ञ्चभिर्महापातकैश्चोपपातकैश्च संयुक्त [:*] स्यादि[१]त्युक्तञ्च भगवता वेद-
व्यासेन व्यासेन [।*] ष-

६५ ष्टिवर्षसहस्त्रा[णि*] स्वर्गे तिष्ठति भूमिद[:।*] आच्छेता(त्ता) चानुमंता-
च तान्येव नरके वसेत् [।।२७।।*] विंध्याटवीश्व(ष्व)तोया-

६६ सु शुष्ककोटरवासिन[:।*] कृष्णाहयो हि जायंते भूमिदानं हरंति ये [।।२८।।*]
व(ब)हुभिर्व्वसुधा भुक्ता राजभि[:*] सग-

६७ रादिभि[:।*] यस्य यस्य यदा भूमिस्तस्य तस्य तदा फलं(लम्) [।।२९।।*]
यानीह दता(त्ता)नि पुरा नरे(रें)द्रैर्दानानि धर्मा-

६८ र्थयशस्कराणि [।*] निर्माल्यवान्तप्रतिमानि तानि को नाम साधु[:*] पु[न*]-
राददीत [।।३०*] स्वदत्ता(त्तां) परदतां(त्तां) वा य-

६९ त्नाद्रक्ष नराधिप [।*] मही(हीं) महिमता(तां) श्रेष्ठ दा[नात्*] श्रेयोनु-
पालनं(नम्) [।।३१।।*] इति कमलदलं(लां) बु(बु)विं(बिं)दुलो [लां*][२]

*तिसरा पत्रा : दुसरी बाजू*

७० श्री(श्रि)यमनुचि(चिं)त्य मनुष्यजीवितञ्च [।*] अतिविमल[म*]नोभि-

७१ रात्मनीनैर्न्नहि पु[रु]षै[३]ऽपरकीर्त्तयो विलोप्या[:।।३२।।*] श्री

७२ विषयपते प[ञ्च]सहश्रा(स्त्रा)णि प्रतिवरिषं[४] देयानि[।*]

७३ श्रीदेवैयराणकदूतकं(कः) [।*] लिखितं श्रीवत्सराजसु(सू)-

७४ नुना श्रीअरुणादित्येन ।।

१ 'स्यादिति उक्तञ्च'—असे वाचावे.

२ या कोपऱ्याचा भाग तुटलेला आहे. त्यामुळे येथील अक्षर नष्ट झाले आहे.

३ 'पुरुषैः पर°' असे वाचावे.

४ 'प्रतिवर्षं' असे वाचावे.

# १४

# राष्ट्रकूट नृपती प्रथम अमोघवर्ष याच्या काळातील मेहूण शिलालेख : शके ७४७

## उपलब्धी

मेहूण हे गाव महाराष्ट्राच्या जळगाव जिल्ह्यातील एदलाबाद तालुक्यात तापी नदीच्या काठावर आहे. सध्याचे मेहूण हे पुनर्वसन झालेले नवीन गाव आहे. त्यापूर्वी, या नवीन गावाच्या ईशान्येस सुमारे दोन किलोमीटर अंतरावर असलेल्या एका टेकडीवर ते वसलेले होते. याच टेकडीवर अलीकडे श्रीमुक्ताबाईचे नवीन मंदिर बांधलेले असून तेथे त्याच्या पूर्वेला एक पुरातन सोमेश्वर मंदिर आहे. त्याच्या पूर्वेकडील पडित जागेत माती खणत असताना प्रस्तुत शिलालेख १९८४ च्या मार्च महिन्यात सापडला. श्रीमुक्ताबाई देवस्थानचे सचिव श्री. रामरावबुवा मेहूणकर यांनी तेथील मजुरांच्या साह्याने तो उचलून देवस्थानाच्या मंदिरात आणून ठेवण्याची व्यवस्था केली. सध्या त्याच ठिकाणी तो सुरक्षित आहे. नांदुरा (ता. मलकापूर, जिल्हा बुलडाणा) येथील कोठारी हायस्कूलमधील शिक्षक श्री. शं. नि. झांबरे यांच्याकडून, अमरावती येथील विदर्भ महाविद्यालयातील इंग्रजी विषयाच्या अधिव्याख्याता कु. डॉ. तारा चौधरी यांच्यामार्फत मला या शिलालेखाची माहिती मिळाली. भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण, नागपूर कार्यालयातील शिलालेख-अधीक्षक श्री. गनम यांनी माझ्या विनंतीवरून उप-अधीक्षक श्री. खान यांना मेहूणला पाठवून या शिलालेखाचा उत्कृष्ट ठसा काढून आणला व मला दिला. त्या ठशा-वरूनच प्रस्तुत शिलालेखाचे संपादन येथे करीत आहे. वरील सर्व व्यक्तींचा, त्यांच्या साह्याबद्दल मी अत्यंत आभारी आहे. या शिलालेखाच्या वाचनात व संपादनात मला गुरुवर्य डॉ. वा. वि. मिराशी व डॉ. अजयमित्र शास्त्री यांचे साह्य झाले. त्यांचाही मी अत्यंत कृतज्ञ आहे.

## वर्णन

प्रस्तुत कोरीव लेखाची शिळा ९२ सें. मी. रुंद आणि ६१ सें. मी. उंच असून १८ सें. मी. जाड आहे. शिळेवर एकूण ३२ ओळी कोरलेल्या आहेत. शेवटची ओळ

अध्यातच पूर्ण झालेली आहे. प्रत्येक ओळीत साधारणपणे ७९ ते ८९ अक्षरे असून प्रत्येक अक्षराची उंची सुमारे १ ते १.५ सें. मी. आहे. अक्षरे ठसठशीत कोरली असून पहिल्या ओळीपासून तो २१ व्या ओळीतील 'कृतिः कुसुमबाणस्य' या वाक्या-पर्यंत ती अतिशय वळणदार व सुंदर आहेत. पुढील ओळीत हा वळणदारपणा नाही. २२ वी ओळ तर सरळ रेषेतही कोरलेली नाही. अक्षरे लहान-मोठी आहेत. त्यामुळे क्वचित ती दुर्वाच्यही झाली आहेत. या विभागात कोरकाने चुकाही अनेक केल्या आहेत. उदा. 'नरेंद्रदेवः'–ओ. २४, या शब्दातील **रे** वर अनुस्वार कोरण्याचे राहून गेले. 'भुक्त्यांतर्गत'–ओ. २७, या शब्दातील 'भु' वर चुकून अनुस्वार कोरला आहे. 'उदकातिसर्गेण'–ओ. ३०, या शब्दातील 'का' चा काना कोरलेला नाही. 'क्षितिसरित्पर्व्वत'–ओ. २९, या शब्दातील 'त्' कोरण्याचे राहून गेले. 'आच्छेत्ता चानुमंता' हे शब्द चुकून 'आ**छेता** चानुमंत्ता' –ओ. ३१, असे कोरले आहेत. एकंदरीतच ओ. २१ व्या उत्तरार्धा-पासून तो शेवटपर्यंतचा मजकूर निष्काळजीपणाने कोरलेला दिसतो. त्यावरून हा भाग दुसऱ्या एखाद्या कोरकाने कोरला असावा असे अनुमान करण्यास हरकत नाही.

## लिपी व अक्षरवटिका

या कोरीव लेखाची लिपी नागरी असून अक्षरवटिका उत्तर भारतीय स्वरूपाची आहे. या लेखात आढळणारी तिची काही वैशिष्ट्ये लक्षणीय आहेत. (१) 'इ' साठी सामान्यतः वर दोन टिंबे व त्याखाली आजच्यासारखे ऱ्हस्व उकाराचे चिन्ह कोरलेले असते, तसे ते या लेखातही आहे. उदा. 'तृ(त्रि)भुवनवल्लभ इत्यपि', ओ. २३; 'परमेश्वराज्ञया इति'–ओ. ३२ यातील इ पाहा. पण ही दोन्ही उदाहरणे लेखाच्या उत्तरार्धातील आहेत. पूर्वार्धात मात्र सामान्यतः वर दोन टिंबे व त्याखाली आजच्यासारखे दीर्घ ऊकाराचे चिन्ह 'इ' साठी कोरले आहे. उदा. 'शुभकंट इति' ८; 'सासूया इव'–१०; 'इत्यनुगतं'–४. उत्तरार्धात देखील 'इ' चे हे चिन्ह आढळते. उदा. 'गृह इव'–ओ. २२. तथापि, या लेखात नेहमीच्याहून अगदी निराळे असे 'इ' चे दुसरे एक चिन्ह 'परशुराम इति'–ओ. ११, यातील 'इ' मध्ये आढळते, ते विशेष लक्षणीय आहे. या ठिकाणी वर आडवी रेषा व त्याखाली दोन टिंबे कोरून 'इ' कोरली आहे. या दृष्टीने याच ओळीतील 'परशुराम इव' आणि 'परशुराम इति' यातील दोन्ही ठिकाणी आलेली 'इ' ची चिन्हे तुलून पाहावी. (२) लंबत्रिकोणाकृती **ए** सर्वत्र आहे. वस्तुतः त्यालाच वर किंवा डाव्या बाजूला मात्रेचे चिन्ह लावून **ऐ**चे चिन्ह कोरले जाते. या लेखात मात्र ते निराळे आहे. उदा. ऐषुः–ओ. १०. यातील **ऐ** पाहा. येथे **र** **व**

त्याच्या दोन्ही बाजूंना दोन दोन टिंबे कोरून म्हणजे : र : असा **ऐ** कोरलेला आहे. **ऐ** चे हे चिन्हही लक्षणीय आहे. (३) 'विलासान्'–ओ. ५ यातील 'न्' हलन्त व्यंजनाचे चिन्ह आजच्या प्रमाणे स्पष्ट कोरलेले आहे, पण 'सुकृतवशात्'–ओ. ३ यातील हलन्त **त्** कसा कोरला आहे ते पाहावे. हे हलन्त चिन्ह चिंत्य होय.

(४) **आकाराचे** चिन्ह म्हणजे अक्षराला लावलेला काना. बहुधा सर्वत्र तो आजच्या सारखाच आहे; पण **णा** या अक्षरात उजवीकडील दंडाला मध्यभागी किंचित वर झुकणारी रेषा देऊन तो दाखविला आहे. उदा. 'सत्क्रियाणां'–ओ. १ 'विप्राणां'—ओ. ३०; 'फणामंडल'–ओ. १४; या शब्दांतील **णा** पाहा.

**ज** या अक्षराच्याही मधल्या दंडाला अशीच ऊर्ध्वमुख रेषा जोडून **जा** कोरला आहे, उदा. अ**जा**दिदेव–ओ. २, अवनिभु**जां**, **जा**तेषु; भाजाम्; रा**जा**–ओ. ३, इत्यादी. **फा**ल्गुन–ओ. १५; नदीत**टा**श्रित–ओ. ११; ग्रामस्याघा**टा**:–ओ. २०, २८; भ**ट्टा**रक–ओ. २३, २४ या शब्दांतील **फा** आणि **टा** या अक्षरांतील **आकाराची** चिन्हेही पाहावी. तथापि, रत्नस्व**र्णा**दि–ओ. ७, यातील **णा** चा आकार नेहमीप्रमाणे काना कोरूनच दाखविलेला आहे.

(५) ऱ्हस्व 'उ' चे चिन्हही आजच्या **उकारासारखेच** आहे. उदा. हे**तु**–ओ. १; भवत्**सु**; संकटे**षु**, पृ**थु**, गु**रु**गुण–ओ. २ इत्यादी शब्दांतील **उकाराचे** चिन्ह पाहा. तथापि, अनेक ठिकाणी ऱ्हस्व उकाराचे हे चिन्ह अक्षराच्या दंडाला खाली डावीकडे वर जाणारी रेषा लावून दाखविले आहे. लुप्तानां, द**नु**ज, त्रि**षु**–ओ. १; पर**शु**राम इति–ओ. ११, जग**तुं**ग–ओ. २४, पाद**नु**ध्यात–ओ. २५ इत्यादी. याशिवाय ज्ञानां**कु**र–ओ. १, **खु**र –ओ. १०, क्ष**त्**क्षाम: ओ. १६, यातील **उकाराचे** चिन्ह पाहावे. तसेच, वि**द्यु**त–ओ. ५; श**त्रु**यम:–ओ. ९; अमित**द्यु**ते:–ओ. ९; न **श्रु**त–ओ. १६; कीर्त्यु**द्**गमानां–ओ. ३ यांतील **उकाराचे** चिन्ह म्हणजे अक्षराच्या दंडाला मध्यभागी जोडून खाली ओढलेली रेषा. हेही लक्षणीय होय.

(६) दीर्घ **ऊकाराची** चिन्हेही दोन निरनिराळ्या प्रकारची आढळतात. उदा. आविर्**भू**तं–ओ. १, **भू**मंडलांत:–ओ. २; भूमी:–ओ. ४; **धू**मके**तु**–ओ. ६; तस्या**भू**द्-**भू**रिभूति–ओ. ७, **सू**नु:–ओ ७; **पू**जाविधि–ओ. १८ इत्यादी शब्दांतील दीर्घ **ऊकार** आजच्या दीर्घ **ऊकारासारखेच** पण आडवे कोरलेले आहेत. **भू**पतिषु, राजा**भृ**त्–ओ. ३; **भू**रिविकास–ओ. ६; पर**भू**पा:–ओ. १०; **शू**न्य–ओ. १२ इत्यादी शब्दांतील दीर्घ **ऊकाराचे** चिन्ह यापूर्वीच्या ऊकाराहून वेगळे आहे. येथे प्रथम ऱ्हस्व उकाराचे चिन्ह कोरून त्याला जोडूनच दीर्घ ऊकाराचे चिन्ह कोरलेले आहे.

(७) **थ** साठी स्वतंत्र चिन्ह आहे, उदा. 'दशर**थ**'–ओ. ३, 'सर्व्वा**र्थि**नां'–ओ. ६, 'अ**र्थि**नां' ओ. ७, 'पृ**थु**यशा' ओ. ८ इत्यादीतील **थ** चे चिन्ह पाहा. संयुक्त

व्यंजनात मात्र थ साठी छ चे चिन्ह वापरलेले आहे. उदा. 'स्थितिचक्र'–ओ. २, 'वक्षस्थल:'–ओ. ४, 'कुंभस्थल:'–ओ. ५, 'स्थपति:'–ओ. १३ इत्यादी शब्द पाहा.

(८) ब साठी सामान्यत: व कोरला आहे. उदा. 'बान्धव:'–ओ. ६, 'बुधवारे'–ओ. १५, 'बहुपु'–ओ. ३ इत्यादी. या काळातील अनेक कोरीव लेखांत ही प्रवृत्ती आढळते. पण प्रस्तुत कोरीव लेखात ब साठी एक स्वतंत्र चिन्हही वापरलेले आहे. उदा. 'बहुगोदानस्य'–ओ. १०, 'बदरीनदी–' ओ. ११, 'निर्जबिब'–१३, 'कुसुमबाणस्य'–ओ. २१, 'आपस्तंब'–ओ. २७ इत्यादी शब्दांतील ब पाहा. चौकोनाच्या चिन्हाची उजवीकडील उभी रेषा खाली ओढून हे ब चे चिन्ह कोरलेले आहे. वर निर्दिष्ट केलेल्या बुधवार, बान्धव, बहु, इत्यादी शब्दांतील ब साठी कोरलेल्या ब सारखे हे चिन्ह नाही. ते प सारखे दिसत असले तरी प हून वेगळे आहे. प च्या चिन्हात संपूर्ण शिरोरेषा कोरलेली नसते, ती फक्त प डाव्या बाजूवरील रेषेवर असते. उदा. अपनयति, प्रवृत्यै–ओ. १, पृथु, पर्व्व, अपि, प्रसृत–ओ–२, इत्यादी शब्दांतील प पाहा. काही ठिकाणी संयुक्त व्यंजनातही ब चे हे स्वतंत्र चिन्ह कोरलेले स्पष्टपणे दिसते. उदा. 'यस्याब्धिष्वपि'–ओ. ४ यातील ब चे चिन्ह पाहा. 'स्तब्धत्व'–ओ. ७, 'इन्दोर्बिम्बं'–ओ. १७, 'महाशब्द'–ओ. २४, 'सब्रह्मचारी'–ओ. २७ इत्यादी शब्दांतील संयुक्त व्यंजनांतर्गत ब चे चिन्हही स्वतंत्र आहे.

(९) 'दिङ्मुख'–ओ. २३ या शब्दातील ङचे, उजवीकडील उभीरेषाविरहित चौकोनाचे चिन्हही लक्षणीय आहे.

भाषा

लेखाची भाषा संस्कृत असून ती निर्दोष आहे. उत्तरार्धात काही दोष निर्माण झाले आहेत, ते बहुधा कोरकाच्या चुकीमुळे असावेत. उदा. 'कांतेन्दु:कलया'– ओ. २२, 'निर्भुक्तमाल्य:प्रतिमानि'– ओ. ३१, 'आत्मन:श्चैहिक'–ओ. २६, 'गुरु:विक्रमो'–ओ. २३, 'पुनराददीत:'–ओ. ३२ यांतील विसर्गाची चिन्हे अनावश्यक आहेत. 'यं नाभि' (यन्नाभि–) ओ. २१, 'तथास्मिग्रामे' (तथा-स्मिन्ग्रामे)–ओ. २६, 'दृष्टदेहो' (देह:) – ओ. २२, 'तृ(त्रि)भुवन' – ओ. २३ इत्यादी चुका कोरकाकडून झालेल्या असाव्यात.

'र' च्या नंतरचे व्यंजन सामान्यत: द्वित्त करून लिहिलेले आहे. उदा. मार्त्तण्ड– ओ. २, पर्व्व–ओ. २, स्वर्ग्ग–ओ. ४, दुर्ग्ग–ओ. ५, स्थपतिर्व्विश्वकर्म्मेव कर्म्मनिर्म्माण– ओ. १४, सर्व्वार्थिनां–ओ. ६ इत्यादी. तथापि, सर्वावयव:– ओ. १४, पार्थिव:– ओ. १४, गर्जित:– ओ. १६ इत्यादी शब्द त्याला अपवाद आहेत.

अनुनासिकासाठी सामान्यतः अनुस्वाराचा उपयोग केलेला आहे. उदा. प्रति-कंट–ओ. ४, शुभकंट–ओ. ८, दंड–ओ. ९, कुंभ–ओ. ५, स्तंभ–ओ. ८, मंडल–ओ. २, १४, बिंब–ओ. १३ इत्यादी. काही ठिकाणी परसवर्णही योजला आहे. उदा. मार्त्तण्ड–ओ. २, बान्धव–ओ. ६, अम्बराग्रे–ओ. १३, बिम्बं–ओ. १७ इत्यादी.

हा अधिकांश लेख पद्यात लिहिलेला आहे. फक्त २०, २१ व २४ ते ३० ओळी गद्यात आहेत. पद्यातील श्लोकरचना सुश्लिष्ट असून काव्यमय आहे.

### शिलालेखाचा काळ

प्रस्तुत कोरीव लेखात दोन कालोल्लेख आलेले आहेत. पहिला, शुभकंटाने बांधलेले सूर्यमंदिर कालांतराने पडून गेल्यावर राजाने (नरसिंघदेवाने) तेथे नवीन मंदिर बांधण्याला जेव्हा आरंभ केला तेव्हाचा काळ. हा काळ 'शकनृपकालातिक्रांतवर्षशतसप्तकेयमारब्धः । अष्टाविंशत्यधिके फाल्गुनसितपक्षपंचम्यां ।। बुधवारे–' (ओ. १५) म्हणजे गतशक ७२८, फाल्गुन शुद्ध ५, बुधवार, असा निर्दिष्ट केला आहे. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे या दिवशी मंगळवार येतो. 'सैकनिरैक' च्या नियमाप्रमाणे हा फरक दुर्लक्षिता येण्यासारखा आहे. सारांश, हा कालोल्लेख पंचांगाप्रमाणे बरोबर आहे. त्या दिवशी इंग्रजी तारीख १६ फेब्रुवारी ८०७, मंगळवार ही होती. दुसरे असे की, हे नवीन देवालय बांधून पूर्ण झाले त्यावेळी राष्ट्रकूट नृपती (तृतीय) गोविंद जगत्तुंग राज्य करीत होता, असा उल्लेख ओ. २८ मध्ये आला आहे. तृतीय गोविंदाचा राज्यकाल शके ७१५ ते ७३६ (इ. स. ७९३ ते ८१४) हा होय.

या लेखातील दुसरा कालोल्लेख नरसिंघदेवाने उग्रादित्य भट्टारक (=देव) व प्रभाकरभट्ट महाजन यांना मंगलपुरक नावाचे गाव ज्या दिवशी दान दिले त्याचा आहे. तो 'शकनृपकालातीतसंवत्सरशतेषु सप्तषु सप्तचत्वारिंशत्यधिकेषु भाद्रपदः शुद्ध नवम्यां कन्यागतसंक्रांतौ सूर्यवारे–' (ओ. २९) म्हणजे गतशक ७४७, भाद्रपद शुद्ध ९, रविवार असा आहे. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे या तिथीला शनिवार होता. 'सैकनिरैक' च्या नियमाप्रमाणे याला हरकत नाही. तेव्हा हा कालोल्लेख पंचांगाप्रमाणे बरोबर आहे. त्या दिवशी इंग्रजी तारीख २६ ऑगस्ट ८२५, शनिवार ही होती.

नरसिंघदेवाने हे दान ज्यावेळी दिले त्यावेळी राष्ट्रकूट नृपती अमोघवर्ष (तृतीय गोविंदाचा पुत्र) राज्य करीत होता, असा निर्देश ओ. २४ मध्ये आहे. अमोघवर्षाचा राज्यकाल शके ७३६ ते ८०२ (इ. स. ८१४ ते ८८०) हा होय.

या दोन कालोल्लेखांतील पहिला उल्लेख पूर्ववृत्तांतनिवेदनात आला आहे. दुसरा उल्लेख मात्र नवीन गाव दान दिल्यासंबंधीचा आहे. त्याच वेळी हा लेख कोरला गेला असावा, हे स्पष्ट आहे. तेव्हा तोच, म्हणजे शके ७४७ भाद्रपद शुद्ध ९ रविवार (इ. स. २६ ऑगस्ट ८२५, शनिवार) हाच प्रस्तुत शिलालेखाचा काळ होय.

## दोन्ही भाग मिळून एकच लेख

प्रस्तुत शिलालेखाचे दोन भाग आहेत. पहिला भाग ओ. १ पासून ओ. २१ मधील 'कृतिः कुसुमबाणस्य' या वाक्यापर्यंत ; तर दुसरा भाग त्याच ओळीत 'स वोव्याद्वेधसा धाम'–या श्लोकापासून सुरू होऊन शेवटच्या ३२ व्या ओळीतील 'इति' येथे संपला आहे. तेव्हा प्रश्न असा उपस्थित होतो की, एकाच शिळेवर कोरलेले हे दोन भाग म्हणजे दोन स्वतंत्र लेख आहेत, किंवा दोन्ही भाग मिळून संपूर्ण असा हा एकच लेख आहे? या दोन्ही भागांतील अक्षरांचे वळण सारखे असले तरी पहिला भाग जितका काळजीपूर्वक कोरला आहे तितका दुसरा नाही; तो निष्काळजीपणाने कोरलेला आहे. असे का व्हावे? म्हणजे हा संपूर्ण लेख कोरण्यासाठी दोन भिन्न व्यक्ती का? एकाच व्यक्तीने संपूर्ण लेख का कोरला नाही? या प्रश्नांची उत्तरे आज तरी देता येत नाहीत. शिवाय, दोन्ही भागांत दोन भिन्न कालोल्लेख आहेत. त्यामुळे सकृतदर्शनी तरी हे दोन भाग म्हणजे दोन स्वतंत्र लेख असून पहिल्या लेखाच्या मोठ्या शिळेवर दुसरा लेख मागाहून कोरण्यात आला असावा असे वाटणे स्वाभाविक आहे. मला मात्र तसे वाटत नाही. आंतर आणि बाह्य पुराव्यावरून हे दोन्ही भाग मिळून हा एकच संपूर्ण लेख होय असे मला वाटते.

हे दोन्ही भाग स्वतंत्र, आणि भिन्न काळांत कोरलेले लेख आहेत, अशी कल्पना केली तर पहिला प्रश्न असा की, यांतील पहिला भाग ज्या वेळी कोरला गेला त्यावेळी त्या भागातील २१ ओळी कोरण्यासाठी त्याखाली आणखी ११ ओळी मावतील एवढी मोठी शिळा तयार करण्याचे कारण काय? लेखाची शिळा घोटून तयार करण्यासाठी कारागिराने पहिल्या भागाच्या २१ ओळी मावतील एवढीच शिळा तयार केली असती. पण दोन्ही भाग मावतील एवढी शिळा आरंभीच तयार केलेली असावी असे स्पष्ट दिसते. त्यावरून हे दोन्ही भाग मिळून एकच समग्र लेख असून तो कोरण्यासाठीच एवढी मोठी शिळा तयार केलेली होती स्पष्ट होते.

दुसरे असे की, पहिला भाग हा स्वतंत्र लेख असता तर त्यातील दानोल्लेखानंतर 'सर्वमेतदागामिभिरवनिपतिभिः पालनीयमिति' यापुढे, एरवी आढळतात त्याप्रमाणे वेदव्यासाची आशीर्वचने व शापवचने यांचे श्लोक आले असते. तसे ते तेथे नाहीत. उलट, असे श्लोक दुसऱ्या भागाच्या शेवटीच आहेत. तिसरे असे की, पहिला भाग स्वतंत्र लेख असता तर त्यात शेवटी लेखकाचे नाव 'लिखितं च–' अशा स्वरूपात तेथेही आले असते. पण तेथे प्रशस्ति–लेखकाचे जसे नाव आहे तसे ही प्रशस्ति कोरणाराचे मात्र नाही. उलट, अशा लेखकाचे नाव दुसऱ्या भागाच्या शेवटी आले आहे. त्यावरूनही हे दोन्ही भाग मिळून एकच संपूर्ण लेख असावा असे दिसते.

पहिल्या भागात पक्कोडिका ग्राम 'पूर्वमेव दत्तः' असा उल्लेख आहे. असा उल्लेख करणारा, हे दान देणाऱ्याव्यतिरिक्त दुसराच कोणी असला पाहिजे. तो कोण? माझ्या मते त्याचा संदर्भ दुसऱ्या भागात शोधता येतो. आतील मजकुराच्या दृष्टीनेही हे दोन्ही भाग एकमेकाशी संबद्ध आहेत. कसे, ते त्या त्या ठिकाणी चर्चा करून स्पष्ट करण्यात येईल. हे लक्षात घेऊनच या शिलालेखाची चर्चा पुढे करीत आहे.

**विषय व चर्चा**

हैहय वंशातील प्रतिकंट राजाचा मुलगा शुभकंट हा विक्रमादित्याच्या प्रसादाने सांविली नगरात राज्य करीत असताना त्याने बदरी नदीच्या काठावर उग्रादित्य नावाच्या सूर्याचे मंदिर बांधले, त्याच वेळी सत्याश्रय नृपतीने त्या देवालयाला पक्कोडिका नावाचे गाव दान दिले. कालांतराने हे मंदिर पडले. तेव्हा त्या ठिकाणी नवीन सूर्यमंदिर बांधून मंदिरातील देवाला पूर्वीच दिलेल्या पक्कोडिका गावाशिवाय, तेथील उग्रादित्य भट्टारक व प्रभाकर महाजन यांना मिळून मंगलपुरक नावाचे गाव नरसिंघदेवाने दिले, हे नमूद करणे हा प्रस्तुत शिलालेखाचा विषय होय.

लेखाचा आरंभ सूर्याच्या आशीर्वचनपर दोन श्लोकांनी झालेला आहे. या दोन्ही श्लोकांत सूर्याच्या विविध गुणांचे व सामर्थ्याचे सुंदर वर्णन आलेले आहे. पहिल्या श्लोकात 'ज्याचे उग्रादित्य हे नाव त्रैलोक्यात प्रगट झालेले आहे' (तो सूर्य आपले संरक्षण करो) हे विशेषण त्याला लावलेले आहे. ज्या देवालयाच्या ठिकाणी नवीन देवालयाच्या निर्मितीच्या निमित्ताने प्रस्तुत शिलालेख कोरला गेला ते देवालयही 'उग्रादित्य' नावाच्या सूर्याचेच असल्यामुळे (श्लो. १७) हे विशेषण योजून त्याचे आशीर्वचन मागितलेले आहे हे उघड

दिसते. 'उग्रादित्य' हे सूर्याचे पर्याय नाव असल्याचे आढळत नाही. तथापि, या नावाने 'आदित्या' ची देवळे मात्र पूर्वी बांधली जात. १२ व्या शतकात पैठण येथे उग्रादित्याचे देवालय होते.[१]

## हैहय वंश

या नंतर तिसऱ्या श्लोकात 'वंश' (=१ बांबू, २ कुल) या शब्दावर, श्लेष करून हैहय वंशाचे वर्णन केले आहे. त्याचा भावार्थ असा: छायेमुळे (आश्रितावर सावली केल्यामुळे) सुंदर दिसणारा, विशाल (विस्तारलेला), अत्यंत सरळ (निष्कपट वृत्तीच्या नृपतींचा), आपल्या पेर–खंडांना (नवीन विभागांना) आपले सार (रस, सामर्थ्य) देणारा, उत्तम कुळातून उदयाला आलेला, दूरवर पसरलेल्या आपल्या श्रेष्ठ गुणांनी सर्व भूमंडल व्यापणारा, ज्यातील नृपती त्याग आणि शौर्य यांचे निष्ठावंत उपासक आहेत, ज्यांच्या कीर्तीचे उद्‌गम समुद्र, पर्वत, दिशा, देव व दानव यांची वसतिस्थाने म्हणजेच स्वर्ग आणि पाताळ या सर्व ठिकाणी प्रसिद्ध आहेत अशा अनेक हैहय नृपतींचा हा वंश होय. (श्लो. ३)

हे वर्णन केवळ प्रशस्तीच्या स्वरूपाचे व म्हणून अत्युक्तिपूर्ण होय. त्यातून ऐतिहासिक माहिती कोणतीही मिळत नाही. हैहय वंशाचे असे स्वतंत्र वर्णन यात्र शिलालेखात प्रथम आलेले आहे. यातील 'अस्ति' या वर्तमानकाळी क्रियापदावरून हा लेख ज्या वेळी कोरला त्यावेळीही हा हैहय वंश, अर्थात त्यातील राजा विद्यमान होता असे दिसते. हा लेख कोरविणारा नरसिंघदेव हा हैहयवंशी होता असे त्यावरून म्हणता येईल काय?

## मूळ पुरुष कार्तवीर्य सहस्रार्जुन हैहय

हैहय म्हणजे कार्तवीर्य सहस्रार्जुन. त्याचे मूळचे नाव अर्जुन. तो कृतवीर्य भूपतीचा पुत्र, म्हणून त्याला 'कार्तवीर्य' म्हणतात. जन्मतःच याच्या दोन्ही हातांना बोटे नव्हती. कृतवीर्याच्या मृत्यूनंतर राज्यावर बसण्यापूर्वी, आपले राज्य काही काळ, आपल्या प्रधानाच्या स्वाधीन करून हा दत्तात्रेयाच्या आराधनेसाठी सह्याद्री पर्वतावर निघून गेला. त्याच्या एकनिष्ठ भक्तीने प्रसन्न होऊन दत्तात्रेयाने त्याला 'सहस्र' बाहू दिले. त्यामुळे त्याला 'सहस्रार्जुन'

---

१ पाहा: 'उग्रादित्यालये देवो—' रत्नमालास्तोत्र. उत्त. १०७१, १०७८; लीच. उत्त. ४१९, ४२०.

हे नाव प्राप्त झाले. त्यानंतर तो गादीवर बसला. पुढे जमदग्नी ऋषीच्या आश्रमातील कामधेनू बलात्काराने नेण्याचा त्याने प्रयत्न केला, तेव्हा जमदग्नीचा पुत्र परशुराम याने त्याच्याशी युद्ध करून त्याचे सहस्र बाहू तोडून टाकले. त्यातच त्याला मृत्यू आला. नर्मदा नदीच्या तीरावरील माहिष्मती ही त्याची राजधानी होती. ही माहिष्मती म्हणजे आजचे ओंकार मांधाता (जि. नेमाड मध्यप्रदेश) होय, असे डॉ. वा. वि. मिराशी आणि इतर काही विद्वान मानीत.[१] परंतु, उत्खननातील शिल्पे, नाणी व कोरीव लेख यांच्या पुराव्यावरून प्राचीन माहिष्मती म्हणजे आजचे नर्मदातीरावरील महेश्वर शहर (जि. पश्चिम नेमाड, मध्यप्रदेश) होय, हे डॉ. ह. ध. सांकलिया यांनी निर्विवादपणे सिद्ध केले आहे.[२] ते सर्वमान्य झाले आहे. या कार्तवीर्य सहस्रार्जुनाचेच पर्याय नाव 'हैहय' असे होते. त्याच्यापासून निर्माण झालेला वंश तो हैहय वंश. सहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास मध्य-भारतातील कलचुरी राजांनी या वंशाशी आपला संबंध जोडला व ते आपणाला हैहयवंशी म्हणवून घेऊ लागले. त्यांच्या कोरीव लेखांत या कार्तवीर्य हैहयाचे स्तुतिपूर्ण वर्णन येते. उदा. त्रिपुरीचा कलचुरी नृपती कर्ण याच्या बनारस ताम्रपटात (इ. स. १०४१) पुढील वर्णन आले आहे. "या हैहय ऊर्फ सहस्रार्जुनाने आपल्या सहस्र बाहूंचा बांध घालून नर्मदेचे पाणी अडविले व त्यामुळे त्या नदीच्या तीरी शिवपूजा करीत बसलेल्या रावणाने भगवान शंकराला वाहिलेली फुले पाण्याच्या ओघात वाहून गेली. तेव्हा रावणाला क्रोध येऊन त्याने कार्तवीर्य सहस्रार्जुनाशी युद्ध केले, पण त्यात पराजय पावल्यामुळे, कैलासालाही हलवणाऱ्या त्या बलाढ्य रावणाला सहस्रार्जुनाच्या बंदीखान्यात काही काळ घालवावा लागला.[३]" असेच वर्णन त्रिपुरी येथील कलचुरींच्या इतर कोरीव लेखांतही आढळते.[४] या सर्व ठिकाणी कार्तवीर्य सहस्रार्जुनालाच हैहय हे दुसरे नाव लावले आहे. तथापि, रत्नपूरच्या कलचुरी वंशातील द्वितीय रत्नदेव याच्या शेवरीनारायण ताम्रपटात 'आसीत्त्रिलोकीतिलको हैहयः शशिनोन्वये । नृपतिर्भूभृतामाद्यः कार्त्तवीर्योऽस्य वंशजः'

---

१ डॉ. वा. वि. मिराशी. इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि कलचुरी चेदी एरा. प्रस्ता. पृ. XLIV

२ डॉ. ह. ध. सांकलिया. एक्स्कॅव्हेशन्स ॲट महेश्वर अँड नवदटोली, पृ. १५.

३ डॉ. वा. वि. मिराशी. कलचुरी नृपति आणि त्यांचा काल, पृ. २; कॉर्पस इन्स्क्रिप्शनम इंडिकॅरम्, भाग ४, क्र. ४८, श्लो. ३.

४ तत्रैव.

(श्लो. ३) या श्लोकात हैहय व कार्त्तवीर्य ह्या भिन्न व्यक्ती कल्पून कार्त्त-वीर्याला हैहय नृपतीचा वंशज म्हटले आहे.[1] त्याच रत्नपूर शाखेतील वाहर राजाच्या कोसगाइ शिलालेखात (इ. स. १६ वे शतक) देखील असाच संबंध वर्णिलेला आहे.[2] तो अर्थातच चुकीचा होय. महाभारतात (अनु. पर्व. अ. ८) वर्णिल्याप्रमाणे कार्तवीर्याचा पुत्र जयध्वज. जयध्वजाचा तालजंघ. याच्या एका मुलाला हैहय हे नाव होते. पण हैहय वंशाचा मूळ पुरुष तो नव्हे. तो मूळ पुरुष कार्तवीर्य सहस्रार्जुन असून त्याचेच दुसरे नाव हैहय होते.

कालिदासाच्या रघुवंश या महाकाव्यात परशुरामाच्या तोंडी रामाला उद्देशून पुढील श्लोक आढळतो. 'बिभ्रतोऽस्त्रमचलेप्यकुण्ठितं द्वौ रिपू मम मतौ समागसौ। धेनुवत्सहरणाच्च **हैहयस्त्वं** च कीर्तिमपहर्तुमुद्यतः' (सर्ग ११–७४) यातील हैहय शब्द कार्तवीर्यालाच उद्देशून योजला आहे हे त्यातील धेनुहरणाच्या उल्लेखावरून देखील स्पष्ट होईल.

## महाराष्ट्र प्रतिकंट : सूर्यवंशी ?

लेखातील चौथा व पाचवा श्लोक मिळून एक युग्मक आहे. त्यावरून असे कळते की, या हैहय वंशात 'नृग, नल, दिलीप, दशरथ, राम' यांच्या-सारखे (म्हणजे, यांच्या योग्यतेचे) अनेक राजे होऊन गेले. आपल्या पुण्याईने ते स्वर्गाला गेले. त्यांत, आपल्या पराक्रमाने प्राप्त झालेले **प्रतिकंट** हे अद्वितीय नाव धारण करणारा, मदोन्मत्त हत्तींच्या युद्धात शत्रूंचे वक्षस्थळ भेदणारा, स्वर्गातील स्त्रियांची अंतःकरणे वेधून घेणारा (म्हणजेच स्वर्गात पोचलेले) ज्याचे अतुलनीय व अकुंठित असे शुभ्र यश समुद्रात (पाताळात) देखील स्खलन पावले नाही (तेथेही जे निरंतर टिकून राहिले) असा **महाराष्ट्र** या नावाचा राजा होऊन गेला. (श्लो. ४ व ५). यातील काही विधाने चिंत्य आहेत. या हैहय वंशात नृग–नल–दिलीप–दशरथ–रामा 'सारखे' राजे होऊन गेले असे का म्हटले असावे? नृग–नलादि राजे हैहयवंशीय नाहीत; तसे ते दूरान्वयाने देखील कधीच व कोठेही उल्लेखिलेले नाहीत. तेव्हा या विधानाचा अर्थ एवढाच की, या हैहय वंशात पूर्वी होऊन गेलेले राजे नृग–नलादि राजांच्या योग्यतेचे, त्यांच्या तोडीचे होते. हे सर्व राजे सूर्यवंशी होते. त्यावरून असे वाटते की, या लेखातील प्रतिकंटादि हैहय वंशीयांचा संबंध सूर्य

१ तत्रैव. क्रमांक ८२.

२ तत्रैव, क्र. १०५, श्लो. ५.

कुळाशी जोडण्याच्या हेतूने त्यांचा उल्लेख केला असावा. प्रतिकंटाचा पुत्र शुभकंट याने 'उग्रादित्य' नावाचे सूर्यमंदिर बांधले होते. यावरूनही, या वंशातील राजे आपला संबंध सूर्य कुळाशी जोडीत असावेत असे दिसते.

वस्तुतः कार्तवीर्य हैहय हा सोमवंशीय नृपती होय. हैहय राजे हे सोमवंशी म्हणूनच पुराणात उल्लेखिलेले आहेत. पुराणातील एका उल्लेखानुसार यदु, नंतर त्याचा पुत्र सहस्रजित व त्यानंतर हैहय अशी वंशावळ आढळते. यदुकुल हेही सोमवंशीच होय. इतिहासाला ज्ञात असलेले कलचुरी-हैहय हे आपणाला सोमवंशीच म्हणवीत. तथापि, त्यांतील काही जणांनी आपला संबंध सूर्यवंशाशी जोडला आहे हेही खरे आहे.[1] विशेषतः "रत्नपूरच्या कलचुरींच्या अनेक ताम्रपटांत सूर्य, नंतर त्याचा पुत्र मनू, त्याच्या वंशात कार्तवीर्य अशी वंशावळ दिलेली आढळते[2]" हे तर खरेच आहे; पण त्रिपुरीचा कलचुरी नृपती कर्ण याच्या बनारस ताम्रपटातही हीच वंशावळ आढळते, हे लक्षात घेतले पाहिजे.[3] प्रस्तुत मेहूण-शिलालेखातील हैहयवंशीय प्रतिकंटादि नृपतींनीही आपल्या वंशाचा संबंध सूर्य वंशाशी जोडण्याचा प्रयत्न केला असणे अशक्य नाही.

### महाराष्ट्र या व्यक्तिनामाचा पहिला उल्लेख

पाचव्या श्लोकातील लक्ष वेधून घेणारी बाब म्हणजे **महाराष्ट्र** या व्यक्तिनामाचा उल्लेख. आपल्या सामर्थ्याने या राजाला 'प्रतिकंट' हे दुसरे अन्वर्थक नाव प्राप्त झाले असले तरी त्याचे मूळ नाव **महाराष्ट्र** असे होते. महाराष्ट्र हे एका प्रदेशाचे नाव होते व आहे हे प्रसिद्धच आहे. पण एखाद्या व्यक्तीचे ते विशेषनाम असल्याचा हा पहिलाच उल्लेख असावा. शकनृपती श्रीधरवर्म्याच्या एरण येथील शिलालेखात (इ. स. ३६५) श्रीधरवर्म्याचा 'आरक्षिक' (संरक्षणकर्ता) सेनापती सत्यनाग याने स्वतःला 'माहाराष्ट्र' असे म्हटले आहे.[4] 'माहाराष्ट्र' म्हणजे 'महाराष्ट्रीय', अर्थात, महाराष्ट्रात राहाणारा, असा त्याचा अर्थ डॉ. वा. वि. मिराशी करतात. तो त्या ठिकाणी

१ इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि कलचुरि-चेदि इरा. क्र. ७६, ८३, ८९, ९१, ९२ व ९४.

२ कलचुरि नृपति आणि त्यांचा काल. पृ. ३.

३ पूर्वोक्त, क्र. ४८.

४ संशोधन मुक्तावलि, सर पहिला, पृ. १६७. 'राज्ञः आरक्षिकेन सेनापति सत्यनागेन माहाराष्ट्रेन'.

यथार्थही आहे. सत्यनागाचेच ते दुसरे विशेषनाम असते तर ते त्या शब्दाला जोडून आले असते. याच अर्थाने या शब्दाचा उल्लेख वराहमिहिराच्या बृहत्संहितेतील (इ. स. ५०५) 'भाग्ये रसविक्रयिणः पण्यस्त्रीकन्यका महाराष्ट्राः' (अ. १०) या चरणात आढळतो. पण 'महाराष्ट्र' या शब्दाचा विशेषनाम म्हणून प्रयोग प्रस्तुत मेहूण-शिलालेखातच प्रथम आढळतो. 'स महाराष्ट्राभिधानः प्रभुः' या चरणावरून त्या राजाचे नाव (अभिधान) महाराष्ट्र होते, असा हा स्पष्ट निर्देश आहे. तेव्हा त्याच्या अर्थाविषयी संशय असण्याचे कारण नाही. 'रट्ट' या प्राकृत शब्दाचे 'राष्ट्र' हे सुसंस्कृत रूप होऊन त्यापासून 'राष्ट्रकूट' हे सन्मान्य कुलनाम तयार झाले आणि ते एका व्यक्तीचे विशेषनाम म्हणूनही हेमचंद्राने आपल्या परिशिष्ट पर्वात नमूद केले आहे,[१] तसेच 'महाराष्ट्र' हे देशनामही व्यक्तीचे विशेषनाम म्हणून वापरले जाण्यासारखा हा प्रकार दिसतो. अकोला जिल्ह्यातील वानखेड येथून दिलेल्या वाकाटकपूर्व भारतातील आदित्यराजाच्या मल्हार ताम्रपटात एका मुंड-वंशीय नृपतीचे 'राष्ट्र' असे विशेषनाम आढळते, हे येथे नमूद करणे अवश्य आहे.[२]

### हैहयवंश मूळचा महाराष्ट्रीय

यावरून आणखी एक गोष्ट लक्षात येते ती अशी की, प्रतिकंट, शुभकंट हे राजे जिच्यात होऊन गेले अशी हैहय-वंशीयांची ही शाखा महाराष्ट्रीय होती. महाराष्ट्रात, विशेषतः महाराष्ट्राच्या ज्या जळगाव जिल्ह्यात हा शिलालेख सापडला तेथे महाराष्ट्रीय हैहय-वंशीयांचे राज्य शके ७२८ (इ. स. ८०७) मध्ये व त्यापूर्वीपासूनही असले पाहिजे. हैहय-वंशीय राजे मूळचे माहिष्मतीचे म्हणजे नेमाड जिल्ह्यातील नर्मदेच्या काठावरील महेश्वर येथील. इतिहासाला ज्ञात असलेले माहिष्मतीचे कलचुरी (हैहय) ही त्यांची मूळ शाखा. त्यांतील शेवटचा ज्ञात राजा बुद्धराज. तो 'उत्तरेत माळव्यापासून दक्षिणेत महाराष्ट्रापर्यंत पसरलेल्या विस्तृत प्रदेशाचा स्वामी होता यात संशय नाही' असे डॉ. वा. वि. मिराशी सांगतात.[३] पुढे चालुक्य नृपती 'पुलकेशीने. . .बुद्धराजाच्या अंमलाखालील महाराष्ट्रावर चाल केली आणि तो प्रदेश काबीज केला. . .पुलकेशी. . .नव्याण्णव हजार गावे ज्यामध्ये आहेत अशा तीन

---

१ एपि इंडिका. व्हॉ. ७, पृ. २२३; मोनिअर वुइल्यम्स. संस्कृत-इंग्रजी कोश, यातील 'राष्ट्र' शब्दाचे अर्थ पाहा.

२ विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९७५. पृ. १६.

३ कलचुरी नृपति आणि त्यांचा काल, पृ. ८.

महाराष्ट्रकांचा स्वामी झाला' असे पुलकेशीच्या ऐहोळे येथील शिलालेखातील 'अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणां नवनवतिसहस्रग्रामभाजां त्रयाणां' या श्लोकावरून दिसते. 'या श्लोकात पुलकेशीच्या प्रतिस्पर्ध्याचे नाव आले नाही. पण तो कलचुरी बुद्धराजच असला पाहिजे' असे ते सांगतात. सारांश, माहिष्मतीच्या कलचुरी वंशातील बुद्धराजाला जिंकून पुलकेशी तीन महाराष्ट्रकांचा स्वामी झाला. यावरून एक अनुमान असे निघते की, माहिष्मती (म्हणजे आजचे महेश्वर) ही तीन महाराष्ट्रकांपैकी एका महाराष्ट्रकात अंतर्भूत होती. ती त्या एका महाराष्ट्रकाची राजधानी होती. अर्थात, माहिष्मती त्यावेळी महाराष्ट्राचाच एक भाग होता, असे दिसते. वात्सायनाच्या कामसूत्रावरील जयमंगलविरचित टीकेत[१] 'नर्मदाकर्णाटविषययोर्मध्ये महाराष्ट्रविषय:' अशी, नर्मदा ही महाराष्ट्राची उत्तर सीमा स्पष्टपणे सांगितली आहे. डॉ. रा. गो. भांडारकर यांनीही महाराष्ट्राची उत्तर सीमा नर्मदा हीच निर्देशिली आहे.[२] त्या वेळच्या तीन्ही महाराष्ट्रकांत मिळून नव्याण्णव हजार गावे होती, हा ऐहोळच्या शिलालेखातील उल्लेख वर आलाच आहे. आजच्या संयुक्त महाराष्ट्रात एकूण फक्त चाळीस हजार गावे आहेत. इतर गावांच्या महाराष्ट्राचा प्रदेश दक्षिणेत कोकण, कर्नाटक व आंध्र प्रांत आणि उत्तरेला गुजराथ व फार मोठ्या प्रमाणात मध्यप्रदेश यात आजही आहे. तेव्हा त्यातील नर्मदेपर्यंत महाराष्ट्राची सीमा असावी हे लक्षात घेता माहिष्मती महाराष्ट्रात व तेथील मूळ कलचुरी हैहय राजे महाराष्ट्रीय असावेत हे मान्य होण्याला हरकत असू नये. पुलकेशीने बुद्ध-राजाला जिंकून त्याचे राज्य नष्ट केले, तेव्हाच त्याची व त्याच्या वंशातील लोकांची वाताहत झाली असेल. त्यांपैकी एखादा पुरुष खानदेशात येऊन चालुक्यांचे मांडलिकत्व स्वीकारून त्या भागात राज्य करू लागला असावा. त्याचाच वंश हा या प्रतिकंट-शुभकंट राजांचा वंश होय. प्रतिकंटाच्या 'महाराष्ट्र' या व्यक्तिनामावरून ही गोष्ट स्पष्टपणे निदर्शनाला येते.

## स्तंभ ऊर्फ शुभकंट नृपती

यापुढील तीन श्लोकांत (श्लो. ६ ते ८) या **महाराष्ट्र** ऊर्फ **प्रतिकंट** नृपतीची प्रशस्ती आहे. त्यात त्याचे शौर्य, दातृत्व, सज्जनांना प्रफुल्लित करण्याचा धर्म, सौंदर्य इत्यादी अनेक गुणांचे काव्यमय वर्णन आहे. या महाराष्ट्र

---

१ द्वितीयाधिकरण, अ. २-२९.

२ एपि. इंडिका. वर्ष ५, पृ. १९०.

ऊर्फ प्रतिकंटाचा शुभकंट नावाचा मुलगा होऊन गेला. स्तंभ हे त्याचे दुसरे नाव होते. (श्लो. ९-१०) या शुभकंट ऊर्फ स्तंभ नृपतीची प्रशस्ती १० ते १५ श्लोकांत आलेली आहे. तीत त्याचा पराक्रम व विशेषत: दातृत्व याचे काव्यमय वर्णन आहे. हा लोककल्याणकारी राजा, अत्यंत तेजस्वी अशा विक्रमादित्यदेवाच्या प्रसादाने सांविली नगराचा स्वामी झाला होता (श्लो. १२). ज्याने क्षत्रियांचा वारंवार संहार केला असा परशुराम जणू पुन्हा अवतार घेऊन, धर्माधिकारी परशुराम नावाच्या पवित्र ब्राह्मणाच्या रूपाने त्याची (त्या शुभकंटाची) सेवा करीत होता (श्लो. १६). त्या शुभकंटाने बदरी नदीच्या काठावर तपोवनाने अलंकृत झालेल्या अशा शहरात येथे उग्रादित्य नावाच्या सूर्याचे गृह (मंदिर) निर्माण केले (श्लो. १७). कालांतराने ते जीर्ण होऊन पडले. त्याच्या सर्व भिंतीचे पायेही निखळले. मंडपाचा शिखर उध्वस्त झाला. देवतेची मूर्तीच काय ती शिल्लक राहिली. त्या मंदिराची ही दशा निरंतर पाहून, धर्मकार्यात ज्याचे मन एकरूप झाले आहे अशा विशाल भवतीच्या राजाने (श्लो. १८) येथे हे भुवनाधिप सूर्याचे भवन निर्माण केले (श्लो. १८). या पुढील तीन श्लोकात या मंदिराचे वर्णन आले आहे (श्लो. २०–२२).

## चालुक्य नृपती प्रथम विक्रमादित्य

या लेखात ज्या विक्रमादित्यदेवाच्या प्रसादाने शुभकंट सांविली नगराचा राजा झाला होता तो वातापी येथील चालुक्य नृपती प्रथम विक्रमादित्य होय. कारण, त्याचाच उल्लेख पुढे 'सत्याश्रय' म्हणून केला आहे (श्लो. १९). त्याचा राज्यकाल सुमारे इ. स. ६५४ ते ६८१ असा आहे. याच्या प्रसादाने सांविली नगराचा राजा झालेल्या शुभकंटाने बांधलेले सूर्यमंदिर पायासकट उध्वस्त झाल्यामुळे पुढे त्या ठिकाणी नवीन मंदिर बांधले गेले ते शके ७२८ (=इ. स. ८०७) मध्ये. शुभकंटाने मंदिर बांधले ते सुमारे इ. स. ६५४ मध्ये असे गृहीत धरले तरी ते उध्वस्त होण्यासाठी हा सुमारे १५० वर्षांचा काळही तसा कमीच आहे; पण तो स्वीकारण्यावाचून गत्यंतर नाही. याच कारणासाठी या शिलालेखातील विक्रमादित्य सत्याश्रय हा वातापी येथील दुसरा किंवा त्यानंतरचा विक्रमादित्य असणे शक्य नाही; तो प्रथम विक्रमादित्यच असला पाहिजे हे स्पष्ट होते. त्याच्या काळात सांविली राज्यावर असलेल्या शुभकंटाचा पिता प्रतिकंट हा स्थूल मानाने इसवी सनाच्या सातव्या शतकाच्या पहिल्या चरणात होऊन गेला असावा.

**मंदिर बांधणारा शुभकंट की परशुराम ?**

दुसरा प्रश्न असा की, बदरी नदीच्या काठावर प्रथम सूर्यमंदिर बांधले ते शुभकंटाने की त्याचा भृत्य परशुरामाने ? परशुरामाचा निर्देश करणाऱ्या श्लोकानंतर (श्लो. १६) '**येना**कारीह गृहम्' (श्लो. १७) असा उल्लेख असल्यामुळे यातील 'येन' या सर्वनामाचा संबंध परशुरामाकडे लावण्याचा संभव आहे. तसा तो लावल्यास ते मंदिर परशुरामाने बांधले असा अर्थ होईल. पण तो मला बरोबर वाटत नाही. ८ व्या श्लोकापासून शुभकंटाचे वर्णन सुरू होते. त्याचे निरनिराळे गुण वर्णन करताना पुढे 'यः' (श्लो. १०, ११) 'यस्य' (श्लो. १३, १४, १५, १६) ही सर्वनामे शुभकंटासाठी वापरली आहेत. त्याला धरूनच १७ व्या श्लोकातील 'येन' हा शब्द शुभकंटासाठीच वापरलेला असणे स्पष्ट दिसते. पूर्वीच्या श्लोकातील परशुराम अभिप्रेत असता तर येथे 'तेन' हे सर्वनाम आले असते. तेव्हा, पहिले सूर्यमंदिर निर्माण करणारा शुभकंट होय, परशुराम नव्हे. त्याच ठिकाणी नवीन निर्माण केलेल्या सूर्यमंदिराला प्रशस्तिकाराने 'धर्मोऽयं शुभकंटस्य' (श्लो. ३१) असे म्हटले आहे. तेव्हा त्या ठिकाणी पूर्वी असलेले सूर्यमंदिर शुभकंटानेच बांधले होते यात शंका नाही.

'धर्मोऽयं शुभकंटस्य' हा उल्लेख, 'शुभकंटाने हे नवीन मंदिर बांधले' असा निर्देश करणारा आहे असे मानले तर मग हे मंदिर प्रथम बांधणारा, विक्रमादित्यदेवाच्या प्रसादाने सांविली नगराचा राजा झालेला हा दुसरा कोणीतरी असला पाहिजे, असे मानावे लागेल. तो कोण असावा ? त्याचे नाव या लेखात का निर्दिष्ट केलेले नाही ?—हे प्रश्न उपस्थित होतात. त्या राजाचा परशुराम नावाचा एक धर्माध्यक्ष सेवक होता, याची माहिती या प्रशस्तिलेखकाला आहे; इतकेच नाही तर त्या राजाच्या निरनिराळ्या गुणांचे वर्णन (श्लो. १३ ते १५) करण्याइतपत त्याची माहिती त्याला आहे, पण त्याचे नाव मात्र माहीत नाही, असे होणे संभवत नाही. प्रशस्तिलेखकाने त्याचे नाव जाणुनबुजून किंवा अनवधानाने गाळले असणेही सुतरां शक्य नाही तेव्हा 'धर्मोऽयं शुभकंटस्य' हा उल्लेख ज्या मंदिराचे पुर्ननिर्माण करण्यात आले होते ते पूर्वीचे मंदिर शुभकंटाने बांधले होते असे सुचविणारा आहे, असेच मानणे योग्य होईल.

दुसरे असे की, पूर्वीचे मंदिर दुसऱ्या कुणीतरी बांधले असून ते पडल्यावर त्या ठिकाणी नवीन मंदिर शुभकंटाने बांधले असे क्षणभर मानले तर प्रश्न असा की, त्याने आपली प्रशस्ती व मंदिरनिर्मितीचा वृत्तांत शिळेवर कोरविल्यानंतर

खाली जवळजवळ शिळेची एक–तृतीयांश जागा मोकळी ठेवण्याचे कारण काय ? नवीन मंदिर त्याने शके ७२८ च्या शेवटीशेवटी बांधले. त्यानंतर तो काही वर्षे तरी जिवंत असावा. तेव्हा त्याच्या (किंवा त्याच्या पुत्राच्या) हयातीत त्याने कोरलेल्या शिळेवर शके ७४७ मध्ये, म्हणजे १८-१९ वर्षातच नरसिंघदेवाने आपला स्वतंत्र दानलेख कोरविण्याचे धाडस केले असणे शक्य वाटत नाही. तेव्हा विक्रमादित्याच्या प्रसादाने सांविली नगराचा झालेला राजा शुभकंट हा असून त्यानेच बदरी नदीच्या काठावरील उग्रादित्याचे मंदिर प्रथम बांधले होते असाच अर्थ लेखातील श्लोकांच्या रचनेवरून उघड दिसतो.

## परशुरामाचा उल्लेख का ?

मग प्रश्न असा की, शुभकंटाचा सेवक परशुराम याने हे नवीन मंदिर बांधले नसेल तर त्याचा उल्लेख लेखात करण्याचे कारण काय ? याचे उत्तर असे की, परशुरामाचा हा उल्लेख तेथे शुभकंटाच्या पराक्रमाचे व क्षत्रियत्वाचे गौरवपूर्ण वर्णन करण्यासाठी आला आहे. हैहय वंशाचा मूळ पुरुष कार्तवीर्य सहस्रार्जुन याचा परशुरामाने पूर्वी, आपल्या ब्राह्मणधर्माला न शोभणाऱ्या प्रकारे वध केला होता. पण त्यानेच पश्चात्तापदग्ध होऊन आता परशुराम या नावाने पुन्हा जन्म घेतला आणि तो शुभकंटाचा धर्माध्यक्ष होऊन त्याची सेवा करू लागला. हे वर्णन करण्यात शुभकंटाच्या क्षत्रियत्वाचा व पराक्रमाचा गौरव सूचित केला आहे. केवळ त्यासाठीच शुभकंटाच्या परशुराम नावाच्या धर्माध्यक्षाचा हा उल्लेख आहे. त्याने ते मंदिर बांधले असावे असा अर्थ त्यावरून काढणे योग्य नाही. श्लोकातील सर्वनामाच्या योजनेवरून तसा तो निघतही नाही, हे पूर्वीच दाखविले आहे.

## नवीन मंदिर बांधणारा नरसिंघदेव

शुभकंटाने प्रथम बांधलेले ते उग्रादित्य नावाच्या सूर्याचे मंदिर कालांतराने उध्वस्त झालेले पाहून त्या ठिकाणी नवीन मंदिर बांधणारा राजा कोण असावा ? 'धर्मोयं शुभकंटस्य' (श्लो. ३१) या वाक्याच्या आधारे हे नवीन मंदिरही शुभकंटानेच बांधले असा अर्थ काढणे योग्य नाही. कारण, शुभ-कंटाने प्रथम बांधलेले मंदिर त्याच्याच काळात पायापासून उध्वस्त होणे शक्य नाही. कालांतराने ते उध्वस्त झालेले मंदिर सतत त्या स्थितीत पाहाणारा व त्याच ठिकाणी नवीन मंदिर बांधणारा हा शुभकंटानंतर बऱ्याच

काळाने झालेला दुसरा कोणीतरी असावा. पहिल्यांदा मंदिर बांधले जाऊन त्याला पक्कोडिका नावाचे गाव दान दिले गेले ते चालुक्य नृपती प्रथम विक्रमादित्य सत्याश्रयाच्या काळात म्हणजे इ. स. ६५४ ते ६८१ च्या दरम्यान, तर त्या मंदिराच्या ठिकाणी नवीन मंदिर बांधले गेले ते राष्ट्रकूट नृपती तृतीय गोविंदराज जगतुंग (इ. स. ७९३ ते ८१४) याच्या काळात इ. स. ८०६ मध्ये (श्लो. २३ व २८), यावरूनही हे दिसून येईल. हे नवीन मंदिर बांधणारा कोण असावा? त्याचे नाव या लेखाच्या पहिल्या भागात स्पष्टपणे सांगितलेले नाही. माझ्या मते शिलालेखाच्या दुसऱ्या भागात वर्णिलेला नरसिंघदेव हा तो राजा असावा. या शिलालेखाचे दोन भाग दिसत असले तरी वस्तुतः हे दोन्ही भाग मिळून हा एकच लेख होय, याची चर्चा आरंभी केलेली आहे. पहिल्या भागात उग्रादित्य सूर्यमंदिराच्या प्रथमनिर्मितीचा व पुर्ननिमितीचा वृत्तांत असून दुसऱ्या भागात ही पुर्ननिमिती करणाऱ्या राजाचा, म्हणजे नरसिंघदेवाचा, त्याच्या वंशावळीसहित उल्लेख असून त्याने उग्रादित्यभट्टारक व प्रभाकरभट्ट महाजन यांना दिलेल्या मंगलपुरक नावाच्या गावाच्या दानाचा उल्लेख आहे. सारांश, हे दोन्ही भाग मिळून हा संपूर्ण असा एकच लेख होय.

### स्पष्ट उल्लेख का नाही ?

तसे असेल तर, म्हणजे लेखाच्या दुसऱ्या भागात वर्णिलेल्या नरसिंघदेवानेच नवीन मंदिर बांधले असेल तर, लेखाच्या पहिल्या भागातील श्लो. १८ ते ३१ पर्यंतचे सर्व वर्णन त्यालाच उद्देशून असले पाहिजे. तथापि, त्याच्या नावाचा स्पष्ट उल्लेख मात्र तेथे कोठेही नाही, असे का ? माझ्या मते, वंशावळीसहित त्याचा उल्लेख पुढे दुसऱ्या भागात करावयाचा असल्यामुळे तो येथे करण्याचे प्रयोजन नव्हते. यातून दुसराही एक प्रश्न उपस्थित केला जाणे शक्य आहे. तो असा की, हा संपूर्ण लेख एक असून तो नरसिंघदेवानेच कोरविला असेल तर त्याने आपली व आपल्या सम्राटांची वंशावळ लेखाच्या आरंभीच का कोरविली नाही? याला उत्तर असे की, लेखाचा पहिला भाग प्रामुख्याने तेथील सूर्यमंदिराच्या वर्णनाचा आहे. म्हणूनच आरंभी सूर्यदेवतेची प्रशस्ति आली आहे. या भागात दानाचे वर्णन आहे, तेही पूर्वी दिल्या गेलेल्या दानाचे आहे. त्यानंतर नरसिंघदेवाने स्वतः दिलेल्या दानाचे वर्णन दुसऱ्या भागात करायचे असल्यामुळे त्या दानलेखाच्या आरंभीच आपल्या सम्राटाची व आपली वंशावळ देणे प्रासंगिक होते. म्हणून तसेच ते केलेले आहे. एरव्ही, पहिला भाग शुभकंटाने नवीन मंदिर बांधण्याच्या वर्णनाचा

आहे असे घटकाभर गृहीत धरून या लेखाचा पूर्वभाग हा स्वतंत्र लेख आहे असे मानले तर पहिल्या लेखाच्या आरंभी तरी शुभकंटाने आपल्या सम्राटांची वंशावळी देऊन आपण त्यांचे मांडलिक असल्याचा उल्लेख कोठे केला आहे ? तो राष्ट्रकूटांचा मांडलिक असला पाहिजे यात शंका नाही. एरवी हे नवीन मंदिर जगतुंग गोविंदराज राज्य करीत असताना निर्माण केले गेले, असा उल्लेख करण्याचे कारण नव्हते.

### राष्ट्रकूट तृतीय गोविंदाच्या कारकीर्दीत

या (नरसिंघदेव) राजाने पुन्हा निर्माण केलेल्या नवीन सूर्यमंदिराचा निर्देश केल्यानंतर (श्लो. १९) पुढील तीन श्लोकांत (श्लो. २०-२२) त्या मंदिराचे सुंदर वर्णन केले आहे. 'इदम्', 'अत्र' या शब्दांच्या योजनेने प्रशस्तिकार जणू आपल्या समोर प्रत्यक्ष असलेल्या त्या मंदिराचे वर्णन करीत आहे याचा प्रत्यय येतो. बुद्धिमान व श्रेष्ठ गुरु असलेल्या 'नारुक' नावाच्या शिल्पशास्त्रज्ञाने या मंदिराच्या निर्माणकार्यात प्रत्यक्ष विश्वकर्म्याप्रमाणे आपले निर्माणकौशल्य प्रगट केले (श्लो. २२) शकवर्ष सातशे अठ्ठावीस, फाल्गुन शुद्ध पंचमी, बुधवार रोजी या देवालयाच्या निर्मितीचे काम सुरु झाले (श्लो. २३). त्यानंतर आपल्या घराकडील वार्ता, द्रव्याचा खर्च, भृत्यवर्ग इत्यादी कशाकडेही लक्ष न देता सतत या ठिकाणी राहून (श्लो. २४) जणू भक्ति-भावनेने अर्पण केलेला पूजाविधी व मूर्तीमंत प्रसादच असे हे सूर्याचे मंदिर राजाने पूर्ण केले. (श्लो. २९) आपल्या पराभूत व उध्वस्त शत्रूच्या अंतःकरणांचा ज्याने भीतीने थरकाप उडविला होता (श्लो. २५–२७) असा श्रीवल्लभ जगतुंग गोविंदराज हा त्यावेळी राज्य करीत होता (श्लो. २८) हा गोविंदराज म्हणजे राष्ट्रकूट नृपती तृतीय गोविंद होय. बहुतेक राष्ट्रकूट नृपतींनी 'श्रीवल्लभ' हे बिरुद आपणाला लावून घेतले आहे त्याप्रमाणे गोविंदराजालाही ते या ठिकाणी लावले आहे. गोविंद नृपतीचे दुसरे नाव 'जगतुंग' होते असे या ठिकाणी म्हटले असले तरी वस्तुतः तेही उत्तर व दक्षिण भारतातील दिग्विजयानंतर त्याने धारण केलेले एक बिरुदच होय. या तृतीय गोविंदाचा राज्यकाल इ. स. ७९३ ते ८१४ असा आहे. अर्थात, प्रस्तुत देवालय इ. स. ८१४ पूर्वी केव्हातरी बांधून पूर्ण झाले.

सामान्यतः एखादे देवालय बांधण्याला आरंभ केव्हा झाला हे नमूद करण्या-पेक्षा ते पूर्णपणे बांधून केव्हा झाले हे प्रामुख्याने नमूद केलेले असते. ही बाब लक्षात घेऊन २३, २४ व २९ या श्लोकांचा अन्वयार्थ पुढीलप्रमाणे करता येणे शक्य आहे. 'शकनृपकालातिक्रांत वर्षशतसप्तके आरब्धः अयं (प्रासादः)

अष्टाविंशत्याधिके फाल्गुन सितपक्षपंचम्यां (श्लो. २३) बुधवारे, (श्लो. २४) निष्पन्न: ' (श्लो. २९). म्हणजे हे देवालय बांधण्याला शके ७०० मध्ये आरंभ झाला, व ते २८ वर्षानंतर फाल्गुन शुद्ध पंचमी बुधवार रोजी पूर्ण झाले. असा अर्थ केला तर हे निर्माण कार्य सतत २८ किंवा २९ वर्षे चालू होते व इतकी वर्षे हे निर्माण कार्य करणारा राजा सतत त्या ठिकाणी होता असे मानावे लागले. तसे असणे शक्य वाटत नाही. ते काहीही असले तरी तृतीय गोविंदाच्या मृत्यूपूर्वी हे देवालय बांधले गेले यात शंका नाही.

## सत्याश्रयाचे ग्रामदान पक्कोडिका

यानंतर शुभकंटाचा हा धर्म, अर्थात पहिल्या प्रथम शुभकंटाने धर्मकार्य म्हणून बांधलेल्या या मंदिराचे संरक्षण पुढे होणाऱ्या राजांनी देखील करावे (श्लोक ३१) अशी विनंती करून पूर्वीच सत्याश्रय नृपतीने देवाला, अर्थात देवालयातील मूर्तीच्या पूजाअर्चेसाठी **पक्कोडिका** नावाचे गाव दान म्हणून दिले होते, याचा निर्देश केला आहे. (ओ. १९, २०) त्याच वेळी सत्याश्रय नृपतीने तेथे एक शहरही वसविले. (ओ. २०). दान दिलेल्या पक्कोडिका गावाच्या चतु:सीमा पुढीलप्रमाणे : पूर्वेला चंद्रोणी, दक्षिणेला लोणिवहक (=लोणी नावाचा ओढा); पश्चिमेला उड्‌वाटिका आणि उत्तरेला व्याघ्रवियरक. सत्याश्रयाने जे नवीन गाव वसविले होते त्याच्या चतु:सीमा अशा : पूर्वेला राजतडाग; दक्षिणेला देऊ [द] कपाटक ; पश्चिमेला नदीकाठ; उत्तरेला भद्रेश्वर. या सर्वांचे पुढे होणाऱ्या राजांनी संरक्षण करावे अशी पुन्हा विनंती केली आहे. त्यानंतर ' कृति: कुसुमबाणस्य ' असा उल्लेख आहे. तो प्रस्तुत प्रशस्ति रचणाऱ्याचा असावा.

## दुसरा भाग : तृतीय गोविंद व अमोघवर्ष

यानंतर लेखाचा दुसरा भाग सुरू होतो. पहिला भाग जेथे संपतो त्याच्या लागलीच पुढे त्याच ओळीत हा भाग सुरू होतो, यावरूनही हा संपूर्ण लेख एकच होय, हे दिसून येते. आरंभीची तीन चार अक्षरे नीट वाचता येत नाहीत. त्यांच्या शेवटी असलेली 'श्री' मात्र स्पष्ट आहे. त्यावरून सामान्यत: एखाद्या लेखाच्या आरंभी असणारी 'स्वस्तिश्री' सारखीच ही अक्षरे असावीत. त्यानंतर, राष्ट्रकूट नृपतींच्या व त्यांच्या मांडलिकांच्या कोरीव लेखांच्या आरंभी सामान्यत: आढळणारा विष्णू व शिव यांचे आशीर्वचन

मागणारा श्लोक आला आहे (श्लो. ३२). त्यापुढील श्लोकाचा आरंभ 'तस्य' या सर्वनामाने होतो. पुढे या 'तस्य'चीच काही विशेषणे आली आहेत. हा 'तो' कोण? त्याला गुहाप्रमाणे अनन्यसाधारण शक्तीचा पुत्र झाला (श्लो. ३३), जो महाराज शर्व या नावाने प्रख्यात झाला. (श्लो. ३४) हे तिसऱ्या व चौथ्या श्लोकांतील वर्णन तृतीय गोविंदाचा पुत्र शर्व अमोघवर्षाचे आहे. तेव्हा दुसऱ्या श्लोकातील 'तस्य' हा शब्द जगतुंग गोविंदाला उद्देशून आहे हे स्पष्ट होय. पण दुसऱ्या भागात त्यापूर्वी तर त्याच्या जगतुंग किंवा गोविंद या विशेषनामाचा उल्लेख कोठेही आलेला नाही, मग त्यासाठी 'तस्य' हे सर्वनाम योजण्याचे कारण काय? हे कारण असे की, लेखाच्या पहिल्या भागात, ज्याच्या कारकीर्दीत उग्रादित्य देवालयाचे पुनर्निर्माण झाले त्या गोविंदाचा उल्लेख (श्लो. २८) आलेलाच आहे. तो गृहीत धरून त्याचा उल्लेख प्रस्तुत ठिकाणी 'तस्य' या सर्वनामाने केला आहे. यावरून सुद्धा हे दोन्ही भाग मिळून हा एकसंध असा लेख आहे हे स्पष्ट दिसून येईल.

वस्तुतः 'तस्य' या शब्दाने सुरू होणारा हा श्लोक व त्यानंतरचे दोन श्लोक (श्लो. ३३–३५) हे या लेखात अमोघवर्षाच्या जवखेड ताम्रपटातून[1] घेतलेले आहेत. जवखेड ताम्रपट (शके ७४२) हा अमोघवर्षाचा स्वतःचा असा पहिला ताम्रपट होय. त्यातील राष्ट्रकूटांची वंशावळ व प्रशस्तीचे पहिले २० श्लोक हे तृतीय गोविंदाच्या सीसवै (श. ७२९), राधनपूर, बदनगुप्पे (श. ७३०), वहुलावार (श. ७३१), लोहारा (श. ७३४) इत्यादी ताम्रपटांत आढळतात. त्यांतील १० ते २० हे श्लोक तृतीय गोविंदाच्या प्रशस्तीचे आहेत. ते संपल्यानंतर अमोघवर्षाच्या प्रशस्तीचे ५ श्लोक जवखेड ताम्रपटात नवीन आलेले आहेत. गोविंदाच्या वर्णनानंतर 'तस्य' या शब्दाने तेथे अमोघवर्षाच्या वर्णनाचा श्लोक सुरू होणे सुसंगत होय. तसे आपल्या या लेखात नाही. कारण, येथे अन्य ताम्रपटांतील वंशावळ व गोविंदाची प्रशस्ती न घेता फक्त अमोघवर्षाच्या वर्णनाचे आणि तेही आरंभीचे ३ श्लोकच काय ते घेतलेले आहेत. त्यामुळे 'तस्य' या शब्दाचा पूर्वसंदर्भ या दुसऱ्या भागात शोधता येत नाही. पण तो लेखाच्या पहिल्या भागातील गोविंदाचे निर्देश गृहीत धरून कसा केला आहे, हे पूर्वी स्पष्ट केलेले आहे.

लेखाच्या या दुसऱ्या भागात आरंभी दुसऱ्या श्लोकात जगतुंग गोविंद नृपतीचे, तर तिसऱ्या व चौथ्या श्लोकात त्याचा पुत्र शर्व म्हणजेच प्रथम

---

१ एपि इंडिका, वर्ष ३२, पृ. १३० ते १३४.

अमोघवर्ष याचे वर्णन आले आहे. (ओ. २२ व २३). याचाच नामोल्लेख पुन्हा ओ. २३ व २४ मध्ये आलेला आहे. त्यानंतर राष्ट्रकूट अमोघवर्षाचा मांडलिक म्हणून नरसिंघदेवाने आपला उल्लेख केला असून त्या निमित्ताने आपली वंशावळ सांगितली आहे. (ओ. २४ ते २६) आपल्या सम्राटाचे वर्णन करताना लेखात गोविंदराजाविषयी जी गौरवपूर्ण विशेषणे योजिली आहेत त्यांत त्याच्या चरणावर सर्व राजे मस्तक ठेवीत व तो आपल्या शत्रूंचा निःपात करीत असे, असे म्हटले आहे. (श्लो. ३३) तृतीय गोविंदाने उत्तर व दक्षिण भारतात दिग्विजय करून सर्व राजांना जिंकले होते हे इतिहास-प्रसिद्धच आहे. त्याला धरूनच ही वर्णने आहेत.

**प्रथम अमोघवर्ष : महाराज शर्व**

या गोविंदाला महाराज शर्व नावाचा, गुहाप्रमाणे अत्यंत शक्तिमान पुत्र झाला. (श्लो. ३३) शंकर आणि पार्वती यांचा पुत्र जो कार्तिकेय, त्याचेच गुह हे दुसरे नाव आहे. त्याने आपल्या बालपणातच, म्हणजे जन्मापासून केवळ सातव्याच दिवशी तारकासुराचा वध केला, हे प्रसिद्धच आहे. यालाच 'कुमार' असेही दुसरे नाव आहे. कालिदासाने लिहिलेले 'कुमारसंभव' हे महाकाव्य याच्या जन्माच्या व पराक्रमाच्या संबंधीच होय. त्यावरून गुहाच्या सामर्थ्याची कल्पना येईल. या गुहाप्रमाणे शर्व हाही शक्तिमान होता. अनंतकिरण बालसूर्याप्रमाणे या शर्वाने देखील आपल्या कीर्तीने सर्व भूमंडल व्यापले होते. (श्लो. ३४) आपल्या गुणांनी त्याने स्वतःला 'त्रिभुवनवल्लभ' म्हणून ख्याती प्राप्त करून दिली होती. तो राजनीतीही उत्तम जाणत होता. या बाबतीत 'विक्रम' हा त्याचा गुरु होता (श्लो. ३५). यात उल्लेखिलेला 'विक्रम' म्हणजे शर्वाचा पिता तृतीय गोविंदराज हाच होय. अमोघवर्षाच्या संजान ताम्रपटात या गोविंदराजालाच दोन ठिकाणी 'विक्रम' असे म्हटले आहे.[१] हा शर्व म्हणजे तृतीय गोविंद नृपतीचा पुत्र प्रथम अमोघवर्ष होय. अमोघवर्ष हे त्याने राज्यारोहणप्रसंगी धारण केलेले बिरुद होय. तेच त्याचे विशेष नाव म्हणून वापरले जाऊ लागले. त्याच नावाने तो प्रसिद्ध असला तरी त्याचे मूळचे नाव 'माराशर्व' किंवा 'महाराज शर्व' असेच होते. त्याचे वडील तृतीय गोविंद उत्तर-दिग्विजय करून परतताना नर्मदातीरावरील महाराज शर्व नावाच्या एका राजाच्या श्रीभवन या राजधानीत मुक्कामाला होते. तेथे

१ एपि. इं. वर्ष १८. अमोघवर्षाचा संजान ताम्रपट, श्लो. २४, ३२.

त्याला पुत्र झाला. जणू तेथील महाराज शर्व याची कायमची स्मृती म्हणून गोविंदाने आपल्या या पुत्राचे नाव शर्व असे ठेवले. तोच पुढे महाराज शर्व म्हणून सर्व पृथ्वीचा स्वामी झाला.[१] त्याने बालपणातच आपल्या कीर्तीने भूमंडळ व्यापले होते, हे वर्णन मात्र केवळ औपचारिक अर्थानेच खरे मानावे लागते. गोविंदाच्या मृत्यूनंतर इ. स. ८१४ मध्ये तो राज्यावर बसला तेव्हा तो केवळ १४ वर्षांचा होता, याच अर्थाने हे खरे मानायचे. एरवी त्यावेळी व त्यानंतरही अनेक वर्षे त्याचे काका कर्क ऊर्फ पातालमल्ल हाच राज्यकारभार पाहत होता. इ. स. ८१८–१९ च्या सुमारास अमोघवर्षाचे काही नातेवाईक, मंत्री आणि मांडलिक त्याच्या विरुद्ध बंड करून उठले. त्याचा परिणाम असा झाला की, अमोघवर्षाला राज्यत्याग करून देशोधडी व्हावे लागले, आणि राष्ट्रकूटांची सत्ता तात्पुरती का होईना, नष्ट होण्याची चिन्हे दिसू लागली. त्यावेळी या कर्क पातालमल्लानेच बंडखोरांचा बीमोड करून अमोघवर्षाला इ. स. ८१९–२० च्या सुमारास पुन्हा गादीवर बसविले व राष्ट्रकूटांची सत्ता सर्वत्र पुन्हा स्थापन केली.[२] असे असले तरी प्रस्तुत लेखात प्रशस्तिकाराने याचे श्रेय तरुण अमोघवर्षालाच देऊन हे वर्णन केलेले आहे, ते अर्थातच अतिशयोक्त होय.

### अमोघवर्षाच्या मांडलिकाचा पहिला कोरीव लेख

त्रिभुवनवल्लभ हे अमोघवर्षाने धारण केलेले नवीन बिरुद होय. ते त्याच्या जवखेड ताम्रपटात[३] प्रथम आढळते. अमोघवर्षाचे असे गौरवपूर्ण वर्णन केल्यानंतर पुढील ओळीत (ओ. २४) त्याचे सम्राटत्व दाखविणारी बिरुदावली पुन्हा योजिली आहे. 'परमभट्टारक महाराजाधिराज परमेश्वर' या सम्राटाच्या बिरुदावलीने प्रथम जगत्तुंग गोविंदराजाचे वर्णन करून त्याच्या चरणांचे ध्यान करणाऱ्या (पादानुध्यात) अमोघवर्षालाही ती बिरुदावली योजिली आहे. शिवाय तीत त्याला 'श्रीवल्लभनरेंद्रदेव' ह्या बिरुदावलीनेही गौरविले आहे. पूर्वोक्त जवखेड व त्याच्या संजान ताम्रपटातही त्याला ही बिरुदे लावलेली आहेत.[४] तेथे त्याला 'श्रीपृथ्वीवल्लभ श्रीमदमोघवर्ष श्रीवल्लभनरेंद्रदेवः' असे म्हटले आहे. त्यावरून राष्ट्रकूटांच्या 'श्रीपृथ्वीवल्लभ' या नित्याच्या

---

१ एपि. इंडिका. वर्ष १८. अमोघवर्षाचा संजान ताम्रपट, श्लो. २६.

२ पूर्वोक्त, ओ. ५७–५८.

३ एपि. इंडिका. वर्ष ३२, पृ. १३३.

४ तत्रैव. श्लो. ३८–४१.

बिरुदांव्यतिरिक्त श्रीवल्लभ व नरेंद्रदेव ही आणखी दोन बिरुदे अमोघवर्षाने धारण केली असावीत असे दिसते.

या बाबतीत नमूद करण्यासारखी महत्त्वाची गोष्ट अशी की, अमोघवर्षाच्या राज्यकालात त्याच्या मांडलिकांचा उपलब्ध झालेला हा पहिलाच कोरीव शिलालेख दिसतो. अमोघवर्ष पुन्हा सिंहासनावर बसल्यानंतर चारच वर्षांनी तो कोरला गेला. या दृष्टीने प्रस्तुत कोरीव लेखाचे महत्त्व विशेष आहे.

**नरसिंघदेवाची वंशावळ**

एवंगुणविशिष्ट सम्राट अमोघवर्ष कुशल असताना (कुशली), अर्थात, त्याच्या राज्यकालात नरसिंघदेवाने दिलेल्या दानाचा उल्लेख पुढे केलेला आहे. त्यापूर्वी या नरसिंघदेवाच्या वंशावळीचे वर्णन ओ. २४ ते २६ मध्ये आलेले आहे. ते असे : श्रीअत्रियप्प, त्याचा पुत्र श्रीमदप्प आणि त्याच्या चरणाचे ध्यान करणारा (त्याचा पुत्र ?) नरसिंघदेव. श्रीअत्रियप्पाचे वर्णन करताना आरंभीच त्याला 'शलुक्यान्वय' म्हटलेले आहे. शलुक्यान्वय म्हणजे शलुक्य वंशाचा. शलुक्य हे चलुक्य या शब्दाचेच दुसरे रूप होय. **च** आणि श या वर्णांची अनेकदा अदलाबदल होत असते. उदा : **चू**लिक–**शू**लिक ; चौलुक्य–**सो**लंकी ; **शां**तमूल–**चा**टमूल ; **शां**तिश्री–**चा**तिश्री, इत्यादी.[1] त्याप्रमाणे चलुक्य –**श**लुक्य हे रूप येथे आले आहे. 'चलुक्य' ऐवजी 'सालुक्की' असे रूप चालुक्यवंशीय शाखांच्या काही कोरीव लेखांत आढळते, असे डॉ. दिनेशचंद्र मुजुमदार यांनी म्हटले आहे.[2] तेव्हा श्री अत्रिअप्प हा चालुक्यवंशीय होता, अर्थात त्याचा पुत्र श्रीमदप्प व त्याचा पुत्र नरसिंघदेव हेही चलुक्य–वंशीयच होते. पूर्वी हैहय–वंशीय शुभकंटाने उग्रादित्याचे सूर्यमंदिर बांधले होते, ते चलुक्य विक्रमादित्य सत्याश्रयाच्या प्रसादाने. त्यानेच त्या मंदिराला पवको-डिका गाव दान दिले होते. म्हणूनच की काय, त्याच चलुक्य वंशातील नरसिंघदेवाने त्याच ठिकाणी नवीन मंदिर बांधले व त्याला मंगलपुरक नावाचे गावही दान दिले, हा संबंध लक्षात घेण्यासारखा आहे.

श्रीअत्रियप्प, . श्रीमदप्प व श्रीनरसिंघदेव या तिघांनाही 'समधिगतपंच-महाशब्द . .' ही विशेषणे लावली आहेत. सामंत म्हणजे मांडलिक, एखाद्या लहान संस्थानाचा अधिकारी. महासामंत म्हणजे मोठा संस्थानिक. अशा

१ दिनेशचंद्र सरकार : सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स, पृ. २२९, २३२.

२ हिस्ट्री अँड कल्चर ऑफ इंडियन पीपल, व्हॉ. ३, पृ. २२७.

अनेक मोठ्या संस्थानांवरील संस्थानिकांचा प्रमुख तो महासामंताधिपति–अर्थात, हा देखील सम्राटाचा मांडलिकच. त्याला उत्सव-प्रसंगी 'पंच-महाशब्दां'चा मान स्वीकारण्याचा अधिकार असे. पंच महाशब्द म्हणजे पाच वाद्यांचा मोठा आवाज. सामंत, महासामंत, सेनापती इत्यादिकांना आपल्या राजवाड्या-समोर, मिरवणूक व इतर उत्सव प्रसंगी मोठा आवाज करणारी वाद्ये वाजवू देण्याचा सन्मान सम्राटाकडून देण्यात येत असे. ही पाच वाद्ये निश्चित कोणती याविषयी मतभेद आहेत. मात्र फार मोठ्या श्रेष्ठ व्यक्तींनाच हा मान प्राप्त होत असे. तसा तो श्रीअत्रियप्प, श्रीमदप्प व श्रीनरसिंघदेव यांना आपल्या सम्राटाकडून प्राप्त झाला होता. 'पंच-महाशब्द' या शब्दाचा 'पाच अधिकार किंवा उपाधी' असाही अर्थ करण्यात येतो.[1] कल्हण कवीच्या राजतरंगिणीत हे पाच शब्द म्हणजे पाच अधिकार पुढीलप्रमाणे सांगितले आहेत. (१) महा–प्रतिहार; (२) महा–संधिविग्रहिक; (३) महा–अश्वशालाधिकृत; (४) महा–भांडागारिक; आणि (५) महा–साधनिक म्हणजे सेनापती. या अर्थाने पंच–महाशब्द हा शब्द सामान्यतः उत्तर भारतात वापरला जात होता. पश्चिम भारतातील काही लेखांत हे पाच अधिकार म्हणजे महाराज, महासामंत, महाकार्तािकृतिक (स्मरण करून देणारा राजकीय अधिकारी), महादंडनायक; आणि महाप्रतिहार. दक्षिण भारतात मात्र हा शब्द पाच वाद्यांचे आवाज याच अर्थाने योजला जात होता.[2] प्रस्तुत लेखातही तोच अर्थ अभिप्रेत दिसतो. श्री मदप्प याला 'प्रभुधाम' (सामर्थ्याचे घर=सामर्थ्यसंपन्न), महानंद (अत्यंत आनंदी किंवा आनंद देणारा), आणि समरजयाश्रय (युद्धातील विजयाचे आश्रयस्थान, युद्धात नेहमी विजयी होणारा) ही विशेष विशेषणे लावली आहेत. ती बहुधा त्याची बिरुदे असावी.

## नरसिंघदेव

नरसिंघदेवाला लावलेल्या विशेषणांचा अर्थ मात्र समाधानकारक लागत नाही. तो पुढीलप्रमाणे लावता येणे शक्य आहे. तोही 'समधिगत–पंचमहाशब्द' होता, म्हणजे त्यालाही पंच महाशब्दांचा मान मिळालेला होता. त्याचे पूर्वज श्रीअत्रियप्प व श्रीमदप्प यांना महासामंताधिपति म्हटले आहे तर

१ डॉ दिनेशचंद्र सरकार, इंडियन एपिग्राफी, पृ. ३४१–४२.

२ तत्रैव, पृ. ४०९.

नरसिंघदेवाला केवळ महासामंत म्हटले आहे. तो 'भद्रांकुशधर' म्हणजे आपल्या हातात कल्याणकारी अंकुश धारण करणारा होता. अर्थात त्याने जो अंकुश (शस्त्र) धारण केला होता तो केवळ लोककल्याणासाठी. तो 'लोकाश्रय' म्हणजे त्रैलोक्यातील सर्व प्राणीमात्रांना आश्रय देणारा होता. तो आपल्या (निज), एखाद्या लहान वृषभाप्रमाणे (गलि) उंच (ऊर्ध्व) असलेल्या किंवा दिसणाऱ्या अशा नेगड–श्रीने युक्त, अर्थात, नेगड राज्यलक्ष्मीचा स्वामी होता. यावरून 'नेगड' येथे त्याची राजधानी असावी, त्याच्या राज्याचे नाव 'नेगड' असावे असे दिसते. जळगाव जिल्ह्याच्या चाळीसगाव तालुक्यातील नागड या आज उध्वस्त असलेल्या खेड्यात सेंद्रक–वंशीय अल्ल-शक्ती नृपतीचा शके ५७७ (इ. स. ६५५) चा एक ताम्रपट सापडला आहे. त्यावरून नागडच्या परिसरात सेंद्रक–वंशीय राजे पूर्वी राज्य करीत होते, असे दिसून येईल. हे सेंद्रक राजे चालुक्यांचे नातेवाईक होते. नरसिंघदेव आणि त्याचे पूर्वज हेही चालुक्यवंशीयच होते. हे लक्षात घेता, या नरसिंघदेव चालुक्याचे नागड येथे लहानसे राज्य असावे अशी कल्पना करण्यास हरकत नाही. नेगड हे नागड या शब्दाचेच रूपांतर होय.

**मंगलपुरक गावाचे दान**

असा हा नरसिंघदेव बाह्मणिका या गावी तळ देऊन वास्तव्य करीत असताना, त्याने आपल्या व आपल्या मातापित्याच्या पुण्ययशोभिवृद्धीसाठी शके ७४७ भाद्रपद शुद्ध नवमी, रविवार रोजी सूर्य कन्या राशीत असताना संक्रांत महापर्वकाळी, स्नान करून, हातावर पाणी सोडून, संधिलो भुक्ती (जिल्हा) मधील **मंगलपुरक** नावाचे गाव, तेथे गोळा होणाऱ्या जमिनीवरील शासकीय करासहित (स+उद्रंगः) व इतर करांसहित (सपरिकरः), जोपर्यंत चंद्र, सूर्य, पृथ्वी, नद्या व पर्वत आहेत तोपर्यंत (अर्थात् कायमचे) सर्व मालकी हक्कांसहित (भूमिच्छिद्रंन्यायेन) दान दिले. या गावात शिपाई व सैनिक यांना प्रवेश करता येणार नाही. (अ+चाट+भट +प्रावेश्यः)

या गावाचा अर्धा भाग त्याने उग्रादित्य नावाच्या सूर्याला (भट्टारक=सूर्य) अर्थात, उग्रादित्य देवालयातील सूर्याच्या मूर्तीच्या पूजा–अर्चनेसाठी, आणि दुसरा अर्धा भाग **कंभो** विषयातील (जिल्ह्यातील) **उत्पर** या गावी राहाणारा, त्रैविद्यांच्या (म्हणजे तिवारी) कुळातील हारित–गोत्रीय, आपस्तंब–सूत्रानुसार धार्मिक व्यवहार करणारा, यजुर्वेदातील तैत्तिरीय शाखेचा अभ्यासक, अर्थात

कृष्णयजुर्वेदी भट्ट **जोदरि** याचा पुत्र **प्रभाकरभट्ट** या प्रमुख महाजनाला दान दिला.

या मंगलपुरक गावाच्या चतु:सीमा अशा: पूर्वेला **अंधिली नगरक**; दक्षिणेला **श्रीपुरग्राम**; पश्चिमेला **व्याघ्रपाटक**; उत्तरेकडील गावाचे नाव, तेथील अक्षरे खराब झालेली असल्यामुळे स्पष्ट वाचता येत नाही. ते '–कदक' असे असावे असे वाटते.

या ग्रामदानाबरोबरच नरसिंघदेवाने तेथे **संपटाचार्य** नावाच्या पंडिताला विद्याधन म्हणून शंभर निवर्तने जमीन दान दिली. त्याचप्रमाणे 'श्रेष्ठ योग्यनाग' (?) याला दोन्ही दिशाकडे पाच निवर्तने भूमी दान दिली. 'निवर्तन' हे जमीन मोजण्याचे एक माप आहे. निरनिराळ्या स्थळी व काळी हे माप कमी–अधिक असल्याचे आढळते. महाराष्ट्रात भास्कराचार्यांच्या लीलावती व हेमाद्रीच्या चतुर्वर्गचिंतामणी ग्रंथात एक निवर्तन म्हणजे साधारण-पणे दोन एकर म्हणून वर्णन आढळते. या सर्व दानांच्या उपभोगात कोणीही अडथळा आणता कामा नये. (ओ. ३०) अशी कडक ताकीद देऊन भगवान वेदव्यासाची, बहुधा सर्व दानलेखांच्या शेवटी आढळणारी वचने उद्‌धृत केली आहेत.

## स्थलनिश्चिती

या कोरीव लेखात निर्देशिलेल्या अनेक स्थळांचा शोध समाधानकारक रीतीने लागत नाही. हा शोध घेण्याची एक मुख्य व महत्त्वाची खूण म्हणजे जेथे हा शिलालेख सापडला ते स्थळ. शिलालेख सामान्यत: एका जागेहून दुसऱ्या ठिकाणी हलवले जात नाहीत. त्यातून प्रस्तुत शिलालेखाची शिळा फार मोठी व वजनदार असल्यामुळे, शिवाय ती एका उंच टेकाडावरील भूमीत आतापर्यंत गाडली गेली असल्यामुळे तिचे स्थानांतर झालेले असणे शक्य नाही. आरंभापासून ती आहे त्याच ठिकाणी असली पाहिजे. ही महत्त्वाची गोष्ट लक्षात घेऊनच स्थळांचा शोध घेण्याचा प्रयत्न करणे आवश्यक आहे.

## सांविली नगर

विक्रमादित्यदेवाच्या प्रसादाने शुभकंट ज्या नगराचा स्वामी झाला होता ते सांविली नगर कोणते असावे? सांविली या शब्दाचे 'सावली' असे उच्चारांतर होणे अगदी स्वाभाविक आहे. सावली या नावाची गावे महाराष्ट्रात पुष्कळ आहेत. प्रस्तुत शिलालेख जेथे सापडला त्या भोवतालच्या परिसरातच या गावाचा शोध घेणे इष्ट होईल. त्या अनुषंगाने पाहाता जळगाव जिल्ह्यात या

नावाचे गाव आढळत नाही. मेहूणच्या पूर्वेस सुमारे ५० मैलांवर, अमरावती जिल्ह्यातील मेळघाट तालुक्यात 'सावली खेड' या नावाचे एक गाव आहे. तेच बहुधा आपले सांविली नगर असावे, असे मला वाटते. या गावापासून उत्तरेस चार–पाच मैलांवर तापी नदी आहे, तर दक्षिण दिशेला, तेथून जवळच 'धामोरी' (जि. अमरावती) या गावी, माहिष्मतीचा कलचुरी (हैहय) नृपती कृष्णराज याच्या चांदीच्या नाण्यांचा एक फार मोठा साठा सापडला होता. त्यावरून, माहिष्मतीच्या कलचुरी–हैहयांचा अस्त झाल्यावर त्यातील काही राजपुरुष या प्रदेशात आश्रयाला येऊन त्यांनी तेथे नवीन राज्य स्थापन केले असणे अशक्य नाही. हे लक्षात घेता शुभकंट हैहयाचे सांविली नगर म्हणजे मेळघाट तालुक्यातील हे सावली खेड असावे असे वाटते. प्रश्न एवढाच आहे की, पवित्र तापी नदी आपल्या गावाजवळच असतांना शुभकंटाने मेहुण येथे सूर्यमंदिर का बांधले असावे? त्याचे उत्तर असे की, मेहुण हे तापी व पूर्णा या नद्यांच्या अगदी संगमावर नसले तरी त्याच्या जवळच आहे. त्यामुळे तेही धार्मिक दृष्टया संगम स्थानाइतकेच पवित्र समजले जात असावे, त्यामुळेच शुभकंटाने तेथे आपले उग्रादित्य सूर्यमंदिर बांधले असावे.

## बदरी हे तापीचे दुसरे नाव

लेखाची शिळा उग्रादित्याच्या मंदिराला लावलेली असली पाहिजे, असे त्यातील वर्णनावरून दिसते. हे उग्रादित्याचे मंदिर 'बदरी' नदीच्या काठावरील शहरात बांधले गेले होते (श्लो. १७) असे लेखात स्पष्ट म्हटले आहे. पण ही शिळा सापडली ती तापी नदीच्या काठावरील उंच टेकाडात. ही बदरी नदी कोणती? तेथे जवळपास या नावाची नदी नाही. आणि असली तरी, देवालयाला अगदी लागूनच तापी ही मोठी नदी असल्यामुळे, तिचा उल्लेख संभवनीय वाटत नाही. जळगाव जिल्ह्याच्या पश्चिम सीमेजवळ अमळनेर तालुक्यात 'बोरी' या नावाची तापीला मिळणारी एक नदी आहे. ती आपल्या लेखातील 'बदरी' असणे शक्य नाही. कारण ती, जेथे हा शिलालेख सापडला तेथून तापी नदीच्या प्रवाहाच्या खालच्या बाजूला आणि तीही सुमारे ७५ मैल अंतरावर आहे. तेव्हा एकच निष्कर्ष संभवतो तो असा की, तापी नदीचाच उल्लेख या ठिकाणी बदरी या नावाने केला असला पाहिजे. तापीलाच भिन्न नावे असावीत. उदा. 'एष विन्ध्यो महाशैलः पयोष्णी च समुद्रगा' हा उल्लेख तापी नदीचाच होय. कारण, सध्याची

**पयोष्णी** नदी समुद्राला मिळत नाही. याचा अर्थ असा की, मुख्य नदी पयोष्णी असून चांगदेवजवळ तापी नदी तिला मिळते. पुढे ती पयोष्णी या नावानेच वाहत जात असावी. पयोष्णी आणि तापी ही नावे अर्थदृष्ट्या एकच होत. तापीचे पयोष्णी हे जसे दुसरे नाव होते तसेच 'बदरी' हेही असावे. भारतातील सर्व मोठ्या व पवित्र नद्यांना सामान्यतः गंगा म्हणून संबोधतात. गोदावरीला आजही गंगा म्हणतात. तापी, पयोष्णी या नद्यांनाही स्थानिक लोक गंगा म्हणतात. गंगेच्या उगमस्थळाजवळील एका प्रवाहाला बदरी असे नाव असल्याचे मोनिअर वुइल्यम्सच्या संस्कृत–इंग्रजी कोशात नमूद केले आहे. अर्थात, बदरी हे गंगा नदीचे एक नाव होय. गंगा या सामान्य नावाने संबोधिल्या जाणाऱ्या तापीला त्या काळात बदरी हेही एक पर्याय नाव प्रचलित असावे, असे प्रस्तुत लेखावरून दिसते. याला प्रत्यंतर पुरावा आज तरी उपलब्ध नाही, हे मान्य केले पाहिजे.

नरसिंवदेवाने दान दिलेले **मंगलपुरक** ही आजची मंगलवाडी (ता. रावेर, जि. जळगाव) असावी. हे गाव मेहूणच्या पश्चिमेस तापी नदीच्या उत्तर तीरावर आहे. मंगलपुरकच्या चतुःसीमांपैकी दक्षिणेकडील **श्रीपुर** हे आजचे मानपूर असावे. ते तापी नदीच्या दक्षिण तीरावर मंगलवाडीपासून सहा मैलांवर आहे. पश्चिमेकडील **व्याघ्रपाटक** हे आजचे, तापीच्या उत्तर काठावरील वाघळूद असावें. ते मंगलवाडीच्या पश्चिमेस सुमारे नऊ मैलांवर आहे. पूर्वेकडील **अंधिलो** नगर आजची आंदलवाडी असावी. पण ती मंगलवाडीच्या पूर्वेला नसून उत्तरेला सुमारे ५ मैलांवर आहे.

मंगलपुरक गावाचा अर्धा भाग ज्या प्रभाकर भट्ट महाजनाला दिला होता त्याचे वडील **कंमी** विषयातील **उत्पर** गावी राहात होते. मंगलवाडीच्या जवळपास या नावाची गावे नाहीत. महाराष्ट्रातील खेड्यांतील व शहरांतील वर्णक्रमीतही या किंवा एतत्सदृश नावाची गावे नाहीत. आंध्र प्रदेशातील नेलूर विभागात प्राचीन काळी कम्म–नाडु–विषय होता.[1] तोच आपल्या लेखातील कंमी विषय असावा. प्रथम विक्रमादित्य सत्याश्रय व त्यानंतरचे बादामीचे चालुक्य नृपती यांचे राज्य त्या विभागात होते.[2] **उत्पर** ग्राम

१ यझदाणी, अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन, पृ. ४०.

२ तत्रैव, पृ. २२१–२२२.

त्याच विभागातील असावे. भट्ट जोदरि हा तेथील रहिवाशी असावा. चालुक्याच्या कृपेने, त्याचा पुत्र प्रभाकरभट्ट हा उग्रादित्य मंदिराच्या सेवेसाठी आंध्रातून तेथे आला असावा. नरसिंघदेवाचे पूर्वज चालुक्यांचे मांडलीक होते हे येथे लक्षात घेतले पाहिजे. ज्या **ब्राह्मणिका** गावी असताना नरसिंघ-देवाने हे दान दिले ते आजचे अमळनेर तालुक्यातील **ब्राह्मणे** असावे.

विक्रमादित्य सत्याश्रयाने पूर्वी जे **पक्कोडिका** गाव दान दिले होते, ते किंवा तत्सदृश एखादे गाव आज आढळत नाही. पक्कोडिका या शब्दाचा वाकडी किंवा वाकोडी असा अपभ्रंश झाला असणे शक्य आहे. वाकडी नावाचे गाव जळगाव जिल्ह्याच्या जळगाव तालुक्यात आहे. पण त्याच्या चतुःसीमा लेखात नमूद केलेल्या पक्कोडिकाच्या चतुःसीमाशी अगदीच जुळत नाहीत. वाकोडी नावाचे दुसरे एक गाव बुलढाणा जिल्ह्याच्या मलकापूर तालुक्यात आहे. मेहूणहून ते सुमारे २० मैलावर आहे. याच्या पूर्वेस असलेले चांदूर, हे चंद्रोणी असणे शक्य आहे. उत्तरेस तिघ्रा व विवरे ही दोन गावे जवळ जवळ आहेत. तीच लेखातील व्याघ्रवियरक असावे. दक्षिणेला नव्हे, पण वाकोडी जवळच लोनवडी आहे. ते लोणिवहक असावे. पश्चिमेकडील उड्वाटिका मात्र आढळत नाही.

**लेखक**

या लेखाच्या पहिल्या भागातील हैहय–वंशीयांची प्रशस्ती कुसुमबाण नावाच्या कवीने रचलेली आहे. (ओ. २१) हा कोण असावा हे सांगता येत नाही. या संपूर्ण लेखाच्या लेखकाचे नाव **तावियप्प** होय. त्याच्या वडिलांचे नाव शंकरगण असे होते. ताविअप्पाने परमेश्वराच्या म्हणजे सम्राटाच्या आज्ञेने हा लेख लिहिला. कलचुरी हैहय वंशात शंकरगण हे नाव वारंवार आढळते. त्यावरून हा लेखक हैहय–वंशीय असावा असे वाटते. ज्या परमेश्वराच्या आज्ञेने ताविअप्पाने हा लेख लिहिला तो परमेश्वर म्हणजे सम्राट प्रथम अमोघवर्ष असावा.

प्रथम अमोघवर्षाच्या जवखेड ताम्रपटाचा लेखक रुद्र हाही शंकरगणाचाच पुत्र होता, हे त्याच्या शेवटी आलेल्या 'लिखितं चेदं मया लेखक रुद्रः (रुद्रेण) श्रीशंकरगणसूनुना परमेश्वराज्ञया इति' या समाप्तिलेखावरून कळते.[1] या दोन्ही कोरीव लेखांच्या समाप्तिलेखातील हे साम्य लक्षणीय आहे. त्यावरून

१ एपि. इंडिका. वर्ष ३२, पृ. १३४.

शंकरगणाला रुद्र व तावियप्प नावाचे दोन पुत्र होते आणि ते दोघेही 'लेखक' होते असे दिसते. शंकरगणाचे घराणेच लेखकाचे असावे असे म्हणावयास हरकत नाही. त्यामुळेच जवखेड ताम्रपटातील अमोघवर्षाच्या वर्णनातील आरंभीचे तीन श्लोक मेहुणच्या प्रस्तुत शिलालेखात उद्धृत करणे त्याला सहज शक्य झाले असावे. या दोन्ही कोरीव लेखांतील अक्षरवटिकाही सामान्यतः सारखीच आहे.

### वाचन

[वृत्ते : अनुष्टुभ् श्लो. १२, १५, २२, ३०–३२, ३४, ३६; आर्या ४, १०, ११, १३, १४, १७, २०, २१, २३–२९, ३५; इंद्रवज्रा ३७; रथोद्धता ८; वसंततिलका २, १६, १८, १९, ३३; शार्दूलविक्रीडित ५, ७; स्रग्धरा १, ३, ६, ९.]

१ [स्वस्ति] श्रीमत्ताहेतुरुद्यन्नपनयति महामोहमेको जनानां लुप्तानां यस्तमोभिर्भवति करुणया सत्क्रियाणां प्रवृत्यै। उग्रादित्याभिधानं जगदरिदनुजध्वंसविख्यातशक्तेराविर्भूतं जगत्सु त्रिषु निरतिशयं यस्य सोव्यादिनो वः ॥ [१॥*] ज्ञानांकुरप्र–

२ सव[बी]जमजादिदेवतत्वं(त्वं) त्रिलोकशकटं(ट)स्छि(स्थि)तिचक्रमेकं। मार्त्तण्डमंडलमखंडितदिव्यभावभ्व्याद्भवत्सु भवतो भवसंकटेषु ॥ [२॥*] अस्तिच्छायाभिरामः पृथुरतिसरलः पर्व्वदत्तस्वसारः सद्भूभृत्संभवोपि प्रसृतगुरुगुणध्याप्तभूमंड–

३ लांतः । वंशः श्रीहैहयानामलमवनिभुजां त्यागशौर्यै(र्यै)कभाजामंभोधिक्ष्माभृदाशासुरसुरसदनख्यातकीर्त्युद्गमानां ॥ [३॥*] जातेषु तत्र बहुषु क्रमेण नाकं गतेषु सुकृतवशात्। नृगनलदिलीपदशरथरामप्रतिमेषु भूपतिषु ॥ [४॥*] राजाभू–

४ त्प्रतिकंट इत्यनुगतं शक्त्याद्वितीयं बहन्नामोद्दामसदान्धदंतिनि रणे भिन्नारिवक्षस्छ(स्थ)लः । यस्याब्धिष्वपि न प्रवृत्तमतुलं चस्खाल शुभं यशः स्वर्गस्त्रीहृदयापहारि स महाराष्ट्राभिधानः प्रभुः ॥ [५॥*] भूमीः स्वा एव मुक्त्वारुरुहुरुगुहा–

५ गह्वरं शैलदुर्गं दृष्ट्वा नेशुस्ततोपि ध्वनदसितघने विद्युतं प्रोल्लसंतीं। भीत्या यस्येभकुंभस्छ(स्थ)लदलनगलद्रक्तरक्तस्य भीमानुत्पश्यन्तः शितासेरहितनृपतयश्चान्द्रहासान्विलासान् ॥ [६ ॥*] नाम्ना कामजयोन्नतोभ–

---

१ चिन्हाने दर्शविलेला आहे.

६ वदतः सर्व्वार्थिनां वा(बा)न्धवः शातश्याममहासिभासुरकरो यो धूमकेतुर्द्विषां । राजा भूरिविकासकृत्सुमनसां यः पारिजातः क्षितौ कामार्तानुगसुन्दरी-कृतरतिः यः(यैः) काम एव स्वयं ॥ [७॥*] धीरधीरविजितः परिभ्रमद्वी–
७ रवैरिवरवारणे रणे । नाप चापविभृतेषु भीषणे यः श्रमं रिपुजये जयोन्नतः ॥ [८॥*] तस्याभूद्भूरिभूति प्रशमितविपदामर्थिनां कल्पवृक्षः सूनुस्त(स्स्त)ब्धत्वमुक्तः शुभफलविनतोप्यप्रकंप्यो मरुद्भिः । रत्नस्वर्णा-दिदानात्प्रथि–
८ तपृथुयशा यत्सुवृत्तः स्वभावादन्यस्तंभाभिधानः पतदधनजनोत्तंभने स्तंभ एव ॥ [९॥*] यः प्रणयिनीजनस्य प्रणतानां प्रणयिनां निजमुवाह । न क्षतमना मनागपि शुभकंट इति स्फुटं नाम ॥ [१०॥*] धनदोपि कथं
९ विपदः शक्रयमः कथमवास्तगुरुदंडः । एकोप्यनेकरूपः कथमिति यस्तर्कितो लोकैः ॥ [११॥*] विक्रमादित्यदेवस्य प्रसादादमितद्युतेः । सांविली नगरस्याभूद्भर्त्ता लोकहिते रतः ॥ [१२॥*] यस्यातिदुःसहमहाप्रताप–
१० तप्ता निराश्रयाः संतः । ऐयुः सच्छायामिव परभूपाः प्राभृतैः प्रीतिं ॥ [१३॥*] आसन्सासूया इव बहुगोदानस्य यस्य विप्राणां खुरवलय-विषमितांगणसंमार्जनखेदिता दास्यः ॥ [१४॥*] गृहीतनित्यदानानां वदनानि द्वि–
११ जन्मनां । ओंकारमुखराण्यासन्पुरो यस्य दिने दिने ॥ [१५॥*] यः क्षत्रियांतमकरोद्सत्कृत्स एव यस्य स्वयं परशुराम इवावतीय(र्य) । भृत्यो भवत्परशुराम इति प्रतीतो धर्म्माधिकारनिरतः शुचिरग्रजन्मा ॥ [१६॥*] बदरीनदीतटाश्रिततपोव–
१२ नालंकृते पुरे सवितुः । येनाकारीहगृहमुग्धा(ग्रा)दित्याभिधानस्य ॥ [१७॥*] कालेन शीर्ण्णपतिताखिलकुड्यमूलमुत्सन्नमंडपशिखं प्रतिमावशेषं । शून्यं विशालतरभक्तियुतेन राज्ञा धर्म्मैकतानमनसा सत–
१३ तं विलोक्य ॥ [१८॥*] तेनेदमत्र निजवि(बिं)व(ब)मिवाम्व(म्ब)राग्रे लग्नं विमानमिव भूरिलसत्पताकं । भास्वत्युपासितशिखाशतशोभि शुभ्रं भानोरकारि भवनं भुवनाधिपस्य ॥ [१९॥*] यन्निर्गतमुरुशिखरं भित्वेव महीमहीशमहित–
१४ स्य । शेषस्य फणामंडलमंडकमणिमंडितं भाति ॥ [२०॥*] सर्वावयवा-भरणैरलंकृतं पार्थिवः स वपुरस्य । हेममयमिव चकार स्फुरदुरुरत्नैर-हिमरश्मेः ॥ [२१॥*] स्छ(स्थ)पतिर्व्विश्वकर्म्मेव कर्मनिर्म्माणनैपु–

१५ णं । आविश्चकार मतिमानुपाध्यायोत्र नारुकः ॥ [२२॥*] शकनृप-
कालातिक्रांतवर्षशतसप्तकेयमारब्धः(ब्धः) । अष्टाविंशत्यधिके फाल्गुनसित-
पक्षपंचम्यां ॥ [२३॥*] वु(बु)धवारे प्रासादो नरपतिनात्रैव-
१६ नित्यनिरतेन । अनपेक्षितगृहवार्त्तावित्तव्ययभृत्यवर्ग्गेण ॥ [२४॥*] उत्सादितो
गिरिष्वपि न श्रुतघनगर्जितः स्वपिति यस्य । पदढक्काशंकामुक्तमंदनिद्रो
विरोधिजनः ॥ [२५॥*] क्षुत्क्षामः फलितान्यपि कद-
१७ लीतालीवनानि नोपैति । पवनचलत्पालिध्वजपटविभ्रमभयदपत्राणि ॥ [२६॥*]
तुंगशिखरांतरोदितमिन्दोर्वि(बि)म्वं(म्बं) विलोक्य सहसैव । संस्मृतसितातप-
त्रस्त्रासादस्त्रच्छ(स्थ)तामेति ॥ [२७॥*] श्रीवल्लभे महीयो मही-
१८ भुजामधिपतौ महीमवति । जगतुंगापरनाम्नि तस्मिन्गोविन्दराजाख्ये ॥
[१८॥*] निष्पन्नोयमनारतपूजाविधिभक्तिभावनोपनतः । तनुमानिव प्रसादः
प्रासादो भास्वरः सवितुः ॥ [२९॥*] यः करोत्यम-
१९ रावासं यश्च तं पाति यत्नतः । वदंति धर्म्मशास्त्रज्ञाः सममेव तयोः
फलं ॥ [३०॥*] मत्वैवं भाविभिर्भूपैः पालनीयो महात्मभिः । धर्म्मोयं
शुभकंटस्य यावदास्ते जगत्त्रयमि(म् ॥ इ)ति ॥ [३१॥*] अत्र राज्ञा-
सत्याश्रयेण पक्कोडिका नाम ग्रा-
२० मः पूर्व्वमेव देवाय दत्तः पुरनिवेशश्च कृतः [।*] तत्र ग्रामस्याघाटाः
[।*] पूर्व्वतश्चंद्रोणी [।*] दक्षिणतो लोणिवहकं [।*] पश्चिमत
उड्रवाटिका [।*] उत्तरतो व्याघ्रवि[य]रकं [।*] पुरस्यापि पूर्व्वतो
राजतडागं [।*] दक्षिणतो देउ[व]कपाटकः [।*]
२१ पश्चिमतो नदीतटम् [।*] उत्तरतो भद्रेश्वरमि(म् इ)ति ॥ सर्व्व
मेतद्भागामिभिरवनिपतिभिः पालनीयमि(म् इ)ति ॥ कृतिः
कुसुमबाणस्य ॥..[1] स वोव्याद्वेधसा धाम यं(यन्)नाभिकमलं कृतं [।*] हर-
२२ श्च यस्य कांतेन्दुः(न्दु)कलया कमलंकृतं । [। ३२॥*] तस्यानताखिलनरें-
द्रकिरीटकोटिसंवृष्टपादनखदर्पणदृष्टदेहो(हः) [।*] दुर्व्वारवैरिवरवारण-
दारणस्य पुत्रो भवद्गुह इवाप्रतिरूपशक्तिः[2] [॥*३३] यो महारा-

---

१ ही अक्षरे दुर्वाच्य आहेत.

२ हा व यापुढील दोन श्लोक (३३ ते ३५) अमोघवर्षाच्या जंवखेड ताम्र-पटातही (श्लो. २१ ते २३) आढळतात. पाहा. एपि. इंडिका. वर्ष ३२, पृ. १३३. 'अप्रतिरूप' ऐवजी ताम्रपटात 'अप्रतिहूप' असे वाचन आहे. ते उघडउघड चुकीचे वाचन आहे.

२३ जशर्व्वाखप्रः ख्यातिं यातो मही[तले] [।*] वा(बा)लोपि दिङ्मुखाकी[र्ण]-
भूरिधामांशुमानिव [।।३४।।*] तृ[त्रि]भुवनवल्लभ इत्यपि येनात्मा-[1]
निजगुणैरसामान्यै[ः।*] नीतो नीतिविदोपिहि यस्य गुरुः(रु)विक्रमो[2] जातः।
[३५।।*] परमभट्टारकम-
२४ हाराजाधिराजपरमेश्वरश्रीजगतुंगदेवपादानुध्यातपरमभट्टारकमहाराजाधिराज-
परमेश्वरश्रीमदमोघवर्षः श्रीवल्लभनरेंद्रदेवः कुशली [।*] शलुक्यान्वय-
समधिगतपंचमहाशब्दमहासा-
२५ मंताधिपतिश्रीअत्रियप्पराज्ञः तस्य सुतः समधिगताशेष[पंचमहाशब्द*]
महासामंताधिपतिप्रभुधाममहानंदसमरजयाश्रयश्रीमदप्प तस्य पादानुध्यात
समधिगतपंचमहाशब्दमहासामंतभ्रद्रांकुश-
२६ धरणिलोकाश्रयनिजगलिऊर्ध्वनेगडश्रीनरसिंघदेवेन वा(ब्रा)ह्मणिकावासितेन मया
मातापित्रोरात्मनः(न)श्चैहिकामुष्मिकपुण्ययशोभिवृद्धये उग्रादित्यट्टारकस्य
ग्रामस्यार्धं दत्तं [।*] तस्मिंम(स्मिन्) ग्रामे कर्मः-
२७ विषयउत्परग्रामवास्तव्यतत्रैविद्यसामान्य हारितगोत्रआपस्तंबतैत्तिरीयस-
व(ब्र)ह्मचारीभट्टजोदरिपुत्राय श्रीप्रभाकरभट्टप्रमुखमहाजनाय द्वितीयार्धं दत्तं
संपिलिनगरभं(भु)क्त्यं(क्त्यं)तर्गतमंगलपुरकं
२८ नाम ग्रामः [।*] यस्य चाघाटाः [।*] पूर्व्वतः अंघिलिनगरकं च [।*]
दक्षिणत श्रीपुरग्रामः [।*] पश्चिमतः व्याघ्रपाटकं [।*] उत्तरतः [ढे][3]कुवेकं
[।*] एवमयं चतुराघाटनोपलक्षितः सोद्रंगः सपरिकरः अचाटभटप्रावेश्य
[ः*] आचंद्रार्का-
२९ र्णवक्षितिसरि[त्*]पर्व्वतसमकालीनभूमिछिद्रंन्यायेन शकनृपकालातीतसंवत्सर-
शतेसु सप्तसु सप्तचत्वारिंशत्यधिकेषु भाद्रपदः शुद्धनवम्यां कन्यागतसंक्रांतौ
सूर्यवारे महापर्वणि स्नात्वा उ-
३० दक(का)तिसर्गेण प्रतिपादितः । अत्र सें[प]टाचार्यस्य निवर्त्तनशतमेकं
विद्याधनीकृतं । [श्रेष्ठ]यो[ग्य]णागस्य उभयदिशायां भूमिनिवर्तनपंचालं
केन(ना)वि(पि) परिपंथना कार्या । उक्तं च भगवता वेदव्या-

१ जवखेड ताम्रपटातील 'येतोत्या'-श्लो. २३. हे वाचनही चुकीचे आहे.

२ 'प्रक्रमो'-तत्रैव.

३ शिळेवर ढे स्पष्ट दिसतो.

३१ सेन व्यासेन [।*] षष्टिवर्षसहस्राणि स्वर्गे तिष्ठति भूमिदः [।*] आछे-
(च्छे)ता(त्ता) चानुमंत्ता(ता) च तां(ता)न्येव नरके वसेत्। [।३६।।*]
य(या)नीह दत्तानि पुरा नरेंद्रैर्दानानि धर्मार्थयशस्कराणि [।*] निर्भुक्तमाल्यः-
(ल्य)प्रतिमानि तानि को–

३२ नाम साधुः पुनराददीतः(त) ।[। ३७।।*] लिखितं च श्रीत्ता(ता)वियप्देन
शंकरगणसूनुना परमेश्वराज्ञया इति ।।

० ० ०

# १५

# तृतीय इंद्रराज याचे वजीरखेड येथील दोन ताम्रपट

## उपलब्धी

नासिक जिल्ह्यातील मालेगाव तालुक्यात मालेगावपासून सुमारे चार मैल पूर्वेला वजीरखेड नावाचे एक गाव आहे. तेथील एक शेतकरी श्री. नारायणराव मोतीराम माळी यांना सुमारे एका वर्षापूर्वी आपले शेत नांगरत असताना ताम्रपटांचे दोन संच मिळाले. ते त्यांनी मालेगाव येथील एक इतिहासप्रेमी शिक्षक श्री. ना. अ. रहाळकर यांना दाखविले. त्यांतील एक ताम्रपट-संच त्यांनी मुंबई येथे पुरातत्त्व व पुराभिलेख विभागाचे संचालक डॉ. मो. गं. दीक्षित यांच्याकडे पाठविला. डॉ. दीक्षित यांनी संपादनासाठी तो माझ्या स्वाधीन केला. श्री. ना. मो. माळी यांच्याजवळ असलेला दुसरा ताम्रपट मालेगाव येथील कला—विज्ञान महाविद्यालयाचे प्राचार्य श्री. रा. बे. खैरनार यांनी श्री. रहाळकर यांच्या मध्यस्थीने मला मिळवून दिला. या ताम्रपटांची माहिती लखनौ येथील डॉ. ज्योतिप्रसाद जैन यांच्याकडे मालेगाव येथील श्री. नंदलाल कासलीवाल आणि श्री. चंदुलाल पहाडे या सद्गृहस्थांनी पाठविली होती. तिच्या आधारे त्यांनी 'जैन संदेश' (शोधांक २४) या मासिकात एक लेख लिहिलेला आहे. तथापि, डॉ. जैन यांना मूळ ताम्रपट पाहावयास न मिळाल्यामुळे त्यातील माहिती अपूर्ण आणि अनेक ठिकाणी चुकीची आहे. मूळ ताम्रपटांच्या आधारे या ठिकाणी मी या दोन्ही ताम्रपटांचे संपादन करीत आहे. वरील सर्व सद्गृहस्थांचा आणि भारत सरकारचे सेवानिवृत्त पुराभिलेखाधिकारी श्री. न. लक्ष्मीनारायण राव व डॉ. वा. वि. मिराशी यांचा मी अत्यंत ऋणी आहे.

## ताम्रपटांच्या मुद्रा

ताम्रपटांच्या प्रत्येक संचात तीन ताम्रपत्रे आहेत. त्यांतील प्रत्येक ताम्रपत्राची लांबी १४ इंच व रुंदी ९.५ इंच आहे. प्रत्येक पत्र्याचे वजन ४ किलो आहे. ताम्रपट क्रमांक १ ची मुद्रा व कडी यांचे एकत्रित वजन दोन किलो चारशे ग्राम आहे, तर ताम्रपट क्रमांक २ ची मुद्रा व कडी यांचे वजन २ किलो ६०० ग्राम आहे. ताम्रपत्र, कडी व मुद्रा मिळून ताम्रपट क्र. १ चे एकूण वजन १४ किलो ४०० ग्राम, तर ताम्रपट

क्र. २ चे एकूण वजन १४ किलो ६०० ग्रामआहे. ही पत्रे सुमारे अर्धा इंच जाडीच्या एकेका गोलाकार कडीत ओवलेली होती. प्रत्येक कडीचा व्यास ३ इंच आहे. कडीची दोन्ही टोके एकेका चौरस मुद्रेत फसवलेली असून मुद्रेची लांबी व रुंदी २.८ इंच आहे. माझ्याकडे हे दोन्ही ताम्रपट आले त्या वेळेला ह्या कड्या सुरक्षित होत्या. त्या कापलेल्या नव्हत्या. प्रत्येक मुद्रेवर उठावामध्ये कमळासनावर बसलेल्या गरुडाची आकृती असून त्याचे पंख शरीराच्या दोन्ही बाजूंना पसरलेले दिसतात. त्याच्या दोन्ही हातांत सर्प असून त्यांच्या फणा स्पष्ट दिसतात. शरीरावर जानव्या-सारखा जो भाग दिसतो तो वस्तुतः गरुडाने उजव्या हातात धरलेल्या सर्पाच्या शरीराचा भाग होय, आणि गरुडाच्या गळ्याभोवती दागिन्यासारखा जो भाग दिसतो ते वस्तुतः त्याने आपल्या डाव्या हातात धरलेल्या सर्पाच्या शरीराचे वेटोळे होय. गरुडाच्या उजव्या अंगाला वरच्या कोपऱ्यात गणपतीची मूर्ती उठावात कोरलेली असून त्याखाली एक चवरी आणि तिच्या खाली समईची आकृती आहे. गरुडाच्या डाव्या बाजूला वरच्या कोपऱ्यात सिंहावर आरूढ झालेल्या दुर्गा देवीची आकृती आहे. सिंहाचे पाय मुद्रेवर स्पष्ट दिसतात. तोंडाचा भाग मात्र किंचित अस्पष्ट झालेला आहे. सिंहाच्या आकृतीखाली एक चवरी असून तिच्याखाली स्वस्तिक कोरलेले आहे. गरुडाच्या दोन्ही बाजूंना वर दोन पूर्णाकृती गोल चिन्हे आहेत. बहुधा सूर्य व चंद्र यांच्या त्या आकृत्या असाव्यात. कमला-सनस्थ गरुडाच्या खाली एक लेख आहे. ताम्रपट क्र. १ च्या मुद्रेवरील या लेखातील आरंभीची 'श्रीमन्नित्य' ही अक्षरे स्पष्ट दिसतात. दुसऱ्या ताम्रपटाच्या मुद्रेवरील आरंभीची 'मन्नि' व शेवटची 'वर्षदेवस्य' ही अक्षरे स्पष्ट दिसतात. यावरून दोन्ही मुद्रांवरील ही अक्षरे 'श्रीमन्नित्यवर्षदेवस्य' अशी असावीत यात शंका नाही. प्रत्येक मुद्रेवर चारी बाजूंना सरळ रेषा कोरलेल्या असून त्यात अनेक चिन्हे, विशेषतः शस्त्रांची चिन्हे कोरलेली आढळतात.

## ताम्रपत्रांचे वर्णन : कोरकाच्या चुका

ताम्रपटांच्या प्रत्येक संचात तीन ताम्रपत्रे असून प्रत्येक ताम्रपत्राच्या कडा किंचित उंचावलेल्या आहेत. पहिल्या व तिसऱ्या पत्र्याच्या आतील बाजूवर व दुसऱ्या पत्र्याच्या दोन्ही बाजूंवर ताम्रपटातील मजकूर कोरलेला आहे. साधारणपणे प्रत्येक पत्र्यात १७ ओळी आहेत. ताम्रपट क्र. १ च्या दुसऱ्या पत्र्याच्या पहिल्या बाजूवर मात्र १६ ओळी असून तिसऱ्या पत्र्यावर शेवटी काही अक्षरे अधिक कोरलेली आहेत. सारांश, ताम्रपट क्र. १ मधील मजकुराच्या एकूण ६७ ओळी असून ताम्रपट क्र. २ मधील मजकूर एकूण ६९ ओळींचा

आहे. प्रत्येक ओळीत साधारणपणे ४० ते ४२ अक्षरे असून अक्षरांची उंची अर्धा इंच आहे. दोन्ही ताम्रपटांतील मजकूर स्वच्छ व ठसठशीत कोरलेला आहे. तथापि, काही ठिकाणी मात्र कोरकाच्या अनवधानाने कोरण्यात चुका झालेल्या आढळून येतात. श्लोकांच्या शेवटी सामान्यतः दोन उभे दंड कोरण्यात आलेले आहेत. तथापि, ताम्रपट क्र. १ मधील ६, १२ व १६ व्या ओळीत अनुक्रमे ४, ७ व १० व्या श्लोकांच्या शेवटी, आणि ताम्रपट क्र. २ मधील ८, १२ आणि १६ व्या ओळीत ५, ६, ७ आणि १० व्या श्लोकांच्या शेवटी हे दंड कोरण्याचे राहून गेलेले आहे. दोन्ही ताम्रपटांतील ११ व्या ओळीत **देवः** या शब्दासमोर दोन दंड चुकीने कोरले गेले आहेत. वस्तुतः ते १२ व्या ओळीतील **वर्ष:** या शब्दासमोर कोरायला पाहिजे होते. ताम्रपट क्रमांक १ मध्ये **ब** ऐवजी **प** (ओ. २८), **त्व** ऐवजी **त्र** (ओ ३६), **थ** ऐवजी **छ** (ओ. ५९) आणि **व** ऐवजी **च** (ओ. ६१) ही अक्षरे चुकीची कोरली आहेत. तसेच ओळ ४४ मधील **ध्या** या अक्षरावर आणि ओळ ५५ मधील **ता** या अक्षरावर एकेक मात्रा चुकून कोरण्यात आलेली आहे. ताम्रपट क्र. २ मधील ४१ व्या ओळीतील **इर्ष्वं** या शब्दावर प्रथम अनुस्वार कोरलेला होता पण नंतर तो रद्द केल्याचे दिसून येईल. ५५ व्या ओळीतील **उत्तरा** या शब्दानंतर एक विसर्ग चुकून कोरण्यात आलेला होता, तोही मागाहून रद्द केलेला आढळतो. ओळ ६३ मध्ये **एवं** या अक्षरातील **ए** ऐवजी प्रथम **प** कोरण्यात आलेला होता पण मागाहून त्याचे **ए** मध्ये रूपांतर करण्यात आले आहे. कदाचित त्या काळी **ए**चे वळण **प** सारखे असण्याचा संभव आहे. ह्या काही चुका सोडून दिल्या तर दोन्ही ताम्रपटांतील मजकूर चांगला कोरण्यात आलेला आहे यात शंका नाही.

## अक्षरांचे वळण

ताम्रपटांतील अक्षरांचे वळण उत्तरभारतीय अक्षरांच्या स्वरूपाचे आहे. पुढील काही गोष्टी विशेष लक्षात घेण्यासारख्या आहेत. (१) ता. क्र. २ ओ. ५२, ५६ मधील **उ** या अक्षराचे वळण. (२) व्यंजनांतर्गत **आ** या स्वराचे चिन्ह सामान्यतः अक्षरापुढे एक काना जोडून दाखविले आहे. पण काही ठिकाणी अक्षरावरील शिरोरेषेच्या उजव्या बाजूला ऊर्ध्वमुख अर्धवर्तुळ कोरूनही ते दाखविले आहे. उदा. ता. क्र. १ मधील ४, ५, २० इत्यादी, व ता. क्र. २ मधील ४, ५, ४२, ४३ इत्यादी ओळी पाहा. (३) ता. क्र. १ व ता. क्र. २ ओ. ८, १७, १९, २६ इत्यादीमधील **इ** चे चिन्ह. (४) शिरोरेषेवरील मात्रेप्रमाणेच पृष्ठमात्रेचाही विपुल प्रमाणात उपयोग करून **ए** कार दाखविला आहे. (५) **प** सारखे दिसणारे **ए** या अक्षराचे वळण. ता. क्र. २, ओ.५५ व ६३ पाहा. (६) दोन्ही ताम्रपटांत ओ. २ मधे लाञ्च्छन या

शब्दातील ज चे वळण. (७) ता. क्र. १ मधील ख या अक्षराचे ओ. ३, १५, २९ व ओ. ७, ३६, ३९ मधील भिन्न वळण. ता. क्र. २ मध्ये सामान्यत: हे दुसरे वळण आढळते. (८) ध आणि व ही अक्षरे सारखीच आहेत. ध अक्षरावर शिरोरेषा नाही. अर्थात, शिरोरेषारहित **व**=**ध**. काही ठिकाणी **ध** वर चुकून शिरोरेषा कोरलेली आहे. उदा. क्र. २ ओ. १९, २० पाहा (९) **ब** साठी सर्वत्र **व** कोरलेला आहे. (१०) **ष** चे वळण **थ** सारखेच आहे. यामुळे वाचनात घोटाळा उडण्याचा संभव आहे. उदा. ता. क्र. २ मधील ओ. ४६ व ४७ पाहा.

### भाषा

ताम्रपटांतील मजकूर संस्कृत भाषेत लिहिलेला असून भाषा साधारणपणे सर्वत्र शुद्ध आहे. शुद्धलेखनातील काही विशेष पुढीलप्रमाणे : (१) **र** नंतर आलेली व्यंजने बहुधा **द्वित्त** केलेली आहेत. अपवाद–**धूर्जटिना**–ओ. ४, **निर्मूलिता**–ओ ९, **गूर्जर**:–ओ. १४, **ऊर्जित**–ओ–१८, ३७, **निर्जित**–ओ. ता. क्र. १ मधील २९, ३४ व ३९; आणि ता. क्र. २ मधील २३, ३४ व ३८, **दोर्षैर्भुहु**:–ओ. ता. क्र. १-२५ आणि ता. क्र. २-२४, **सर्गेण**–ओ. ता. क्र. २-५१. (२) बहुधा याच कारणामुळे **त्र** हे जोडाक्षर दोन्ही ताम्रपटांत **त्त्र** असे कोरलेले आहे. (३) पुढील शब्दांत परसवर्णाच्या ऐवजी अनुस्वारांचा उपयोग केलेला आहे. उदा. कृतालंकृता --ता. क्र. १ ओ. ५, विमुंचति–ओ. १४, पतंग–ओ. २६, भ्रूभंग, भंग–ओ. २६ २७, अंचित व कांचन–ता. क्र. १, ओ ३२ आणि ता. क्र. २, ओ. ३१. (४) ता. क्र. २ मध्ये ओळ ६३ व ६६ मध्ये अनुक्रमे पश्चिम आणि वंश्यै: या शब्दांत **श** च्या ऐवजी **स** योजला आहे.

सामान्यत: गावाच्या दिशा निर्दिष्ट करताना **पूर्वत**:, **पश्चिमत**: इत्यादी रूपे वापरण्यात येतात, पण या दोन्ही ताम्रपटांत पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर अशीच रूपे वापरलेली आहेत, हे विशेष लक्षात घेण्यासारखे आहे.

### उद्देश : जैन वसतींना दाने

दोन्ही ताम्रपटांतील मजकूर पद्यात आणि गद्यात अशा संमिश्र स्वरूपाचा आहे. श्लोकांच्या शेवटी क्रमांक निर्दिष्ट केलेले नाहीत. प्रत्येक ताम्रपटात आरंभी २१ श्लोक असून नंतरचा भाग गद्यात लिहिलेला आहे. दोन्ही ताम्रपटांत शेवटी शापवचनाचे श्लोक आलेले आहेत. ताम्रपट क्र. १ मध्ये शापवचनाचे तीन श्लोक आलेले असून ताम्रपट क्र. २ मध्ये मात्र एकच श्लोक घातलेला आहे. ताम्रपट कोरताना शेवटी जागेच्या अभावी इतर श्लोक गाळण्यात आलेले असावेत असे वाटते.

तथापि, 'अत्रैव राम श्लोकार्थम्' असे निर्दिष्ट करून या ठिकाणी हे श्लोक सूचित केलेले आहेत.

ताम्रपट क्र. १ चा उद्देश **चंदनापुरी** येथील **अमोघ** नावाच्या जैन वसतीला, वसतीची जागा आणि इतर दोन गावे द्रविड संघाच्या विशेष **वीरगणातील चीर्णाय** अन्वयातील लोकभद्राचा शिष्य वर्धमान नावाच्या गुरूला दान देण्याचा आहे, तर ताम्रपट क्र. २ चा उद्देश **वडनेर** येथील **उरिअम्म** नावाच्या वसतीला, वसतीची मूळ जागा आणि इतर ६ गावे तेथील द्रविड संघाच्या विशेष **वीरगणातील वीर्णाय्य** अन्वयाच्या गादीवरील वर्धमान नावाच्या गुरूला दान देण्याचा आहे. ही दाने महाराजाधिराज परमेश्वर श्रीमत् अकालवर्षदेवाच्या (म्हणजेच द्वितीय कृष्णराजाच्या) चरणाचे ध्यान करणाऱ्या 'श्रीमन्नित्यवर्षदेव पृथ्वीवल्लभ श्रीवल्लभ नरेंद्रदेव' याने दिलेली आहेत. राष्ट्रकूट नृपती तृतीय इंद्रराज याचीच ही नावे व बिरुदे होत.

## कालनिश्चिती

तृतीय इंद्रराज आपल्या पट्टबंधोत्सवासाठी कुरुंदक येथे गेला असताना त्याने ही दाने दिलेली आहेत. दानपत्रांचा काळ 'शकनृपकालातीत संवत्सरशतेष्वष्टासु षट्त्रिंशदुत्तरेषु' (ओ. ४९) म्हणजे गत शक ८३६, युव संवत्सर फाल्गुन शुद्ध सप्तमी, शुक्रवार, मृगशीर्ष नक्षत्र, असा दोन्ही ताम्रपटांत तपशीलवार दिलेला आहे. दि. ब. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे हा कालनिर्देश तंतोतंत बरोबर आहे. इंग्रजी कालगणने-प्रमाणे इ. स. २४ फेब्रुवारी ९१५ असा या दानपत्रांचा काळ निश्चित करता येतो.

## इंद्रराजाच्या ताम्रपटांचे सिंहावलोकन

तृतीय इंद्रराजाचे यापूर्वी चार ताम्रपट उपलब्ध झालेले आहेत. (१) बगुम्रा ताम्रपट,[१] क्रमांक १, (२), बगुम्रा ताम्रपट[२], क्रमांक २, (३) जांबगाव ताम्रपट[३], आणि (४) चिंचणी ताम्रपट[४] वजीरखेड ताम्रपटांच्या उपलब्धीने त्यांत आणखी दोन महत्त्वाच्या ताम्रपटांची भर पडलेली आहे. चिंचणी ताम्रपट सोडून इतर पाचही ताम्रपट कुरुंदक येथील पट्टबंधमहोत्सव प्रसंगी शके ८३६, युव संवत्सर फाल्गुन शुद्ध सप्तमीला दिलेले आहेत. बगुम्रा ताम्रपटात मृगशीर्ष नक्षत्राचा उल्लेख

---

१ एपि. इंडिका. वर्ष ९, पृष्ठे २४-४१.

२ तत्रैव.

३ एपि. इंडिका. वर्ष ३६, पृष्ठे २२३-३८.

४ तत्रैव, वष ३२, पृष्ठे ४५.

नाही, तो जांबगाव आणि वजीरखेड ताम्रपटांत आढळतो. जांबगाव ताम्रपटात शुक्रवार या शब्दासाठी 'वारे भृगुनंदनस्य' असे शब्द योजलेले आढळतात. चिंचणी ताम्रपटाचा काळ शके ८४८=इ. स. ९२६ आहे.

पट्टबंध उत्सवप्रसंगी तुलापुरुषाच्या पारड्यात चढून त्यातून खाली उतरण्यापूर्वी इंद्रराजाने ही दाने दिलेली आहेत. (ता. क्र. १, ओ. ५२; ता. क्र. २, ओ. ५०) बगुम्रा ताम्रपटात पट्टबंधोत्सव संपन्न झाल्यानंतर इंद्रराज तुलापुरुषात चढला असा उल्लेख आहे, तर वजीरखेड ताम्रपटात दुसऱ्या पारड्यात उत्कृष्ट सोन्याच्या राशी घालून इंद्रराजाने आपले वजन करून घेतले असा निर्देश आहे. या पाच ताम्रपटांपैकी बगुम्रा आणि जांबगाव या तीन ताम्रपटांत आरंभी राष्ट्रकूटनृपती इंद्रराज व त्याचे पूर्वज यांची वंशावळ वर्णन करणाऱ्या श्लोकांचा आराखडा एकच आहे, तर वजीरखेड येथील दोन्ही ताम्रपटांतील आराखडा त्याहून सर्वस्वी भिन्न आणि स्वतंत्र आहे. पहिल्या आराखड्यातील प्रशस्ती त्रिविक्रम भट्टाने लिहिलेली आहे, तर वजीरखेड ताम्रपटातील प्रशस्ती राजशेखराने लिहिलेली आहे.

बगुम्रा आणि जांबगाव या ताम्रपटांतील आराखडा एकच असला तरी तो तंतोतंत सारखा आहे, असे मात्र नाही. बगुम्रा ताम्रपट क्र. १ मध्ये वंशावळी वर्णनाचे एकूण २४ श्लोक आहेत, तर क्र. २ मध्ये २३ श्लोक आहेत. पहिल्या ताम्रपटातील २१ वा श्लोक दुसऱ्या ताम्रपटात वगळलेला आढळतो. जांबगाव ताम्रपटात तर एकूण ३१ श्लोक आहेत, त्यांतील १२, १७, २५, २६, २८, २९ आणि ३० या क्रमांकांचे श्लोक सर्वस्वी नवीन आहेत. त्यात ऐतिहासिक-दृष्टचा काही नवीन माहिती आलेली आहे असे नाही. सर्वसाधारण प्रशस्तीचे हे श्लोक आहेत. या तिन्ही ताम्रपटांतील दाने एकाच दिवशी दिलेली असून त्यांचा लेखक एकच असताना देखील यातील वंशावळी वर्णनाच्या श्लोकांत असा कमीअधिक फरक का असावा हे कळत नाही. दाने एकाच दिवशी दिलेली असली तरी दानपत्रांचे आराखडे नंतर केव्हा तरी तयार करून ते मागाहून कोरलेले असावेत असा तर्क करणे चूक होणार नाही. त्याच दिवशी दिलेल्या वजीरखेड ताम्रपटातील आराखडा तर सर्वस्वी भिन्न आणि स्वतंत्र आहे. यावरून वरील तर्काला पुष्टी मिळते.

### आरंभीचे दोन मंगल श्लोक

राष्ट्रकूटांच्या ताम्रपटांत प्रारंभी विष्णू आणि शिव यांच्या संरक्षणाची प्रार्थना करणारा एक श्लोक ('स वोव्याद्वेधसा धाम' इत्यादी) असतो. बगुम्रा आणि जांबगाव ताम्रपटांतही तसा तो आलेला आहे. तथापि, वजीरखेड ताम्र-

पटांत मात्र आरंभी त्याऐवजी जिनशासनाच्या प्रशस्तीचे दोन मंगल श्लोक आलेले आहेत. त्यांपैकी दुसरा श्लोक सुप्रसिद्ध जैन आचार्य भट्ट अकलंकदेव[१] यांच्या 'प्रमाणसंग्रह' नावाच्या ग्रंथातील मंगल श्लोक होय. तोच येथे उद्धृत केलेला आहे. पहिला श्लोकही प्रशस्ती-लेखकाने अशाच दुसऱ्या एखाद्या ग्रंथातून घेतलेला असावा. कदाचित त्याने स्वतःही तो रचला असणे शक्य आहे. यातील दाने जैन वसतींना दिलेली असल्यामुळेच बहुधा या ताम्रपटांच्या आरंभी जिनशासनाच्या प्रशस्तीचे हे श्लोक घातलेले असावेत. पण याचा अर्थ तृतीय इंद्रराज हा जैन धर्मानुयायी होता असा करता येईलसे वाटत नाही. बगुम्रा आणि जांबगाव ताम्रपटांतील शिव आणि विष्णू यांच्या प्रशस्तीपर श्लोकांवरून वंशपरंपरेने तृतीय इंद्रराज हाही हिंदू धर्मानुयायी होता असे स्पष्ट दिसते. फार तर असे म्हणता येईल की, जैन धर्माविषयी इंद्रराजाच्या मनात आदर आणि सहानुभूती होती, म्हणूनच तर त्याने जैन वसतींना यांतील दाने दिलेली आहेत. इंद्रराजाचा पणजोबा अमोघवर्ष हा जैन धर्मानुयायी होता असे 'आदिपुराण' ग्रंथकर्ता जिनसूरी आणि 'गणितसारसंग्रह' ग्रंथाचा लेखक महावीराचार्य यांनी म्हटले आहे हे खरे[२]. तसेच इंद्रराजाचे आजोबा अकालवर्ष किंवा द्वितीय कृष्णराज याचे शिक्षण 'आदिपुराण' ग्रंथाच्या शेवटच्या पाच अध्यायांचा लेखक गुणचंद्र यांच्या हाताखाली झाले होते हेही खरे[३]. तथापि, त्यावरून हे दोघे जैन धर्मानुयायी होते असे म्हणणे विद्वानांना मान्य नाही. इतर पुराव्यावरून ते हिंदू धर्मानुयायी होते असेच दिसून येते. हिंदू धर्माप्रमाणे जैन धर्म आणि जैन गुरू यांच्याविषयीही त्यांच्या मनात आदर व श्रद्धा होती एवढेच म्हणता येईल. तृतीय इंद्रराजाच्या बाबतीतही अशीच वस्तुस्थिती असावी.

### वंशावळ प्रशस्ती व चर्चा

प्रस्तुत वजीरखेड ताम्रपटात जिन-प्रशस्तीच्या या दोन मंगल श्लोकांनंतर राष्ट्रकूटांची वंशावळ वर्णन केलेली आहे. सोमवंशात जन्मलेल्या यदूच्या कुळात **श्रीकृष्णाने** जन्म घेतला होता. त्याच्या कुळात **दंतिदुर्ग** नावाचा एक सुप्रसिद्ध राजा होऊन गेला (श्लो. ३–६). दंतिदुर्गाच्या मृत्यूनंतर त्याचा काका **कृष्णराज (प्रथम)** गादीवर आला. कृष्णराजाला **गोविंदराज** या नावाचा मुलगा होता.

---

१ न्यू इंडियन अँटिक्वेरी, वर्ष २, पृ. १११.

२ दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन, संपा. यज्ञदानी. पृ. २७९.

३ तत्रैव, पृ.२८५.

हाच द्वितीय गोविंदराज म्हणून ओळखला जातो. बगुम्रा व जांबगाव ताम्रपटांतील वंशावळीत याचे नाव गाळले आहे, पण प्रस्तुत वजीरखेड ताम्रपटांतील ७ व्या श्लोकात मात्र ते आले आहे. तथापि, त्यावरून हा द्वितीय गोविंदराज गादीवर बसला होता की नाही ते निश्चित कळत नाही. तो खरोखर गादीवर बसला होता की नाही या प्रश्नाविषयी विद्वानांत बरेच दिवस मतभेद होता. पण या गोविंदराजाच्या कडबा आणि दौलताबाद ताम्रपटांच्या उपलब्धीमुळे आता त्यावर पडदा पडला आहे. तो गादीवर बसला होता हे निश्चित झाले आहे. हा द्वितीय गोविंदराज राज्यकारभारात फारसे लक्ष घालीत नसे. आपला धाकटा बंधू निरुपम (ध्रुव) याच्यावर राज्यकारभार सोपवून तो स्वतः सुखविलासात मग्न असे. **निरुपम = ध्रुव** हा महत्त्वाकांशी होता. त्याने या संधीचा फायदा घेऊन आपल्या वडील बंधूशी युद्ध करून त्याला पदच्युत केले व स्वतः राज्यसिंहासन बळकावले.[1] हा निरुपम, ध्रुव, धारावर्ष या नावांनीही प्रसिद्ध आहे. त्याच्या नंतर **जगतुंगदेव** (=**तृतीय गोविंद**) गादीवर बसला. त्याच्या मागून त्याचा सुपुत्र अमोघवर्ष याला राजपद प्राप्त झाले. (श्लो. ७)

श्लोक ८ मध्ये **अमोघवर्षाला** 'चालुक्यांचा कालानल' म्हटले आहे. त्यावरून त्याने केलेल्या चालुक्य वंशाच्या विध्वंसाची कल्पना येते. इतिहासावरून आपणास असे कळते की, अमोघवर्ष गादीवर बसल्यावर लौकरच त्याच्या राज्यात अनेक बंडे झाली व त्यामुळे राष्टकूटांच्या साम्राज्यात सर्वत्र गोंधळ माजला. पूर्व चालुक्यनृपती द्वितीय विजयादित्य याने राष्टकूटांच्या राज्यावर स्वारी करून त्यांना पराभूत केले व सर्व राज्य पादाक्रांत केले. या संकटाच्या काळी अमोघवर्षाचे काका कर्क ऊर्फ पातालमल्ल याने बंडखोरांचा बीमोड केला. पूर्व चालुक्यांच्या विरुद्ध विंगवल्लीच्या रणांगणावर अमोघवर्षाचे दीर्घकाळ युद्ध चालू होते. त्यात अमोघवर्षाचा अखेरीस विजय झाला. बगुम्रा ताम्रपटावरून कळते की, झाडे फुलासकट उपटून जाळावी त्याप्रमाणे चालुक्यांचा विध्वंस करून अमोघवर्षाने चालुक्य समुद्रात बुडत असलेल्या राष्टकूटलक्ष्मीला वर काढले.[2] स्तंभ हा शब्द श्लिष्टार्थाने वापरला आहे. त्यावरून असे सूचित होते की, अमोघवर्षाने स्तंभ नगराचा विध्वंस केला होता. हे स्तंभनगर म्हणजे बंगालच्या मिदनापूर जिल्ह्यातील प्राचीन ताम्रलिप्त (=आजचे तामलक) शहर होय, असे डॉ. डी. आर. भांडारकरांनी

---

१ डॉ. अळतेकर. राष्टकूट अँड देअर टाइम्स. पृ. ४९.

२ इंडि. अँटि, वर्ष १२, पृ.२४९

म्हटले होते; पण ते बरोबर नाही. वस्तुतः ते आंध्रप्रदेशातील कर्नूल जिल्ह्यातील कुंभम् होय. चालुक्यांच्या राज्यातील हे महत्त्वाचे शहर असले पाहिजे.

याच श्लोकावरून आपणाला कळते की, अमोघवर्षाला **कृष्णराज** (द्वितीय) नावाचा मुलगा होता. तो नंतर गादीवर बसला. याची राणी चेदि राजाची मुलगी होती. तिच्या नावाचा उल्लेख केलेला नाही. हा चेदि राजा म्हणजे मध्यप्रदेशातील त्रिपुरा येथे त्यावेळी राज्य करणारा कोक्कल नृपती होय असे सांगली[1] आणि कर्डा[2] या ताम्रपटावरून कळते. या दोघांना झालेल्या मुलाचे नाव **जगत्तुंग**. (श्लो. ८) हाच प्रस्तुत दानपत्रे देणाऱ्या तृतीय इंद्रराजाचा पिता होय.

**लक्ष्मीची वांशिक परंपरा**

यानंतर जगत्तुंगाची पत्नी आणि तृतीय इंद्रराजाची आई लक्ष्मी हिची वांशिक परंपरा पुढील दोन श्लोकांत वर्णन केलेली आहे. आपल्या सहस्र बाहूंनी नर्मदेचे पाणी थोपवून धरून तिचा ओघ अनेक धारांमध्ये विभागणाऱ्या आणि रावणाचा गर्व हरण करणाऱ्या सहस्रार्जुन नृपतीच्या वंशात हैहय कुळाला भूषणभूत झालेला **कोक्कल** नावाचा राजा चेदि देशावर राज्य करीत होता. त्याला **शंकरगण** या नावाचा मुलगा होता. (श्लो. १०) त्याचा विवाह चालुक्य कुळातील **सिंहुकाचा** मुलगा जो **अरयम्म** त्याच्या मुलीशी झालेला होता. शंकरगणाला अरयम्माच्या कन्येपासून जी मुलगी झाली तिचे नाव लक्ष्मी, हीच जगत्तुंगाची पत्नी बनली. शंकरगणाचे दुसरे नाव शंकुक असे याच श्लोकात आलेले आहे. (श्लो. ११)

बगुम्रा आणि जांबगाव ताम्रपटांत देखील लक्ष्मीच्या पूर्वजांचा हा वृत्तांत आलेला आहे. त्यांत आणि आपल्या वजीरखेड ताम्रपटांत कोक्कलाचा पुत्र म्हणून ज्या शंकरगणाचा किंवा शंकुकाचा उल्लेख आहे त्याचेच नाव रणविग्रह म्हणून निर्दिष्ट केलेले आढळते. सांगली ताम्रपटात लक्ष्मीच्या वडिलांचे नाव रणविग्रह, तर कर्डा ताम्रपटात शंकरगण आणि शंकुक अशी आढळतात. शंकुक हे शंकरगण शब्दाचेच संक्षिप्त रूप होय. अर्थात, रणविग्रह, शंकरगण अथवा शंकुक ही एकाच व्यक्तीची नावे होत यात शंका नाही. रणविग्रह ही बहुधा शंकरगणाची उपाधी असावी.

---

१ तत्रैव, पृ. २५०

२ तत्रैव, पृ. २६५.

## चालुक्य नृपती सिंहुक आणि अरयम्म

प्रस्तुत वजीरखेड ताम्रपटात ऐतिहासिक दृष्ट्या नवीन माहिती मिळते ती अशी की, या शंकरगणाची पत्नी, अर्थात, लक्ष्मीची आई, ही चालुक्यांच्या कुळातील कन्या असून तिच्या वडिलांचे नाव अरयम्म आणि आजोबाचे नावे सिंहुक असे होते. वगुम्रा आणि जांबगाव या ताम्रपटांत ही माहिती नाही. चालुक्यांच्या कुळातील सिंहुक आणि अरय्यम हे राजे कोण असावे याचा शोध आजच्या ज्ञात इतिहासावरून लागत नाही.

## जगतुंग आणि गूर्जर (प्रतिहार)

द्वितीय कृष्णराजाच्या मृत्यूपूर्वीच जगत्तुंग मृत्यू पावला आणि म्हणून गादीवर बसण्याचे भाग्य त्याला लाभले नाही, हे खरे असले तरी आपल्या वडिलांच्या बरोबर किंवा स्वतंत्रपणे त्याने गूर्जर प्रतिहारांच्या विरुद्ध झालेल्या युद्धात प्रत्यक्ष भाग घेतलेला असावा असे दिसते. गूर्जर प्रतिहारांच्या देशातील वृद्ध लोक पावसाळ्यात दिसणारे इंद्रधनुष्य आणि होणारी मुसळधार वृष्टी पाहून पूर्वी कृष्णराज आपल्या अशाच धनुष्यातून पर्जन्यधारांप्रमाणे बाणांचा वर्षाव कसा करीत होता यासंबंधी वर्णने अजूनही करतात, असे द्वितीय कृष्णराजाच्या पराक्रमाचे वर्णन वगुम्रा आणि जांबगाव ताम्रपटांत आलेले आहे. वजीरखेड ताम्रपटात कृष्णराजाच्या पराक्रमाचे असे वर्णन आढळत नाही. उलट, गूर्जर प्रतिहारांच्या विरुद्ध झालेल्या युद्धातील जगत्तुंगाच्या पराक्रमाचे वर्णन त्यातील ९ व्या श्लोकात आलेले आहे. 'ज्याच्या तरवारीच्या प्रचंड घावांनी छिन्नविछिन्न झालेले पण युद्धातून कसेबसे वाचलेले गूर्जर वीर आपला भयज्वर अजूनही सोडीत नाहीत' –(म्हणजे, अजूनही ते भीतीने थरथर कापत असतात) असे वर्णन या श्लोकात आहे. त्यातील 'ज्याच्या (यस्य)' या पदाचा संबंध मागील श्लोकातील जगत्तुंगाशी आहे हे अगदी स्पष्ट दिसते. तेव्हा आपल्या तरवारीच्या घावांनी गूर्जरांना छिन्नविछिन्न आणि भयभीत करून सोडणाऱ्या जगत्तुंगाच्या पराक्रमाचे हे वर्णन होय यात शंका नाही. गूर्जर म्हणजे उत्तर हिंदुस्थानातील महोदय अथवा कनोज येथे राज्य करणाऱ्या गूर्जर प्रतिहारांच्या विरुद्ध कदाचित दोन स्वतंत्र युद्धे होऊन पहिल्यात कृष्णराजाने आणि दुसऱ्यात जगत्तुंगाने असे पराक्रम गाजवले असावेत; किंवा दोघांनीही एकाच युद्धात ते पराक्रम गाजविले असावेत असे दिसते. कदाचित असेही असणे शक्य आहे की, गूर्जर प्रतिहारांच्या विरुद्ध झालेल्या लढाईची सूत्रे जगत्तुंगाच्या हाती असावीत, पण प्रत्यक्ष गादीवर द्वितीय कृष्णराज असल्यामुळे वगुम्रा आणि जांबगाव ताम्रपटांत या पराक्रमाचे श्रेय त्याला दिलेले असावे. त्यात वर्णन केलेला पराक्रम करण्याइतपत

कृष्णराजाचे वय त्यावेळी नव्हते कारण, त्यावेळी तो बराच वृद्ध असावा असे त्याच्या कारकीर्दीच्या कालखंडावरून दिसून येते. दुसरे असे की, जगत्तुंग हे काही विशेषनाम नाही. ती एक उपाधी असावी आणि कृष्णराजाच्या या मुलाने आपल्या पराक्रमाने ती मिळविलेली असावी असे ११ व्या श्लोकातील 'पराक्रमोर्जितजगत्तुंगस्य' या पदावरून दिसून येते. बगुम्रा आणि जांबगाव ताम्रपटातील अनुक्रमे १६ व १८ या श्लोकांतील 'जनितभंगो वैरिवृंदस्य' 'वल्लभो वीरलक्ष्म्या:' ही विशेषणे देखील जगत्तुंगाने केलेल्या पराक्रमाची सूचक असून त्याचा तो पराक्रम गूर्जर प्रतिहारांच्या विरुद्ध झालेल्या युद्धातील असावा असे प्रस्तुत वजीरखेड ताम्रपटांतील ९ व्या श्लोकावरून म्हणावयास हरकत नाही.

### इंद्रराजाचे राज्यारोहण व नातेवाइकांचे बंड

जगत्तुंग आणि लक्ष्मी यांना झालेल्या मुलाचे नाव **इंद्रराज (तृतीय)** होय. यानेच प्रस्तुत दानपत्रे दिलेली आहेत. १२ ते २१ या श्लोकांत त्याची प्रशस्ती आलेली आहे. त्यात प्रशस्तीलेखकाने इंद्रराजाला सर्वगुणसंपन्न म्हणून वर्णन केल्याचे दिसून येईल. प्रशस्तीचे हे श्लोक प्रशस्तीलेखकाच्या स्वभावाला अनुसरून ठराविक पद्धतीचे आणि अतिशयोक्त असले तरी त्यांतून ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाच्या माहितीचे काही कण गोळा करता येणे शक्य आहे असे मला वाटते. पुढील श्लोकाकडे अभ्यासकांचे लक्ष मी विशेष वेधतो.

तेजो वीक्षितुमक्षमा: क्षणमपि स्वैरेव दोषैर्मुहु–
भ्रान्ता: सन्ततमक्रमेण सहसा संगम्य सर्वेप्यमी ।
व्यालोलाश्चलपक्षपातविकला दीप्रप्रतापानले
दायादा: स्वयमेव यस्य पतिता दीपे पतंगा इव ॥१६॥

सामान्यत: अशी समजूत आहे की, द्वितीय कृष्णराजाच्या मृत्यूनंतर त्याचा नातू (तृतीय) इंद्रराज हा निर्विघ्नपणे गादीवर बसला.[1] तथापि, इंद्रराजाचे राज्यारोहण निर्विघ्नपणे झाले असावे असे वरील श्लोकावरून दिसून येत नाही. कृष्णराज मृत्यू पावला त्यावेळेला त्याचा मुलगा जगत्तुंग हा जिवंत नव्हता. म्हणून जगत्तुंगाचा पुत्र इंद्रराज याला गादी मिळणे न्याय्य होते. तथापि, त्यावेळी गादीवर वारसाहक्क सांगणारे कृष्णराजाचे काही नातेवाईक असावेत. इंद्रराज गादीवर बसल्यानंतर इंद्रराजाच्या दायादांना त्याचे ते तेज क्षणभरदेखील सहन होऊ शकले नाही. आपापल्या दोषांनी भ्रांत होऊन जे इतस्तत: एकसारखे भ्रमण करीत होते ते सर्व एकत्रित येऊन इंद्रराजावर चाल करून गेले. परंतु त्यांच्यातच फूट पडल्यामुळे

१ डॉ. अळतेकर. दि राष्ट्रकूटाज अँड देअर टाइम्स, पृ. १००.

(पक्षपातविकलाः), ज्योतीवर झडप घालून तिच्या आचेने पंख गळून पडल्यामुळे पतंग ज्याप्रमाणे जळून खाक होतात, त्याप्रमाणे इंद्रराजाच्या पराक्रमाने ते सर्व पराभूत किंवा नष्ट झाले (**पतिताः**). यानंतर शत्रूंच्या माथ्यावर आणि आपल्या सिंहासनावर इंद्रराजाने एकाचवेळी आक्रमण केले, (आणि नंतर) आपला द्वेष करणाऱ्या इतर शत्रूंचा केवळ आपल्या भ्रूभंगाने पराभव करून त्यांची राज्ये एका क्षणात केवळ मनोराज्याप्रमाणे (धुळीला मिळविली), असे वर्णन पुढील १७ व्या श्लोकात आलेले आहे.

यावरून दिसून येईल की, कृष्णराजाच्या मृत्यूनंतर त्याचा नातू इंद्रराज याला सिंहासनावर सुखासुखी बसता आले नाही. तो गादीवर आल्यानंतर त्याच्या नातेवाइकांनी, बहुधा इतर शत्रूंच्या साह्याने, त्याला पदभ्रष्ट करण्यासाठी बंडाळी माजविली असावी. ते बंड इंद्रराजाने आपल्या पराक्रमाने मोडून काढले. सारांश, वारसाहक्काने मिळणारे आपले सिंहासन त्याला आपल्या नातेवाइकांचा आणि इतर शत्रूंचा पराभव करून घ्यावे लागले आणि त्यानंतरच पृथ्वीने, कल्पलतेप्रमाणे त्याच्या सर्व इच्छा पूर्ण केल्या. (श्लो. १७) आपल्या पराक्रमाने शेष-इंद्रादिकांना जिंकणाऱ्या या इंद्रराजाची तिन्ही श्वेत छत्रे, त्याच्या कीर्तीप्रमाणे त्रैलोक्यात कशी चमकत होती, आणि त्याची सेवा करण्यासाठी, विनतेचा पुत्र गरुड स्वतः त्याच्या ध्वजावर कसा येऊन राहिला, याचे श्लो. १८ व १९ मध्ये गौरवपूर्ण शब्दांत वर्णन केले आहे. त्यानंतर त्याने आपणाला राज्याभिषेक करून घेतला. श्लो. २० मध्ये इंद्रराजाने राज्याभिषेकाच्या वेळी दिलेल्या अपूर्व दानाचे वर्णन आलेले आहे. आपल्या दानशूरतेने त्याने बळीराजालाही मागे टाकले. सर्व पृथ्वी जिंकून तो तिचा एकमेव स्वामी झाला. देवब्राम्हणांना अनेक दाने देऊन तो स्वतः नृपतींना वंदनीय झाला. (श्लो. २१.)

यानंतर ताम्रपटातील गद्य विभाग सुरू होतो. त्यात आरंभी इंद्रराजाचे सौंदर्य, शौर्य, चातुर्य, औदार्य, धैर्य, गांभीर्य, वीर्य इत्यादी गुण निर्दिष्ट करून श्रीगेय-चतुर्मुख, श्रीकीर्तिनारायण, श्रीमनुजत्रिनेत्र, श्रीराजमार्तंड, श्रीरट्टकंदर्प, श्रीविक्रमतुंग ही त्याची बिरुदावली काव्यमय शब्दांत वर्णन केली आहे. एवंगुणविशिष्ट नित्यवर्षदेवाचे म्हणजेच तृतीय इंद्रराजाचे आसन मान्यखेट येथील राजधानीत अधिक बळकट झाल्यानंतर ( **मान्यखेटराजधानीस्थिरतरावस्थानेन** ) आपल्या पट्टबंधमहोत्सवासाठी तो कुरुंदक येथे गेला. उत्सव संपल्यानंतर (सुवर्ण-दानासाठी) त्याने तुलापुरुषाच्या एका पारड्यात उज्ज्वल सोन्याच्या राशी घालून आणि दुसऱ्या पारड्यात स्वतः उभे राहून स्वतःला तोलून घेतले. पारड्यातून बाहेर पडण्यापूर्वी त्याने या दोन्ही ताम्रपटांतील दाने दिली.

### राज्याभिषेक व पट्टबंधोत्सव

ताम्रपट क्र. १ मधील २० व्या श्लोकात आणि ४६ व ४७ या ओळींत, त्याचप्रमाणे ताम्रपट क्र. २ मधील २० व्या श्लोकात आणि ४५ व ४६ या ओळींत आलेल्या राज्याभिषेकाच्या आणि पट्टबंधोत्सवाच्या निर्देशाकडे विशेष लक्ष वेधले पाहिजे. बगुम्रा आणि जांबगाव ताम्रपटांत राज्याभिषेक उत्सवाचा उल्लेख आढळत नाही, फक्त पट्टबंधोत्सवाचा उल्लेख आढळतो. पण प्रस्तुत वजीरखेड ताम्रपटातील २० व्या श्लोकात राज्याभिषेक उत्सवाच्या प्रसंगी इंद्रराजाने मनात राग न बाळगता, वेळ वाया न घालवता आणि विशेष बोलबाला न करता दाने कशी दिली याचे अत्यंत सुंदर वर्णन केलेले आहे. दोन्ही ताम्रपटांतील उपरोक्त ओळींत त्याने आपल्या मातापितरांच्या आणि स्वतःच्या ऐहिक आणि पारलौकिक पुण्याच्या आणि यशाच्या अभिवृद्धीसाठी, पूर्वी केव्हातरी देवालयांना दिले गेलेले पण नंतर लुप्त झालेले अग्रहार राज्याभिषेकाच्या वेळीं पुन्हा दान दिले, शिवाय २१ लाख उत्पन्नाची ६५० गावे दान दिली, असा स्पष्ट उल्लेख आहे. हा राज्याभिषेकाचा उत्सव मान्यखेट येथेच झाला असला पाहिजे, आणि त्यानंतरच पट्टबंधोत्सवासाठी तो कुरुंदक येथे गेला असावा असे स्पष्ट दिसते. अर्थात, राज्याभिषेक आणि पट्टबंध असे दोन भिन्न उत्सव असून ते निरनिराळ्या ठिकाणी स्वतंत्रपणे साजरे झाले असावेत असे अनुमान करण्याला हरकत नाही. या दोहोंचा काळ वेगवेगळा असला पाहिजे. ताम्रपटांत आलेला पट्टबंधोत्सवाचा काळ हा राज्याभिषेकाचा काळ मानता येणार नाही. त्यापूर्वीच राज्याभिषेक उत्सव झालेला असावा. इंद्रराजाचा आजोबा द्वितीय कृष्णराज याचा अंतिम उल्लेख शके ८३४ ( इ. स. ९१२ ) हा आढळतो[१] आणि इंद्रराजाचा पट्टबंधोत्सवाचा काळ शके ८३६ ( इ. स. ९१५ ) फाल्गुन शुद्ध सप्तमी, शुक्रवार आहे. या दरम्यानच्या काळात केव्हातरी इंद्रराज गादीवर बसला असावा असे अनुमान करण्याला हरकत नाही.

### बाणनृपती प्रभुमेरूचा उठाव व पराजय

या बाबतीत बगुम्रा आणि जांबगाव ताम्रपटांत आलेल्या तृतीय इंद्रराजाच्या एका विजयाचे वर्णन लक्षात घेतले पाहिजे. या ताम्रपटातील ' स जयति भुजदण्ड-संश्रयश्रीः' आणि 'कृतगोवर्द्धनोद्धारं –' या दोन श्लोकांवरून असे दिसून येते की, इंद्रराजाने कोणत्या तरी मेरू नावाच्या राजाचा पराभव करून त्यावर विजय मिळविलेला होता. डॉ. मिराशी यांच्या मते हा मेरू म्हणजे बाण वंशातील द्वितीय

---

१ तत्रैव, पृ. ९९.

विजयादित्य ऊर्फ प्रभुमेरू राजा होय. त्यांचे म्हणणे असे आहे की, प्रभुमेरूविरुद्ध मिळवलेला हा विजय तृतीय इंद्रराजाने तो स्वत: युवराज असताना आपले आजोबा द्वितीय कृष्णराजाच्या कारकीर्दीतच केव्हातरी मिळविलेला असावा. कारण, इंद्रराजाने दिलेल्या बगुम्रा आणि जांबगाव ताम्रपटांत त्याचा उल्लेख आहे, आणि हे ताम्रपट तर त्याच्या राज्यारोहणाच्या वेळी म्हणजे तो राज्यावर बसल्यावर पहिल्याच वर्षी दिलेले आहेत.[1] तथापि, राज्याभिषेक उत्सव आणि पट्टबंधोत्सव यांच्या काळात वजीरखेड ताम्रपटांवरून दिसून येणारी भिन्नता लक्षात घेता हे म्हणणे आता मान्य करता येणार नाही. ज्या अर्थी तृतीय इंद्रराजाच्या बगुम्रा आणि जांबगाव ताम्रपटांत त्याच्या विजयाचे हे वर्णन आलेले आहे त्याअर्थी राज्यावर बसल्यानंतरच त्याने हा विजय संपादन केला असला पाहिजे, असे मला वाटते. द्वितीय कृष्णराजाच्या कारकीर्दीत त्याने हा विजय संपादन केला असता तर त्याचे श्रेय द्वितीय कृष्णराजाला देण्यात आले असते. दुसरे असे की, कृष्णराजाच्या मृत्यूनंतर इंद्रराजाला आपल्या सिंहासनावर निर्विघ्नपणे बसता आले नाही हे आपण यापूर्वी पाहिले. त्याला आपल्या नातेवाइकांचा आणि इतर शत्रूंचा पराभव करून सिंहासन प्राप्त करून घ्यावे लागले, या संबंधीची चर्चा पूर्वी केलेलीच आहे. कदाचित कृष्णराजाच्या मृत्यूनंतर राष्ट्रकूटांच्या सिंहासनासंबंधी झालेल्या यादवीत इंद्रराजाच्या नातेवाइकांना प्रभुमेरूचे साह्य झाले असावे; किंवा या यादवीचा फायदा घेऊन प्रभुमेरूने स्वतंत्रपणे उठाव केला असावा. त्याचवेळी आपल्या नातेवाइकांच्या बरोबरच इंद्रराजाने प्रभुमेरूचाही पराभव केला असावा. ही यादवी युद्धे आणि प्रभुमेरूशी झालेले इंद्रराजाचे युद्ध लक्षात घेता कृष्णराजाच्या मृत्यूनंतर म्हणजे शके ८३४ (इ. स. ९१२) नंतर लागलीच केव्हातरी ही युद्धे होऊन शके ८३६ च्या पूर्वी केव्हांतरी इंद्रराज गादीवर बसला असावा, असे अनुमान करण्यास हरकत नाही.

### दोन्ही ताम्रपटांतील वर्धमान एकच

ज्यांना दाने दिलेली आहेत त्यांची नावे दोन्ही ताम्रपटांत वर्धमान अशीच आहेत. ताम्रपट क्र. १ मधील वर्धमान हा द्रविड संघातील चीर्नाय अन्वयातील कोण्यातरी लोकभद्र गुरूचा शिष्य होता, तर दुसऱ्या ताम्रपटातील वर्धमान हा द्रविड संघातील वीर्णाय्य अन्वयाच्या गादीवरील शिष्य होता एवढेच म्हटले आहे. वीर्णाय्य हा शब्द चीर्णाय्य असाही वाचता येऊ शकतो. पण ही केवळ कोरकाची

१ एपि. इंडिका, वर्ष ३६, पृ. २३१.

चूक असावी. या दोन्ही शब्दांनी एकच 'अन्वय' सूचित होतो यात शंका नाही. त्याचप्रमाणे दोन्ही ताम्रपटांतील वर्धमान ही व्यक्ती बहुधा एकच असावी. चंदनापुरी येथील अमोघ वसती आणि वडनेर येथील उरिअम्म वसती या दोन्ही वसतींचा तोच गुरु असावा. उपलब्ध जैन साहित्यात मला या वसतींची, द्रविडसंघाच्या वीरगणाची आणि त्यातील वीणाय्य अन्वयाची नावे आढळली नाहीत. ही सर्व माहिती नवीन असून ती प्रथमच उजेडात येत असावी. जैन धर्मातील द्रविड संघाच्या इतिहास–लेखनासाठी संशोधकांना ती अत्यंत उपयुक्त होईल.

**द्रविड संघ : वीरगण**

जैन धर्माच्या अनुयायांमध्ये वस्त्रपरिधानविषयक मतभेदांवरून प्रथम दिगंबर, श्वेतांबर व यापनीय असे तीन विभाग झाले. पुढे दिगंबर जैनांमध्येही सैद्धान्तिक व आचारविषयक मतभेदांवरून त्या त्या मतांच्या अनुयायांचे **संघ** स्वतंत्र स्थापन झाले. द्रविड संघ हा दिगंबर जैनांचा असा एक संघ होय. देवसेन आचार्यांच्या मते मदुरा येथील पूज्यपादांचे शिष्य वज्रनंदी यांनी द्रविड संघाची स्थापना शके ३९१ मध्ये केली. या संघाचे अनुयायी दिगंबर असले तरी वसतीमध्ये राहून वसतीसाठी दाने स्वीकारीत आणि शेती वगैरे करून आपला निर्वाह करीत. म्हणूनच देवसेन आचार्यांनी त्यांना जैनाभास असे म्हटले आहे. द्रविड संघ हे नाव त्यांच्या द्रविड-देशनिवासापासून आले आहे. पुढे त्यांच्यातही भेद निर्माण झाले. त्यांना **गण** म्हणतात. गणाचेच पोटभेद म्हणजे उपशाखा **अन्वय** म्हणून ओळखल्या जातात. प्रस्तुत ताम्रपटांत द्रविड संघाच्या सुप्रसिद्ध (विशेष) वीरगण नावाच्या गणातील वीर्णाय्य नामक अन्वयाचा उल्लेख आलेला आहे. महाराष्ट्रात सापडलेल्या ताम्र-पटांत द्रविड संघाचा उल्लेख **प्रथमच** उपलब्ध होत आहे. द्रविड संघातील विशेष वीरगण, वीर्णाय्य अन्वय, आणि त्यातील लोकभद्र व वर्धमान नावाचे गुरु यांचे उल्लेख जैन साहित्यात मला मिळाले नाहीत. ही माहिती प्रथमच उजेडात येत आहे असे वाटते.

या ताम्रपटांच्या उपलब्धीमुळे शके ८३६ म्हणजेच इ. स. ९१५ च्या पूर्वी महाराष्ट्रात जैन धर्मातील द्रविड संघाचा प्रवेश झाला असावा असे निश्चित म्हणता येते. या संघाच्या अनुयायांत तीर्थंकराच्या यक्षिणीची उपासना विशेष प्रचलित होती. वडनेर येथे **उरिअम्म** यक्षिणीचे जैनालय होते. चंद्रप्रभ तीर्थंकरांची उपासिका यक्षिणी ज्वालामालिनी हिचेच कानडी नाव **उरिअम्म** असे आहे. तिच्या उपासकांची ही **वसती** होती असे यावरून दिसून येते. चंदनपुरी येथील वसतीचे **अमोघ** हे नाव राष्ट्रकूट नृपती अमोघवर्षाशी निगडित असावे.

बहुधा त्याने दिलेल्या दानातून या वसतीची स्थापना झाली असणे शक्य आहे. इ. स. च्या ९ व्या – १० व्या शतकात द्रविड संघाचे दिगंबर मुनी नाशिक जिल्ह्यात येऊन स्थायिक झाले होते आणि त्यांना राष्ट्रकूट नृपतींकडून दानांच्या रूपाने आश्रय व प्रोत्साहन मिळत होते असे म्हणण्याला हरकत नाही. या ताम्रपटांच्या काळानंतर सुमारे दीडशे वर्षांनी मालवनृपती प्रथम भोज याच्या काळात दिला गेलेला कळवण ताम्रपट उपलब्ध आहे.[1] त्यावरून कळवणजवळ **औद्रहादि** विषयातील **मुक्तापल्ली** येथे श्वेतांबर जैनांचे स्थान असून तेथील आचार्य अम्मदेव नावाचे होते असे कळते. नाशिक जिल्ह्यातील जैन धर्माच्या प्रचाराच्या इतिहासाच्या दृष्टीने ही माहिती उपयुक्त होय.

## करविमुक्ती

या दोन्ही वसतींना दिलेली ही दाने नेहमीप्रमाणे त्या त्या गावातील उद्रंग, परिकर इत्यादी करांसहित दिलेली आहेत. तथापि, त्यातही एक महत्त्वाचा फरक आढळतो. नेहमीप्रमाणे 'अचाटभटप्रवेश' हे विशेषण ताम्रपट क्रमांक २ मध्ये आढळत नाही, ताम्रपट क्रमांक १ मध्ये ते आहे. ता. क्र. २ मध्ये ते अनवधानाने गळले असावे असे वाटते. तसे नसेल तर क्र. २ मध्ये दिलेल्या सहा गावांमध्ये चाट (=शिपाई) आणि भट (=सैनिक) यांना प्रवेश करून तेथील जनतेकडून आवश्यक असलेल्या वस्तू, पैसा वगैरे मागण्याचा हक्क होता, असे मानावे लागेल. जैन वसतींच्या निर्वाहासाठी ही दाने दिलेली असल्यामुळे शिपाई, सैनिक इत्यादींना तेथे प्रवेश करण्याचा हक्क दिला असेल असे वाटत नाही. 'अचाटभटप्रवेश' हे विशेषण ता. क्र. २ मध्ये अनवधानाने गळले असावे असेच मानणे योग्य होईल.

## स्थलनिश्चिती : मान्यखेट व कुरुंदक

प्रस्तुत दोन्ही ताम्रपटांत आलेल्या राष्ट्रकूटांच्या राजधानीचे नाव मान्यखेट म्हणजेच सध्याचे मालखेड. (तालुका सेरम, जिल्हा गुलबर्गा, कर्नाटक राज्य). पट्टबंध उत्सवाचे स्थान कुरुंदक म्हणजे तापी नदीवरील कडोदा हे गाव असावे असे डॉ. रा. गो. भांडारकर यांचे मत होते. श्री. जॅक्सन यांच्या मते ते कोल्हापूर जिल्ह्यातील कृष्णा आणि पंचगंगा यांच्या संगमावरील सध्याचे कुरुंदवाड असावे. डॉ. दे. रा. भांडारकर आणि डॉ. अळतेकर यांनी हेच मत मान्य केले आहे. पण जांबगाव ताम्रपटातील दिलेले 'खैरोण्डी' गाव पैठणजवळ असल्याचे त्या ताम्रपटात निर्दिष्ट केलेले असल्या-

---

१ एपि. इंडिका, वर्ष १९, पृ. ७१.

मुळे कुरुंदक हे पैठणजवळ कोठेतरी असले पाहिजे अशी कल्पना करून घेऊन डॉ. वा. वि. मिराशी यांनी कुरुंदक म्हणजे गोदावरीच्या प्रवरासंगमाजवळचे 'कायगाव' असावे असे सुचवले आहे.[१] पण इंद्रराजाचे बगुम्रा ताम्रपट गुजराथेत, जांबगाव ताम्रपट मराठवाड्यातील औरंगाबाद जिल्ह्यात, आणि वजीरखेड ताम्रपट नाशिक जिल्ह्यात असे दूरदूरच्या भिन्न स्थळी सापडलेले असून त्यात दान दिलेली गावेही त्या त्या जिल्ह्यातील आहेत. तथापि, या सर्व ताम्रपटांतील दाने इंद्रराजाने कुरुंदक येथूनच दिलेली आहेत. ही वस्तुस्थिती लक्षात घेता डॉ. मिराशींची कुरुंदक–ग्रामनिश्चितीची अनुमानपद्धती आणि त्यांनी सुचवलेली स्थलनिश्चिती मान्य करता येत नाही. आपल्या राजधानीहून पट्टबंधोत्सवासाठी इंद्रराज ज्या कुरुंदक गावी गेला होता ते मान्यखेटजवळच कोठेतरी असले पाहिजे. त्या दृष्टीने कुरुंदक म्हणजे कुरुंदवाड असणे शक्य मानता येईल. पण त्याहीपेक्षा परभणी जिल्ह्याच्या वसमत तालुक्यात वसमतच्या उत्तरेस पाच मैलावर असलेले कुरुंदा गाव हे जुने कुरुंदक असेल काय, याचा विचार झाला पाहिजे. **कुरुंदक** याचे भाषाशास्त्रदृष्ट्या **कुरुंदा** होणे अधिक स्वाभाविक होय. मालखेड (मान्यखेट) पासून पश्चिमेकडे कुरुंदवाड १८० मैल दूर आहे. कुरुंदा मालखेडच्या उत्तरेला १५० मैल अंतरावर आहे. परभणी जिल्ह्यातील अनेक प्राचीन जैन मंदिरे आणि अमोघवर्षानंतरच्या राष्ट्रकूटनृपतींचा जैन धर्माकडील ओढा लक्षात घेता इंद्रराज ज्या कुरुंदक गावी पट्टबंधोत्सवासाठी गेला होता ते सध्याचे कुरुंदा असणे अधिक शक्य वाटते.

**ताम्रपट क्रमांक १ मधील स्थलनिश्चिती**

अमोघ नावाच्या जैन वसतीचे गाव **चंदनापुरी** म्हणजे नाशिक जिल्ह्यातील मालेगावच्या दक्षिणेस २ मैलांवरील गिरणा नदीच्या काठावरील **चंदनपुरी** होय. या वसतीला दान दिलेले **पाडलावद्द–८४** विभागातील **मालदह** हे गाव म्हणजे मालेगावच्या आग्नेय दिशेस २ मैलांवरील गिरणा नदीच्या काठावरील **मालधा** गाव असावे. **पाडलावद्द** म्हणजे मालधा गावाच्या ईशान्येस १२ मैलावरील **पाडळदा** गाव असावे. पूर्वसीमेवरील **चिंचवल्ली** म्हणजे मालधा गावाच्या पूर्वेला दहा मैलांच्या अंतरावर असलेले **चिंचगव्हाण** असावे. ताम्रपटात निर्दिष्ट केलेली, पश्चिम आणि दक्षिण सीमेवरील **गिरिपर्णा** नदी म्हणजे **गिरणा** नदी होय. उत्तर सीमेवरील **माहुलोग्राम** आढळत नाही. बहुधा सध्याच्या मालेगावचेच ते जुने नाव असावे.

---

१ तत्रैव. वर्ष ३६, पृ. २३२.

अमोघ वसतीला दान दिलेले दुसरे गाव **सोहपूर**जवळील **पारियालग्राम** म्हणजे सध्याचे औरंगाबाद जिल्ह्याच्या वैजापूर तालुक्यातील **पारिल**; आणि **सोहपूर** म्हणजे पारळच्या पूर्वेकडे १५ मैलांवरील शिऊर गाव असावे. पश्चिम सीमेवरील **मणियाडा** नदी म्हणजे सध्याची **मान्याड** नदी होय. पारळ हे गाव **मान्याड** नदीकाठावरून पूर्वेला दोन मैलांवर आहे. पारियालग्रामाच्या पूर्व-सीमेवरील **निंबग्राम** म्हणजे पारळच्या पूर्वेला पाच मैलांवर असलेले **निमगाव** असावे. आणि उत्तर-सीमेवरील **भट्टावल्ली** म्हणजे पारळच्या उत्तरेला चार मैल अंतरावर असलेले **भादली** हे गाव असावे.

### ताम्रपट क्रमांक २ मधील स्थलनिश्चिती

दुसऱ्या ताम्रपटातील उरिअम्म वसतीचे गाव **वडनेर** म्हणजे मालेगावच्या वायव्येस पंधरा मैलांवर मोसम नदीच्या काठावरील **वडनेर** होय. या वस्तीला दिलेली गावे पुढीलप्रमाणे : (१) **रंकाण** २४ विभागातील **रुद्दाणग्राम.** याच्या चतुःसीमा अशा : पूर्वेला आणि दक्षिणेला **रुद्रगिरी,** पश्चिमेला **वारिवाहला** ग्राम आणि उत्तरेला **मोसिनी** नदी. **मोसिनी नदी** म्हणजे सध्याची **मोसम** नदी होय. रंकाण या किंवा तत्सदृश नावाचे गाव आढळत नाही. रुद्दाणग्राम बहुधा उपरोक्त वडनेर गावाच्या वायव्येला असलेले उत्राण गाव असावे. ही स्थलनिश्चिती करण्यात अडचण आहे ती अशी की, ताम्रपटात रुद्दाणग्राम हे मोसिनी नदीच्या दक्षिण तीरावर असल्याचा निर्देश केलेला आहे, पण उत्राण गाव हे त्या नदीच्या उत्तर तीरावर आहे. नदीची वळणे आणि बदलते प्रवाह लक्षात घेता गेल्या हजार वर्षांच्या काळात उत्राणच्या वसतीत झालेला हा फरक किंवा उत्राणचे पुनर्वसन झाले असणे अशक्य नाही. तथापि, रुद्दाण आणि रंकाण ही गावे याच विभागात कोठेतरी पूर्वी असली पाहिजेत, हे पुढील रंकाण-२४ विभागातील **तुंगोणी** ग्रामाच्या स्थलनिश्चितीवरून दिसून येईल. पूर्व आणि दक्षिण सीमावरील रुद्रगिरी हे उत्राण जवळच्या पर्वताचे नाव असावे. पश्चिम सीमेवरील वारिवाहला ग्राम सध्या आढळत नाही.

(२) दान दिलेले दुसरे गाव **छट्ठियान-३२** विभागातील **धन्नउर ग्राम** होय. त्याच्या चतुःसीमा पुढीलप्रमाणे : पूर्वेला अंतरवल्ली ग्राम, दक्षिणेला **गिरिपर्णी नदी,** पश्चिमेला **फेंचग्राम,** आणि उत्तरेला तलवाड ग्राम. दक्षिण सीमेवरील **गिरिपर्णी** म्हणजे सध्याची **गिरणा** नदी होय. उत्तर सीमेवरील **तलवाड ग्राम** म्हणजे वडनेरच्या दक्षिणेला सात मैल आणि मालेगावच्या पश्चिमेला दहा मैल अंतराबर वसलेले **तलवाडे** होय. दान दिलेले गाव

**धन्नउर** म्हणजे तलवाडच्या दक्षिणेला गिरणा नदीच्या उत्तर तीरावरील धानरी गाव असावे. छट्ऽियान, फेंचग्राम, आणि अंतरवल्ली ही गावे मला आढळली नाहीत.

(३) दान दिलेले तिसरे गाव म्हणजे **रंकाण-२४** विभागातील **तुंगोणी ग्राम** होय. त्याच्या चतुःसीमा : पूर्वेला **दशभोइयली ग्राम,** दक्षिणेला तुंगभद्रा नदी पश्चिमेला **साविणिवाड ग्राम** आणि उत्तरेला **कतरवल्ली ग्राम.** **तुंगोणी** म्हणजे नाशिक जिल्ह्याच्या बागलाण तालुक्यातील **तुंगण** गाव असावे. दक्षिण सीमा म्हणून निर्देशिलेली **तुंगभद्रा** नदी म्हणजे मोसम नदीला मिळणाऱ्या ज्या लहानशा नदीकाठावर तुंगण वसलेले आहे ती नदी असावी. तुंगण आणि तुंगभद्रा या दोहोतील अर्धनामसादृश्यावरून असा तर्क करण्याला हरकत नाही. **दशभोइयली** म्हणजे तुंगणच्या पूर्वेला असलेले दशवेल गाव, आणि **कतरवल्ली** म्हणजे तुंगणच्या उत्तरेला असलेले सध्याचे **कतरवेल** हे गाव होय. साविणिवाड ग्राम आढळत नाही.

(४) दान दिलेले चौथे गाव, **वटनगर** विषयातील म्हणजे जिल्ह्यातील **अज्जलोणी** होय. त्याच्या चतुःसीमा पुढीलप्रमाणे : पूर्वेला **नीलग्राम,** दक्षिणेला **तलवाड ग्राम,** पश्चिमेला **डोंगरग्राम,** आणि उत्तरेला **मोसिनी नदी. वटनगर** म्हणजे उत्तर सीमा म्हणून निर्देशिलेल्या मोसिनी म्हणजे सध्याच्या मोसम नदीच्या काठावरील **वडनेर** होय. वजीरखेडजवळील मोसम नदीच्या काठावर असलेले **नीळगव्हाण** हे ताम्रपटातील **नीलग्राम** असावे. इतर गावे सध्या आढळत नाहीत.

धारावर्ष ध्रुवराज याच्या शके ६९७ (=इ. स. ७७५) च्या पिंपरी ताम्रपटात[1] वरील काही गावांचे उल्लेख आलेले आहेत. त्या ताम्रपटात वटनगरिक-८४ विभागातील लीला-ग्राम नावाचे गाव दान देण्यात आलेले आहे. त्यात निर्देशिलेल्या लीला-ग्रामाच्या चतुःसीमा अशा : पूर्वेस लघु-देञ्जार-खेटक, दक्षिणेस तलापाटक ग्राम, पश्चिमेस अज्जलोणी ग्राम, आणि उत्तरेस मोसिनी नदी. पिंपरी ताम्रपटातील अज्जलोणी आणि आपल्या वजीरखेड ताम्रपट क्र. २ मधील दान म्हणून दिलेले ४ थे गाव अज्जलोणी एकच होय यात संशय नाही. पिंपरी ताम्रपटातील लीला-ग्रामच्या उत्तर सीमेवरील मोसिनी नदी आणि आपल्या ताम्रपटातील अज्जलोणीच्या उत्तर सीमेवरील मोसिनी नदी ही एकच होय.

---

१ एपि. इंडिका. वर्ष १०, पृष्ठे ८१–८९

पिंपरी ताम्रपटाचे संपादन करताना त्यातील नीला-ग्राम म्हणजे नीलगव्हाण होय असे श्री. चांदोरकरांनी म्हटले आहे. आपल्या ताम्रपटातील नील-ग्रामही तेच होय. श्री. चांदोरकरांनी पिंपरी ताम्रपटातील वटनगरिका म्हणजे नाशिक जिल्ह्यातील वणी होय असे म्हटले आहे, ते मात्र बरोबर नाही. आपल्या ताम्रपटातील अज्जलोणी ज्या वटनगर विषयात असल्याचे निर्देशिले आहे तेच पिंपरी ताम्रपटातील वटनगरिक होय. पिंपरी ताम्रपटातील तलापाटक ग्राम हेही आपल्या ताम्रपटातील तलवाड ग्राम होय हे निश्चित. पिंपरी ताम्रपटातील पूर्व सीमेवरील 'देज्जार-खेटक' या शब्दाचे वाचन माझ्या मते 'उज्जारखेटक' असे आहे. माझ्या मते जेथे आपले ताम्रपट सापडले ते वजीरखेड हेच प्राचीन उज्जारखेटक होय. नीलगव्हाणच्या पूर्वेस ते केवळ दोन मैलांवर आहे.

(५) दान दिलेले पाचवे गाव म्हणजे रुद्दाण-१२ विभागातील **चंदुहाण** ग्राम होय. त्याच्या चतुःसीमा पुढीलप्रमाणे: पूर्वेला **अग्गवलियाण ग्राम**, दक्षिणेला **अमियारा नदी**, पश्चिमेला **कन्हैनाण ग्राम** आणि उत्तरेला **बट्टार ग्राम**. **अमियारा नदी** म्हणजे सध्याची **आराम नदी** होय. तिच्या उत्तर तीरावर वसलेले, म्हणजे नाशिक जिल्ह्याच्या बागलाण तालुक्यातील **चौंधाणे** हे **चंदुहाण** ग्राम असावे. चौंधाणच्या पूर्वेला २ मैलांवरील **कंधाणे** म्हणजे ताम्रपटातील **कन्हैनाण ग्राम** असावे. आणि चौंधाणच्या उत्तरेला एक मैल अंतरावरील सध्याचे **बाठार** म्हणजे ताम्रपटातील **बट्टारग्राम** असावे. अग्गवलियाण ग्राम सध्या आढळत नाही. त्या विभागातील मुख्य गाव **रुद्दाण** म्हणजे उन्नाण असावे. ते वडनेरच्या वायव्येस १५ मैलांवर आहे.

(६) दान दिलेले ६ वे गाव म्हणजे **उद्दलउल** विभागातील **दिवारग्राम** होय. त्याच्या चतुःसीमा: पूर्वेला **पिप्पलवद्द ग्राम**, दक्षिणेला **सीहग्राम**, पश्चिमेला **वडालीखत्रा**, आणि उत्तरेला **भोराग्राम**. नाशिक जिल्ह्याच्या चांदवड तालुक्यातील चांदवडच्या दक्षिणेला सात मैलांवर असलेले **उधळ** म्हणजे ताम्रपटातील **उद्दलउल** असावे. उधळच्या नैऋत्येला ३ मैलांवर आणि पूर्वोक्त वडनेरच्या पूर्वेला १० मैलांवर असलेले सध्याचे **देवरगाव** म्हणजे दिवारग्राम असावे. **पिप्पलवद्द** म्हणजे देवरगावच्या पूर्वेला ३ मैलांवरील **पिंपळा** असावे. पिंपळा नदीच्या काठावरच ते वसलेले आहे. दक्षिण सीमेवरील सीहग्रामाचा शोध लागत नाही. पश्चिम सीमेवरील **वडाली खत्रा** म्हणजे देवरगावच्या पश्चिमेला दीड मैल अंतरावरील **वडाळी** नाला असावा. **भोराग्राम** म्हणजे देवरगावच्या उत्तरेकडे दोन मैलांवर असलेले **भोयगाव** असावे.

**प्रशस्ती लेखक राजशेखर**

प्रस्तुत दोन्ही ताम्रपटांतील प्रशस्तींचा लेखक राजशेखर होय. काव्य-मीमांसा आणि अवंतिसुंदरीकथा इत्यादी सुप्रसिद्ध ग्रंथांचा लेखक राजशेखर तोच या प्रशस्तींचा लेखक असावा की काय हे सांगता येत नाही. पण तसे असणे शक्य वाटते. राजशेखर कवीचा काळ स्थूल मानाने इ. स. ८५५ ते ९३० हा होय. गूर्जरप्रतिहार नृपती महेंद्रपाल आणि महीपाल यांच्या दरबारी तो आश्रयाला होता. इ. स. ९१० मध्ये महेंद्रपालाचा मृत्यू झाल्यानंतर द्वितीय भोज गादीवर बसला. पण राज्यपदासाठी त्यांच्यात भांडणे झाली. या अंदा-धुंदीच्या काळात तृतीय इंद्रराजाने गुर्जर प्रतिहारांच्या राज्यावर स्वारी करून त्यांची राजधानी उध्वस्त केली असे इतिहासावरून कळते. बहुधा त्याच वेळी इंद्रराजाबरोबर राजशेखर मान्यखेटला आला असणे अशक्य नाही. इंद्रराज गादीवर बसल्यानंतर त्यानेच बहुधा ही प्रशस्ती लिहिली असावी. कलचुरी नृपती युवराजदेव याच्या आश्रयाला राजशेखर काही दिवस होता. तेथे असताना त्याने आपले विद्धशालभंजिका नाटक लिहिले. राष्ट्रकूट नृपती इंद्रराज आणि कलचुरी नृपती यांचे वैवाहिक संबंध लक्षात घेता इंद्रराजाच्या आश्रयाला असलेला राजशेखर कलचुरीच्या दरबारात गेला असणे अशक्य नाही. तेथे काही दिवस राहिल्यानंतर कनौज येथे जेव्हा महीपाल हिंसासनावर बसला त्यावेळी राजशेखर कवी पुन्हा गुर्जर प्रतिहारांच्या दरबारी अश्रयाला गेला असावा. तेथेच त्याने आपले उर्वरीत आयुष्य घालविले असे दिसते.

**वाचन**

**दानपत्र क्रमांक १**

**[वृत्ते : श्लोक २, ९, १४, १५, २२ व २३ अनुष्टुभ ; श्लोक १ इंद्रवंशा.; श्लोक ६ वसंततिलका. श्लोक ३, ४, ५, ८, १०, ११, १६–२१ शार्दूलविक्रीडित; श्लोक ७, १२, १३, स्रग्धरा; श्लोक २४ शालिनी.]**

*पत्रा पहिला*

१. स्वस्ति[१] [।*] श्रियः पदन्नित्यमशेषगोव(च)रन्नयप्रमाणप्रतिषिद्धदुष्पथम् [।*] जनस्य भवप्रत्वसमाहितात्मनो जयत्यनुग्राहि जि–

१ चिन्हाने दर्शविले आहे.

२. नेन्द्रशासनम् ।। [ १।।* ] श्रीमत्परमगम्भीरस्याद्वादामोघलाञ्च्छनम् । जीयात्त्रैलोक्यनाथस्य शासनं जिनशासनम् ।। [ २।।* ] अ-

३. स्त्यद्यापि निशामुखैकतिलको राजेति नामोज्व(ज्ज्व)लम् वि(बि)भ्राणो मृदुभिः करैर्जगदिदं यो राजते रञ्जयन् [ ।* ] यस्यै-

४. कापि कला कलङ्करहिता गङ्गेव तुङ्गे जटाजूटे धूर्जटिना धृतामृतमयी सोमः स किं वर्ण्यते ।। [ ३।।* ] वंशे तस्य पुरू-

५. रवः प्रभृतिभिर्भूपैः कृतालंकृतावन्तःसारतयोन्नतिं गतवति प्राप्ते च वृद्धिं क्रमात् [ ।* ] तुङ्गानामपि भूभृतामु-

६. परिगे(गो) जातो यदुर्भूपतिः यः कृत्वा कुलमात्मनामविदितं पूर्व्वान्विजिग्ये नृपान् [ ।।४।।* ] तस्मिन्विस्मयकारिचारुचरि-

७. ते तस्यान्वये संभवम् मत्वा श्लाघ्यतमं पितामहमुखैरभ्यर्थितो नाकिभिः [ ।* ] कल्पान्तेपि निजोदरान्तरदरीविश्रा-

८. न्तसप्तार्ण्णवश्चक्रे जन्म हरिर्जितामररिपुः साक्षात्स्वयं श्रीपतिः ।। [५।।*] इत्थं हरेः प्रसरति प्रथि-

९. ते पृथिव्यामव्याकुलं वरकुले कलितप्रतापः [ ।* ] निर्मूलिताहितमहीपति-भूरिदुर्गः पृथ्वीपतिः

१०. पृथुसमोजनि दन्तिदुर्गः ।[ ।६।।* ] जेतुं तस्मिन्प्रयाते त्त्रिदिवमिव ततः कृष्णराजो नरेन्द्रः तस्यैवा-

११. सीत्पितृव्यः समजनि तनयस्तस्य गोविन्दराजो(जः) [ ।* ] राजा तस्यानुजोभू-न्निरुपमनृपतिः श्रीजगत्तुङ्गदेवः ।। [२]

१२. सूनुस्तस्यावनीशो भवदवनिपतिस्तत्सुतोमोघवर्षः [ ।।७।।* ] तस्मादिन्दु-करावदातयशसश्चालुक्यकालानलात् ले-

१३. भे जन्म हिमांशुवंशतिलकः श्रीकृष्णराजो नृपः ।। राज्ञी तस्य च चेदिराज-तनया चछत्त्वल्लयाधीश्वरा जाता भूमि-

१४. पतेर्व्व(र्ब)भूव च जगत्तुङ्गस्तयोरात्मजः ।। [ ८।।* ] यस्याद्यापिप्रचण्डासिपात-विश्लिष्टविग्रहाः [ ।* ] हतशेषा विमुंचन्ति गूर्ज-

१५. रा न भयज्वरम् ।।०।। [ ९।।* ] आसीद्बा(द्बा)हुसहस्रसेतुविहतव्यावृत्त-रेवाजलः क्षोणीशो दशकण्ठदर्प्पदलनः ख्यातः

---

१ विसर्ग अनावश्यक.

२ येथे दंड चुकीने कोरण्यात आले आहेत. ते पुढील ओळीत या श्लोकांच्या शेवटी पाहिजेत.

१६. सहस्रार्जुनः ।। वंशे तत्र च हैहयैकतिलकश्चेदीश्वरः कोक्कलो जातस्तस्य सुतश्च शंकरगणः शंकाकरो विद्विषां(षाम्) [ ।।१०।।* ]

१७. चालुक्यान्वयमण्डनस्य नृपतेः श्रीसिंहुकस्यात्मजो राजासीदरयम्म इत्यनुपमस्तस्यात्मजायामभूत् ।। (।)[१]

पत्रा दुसरा–पहिली बाजू

१८. लक्ष्मीः क्षीरमहार्ण्णवादिव सुता लक्ष्मीस्ततः शंकुकात् देवी सा च पराक्रमोर्जितजगत्तुङ्गस्य कान्ताभवत् ।। [ ११।।* ] तस्या–

१९. स्तस्मात्तनूजो मदन इव हरे[ :* ] स्कन्दवच्चन्द्रमौलेरिन्दुः क्षीराम्बु(म्बु)राशेरिव विमलयशोराशिशुक्लीकृताशः [ ।* ] धातुः सौ–

२०. न्दर्यसृष्टिव्यतिकरजनितानूनविज्ञानसेतुः पृथ्व्याः पुण्यातिरेकैः सुकृतनिधिरभूदिन्द्रराजो नरेन्द्रः ।। [ १२।।* ] वे–

२१. धा विज्ञानदर्प्पं विवु(बु)धपतिरपि स्वाधिपत्यैकदर्प्पं भूभाराधारदर्प्पं फणिपतिरधिकं शत्रवः शौर्यदर्प्पङ्क(र्प्पमक)–

२२. न्दर्पो रूपदर्प्पं भुवि सममसुचं यं विलक्षाः समक्षं दृष्ट्वा दृष्टान्तकल्पं सकलगुणगणस्यैकमेवावनीशम् ।। [ १३।।* ]

२३. न सर्व्वगुणसंदोहमेकस्थं कुरुते विधिः [ ।* ] यन्निर्म्मायेतिनिर्मृष्टस्तेन दोषश्चिरादयम् ।। [ १४।।* ] समर्प्पितकराम्भोधि–

२४. वेलामालावलम्बि(म्बि)नी । यन्निरस्तान्यभूपालाः स्वयं वृतवती मही ।। [ १५।।* ] तेजो वीक्षितुमक्षमाः क्षणमपि स्वैरे–

२५. व दोषैर्मुहुर्भ्रान्ताः सन्ततमक्रमेण सहसा संगम्य सर्व्वेप्यमी । व्यालोलाश्चलपक्षापातवि–

२६. कला दीप्रप्रतापानले दायादाः स्वयमेव यस्य पतिता दीपे पतंगा इव ।। [ १६।।* ] आक्रान्तं सम–

२७. मेव शत्रुशिरसा येन स्वसिंहासनम् भू(भ्रू)भंगेन सहैव भंगमपरे नीताः परं विद्विषः [ ।* ] तेषां

२८. राज्यमपि क्षणाच्चलमनोराज्यावशेपं(षं) कृतं राज्ये कल्पलतेव कामफलदा यस्याभवन्मेदिनी ।। [ १७।।* ] भूभारोद्व–

२९. हने जितः फणिपतिः शक्रः श्रिया निर्जितः कीर्त्तिः क्रान्तदिगन्तरा मलिनिता येनाखिलक्ष्माभृताम् [ ।* ] स्त्रैलो–

---

१ हे चिन्ह येथे अनावश्यक.

३०. क्येपि न विद्यतेस्य सदृशो राजेति यस्योच्चकैराभाति प्रकटीकृतं यश इव श्वेतातपत्त्रत्र्यम् ॥ [ १८॥* ] निर्भिन्नं नर–

३१. सिंहतां गतवता वक्षोमुना विद्विषाम् देवोयं विततस्वचक्रदलितारातिश्रियाप्याश्रितः[ ।* ] तत्सेवेहममुं ध्वजा–

३२. ग्रनिलयो राजानमित्याश्रितो रागादंचितकांचनोज्व (ज्ज्व) लतनुर्य्यं वैनतेय[ :* ] स्वयम् ॥ [ १९॥* ] दानं भद्रगजः सजन्न–

३३. पि रुषा कृष्णं करोत्याननं सद्वृक्षोपि फलप्रदः स्वसमये वर्षन्घनो गर्जति [ ।* ] न क्रोधोद्वहनं न कालह–

*पत्रा दुसरा—दुसरी बाजू*

३४. रणं नोत्सेकतो गर्जितं दानं यस्य तथाप्यनूनमभवद्राज्याभिषेकोत्सवे ॥ [ २०॥* ] देवो दानितया स निर्जितव (ब) लिः

३५. श्रीकीर्त्तिनारायणः जित्वा वारिधिमेखलां वसुमतीमेकाधिपः पालयन्[१] [ ।* ] देवव्रा (ब्रा) ह्मणभोगजातम–

३६. खिलं कृत्वा (त्वा) नमस्य (स्यं) फलं सर्व्वेषामपि भूभुजां स्वयमभूद्देवो नमस्यशिचरम् । [ २१॥* ] यश्च विनयविनतानेक–

३७. भूपालमौलिमालालालितचरणारविन्दयुगलः सौन्दर्य्यशौर्य्यचातुर्य्यौदार्य्यधैर्य्यगाम्भीर्य्यवीर्य्यादि–

३८. भिरखिलजनाश्चर्य्यकारिभिरहितव (ब) हुनृपैश्वर्य्यहारिभिर्म्महागुणैरुपार्जितानवद्यविद्योतमानविवि–

३९. धनामधेय[ :* ] स्वराज्यलीलाविनिर्जितशतमखः श्रीगेयचतुर्मुखः गोदानभूमिदानकनकदानाद्यनेकानूनदा–

४०. नपरायणः श्रीकीर्त्तिनारायणः संत्रासितोद्वृत्तशत्त्रुवरपुरोल्लासितसितातपत्रः श्रीमनुजत्रिनेत्रः । स्वकी–

४१. योदयविकासिताशेषविनतजनवदनपुण्डरीकषण्डः श्रीराजमार्त्तण्डः समुत्खातसु–

४२. भगमानिनीमहाभिमानसौभाग्यदर्प्पः श्रीरट्टकन्दर्प्पः पराक्रमाक्रान्तसमस्तपार्थिवो–

१ दानपत्र क्र. २ मध्ये या ठिकाणी 'पालयत्' असे रूप आहे

४३. तुङ्गः श्रीविक्रमतुङ्गः समभवत(त्) [ ।।* ] स च परमभट्टारकमहाराजाधिराजपरमेश्वरश्रीमदकालवर्ष–

४४. देवपादानुध्यो (ध्या)तपरमभट्टारकमहाराजाधिराजपरमेश्वरश्रीमन्नित्यवर्षदेवपृथ्वीवल्लभः श्रीवल्लभनरेन्द्रदेवः

४५. कुशली सर्व्वानेव यथासंव(ब)ध्यमानकां(कान्) राष्ट्रपतिविषयपतिग्रामकूटायुक्तकनियुक्तकाधिकारिकमहत्तरादीं(दीन्) स–

४६. मादिशत्यस्तु वः संविदितं यथा मान्यखेटराजधानीस्थिरतरावस्थानेन पट्टव(ब)न्धोत्सवसंपादनाय समा–

४७. नन्दितकुरुन्दकमुपागतेन मया राज्याभिषेकसमये मातापित्त्रोरात्मनश्चैहिकामुत्रिकपुण्ययशोभि–

४८. वृद्धये पूर्व्वलुप्तानपि देवभोगाग्रहारान्पालयता तथापराण्यप्येकविंशतिलक्षद्रव्यो[१]त्पत्तिसहितानि दे–

४९. वभोगग्रामाणां षट्छतानि पंचाशद्ग्रामाधिकानि नमस्यानि प्रयच्छता शकनृपकालातीतसंवत्सरशतेष्व–

५०. ष्टासु षट्त्रिंशदुत्तरेषु युवसंवत्सरा[३]

*पत्रा तिसरा*

५१. न्तर्गतफाल्गुनशुद्धसप्तम्यां शुक्रवारे मृगशिरसि नक्षत्रे प्रभूतोज्व(ज्ज्व)लकनकराशिपरिपूरितं तुलापुरुष–

५२. मारुह्य तस्मादनुत्तरता प्रथमोदकातिसर्गेण व(ब)लिचरुसत्त्रतपोधनसंतर्प्पणार्थं देवगुरुपूजार्थं ख–

५३. ण्डस्फुटितसंपादनार्थं च चन्दनापुरिपत्तनाभ्यन्तरे अमोघवसतये सोद्रङ्गौ सपरिकरौ सभूतोपात्त–

५४. प्रत्ययौ सधान्यहिरण्यादेयौ दशदोषदण्डापराधसहितौ अचाटभटप्रवेशौ[४] सर्व्वराजकीयानामहस्त–

---

१ मात्रा चुकीने कोरण्यात आली आहे.

२ बगुम्रा व जांबगाव दानपत्रांत या ठिकाणी 'द्रम्म' शब्द आहे.

३ ही ओळ पत्र्याच्या डाव्या बाजूला कोरलेली असून, आरंभी मजकूर चालू असल्याचे चिन्ह कोरलेले आहे.

४ दानपत्र क्र. २ मध्ये हे विशेषण नाही.

५५. प्रक्षेपणीयौ समस्तोत्पत्तिसहितो[1] (ता)वाचन्द्रार्कार्ण्णवसरित्पर्व्वतसमकालीनौ
द्वौ ग्रामौ नमस्यौ दत्तौ ॥
५६. तत्र तावत्प्रथमः पाडलावद्दचतुरा(र)श्री(शी)त्यन्तर्गतमालदहग्रामः तस्मा-
त्पूर्व्वः [चि]चवल्लीग्रामः दक्षिणा गिरि–
५७. पर्ण्णा[2] नदी। पश्चिमा स(सा) एव गिरिपर्ण्णा नदी। उत्तरः माहुलिग्रामः ॥
तथा द्वितीयः सोहपुरसमीपे पारि–
५८. यालग्रामः ॥ तस्मात्पूर्व्वः निम्व(म्ब)ग्रामः दक्षिणः जन्नपिप्पलग्रामः पश्चिमा
मणियाडा–
५९. नाम नदी। उत्तरः भद्दावल्लिनामग्रामः [।।*] एवं यथावस्छि(स्थि)-
तचतुराघाटोपलक्षितग्राम–
६०. द्वयसहिता पूर्व्वमर्यादया भुक्तभुज्यमाना यथावस्थितचतुराघाटोपलक्षिता
६१. सा वसतिर्द्रविडसंघविशेषवीरगण[ची]र्न्नायान्वयलोकभद्रशिष्याय वर्द्धमानगुरवे
समर्पिता ॥
६२. अयं चास्मद्धर्म्मदायः समागामिभिर्नृपतिभिरस्मद्वंश्यैश्चानुमन्तव्यः ॥
यश्चाज्ञानतितिमिरपटला–
६३. वृतमतिराच्छिन्द्या(द्या)दाच्छिद्यमानं वा कदाचिदनुमोदते स पंचभिर्म्म-
हापातकैरुपपातकैश्च लिप्यते ॥ उ–
६४. क्तं च भगवता वेदव्यासेन ॥ षष्टिं वर्षसहस्राणि स्वर्गे वसति भूमिदः[।* ]
आच्छेत्ता चानुमन्ता च तान्येव नर–
६५. के वसेत् ॥ [२२॥*] स्वदत्तां परदत्तां वा यत्नाद्रक्षय(क्ष) नराधिप।
महीम्महीमतां श्रेष्ठ दानाच्छ्रेयोनुपालनम् ॥ [२३॥*] सामा–
६६. न्योयं धर्म्मसेतुर्नृपाणां काले काले पालनीयो भवद्भिः [।* ] सर्व्वानेतां-
(तान्) भाविन[ः* ] पार्थिवेन्द्रां(न्द्रान्) भूयो भूयो याचते
६७. रामभद्रः ॥ [२४॥* ] राजशेखरकृता प्रशस्तिरियम् ॥०॥

दानपत्र क्रमांक २

[वृत्ते : श्लोक २, ९, १४, १५, २२ अनुष्टुभ; श्लोक १ इंद्रवंशा; श्लोक ६ वसंततिलका; श्लोक ३, ४, ५, ८, १०, ११, १६–२१ शार्दूलविक्रीडित; श्लोक ७, १२, १३, स्रग्धरा.]

---

१ तो वरील मात्रा चुकीने कोरली आहे.

२ दानपत्र क्र. २ मध्ये **गिरिपर्ण्णी** असे नाव आहे.

पत्रा पहिला

१. स्वस्ति[1] [।*] श्रियः पदन्नित्यमशेषगोचरन्नयप्रमाणप्रतिषिद्धदुष्पथम् [।*] जनस्य भव्यत्वसमाहितात्मनो जयत्यनुग्राहि जिने–

२. न्द्रशासनम् ।। [१।।*] श्रीमत्परमगम्भीरस्याद्वादामोघलाञ्च्छनम् [।*] जीयात्त्रैलोक्यनाथस्य शासनं जिनशासनम् [२।।*] अस्त्य–

३. द्यापि निशामुखैकतिलको राजेति नामोज्व(ज्ज्व)लम् चि(बि)भ्राणो मृदुभिः करैर्जगदिदं यो राजते रंजयन् [।*] यस्यैका–

४. पि कला कलङ्करहिता गङ्गेव तुङ्गे जटाजूटे धूर्जटिना धृतामृतमयी सोमः स किं वर्ण्यते[2] ।। [३।।*] वंशे तस्य पुरूर– :

५. वः[3]प्रभृतिभिर्भूपैः कृतालङ्कृतावन्तःसारतयोन्नतिं गतवति प्राप्ते च वृद्धिं क्रमात् [।*] तुङ्गानामपि भूभृतामुपरिगे (गो)

६. जातो यदुर्भूपतिः यः कृत्वा कुलमात्मनामविदितं पूर्वान्विजिग्ये नृपान् [।।४।।*] तस्मिन्विस्मयकारिचारुचरिते तस्या–

७. न्वये संभवम् मत्वा श्लाघ्यतमं पितामहमुखैरभ्यर्थितो नाकिभिः [।*] कल्पान्तेपि निजोदरान्तरदरीविश्रान्तसप्ता–

८. र्णवश्चक्रे जन्म हरिर्जितामररिपुः साक्षात्स्वयं श्रीपतेः[4] [।।५।।*] इत्थं हरेः प्रसरति प्रथिते पृथिव्याम–

९. व्याकुलं वरकुले कलितप्रतापः [।*] निर्मूलिताहितमहीपतिभूरिदुर्गः पृथ्वीपतिः पृथुसमोजनि

१०. दन्तिदुर्गः ।। [६।।*] जेतुं तस्मिन्प्रयाते त्रिदिवमिव ततः कृष्णराजो नरेन्द्रः तस्यैवासीत्पितृव्यः समज–

११. नि तनयस्तस्य गोविन्दराजो [।*] राजा तस्यानुजो भून्निरुमपनृपतिः श्रीजगत्तुङ्गदेवः ।।[5] सूनुस्तस्यावनीशो भव–

१२. दवनिपतिस्तत्सुतोमोघवर्षः [।।७।।*] तस्मादिन्दुकरावदातयशसश्चा-लुक्यकालानलात् लेभे जन्म हिमांशुवंशति–

---

१ चिन्हाने दर्शविले आहे.

२ दानपत्र क्र. १ मध्ये वर्ण्यते असे कोरले आहे.

३ विसर्ग अनावश्यक.

४ दानपत्र क्र. १ मधील रूपाप्रमाणे येथे श्रीपतिः असे वाचावे.

५ येथे हे दंड चुकीने कोरण्यात आले आहेत. ते पुढील ओळीत या श्लोकाच्या शेवटी पाहिजेत.

१३. लकः श्रीकृष्णराजो नृपः ।। राज्ञी तस्य च चेदिराजतनया च्छत्रत्रयाधीश्वरा जाता भूमिपतेर्व्व(र्ब)भूव च जगत्तु–

१४. ङ्गस्तयोरात्मजः ।।[८।।*]यस्याद्यापि प्रचण्डासिपातविश्लिष्टविग्रहाः [।*] हतशेषा विमुंचन्ति गूर्जरा न भयज्वरम् ।।०।। [९।।*]

१५. आसीद्वा(द्बा)हुसहस्रसेतुविहतव्यावृत्तरेवाजलः क्षोणीशो दशकण्ठदर्प्पदलनः ख्यातः सहस्रार्जुनः ।। वंशे

१६. तत्र च हैहयैकतिलकश्चेदीश्वरः कोक्कलो जातस्तस्य सुतश्च शंकरगणः शंकाकरो विद्विषाम् [।।१०।।*] चालुक्यान्वय–

१७. मण्डनस्य नृपतेः श्रीसिंहुकस्यात्मजो राजासीदरयम्य इत्यनुपमस्तस्यात्मजायामभूत् ।। लक्ष्मीः क्षी–

पत्रा दुसरा–पहिली बाजू

१८. रमहार्ण्णवादिव सुता लक्ष्मीस्ततः शंकुकात् देवी सा च पराक्रमोजितजगत्तुङ्गस्य कान्ताभवत् ।। [११।।*] तस्यास्तस्मात्तनूजो

१९. मदन इव हरे[:*] स्कन्दवच्चन्द्रमौलेरिन्दुः क्षीराम्वु(म्बु)राशेरिव विमलयशोराशिशुक्लीकृताशः [।*] वा(धा)तुः (सौ)न्दर्य्यसृष्टि–

२०. व्यतिकरजनितानूनविज्ञानसेतुः पृथ्व्याः पुण्यातिरेकैः सुकृतनिधिरभूदिन्द्रराजो नरेन्द्रः ।। [१२।।*] वेवा(धा)[२] विज्ञानद–

२१. र्प्पं विवु(बु)धपतिरपि स्वाधिपत्यैकदर्प्पं भूभाराधारदर्प्पं फणिपतिरधिकं शत्रवः शौर्यदर्प्पं [।*] कन्दर्पो रूपद–

२२. र्प्पं भुवि समममुचं(चत्) यं विलक्षाः समक्षं दृष्ट्वा दृष्टान्तकल्पं सकलगुणगणस्यैकमेवावनीशम् ।। [१३।।*] न सर्व्वगु–

२३. णसंदोहमेकस्थं कुरुते विधिः [।*] यन्निर्म्मायेति निर्मृष्टस्तेन दोषश्चिरादयम् ।। [१४।।*] समर्प्पितकराम्भोधिवेलामाला–

२४. वलम्बि(म्बि)नी [।*] यन्निरस्तान्यभूपालाः स्वयं वृत्तवती मही ।। [१५।।*] तेजो वीक्षितुमक्षमाः क्षणमपि स्वैरेव दोषैर्मुहुर्भ्रान्ताः

१ शिरोरेषा चुकीने कोरली गेली. दानपत्र क्र. १ मध्ये **वेधा** असे रूप आहे.

२ या अक्षरावरील शिरोरेषा चुकीने कोरली गेली. त्यामुळे हे अक्षर **वा** असे वाचावे लागते. ते **धा** असे दुरुस्त करून घेणे आवश्यक आहे.

२५. सन्ततमक्रमेण सहसा संगम्य सर्व्वेप्यमी [।*] व्यालोलाश्चलपक्षपात-
विकला दी[प्र*][1] प्रतापानले दायादाः

२६. स्वयमेव यस्य पतिता दीपे पतंगा इव ॥ [१६॥*] आक्रान्तं सममेव शत्रु-
शिरसा येन स्वसिंहासनम् भ्रूभं-

२७. गेन सहैव भंगमपरे नीताः परं विद्विषः [।*] तेषां राज्यमपि क्षणाच्चल-
मनोराज्यावशेषं कृतम्

२८. राज्ये कल्पलतेव कामफलदा यस्याभवन्मेदिनी ॥ [१७॥*] भूभारोद्वहने
जितः फणिपतिः शक्रः श्रिया निर्जितः

२९. कीर्तिः क्रान्तदिगन्तरा मलिनिता येनाखिलक्ष्माभृताम् [।*] त्रैलोक्येपि
न विद्यतेस्य सदृशो राजेति यस्योच्चकैरा-

३०. भाति प्रकटीकृतं यश इव श्वेतातपत्रत्रयम् ॥ [१८॥*] निर्भिन्नं नरसिंहतां
गतवता वक्षोमुना विद्विषाम् देवो यं वि-

३१. ततस्वचक्रदलितारातिश्रियाप्याश्रितः [।*] तत्सेवेहममुं ध्वजाग्रनिलयो राजा-
नमित्याश्रितो रागादंचितकांच-

३२. नोज्व(ज्ज्व)लतनुर्य्यं वैनतेय[:*] स्वयम् ॥ [१९॥*] दानं भद्रगजः
सृजन्नपि रुषा कृष्णं करोत्याननं सद्वृक्षोपि फलप्रदः

३३. स्वसमये वर्षन्घनो गर्जति । न क्रोधोद्वहनं न कालहरणं नोत्सेकतो गर्जितं दानं
यस्य तथाप्यनूनमभ-

३४. वद्राज्याभिषेकोत्सवे ॥ [२०॥*] देवो दानितया स निर्जितव(ब)लिः
श्रीकीर्तिनारायणः जित्वा वारिधिमेखलां वसु-

*पत्रा दुसरा : दुसरी बाजू*

३५. मतीमेकाधिपः पालयत्[2] [।*] देवब्रा(ब्रा)ह्मणभोगजातमखिलं कृत्वा नमस्यं
फलम् सर्व्वेषामपि भूभुजां स्वयमभूद्देवोनन(म)[3]-

३६. स्यश्चिरम् ॥ [२१॥*] यश्च विनयविनतानेकभूपालमौलिमालालालित-
चरणारविन्दयुगलः सौन्दर्य्यशौर्य्यचातुर्य्यौदा-

---

१ पाहा. दानपत्र क्र. १, ओळ २६.

२ दानपत्र क्र. १ मध्ये **पालयन्** असे रूप आहे.

३ दानपत्र क्र. १ मध्ये या ठिकाणी **नमस्यः** असे रूप आहे आणि तेच बरोबर आहे.

३७. य्य (र्य्य) धैर्य्यगाम्भीर्य्यवीर्य्यादिभिरखिलजनाश्चर्य्यकारिभिरहितव (ब) हुनृ-
पैश्वर्य्यहारिभिर्म्महागुणैरुपार्जितानव-

३८. द्यविद्योतमानविविधनामधेय[ :* ] स्वराज्यलीलाविनिर्जितशतमखः श्रीगेय-
चतुर्मुखः गोदानभूमिदानकनकदा-

३९. नाद्यनेकानूनदानपरायणः श्रीकीर्तिनारायणः संत्रासितोद्वृत्तशत्रुवरपुरोल्ला-
सितसितातपत्रः श्रीमन्–

४०. जत्त्रिनेन्द्रः स्वकीयोदयविकासिताशेषविनतजनवदनपुण्डरीकषण्डः श्रीराज-
मार्त्तण्डः सनु (मु)[1]त्खातसुभग-

४१. मानिनीमहाभिमानसौभाग्यदर्प्पः श्रीरट्टकन्दर्प्पः पराक्रमाक्रान्तसमस्तपार्थि-
वोत्तुङ्गः श्रीविक्रमतुङ्गः स-

४२. मभवत् [ ।।* ] स च परमभट्टारकमही (हा) राजाधिराजपरमेश्वरश्रीमद-
कालवर्षदेवपादानुध्यातप-

४३. रमभट्टारकमहाराजाधिराजपरमेश्वरश्रीमन्नित्यवर्षदेवपृथ्वीवल्लभश्रीवल्लभ-
नरेन्द्रदे-

४४. वः कुशली सर्व्वानेव यथासंव (ब) ध्यमानकां (कान्) राष्ट्रपतिविषयपतिग्राम-
कूटायुक्तकनियुक्तका-

४५. धिकारिकमहत्तरादीत्स (न्स) मादिशत्यस्तु वः संविदितं यथा मान्यखेटराजधानी-
स्थिरतरावस्थानेन पट्टव (ब)-

४६. न्धोत्सवसंपादनाय समानन्दितकुरुन्दकमुपागतेन मया राज्याभिषेकसमये माता-
पित्त्रोरात्मनश्चैहि-

४७. कामुत्रिकपुण्ययशोभिवृद्धये पूर्व्वलुप्तानपि देवभोगाग्रहारान्पालयता तथा-
पराण्यप्येकविंशतिलक्ष-

४८. द्रव्योत्पत्तिसहितानि देवभोगग्रामाणां षट्छतानि पंचाशद्ग्रामाधिकानि नमस्यानि
प्रयच्छता शकनृपका-

४९. लातीतसंवत्सरशतेष्वष्टासु षट्त्रिंशदुत्तरेषु युवसंवत्सरान्तर्गतफाल्गुनशुद्ध-
सप्तम्यां शुक्रवारे मृ-

५०. गशिरसि नक्षत्रे प्रभूतोज्व (ज्ज्व) लकनकराशिपरिपूरितं तुलापुरुषमारुह्य
तस्मादनुत्तरता प्रथमोद-

५१. कातिसर्गेणव (ब) लिचरुसत्त्रतपोधनसंतर्पणार्थन्दे (र्थं दे) व (व) गुरुपूजाथ (र्थ) म्
खण्डस्फुटितसंपादनार्थं च

---

१ दानपत्र क्र. १ मध्ये या ठिकाणी **समुत्खात** असे रूप आहे, आणि तेच बरोबर आहे.

*पत्रा तिसरा*

५२. वडनेरपत्तने उरिअम्मवसतये सोद्रङ्गाः सपरिकराः सभूतोपात्तप्रत्ययाः सधान्य-हिरण्यादेयाः दशदोष–

५३. दण्डापराधसहिताः सर्व्वराजकीयानामहस्तप्रक्षेपणीयाः समस्तोत्पत्तिसहिता आचन्द्रार्क्कार्ण्णवसरित्पर्व्वत–

५४. समकालीना षट्ग्रामा नमस्या दत्ताः ।। तत्र तावत्प्रथमः रंकाणचतुर्व्विडश-(विश)त्यन्तर्गतरद्दाणग्रामः तस्मात्पूर्व्वः रुद्रगि–

५५. रिपादः दक्षिणः स एव रुद्रगिरिः पश्चिमः वारिवाहलाग्रामः उत्तरा मोसिनी नदी ।। तथा द्वितीयः छट्टियानद्वात्रिं–

५६. शा(श)[त्य*]न्तर्गतधम्रउरग्रामः तस्मात्पूर्वः अन्तरवल्लीग्रामः दक्षिणा गिरिपर्ण्णी[2] नदी । पश्चिमः फेंचग्रामः उत्तरः तल–

५७. वाडग्रामः ।। तथा त्रि(तृ)तीयः रंकाणचतुर्व्विशत्यन्तर्गततुंगोणीग्रामः ।। तस्मात्पूर्व्वः दशभोइयलिग्रामः दक्षिणा

५८. तुंगभद्रा नदी । पश्चिमः साविणिवाडग्रामः उत्तरः कतरवलिग्रामः ।। तथा चतुर्थः वटनगरविषयान्तर्गत[ :* ]

५९. अज्जलोणी ग्रामः । तस्मात्पूर्व्वः नीलग्रामः दक्षिणः तलवाडग्रामः पश्चिमः डोङ्गरग्रामः

६०. उत्तरा मोसिनी नदी ।। तथा पंचमः रुद्दाणद्वादशान्तर्गतचंद्रुहाणग्रामः तस्मात्पूर्व्वः अग्ग–

६१. वलियाण ग्रामः दक्षिणा अनियारा नदी । पश्चिमः कन्हैनाणग्रामः उत्तरः वट्टारग्रामः ।।

६२. तथा षष्टः(ष्ठः) उद्वलउलचतुर्व्विशत्यन्तर्गतदिवारग्रामः ।। तस्मात्पूर्व्वः पिप्पलवहग्रामः दक्षिणः सीहग्रा–

६३. मः पश्चि(श्चि)मः वडालीग्रामः । उत्तरतः भोराग्रामः ।। एवं[3] यथा(था)-वस्थितचतुराघाटोपलक्षितग्रामषट्कसहिता

---

१ या शब्दानंतर प्रथम विसर्ग कोरण्यात आला. मागाहून तो रद्द केला आहे.

२ याच नदीचे नाव दानपत्र क्र. १ मध्ये गिरिपर्ण्णा असे आहे. तेच बरोबर वाटते.

३ प्रथम येथे **प** अक्षर कोरण्यात आले व नंतर त्याचे रूपांतर ए मध्ये करण्यात आले असे दिसते.

६४. पूर्व्वमर्यादया भुक्तभुज्यमाना यथावस्थितचतुराघाटोपलक्षिता सा वसतिर्द्रविड-
संघविशेषवीर–

६५. गणवीर्ण्णाख्यान्वयपर्यङ्कशिष्याय वर्धमानगुरवे समर्पिता ।। अयं चास्मद्धर्म्मदायः
समागामिभिपर्नृपति–

६६. ति[1]भिरस्मद्व(द्वं)स्यै(श्यै)रन्यैश्चानुमन्तव्यः ।। यश्चाज्ञानतिमिरपटलावृत-
मतिराच्छिन्द्या(द्या)च्छिद्यमानं वा कदा–

६७. चिदनुमा(मो)दते स पंचभिर्म्महापातकैरुपपातकैश्च लिप्यते ।। उक्तं च भगवता
व्यासेन । षष्टि(ष्टि)वर्षसहस्रा–

६८. णि स्वर्गे वसति भूमिदः [ ।* ] आच्छेत्ता चानुमन्ता च तान्येव नरके वसेत्
।। [ २२।।* ] अत्रैव रामश्लोकार्थं(र्थः) ।। राजशेखरक(कृ)–
[2] ता प्रशस्तिरियं ।।

१ येथील ति हे अक्षर अनावश्यक होय.

२ मजकूर चालू असल्याचे चिन्ह.

# १६

# अनंतदेव द्वितीय याचा वसई शिलालेख
## शके ११२०

### उपलब्धी

वसई (जिल्हा ठाणे, महाराष्ट्र) येथील किल्ल्यात त्रिविक्रमाच्या प्राचीन देवळासमोर विजेचा खांब उभारण्यासाठी खड्डा खोदत असताना प्रस्तुत शिलालेख फेब्रुवारी १९७० मध्ये उपलब्ध झाला. महाराष्ट्र शासनाच्या पुरातत्त्व व पुराभिलेख विभागाचे संचालक श्री. वि. गो. खोबरेकर यांनी माझ्या विनंती-वरून त्याचे ठसे मला देऊन प्रस्तुत शिलालेख संपादन करण्याची परवानगी दिली, याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. शिलालेखाच्या वाचनात गुरुवर्य डॉ. म. म. वा. वि. मिराशी यांनी केलेल्या साह्याबद्दल मी त्यांचेही आभार मानतो.

### वर्णन

जिच्यावर प्रस्तुत लेख कोरलेला आहे त्या शिळेची उंची ७५ सें. मी. असून रुंदी ३४ सें. मी. आहे. शिळेच्या वरच्या भागावर उजवीकडे चंद्र, डावीकडे सूर्य आणि मध्यभागी मंगल कलश यांच्या आकृती उठावात कोरलेल्या असून शिळेच्या खालच्या भागात ७५ सें. मी. लांब व ३४ सें. मी. रुंद असलेल्या चौकोनात सवत्स धेनूची आकृती कोरलेली आहे; तीही उठावात आहे. प्रत्यक्ष लेख शिळेच्या ज्या भागावर कोरलेला आहे त्याची उंची ४६ सें. मी. असून रुंदी ३४ सें. मी. आहे. लेखाच्या एकूण ओळी २० आहेत. अनेक वर्षे जमिनीत गाडला असल्यामुळे शिलालेख फार खराब झालेला आहे. ठिकठिकाणी तो फुटलेला असल्यामुळे बरीच अक्षरे नाहीशी किंवा अस्पष्ट झालेली आहेत. त्यामुळे संपूर्ण लेखाचे वाचन कठीण झाले आहे. अशाही स्थितीत आरंभीच्या सात-आठ ओळींचे वाचन आतापर्यंत उपलब्ध झालेल्या शिलाहारांच्या अन्य शिला-लेखांच्या साह्याने होऊ शकले, ही समाधानाची गोष्ट होय.

### भाषा व लिपी

प्रस्तुत शिलालेख संस्कृत भाषेत लिहिलेला आहे. ओळ ३ मधील 'शकु संवतु' ही शब्दरूपे मराठी आहेत. शिवाय, ओळ १५, १६ व १७ मध्ये आलेला 'पेंढिआ' हा शब्द, आणि ओळ १६ व १७ मध्ये आलेला 'पावी' हा शब्द, हे दोन्ही शब्द मराठी आहेत. त्यावरून असे दिसते की, लेखाच्या शेवटी आलेल्या ओळीतील काही भाग मराठीत असावा. पण त्या ओळींचे संपूर्ण वाचन होऊ न शकल्यामुळे निश्चित असे काही सांगता येत नाही. लेखाच्या एकंदर अस्पष्टतेमुळे त्यातील संस्कृत भाषेच्या शुद्धाशुद्धतेविषयीही विचार करणे अप्रस्तुत होईल. तथापि, काही गोष्टींकडे लक्ष वेधणे अवश्य आहे. 'वींशत्यधिकेषु' (ओळ २) या शब्दातील 'वी' हे अक्षर ऱ्हस्व पाहिजे. कोरकाने बहुधा अनवधानाने ते दीर्घ कोरले असावे. अनुनासिकासाठी परसवर्ण न वापरता अनुस्वार दिलेला आढळतो. उदा. यत्रांकतोपि, संवत्सरांतर्ग्गत (ओ. ३), श्रीमदनंतदेव (ओ. ५) इत्यादी. अर्ध्या **र** नंतर आलेली व्यंजने द्वित्त केली आहेत. उदा. प्रवर्त्तमाने (ओ. २), संवत्सरांतर्ग्गत (ओ. ३), मार्ग्गशिर (ओ. ४) इत्यादी.

शिलालेखाची लिपी नागरी असून अक्षरांचे वळण उत्तर-भारतीय स्वरूपाचे आहे. अक्षरे मोठी असून ती ठसठशीत कोरली गेली असावीत. प्रत्येक अक्षराची उंची साधारणपणे २ सें.मी. आहे. 'अ' या अक्षराचे वळण लक्षात घेण्यासारखे आहे. उदा. ओ. ४, १६, १७ मधील 'अ' हे अक्षर पाहावे. 'ए' या स्वराचे चिन्ह लंबत्रिकोणात्मक असून (ओ. २) 'इ' या स्वरासाठी वर दोन आडवी गोल चिन्हे व त्याखाली आजच्यासारखे उकाराचे चिन्ह कोरले आहे. (ओ. ८, १६, १७). व्यंजनांतर्गत 'ए' व 'ओ' दर्शविण्यासाठी पृष्ठमात्रेचा, तसेच 'ऐ' आणि 'औ' दर्शविण्यासाठी पृष्ठमात्रेशिवाय शिरोमात्रेचा उपयोग केलेला आहे.

### कालनिश्चिती

'शकनृपकालातीतसंवत्सरशतेषु एकादशेषु वीं(वि)शत्यधिकेषु' या शब्दांत कालाचा निर्देश केला असून पुढे 'अंकतोपि' म्हणजे आकड्यांतसुद्धा तो दिलेला आहे. त्यावरून शके ११२०, कालयुक्त संवत्सर, मार्गशीर्ष वद्य ८, सोमवार, हा प्रस्तुत शिलालेखाचा काळ असल्याचे स्पष्ट दिसून येते. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे तो अगदी बरोबर आहे. इंग्रजी कालगणनेप्रमाणे सोमवार, २३ नोव्हेंबर इ. स. ११९८ हा या शिलालेखाचा काळ होय.

### आशय व चर्चा

शिलालेखाचा विषय काय, म्हणजे तो कोणत्या निमित्ताने कोरला गेला हे निश्चित सांगता येत नाही. कारण ही माहिती निर्दिष्ट करणाऱ्या ओळींचे संपूर्ण वाचन होऊ शकले नाही. तथापि, हा दानलेख होय, असे ओळ ११ मध्ये आलेल्या 'प्रदत्ता' या शब्दावरून दिसून येते. 'स्वस्ति जयश्चाभ्युदयश्च' या मंगल शब्दांनी लेखाचा प्रारंभ झाला आहे. उत्तर कोंकणावर राज्य करणाऱ्या शिलाहार नृपतींच्या बहुतेक कोरीव लेखांचा आरंभ याच शब्दांनी होतो. त्यानंतर १ ते ४ ओळींमध्ये लेखाचा काळ निर्दिष्ट केला आहे. त्याची चर्चा यापूर्वीच केली आहे. कालनिर्देशानंतर ओळ ४ ते ८ मध्ये अनंतदेव राजाचा उल्लेख त्याच्या बिरुदावलीसहीत केलेला आहे. त्यांतील 'समस्तराजावली-विराजित' हे विशेषण शिलाहारांच्या बहुतेक कोरीव लेखांत आढळते. काही लेखांत 'विराजित' ऐवजी 'समलंकृत' हा शब्द योजलेला आढळतो. या विशेषणाचा स्वतंत्रपणे उल्लेख शिलाहारांच्या शिलालेखांत येतो, पण ताम्रपटात मात्र या शब्दापूर्वी अनेक विशेषणात्मक बिरुदे योजलेली आढळतात. उदा. शिलाहार नृपती मुम्मुणी याच्या शके ९७१ च्या ताम्रपटातील[२] पुढील उल्लेख पाहा : 'स्वकीयपुण्योपचयात्समधिगतपंचमहाशब्द–महासामन्ताधिपति–तगरपुरपरमेश्वरश्रीसीलारनरेन्द्र–जीमूतवाहनान्वयप्रसूत–सुवर्णगरुडध्वजाभिमानमहोदधि–त्याग-जगज्झंपडाचार्य[३]–शरणागतवज्रपंजरप्रभृतिसमस्तराजावलीविराजित–'. यातील 'प्रभृति' या शब्दावरून, या ठिकाणी निर्दिष्ट केलेल्या बिरुदांशिवाय शिला-हारांची आणखी काही बिरुदे असावीत असे दिसते; आणि ते खरे आहे. याच मुम्मुणीच्या दुसऱ्या एका ताम्रपटात पश्चिमसमुद्राधिपति, सीलारमार्तंड, राजमार्तंड, डमरमेघडंबर, रिपुमुंडमालालंकृत वसुमतीस्वयंवर' ही जास्तीची बिरुदे आढळतात.[४] या सर्व बिरुदांचा उल्लेख समस्त या शब्दाने सूचित होतो, असे मला वाटते.

---

१ प्राचीन मराठी कोरीव लेख (तुळपुळे), पृ. १००, १५९, १६४.

२ एपि. इंडिका, वर्ष २५, पृ. ५९.

३ छित्तराजदेव याच्या ताम्रपटातील पुढील पाठभेद पाहा :
'सुवर्णगरुडध्वज–सहजविद्याधर–त्यागजगज्झम्पि–मण्डलिकशिखामणि' (इंडि. अँटि., वर्ष ५, पृ. २७८). अनंतदेव प्रथम याच्या खारेपाटण ताम्रपटात पुढील पाठ आढळतो : 'सुवर्णगरुडध्वजाभिमानमहोदधि–निःसंकलकेस्वरदी (वी) रचरितभीरतावतार अरिवीषपतनकेदारकोपकालान-लत्यागजगझंपझंपडाचार्य–' (इंडि. अँटि., वर्ष ९, पृ. ३५).

४ संशोधन मुक्तावलि, सर ४, पृ. १२७.

'समस्तराजावलीविराजित' हे विशेषण स्वतंत्रपणे लक्षात घेतले तर त्याचा अर्थ 'सर्व राजांच्या मालिकेने सुशोभित' असा करता येईल; आणि काही संशोधकांनी[1] तसा तो केलेलाही आहे. कारण 'राजावली' म्हणजे राजांची मालिका हा अर्थ स्पष्ट आहे. पण ताम्रपटात या विशेषणापूर्वी इतर अनेक बिरुदे उल्लेखिलेली आहेत हे लक्षात घेतले म्हणजे 'राजावली' हा शब्द राजाची बिरुदे, या अर्थाने येथे वापरला आहे असे दिसून येईल.[2] राजांची मालिका हा अर्थ येथे विसंगत ठरेल. कारण त्यापूर्वी राजांची नावे आली नसून बिरुदांची नावे आली आहेत. ताम्रपटात काही बिरुदे वापरून शेवटी 'प्रभृति' आणि 'समस्त' या शब्दांनी त्यांची सर्व बिरुदे सूचित केली आहेत. शिलालेखात मात्र जागेच्या अभावी या अनेक बिरुदांचा उल्लेख करणे शक्य नाही, म्हणून 'समस्तराजावली-विराजित' हे विशेषण योजलेले दिसते. अर्थात, त्यातील 'समस्त' या शब्दाने वर निर्देशिलेली ताम्रपटात आढळणारी शिलाहारांची सर्व बिरुदे सूचित केलेली आहेत.

'महाराजाधिराज' आणि 'परमेश्वर' ही आणखी दोन बिरुदे अनंतदेवाच्या नावापूर्वी आलेली आहेत. पूर्वीचे शिलाहारनृपती आपणाला 'महामंडलेश्वराधिपति' अथवा 'महासामंताधिपति' असे म्हणवीत असत. त्यावरून ते कोणातरी सम्राटाचे मांडलिक होते असे दिसून येते. अपरादित्य द्वितीय यानेच प्रथम 'महाराजाधिराज' हे विरुद धारण केले.[3] त्यावरून त्याने इतरांचे मांडलिकत्व झुगारून देऊन स्वतंत्रपणे राजचिन्हे धारण केली होती असे दिसते. त्याच्यानंतर गादीवर आलेला प्रस्तुत शिलालेखातील अनंतदेव द्वितीय यानेही (व त्यानंतर इतर शिलाहार नृपतींनीही) ते विरुद धारण केले आहे; इतकेच नाही तर 'परमेश्वर' हे आणखी नवे बिरुद त्याने स्वीकारले आहे. त्यावरून अपरादित्यानंतर अनंतदेवाने आपले सामर्थ्य अधिक वाढवून शिलाहारांचे राज्य विशेष वैभवसंपन्न केले असावे असे म्हणण्याला हरकत नाही.

प्रस्तुत शिलालेखातील अनंतदेव नृपतीचा हा उल्लेख ऐतिहासिक दृष्टीने फार महत्त्वाचा आहे. उत्तर कोंकणातील शिलाहारवंशात अनंतदेव या नावाचा एक राजा पूर्वी होऊन गेला. अनंतपाल या नावानेही त्याचा निर्देश केलेला आढळतो.

१ जर्नल ऑफ दि बॉम्बे ब्रँच ऑफ रॉयल एशियाटिक सोसायटी, वर्ष ९, पृ. १८६; इंडि. अँटि., वर्ष ५, पृ. २८०.

२ श्री. का. त्र्यं. तेलंग यांनी असा अर्थ केलेला आहे, आणि तोच बरोबर आहे (इंडि. अँटि., वर्ष ९, पृ. ३७.)

३ प्राचीन मराठी कोरीव लेख (तुळपुळे), पृ. ८३.

या अनंतदेव ऊर्फ अनंतपालाची कारकीर्द साधारणपणे शके ९९२ ते १०३२ पर्यंत होती असे उपलब्ध पुराव्यावरून दिसून येते.[१] प्रस्तुत शिलालेखातील अनंतदेव अर्थात तो नव्हे. शके ११२० मध्ये अनंतदेव या नावाचा एखादा राजा कोंकणावर राज्य करीत असल्याचा निर्देश आतापर्यंत उपलब्ध असलेल्या शिलाहारांच्या इतिहासात आढळत नाही; आणि म्हणून प्रस्तुत शिलालेखातील अनंतदेवाच्या निर्देशाचे विशेष महत्त्व आहे. त्याचा उल्लेख अनंतदेव द्वितीय, असा करणे इष्ट होईल. त्याचा उल्लेख प्रस्तुत शिलालेखात दोनदा आलेला आहे (ओ. ५ व १०) हे लक्षात टेवले पाहिजे.

हा अनंतदेव द्वितीय कोण होता? परळच्या शिलालेखावरून असे दिसून येते की, शके ११०८ मध्ये उत्तर कोंकण प्रदेशावर शिलाहारनृपती अपरादित्य द्वितीय राज्य करीत होता[२] वसई तालुक्यातील मांडवी या गावी सापडलेल्या शिलालेखावरून असे दिसून येते की, शके ११२५ मध्ये कोंकण विभागावर शिलाहार नृपती केशिदेव द्वितीय हा राज्य करीत होता.[३] तो अपरादित्य द्वितीय याचा पुत्र असल्याचे लोणाडजवळ चौधारपाडा या गावी उपलब्ध झालेल्या शके ११६१ च्या शिलालेखावरून स्पष्ट होते.[४]

अपरादित्य द्वितीय याच्यानंतर त्याचा पुत्र केशिराज द्वितीय हा सिंहासनावर येणे हेच स्वाभाविक दिसते. पण आपल्या प्रस्तुतच्या शिलालेखावरून शके ११२० मध्ये अनंतदेव द्वितीय हा राज्य करीत होता हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट होय. म्हणूनच प्रश्न उपस्थित होतो तो असा की, हा अनंतदेव द्वितीय कोण होता? अपरादित्यानंतर त्याची गादी बळकवणारा हा कोणी असेल की काय? तसे नसल्यास अपरादित्याचे व त्याचे कोणते नाते असावे?

या प्रश्नांचे उत्तर ऐतिहासिक पुराव्याच्या साह्याने निश्चित देता येणे शक्य नाही. एवढी गोष्ट मात्र खरी की, अपरादित्य द्वितीय याच्या नंतर शके ११२० मध्ये अनंतदेव द्वितीय गादीवर आला आणि त्यानंतर, पण शके ११२५ पूर्वी, केशिराज, द्वितीय हा राज्य करू लागला. अपरादित्य द्वितीय याच्या मृत्यूनंतर त्याचा

१ इंडि., अँटि., वर्ष ९, पृ. ३३--३५; एपि. इंडिका, वर्ष २३, पृ. २७७, २७८

२ प्राचीन मराठी कोरीव लेख (तुळपुळे) पृ. ८०–८४

३ प्राचीन मराठी कोरीव लेख (तुळपुळे) पृ. ९८–१००.

४ अॅनल्स ऑफ दि भांडारकर ओरिअंटल रीसर्च इन्स्टिटयूट, वर्ष २३, पृ. ८९–१०२.

पुत्र केशिराज द्वितीय विद्यमान असतानाही शके ११२० मध्ये सिंहासनाधिष्ठित असलेला अनंतदेव द्वितीय, हा बहुधा अपरादित्याचा वडील मुलगा असावा असा तर्क करण्यास हरकत नाही. शके ११२५ पूर्वीच तो मृत्यू पावला असावा, आणि त्यानंतर त्याचा धाकटा भाऊ केशिराज द्वितीय हा गादीवर आला असावा. कदाचित असेही असेल की, हा अनंतदेव अपरादित्याचा धाकटा भाऊ असून अपरादित्याच्या मृत्यूनंतर तो गादीवर आला असावा व त्याच्या मृत्यूनंतर अपरादित्याचा पुत्र केशिराज याला गादी मिळाली असावी.

ओळ ७ व ९ मध्ये अनंतदेवाच्या मंत्रिमंडळातील अधिकाऱ्यांची नावे आलेली आहेत. श्रीव्रीहिम प्रभु हा महामात्य अर्थात मुख्य प्रधान होता. ओ. १२ मध्ये हेच नाव हुमिप्रभु असे आले आहे. श्री वाहिम प्रभु हा मुख्य सेनापती असावा. ओ. १२ व १३ यामध्येही मालुपै प्रभु व दाढिका मालु अशी नावे आली आहेत बहुधा ज्यांना दान मिळाले त्यांची ती नावे असावीत. दान दिलेल्या (दोन) शेतातील धान्याच्या प्रत्येकी एक हजार पेंढ्यासंबंधी ओळ १६ व १७ मध्ये निर्देश असावा.

लेखाच्या शेवटच्या ओळीत 'स्वदत्तां परदत्तां वा' हा शापवचनाचा श्लोक आलेला आहे. त्यावरूनही एखाद्या जागेचे दान दिल्याचा उल्लेख हा प्रस्तुत शिलालेखाचा हेतू होय हे स्पष्ट होते.

## वाचन

१. [श्री] स्वस्ति जयश्चाभ्युदयश्च शकनृपकालातीतसं–
२. वत्सरशतेषु एकादश(शे)षु वीं(विं)शत्यधिकेषु प्रवर्त्तमाने य–
३. त्रांकतोपि शकुसंवतु ११२० कालयुक्तसंवत्सरांतर्ग–
४. त मार्ग्गशिर वदि [८] सोमे (।*) अद्येह समस्तराजावलीवि–
५. राजित महाराजाधिराज परमेश्वर श्रीमदनंतदेवरा–
६. यकल्याणविजयराज्ये तथैतत्प्रसादावाप्तसमस्तराज्य–
७. चिंताभार(रं) समुद्व[ह]ति महामात्य [प्रोढि] श्री [व्रीहिम] प्रभु
८. [म*]हादलाधिपति श्रीवादिमप्रभुपै इत्यादि श्रीकरणे
९. प्रवर्त्तमाने सति.......... पुर भांडारिअ.............
१०. ........... ...विप्राय महाराज श्रीअनंत–
११. देवेन महाराजाधिराज..............प्रदत्ता लाकाय
१२. य महामात्यहुमिप्रभुसुतस्य [आनु] पै प्रभु..........
१३. ...............अमात्यपुत्र श्रीदाढिकामालुका [य]

१४. ................................स्याय मुक्तौ कृता
१५. .......पेंढिआ सहस्रद्वयं यत्नांकतोपि [२०००]
१६. .......[मालु प्रभु] सत्क पावी पेंढिआ १००० इ.............
१७. ............सत्क पावी पेंढिआ १००० इय..............
१८. .........फलं ।। व(ब)हुभि [र्व्वसुधा भुक्ता] राजभिः सगरा–
१९. ........। स्वदत्तां परदत्तां वा यो [हरेत वसुं]–
२०. धरां [।*] षष्ठि वर्षसहस्राणि विष्ठायां जा[यते कृमिः]

१७

# यादवनृपती द्वितीय सिंघणकालीन भाळवणी शिलालेख, शक वर्ष ११३८

## उपलब्धी

इ. स. १९७१ च्या जून महिन्यात, कऱ्हाड येथील श्रीशिवाजी विद्यालयातील शिक्षक श्री. भगवानराव घार्गे यांना भाळवणी (ता. खानापूर, जिल्हा सांगली) येथे एकूण चार शिलालेख उपलब्ध झाले. ते त्यांनी श्रीशिवाजी विद्यालयात आणून ठेवले आहेत. त्यांपैकी तीन शिलालेख कन्नड लिपीत कोरलेले असून चौथा नागरी लिपीत कोरलेला आहे. आज प्रसिद्ध करीत असलेला लेख हा तोच होय. कन्नड लिपीतील शिलालेखांबरोबरच याही शिलालेखाचा ठसा मला महाराष्ट्र राज्याच्या पुरातत्त्व व पुराभिलेख विभागाचे त्या वेळचे संचालक श्री वि. गो. खोबरेकर यांनी काढून पाठविला होता. अनेक वर्षे तो माझ्याजवळ पडून होता. माझ्या या दिरंगाईबद्दल इतिहासाच्या अभ्यासकांची मी क्षमा मागतो. एका विशिष्ट कारणाने हा शिलालेख मला महत्त्वाचा वाटत असल्यामुळे त्याचे वाचन व संपादन आज मी येथे प्रसिद्ध करीत आहे.

## वर्णन

या कोरीव लेखाची शिळा ३९ सें. मी. उंच असून ३० सें. मी. रुंद आहे. तिच्यावर एकूण १५ ओळींचा मजकूर कोरलेला आहे. एकेका ओळीत साधारणपणे १७–१८ अक्षरे असून प्रत्येक अक्षर सुमारे २ सें. मी. उंच व १ सें. मी. रुंद आहे अर्थात, अक्षरे चांगली मोठी व ठसठशीत आहेत. तथापि, अनेक ठिकाणी शिळेच्या खपल्या निघालेल्या असल्यामुळे तेथील अक्षरांचे वाचन दुर्बोध झाले आहे. विशेषतः शेवटच्या आठ ओळींतील बहुतेक अक्षरे फार खराब झाली असल्यामुळे त्यांच्या वाचनातून सुसंगत अर्थ काढणे अशक्यप्राय वाटते.

## लिपी व भाषा

आरंभी निर्दिष्ट केल्याप्रमाणे लेखाची लिपी देवनागरी असून भाषा संस्कृत आहे. 'ए' या अक्षराचे त्रिकोणाकृती वळण 'श्रीपदुमण ऐडि' या शब्दांत (ओ. ७)

स्पष्ट दिसते. तसेच दोन पोकळ टिंबांच्या खाली 'उ' काराचे चिन्ह कोरून 'इ' लिहिण्याचे जुने वळण 'माइदेवे' या शब्दात (ओ. ११) आढळते. लेखाची भाषा संस्कृत आहे. पण शेवटच्या काही ओळीतील शब्दांवरून शेवटचा भाग मराठीत असावा असे वाटते.

**कालनिर्देश**

शिलालेखाचा आरंभ कालनिर्देशाने झाला आहे. पहिल्या ओळीत ११३८ हा आकडा अगदी स्पष्ट आहे. त्यापूर्वीची अक्षरे बरीच खराब झाली आहेत. ओळीच्या आरंभी 'स्वस्ति श्री' वाचता येते. त्यानंतरची अक्षरे 'शकवर्ष' अशी वाचता येतात. तेथे 'अतीषु' असे वाचनही शक्य आहे. पण ते पुढील वाक्य-रचनेशी जुळत नाही. ११३८ या आकड्यानंतरची अक्षरे 'धाता संवत्सरे वैषाख–' अशी स्पष्ट आहेत. एकूण हा कालनिर्देश '११३८ धाता संवत्सरे वैषाख शुद्ध ३ गुरौ' असा आहे, याविषयी शंका नाही. दि. ब. स्वामी कन्नु पिल्लै यांच्या जंत्री-प्रमाणे गत शक ११३८ ला धात्री संवत्सर असून वैशाख शुद्ध तृतीयेला बरोबर गुरुवार येतो. तेव्हा हा कालनिर्देश शक–संवत्सर आणि तिथिवारांसहित जुळत असल्यामुळे तो बरोबर मानण्याला हरकत नाही. त्या दिवशी इंग्रजी तारीख २१ एप्रिल १२१६, गुरुवार ही होती.

**द्वितीय सिंघणदेव**

कालनिर्देशानंतर, ज्याच्या राज्यकालात हा शिलालेख कोरला गेला त्या श्री-सिंघणदेवाचा उल्लेख ६ व्या ओळीच्या आरंभी स्पष्टपणे आला असून त्यापूर्वी ओळ २ ते ५ मध्ये त्याची बिरुदावली आलेली आहे. ती अशी : श्रीपृथिवीवल्लभ, महाराजाधिराज, परमेश्वर, श्रीद्वारावतीपुरवराधीश्वर, विष्णुवंशोद्भव, श्रीजादवकुलकमलकलिकाविकासभास्कर, प्रतापचक्रवर्ति–श्रीसिंघणदेव. द्वितीय सिंघणाच्या अन्य कोरीव लेखांत आढळणारीच ही बिरुदावली होय. या शिलालेखा-तील काळापूर्वी तीन वर्षे अगोदरच्या खिद्रापूर (ता. शिरोळ ; जि. कोल्हापूर) येथील कोप्पेश्वरदेवाच्या देवालयातील, खुद्द सिंघणाच्या संस्कृत शिलालेखात[1] मात्र, वरील बिरुदावलीशिवाय 'श्रीमद्देवगिरावधिष्ठित, समस्तभुवनाश्रय, समस्त-अरिरायजगझंप' ही विशेषणे अधिक आढळतात. भाळवणी येथील प्रस्तुत शिला-लेख खुद्द सिंघणाचा नसून त्याच्या राज्यकालातील आहे व तो त्याच्या अधिकाऱ्याचा आहे हे लक्षात ठेवले पाहिजे.

---

१ जर्नल, बॉंबे ब्रँच, रा. ए. सोसायटी, वर्ष १४, पृ. ७; डॉ. मिराशी. शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख, पृ. ३५१.

### सिंघणाचे अधिकारी

शिलालेखाच्या ६ ते १० या ओळींत सिंघणाच्या काही अधिकाऱ्यांची नावे आली असून त्यानंतर राज्यवृत्ती म्हणून काही दान दिल्याचा निर्देश १२ व १३ या ओळींत आलेला दिसतो. 'श्रीकरहाड (ओ. ६) मंडले तत्पादपद्मोपजीवी श्री पदुमण ऐडि (ओ. ७) चैय्यपदेव...धिप श्रीसोइदेव (ओ. ८) भालवणी पत्तने। शंभुनारणदेव...(ओ. ९) श्रीपतौ विद्यमाने...' (ओ. १०) हा मजकूर नीट रीतीने वाचता येतो. त्यावरून कऱ्हाड-मंडलात श्रीपदुमण ऐडि, चैय्यपदेव व श्रीसोइदेव हे सिंघणाचे 'पादपद्मोपजीवी' (=चरण कमलावर उपजीविका करणारे) सेवक होते असे दिसते. तसेच भालवणी शहरात (पत्तने) शंभुनारण देव व श्रीपती नावाचे सेवक होते. त्यांच्या उपस्थितीत (विद्यमाने) भाइदेवाच्या मांगलिक पूजेसाठी काही राज्यवृत्ती वगैरे दिल्याची नोंद या शिलालेखात असावी असे स्थूलमानाने म्हणता येते.

### करहाड मंडल

प्रस्तुत शिलालेखातील 'करहाड मंडल' व 'भालवणी' हे दोन्ही स्थाननिर्देश महत्त्वाचे आहेत. हा शिलालेख ज्या गावी मिळाला त्याच भाळवणी गावात दोन कन्नड शिलालेख सापडले आहेत. त्यांतील एक इ. स. ११५६ चा असून दुसरा इ. स. ११७३ चा आहे. पहिल्या शिलालेखात कल्याण येथील चालुक्यचक्रवर्ती त्रैलोक्यमल्लदेव (=तृतीय तैलप) याच्या आठव्या राज्यवर्षी, धाता संवत्सर मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा, गुरुवार, (=इ. स. ११५६, नोव्हेंबर १५) रोजी, त्याचा महामंडलेश्वर बिज्जणदेवाचा पादपद्मोपजीवी कुमारनारायण मैळुगीदेव हा 'करहाड नाल्कु' म्हणजे करहाड–४००० या विभागावर राज्य करीत असताना, त्याचा महाप्रधान सोवण नायक व करण चावण नायक यांनी 'श्रीमतु राजधानि भाळवणि' येथील गवरेश्वरदेवाच्या पूजाअर्चेसाठी काही दाने दिल्याचा उल्लेख आहे. दुसऱ्या शिलालेखातही 'पृथ्वीवल्लभ महाराजाधिराज..कलचुर्य्यकमळमार्तंड' सोयीदेवाच्या राज्यकालात 'श्रीमतु राजधानि भाळवणि' येथील काही श्रेष्ठींनी तेथील जैन वसतीला काही दाने दिल्याची नोंद आहे. या दोन्ही कन्नड शिला-लेखांवरून इ. स. ११५६ ते ११७३ च्या काळात 'करहाड' विभाग कलचुरींच्या राज्यात अंतर्भूत होता, या विभागात एकूण ४ हजार गावे होती व त्याची राजधानी भाळवणी येथे होती असे दिसून येते.

कलचुरी बिज्जण हा आरंभी चालुक्यांचाच मांडलिक होता. पुढे त्याने चालुक्यांचे सार्वभौमत्व झुगारून आपले स्वतंत्र राज्य स्थापन केले. या कामात

त्याला शिलाहार वंशातील ज्या विजयादित्याचे साह्य झाले तो कऱ्हाड येथूनच राज्य करीत होता.[१] चालुक्यांचे स्वामित्व झुगारून दिल्यावर बिज्जणाने शिलाहार विजयादित्यालाही हुसकावून लावून त्याचा कऱ्हाड प्रांत स्वतःच्या राज्याला जोडला असावा, असे भाळवणी येथील उपरोक्त क्र. १ च्या कन्नड शिलालेखावरून दिसते. बहुधा त्यामुळेच शिलाहारांना आपली राजधानी कोल्हापूर येथे न्यावी लागली असावी. चालुक्य नृपती चतुर्थ सोमेश्वर याने सुमारे इ. स. ११८४ मध्ये कलचुरींचे राज्य नष्ट केल्यावर कऱ्हाड प्रांत पुन्हा चालुक्यांच्या स्वामित्वाखाली गेला असावा. त्याच सुमारास द्वितीय सिंघणाचा दक्षिण–दिग्विजय सुरू होता. शके ११३५ = इ. स. १२१३ मध्ये त्याने होयसळावर स्वारी करून त्याचा उत्तर कर्नाटकातील बनवासी प्रांत जिंकून घेतला.[३] त्याच काळात त्याने शिलाहार द्वितीय भोजाचा पराभव करून त्याचे राज्य आपल्या राज्यास जोडले.[४] खिद्रापूर (ता. शिरोळ, जि. कोल्हापूर) येथे कोल्हापूर विभागातील सिंघणाचा जो पहिला शिलालेख उपलब्ध झाला आहे तो शके ११३५=इ. स. १२१३ चा आहे.[५] याच वेळी कऱ्हाड प्रांतही त्याच्या ताब्यात आला असावा. आज प्रसिद्ध करीत असलेल्या शिलालेखावरून शके ११३८ म्हणजे इ. स. १२१६ मध्ये कऱ्हाड मंडळ सिंघणाच्या राज्यात होते हे निश्चित दिसते. खिद्रापूर येथील शिलालेख प्रत्यक्ष सिंघणाचा आहे. त्यानंतर त्याच्या अधिकाऱ्यांचे अनेक शिलालेख कोल्हापूर येथे सापडले आहेत. त्यांतील पहिला शिलालेख शके ११४० (=इ. स. १२१८) चा असून त्यात सिंघणाचा अधिकारी तैलप याने महादेवाच्या देवळातील तोरण बांधल्याचा उल्लेख आहे.[६] कोल्हापूर विभागातील सिंघणाच्या अधिकाऱ्यांचे शिलालेख या दृष्टीने विचार केला तर भाळवणी येथील शके ११३८ (=इ. स. १२१६) चा प्रस्तुत शिलालेख त्याही पूर्वीचा, आणि म्हणून पहिला ठरेल. या दृष्टीने त्याचे महत्त्व विशेष आहे.

---

१ भारतीय इतिहास आणि संस्कृति त्रै. वर्ष ९, पु. १५, पृ. ६३–८७; बॉम्बे गॅझेटीअर I. ii. p. 475.

२ अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन–यझदानी, पृ. ३७९, ४६६.

३ दि यादवाज अँड देअर टाइम्स–डॉ. ओ. पी. वर्मा, पृ. ८५.

४ तत्रैव. पृ. ८९.

५ डॉ. मिराशी. शिलाहार राजवंशाचा इतिहास व कोरीव लेख, पृ. ३५०.

६ ॲन्युअल रिपोर्ट ऑन इंडियन एपिग्राफी, १९४५ क्र. ३५४.

### भाळवणी

प्रस्तुत शिलालेख ज्या गावी सापडला ते भाळवणी गाव सांगली जिल्ह्याच्या खानापूर तालुक्यातील आज एक लहानसे खेडे असले तरी सातशे वर्षांपूर्वी ते फार मोठे शहर असले पाहिजे. कलचुरींच्या काळात त्यांच्या राज्याच्या कऱ्हाडसारख्या चार हजार खेड्यांच्या राजधानीचे शहर होण्याएवढे ते मोठे व महत्त्वाचे शहर होते यात शंका नाही. उपरोक्त दोन्ही कन्नड शिलालेखांत 'राजधानि भाळवणि' असे स्पष्ट म्हटले आहे. सिंघणाच्या अधिकाऱ्याचा प्रस्तुत शिलालेख तेथे असावा यावरूनही त्या गावाचे महत्त्व सूचित होते. गवरेंश्वराचे तेथे फार मोठे देवालय होते. महाप्रधान, पोथेग्राहक (लेखाधिकारी) व करण यांच्यासारख्यांनी, इतकेच नव्हे तर निरनिराळ्या व्यापारी श्रेणींनी त्या देवालयाला दाने दिली आहेत. यावरून हे देवालय फार महत्त्वाचे धार्मिक स्थळ असावे असे दिसते. भाळवणी येथे अनेक व्यापारी श्रेणी होत्या त्यावरून भाळवणी हे व्यापाराचेही मोठे केंद्र असावे. गवरेंश्वरदेवाच्या देवालयाप्रमाणेच तेथे पार्श्वनाथाचे एक मोठे मंदिर होते असे उपरोक्त कन्नड शिलालेखांतील दुसऱ्या शिलालेखावरून दिसून येते. आज प्रसिद्ध करीत असलेल्या सिंघणाच्या प्रस्तुत शिलालेखाद्वारेही भाळवणी येथील कोणत्या तरी देवालयाला राज्यवृत्ती (सरकारी वतन) दिल्याचे त्यातील 'पूजा' 'राज्यवृत्ती' 'प्रदत' इत्यादी शब्दांवरून दिसून येते. या देवालयातील देवतेचे नाव 'भाइयल' असावे असे १२ व्या ओळीतील पहिल्या शब्दाच्या वाचनावरून म्हणता येते. 'भाइयल' हे देवतानाम अपरिचित वाटते. पण त्या नावाची देवता असावी. छित्तराजाच्या शके ९५६ मधील बर्लिन म्यूझियम ताम्रपटात 'श्रीभाइयपेश्वर-देवायतना' चा (ओ. ५०) उल्लेख आढळतो[1] 'भाइलैय' हे एक व्यक्तिनाम म्हणून मुम्मुणि राजाच्या अंबरनाथ देवालयातील शिलालेखात आढळते.[2] आपल्या शिलालेखातील 'भाइयल' हे वाचन बरोबर असल्यास या नावाच्या देवतेचे देऊळ भाळवणी येथे असावे. 'भाळवणी' हे ग्रामनाम या देवतेच्या नावावरून पडले असण्याचीही शक्यता नाकारता येत नाही.

### सिंघणाचे अधिकारी

या शिलालेखात पदुमण ऐडि, चैय्यपदेव, सोइदेव, शंभुनारणदेव, श्रीपती इत्यादी व्यक्तिनामे आलेली आहेत. 'पदुमण ऐडि' हे व्यक्तिनाम आहे की केवळ विशेषण

---

१ डॉ. मिराशी. शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख, पृ. ८२.

२ तत्रैव. पृ. १३२.

आहे हे सांगता येत नाही. ते विशेषण असल्यास पदुमण ऐडि चैय्यपदेव हा कऱ्हाड मंडलातील मुख्य अधिकारी असावा असे म्हणता येईल. चेलपैय, छितपैय, छट्टय, तिकपैय–अशी 'ऐय'(आर्य) पदान्त नावे शिलाहारांच्या कोरीव लेखांत अनेक आढळतात.

लेखक

शेवटच्या दोन ओळीतील शेवटच्या वाक्याचे वाचन 'हे भाज लिखितं च [राजप्पैय] देवे [न]' असे करता येते. यातील 'भाज' (किंवा भाल) या शब्दाचा सुसंगत अर्थ लागत नाही. लिखितं 'राजप्पैय देवेन'–यावरून कुण्या राजप्पैय-देवाने हा शिलालेख कोरला असे कळते.

वाचन

१. [स्वस्ति श्री शकवर्ष] ११३८ धाता संवत्सरे वैषाख
२. शुद्ध ३ गुरौ[अद्येह] श्री पृ[थिवी]वल(ल्ल)भ महाराजाधि–
३. राज परमेश्वर श्रीद्वारावतीपुरवराधी[श्व]र
४. [वि]ष्णुवंशोद्भव[श्री]जादवकुलकमलक–
५. लिकाविकासभास्कर प्रतापचक्रवर्ति
६. श्रीसिंघणदेवविजयराज्ये। श्रीकरहाड
७. [मं]डले तत्पादप[द्मोपजीवी] श्रीपदुमणऐडि
८. चैय्यपदेव [....धिप] श्रीसोइदेवा....
९. भालवणीपत्तने। शंभुनारणदेव......
१०. श्रीप[तौ] विद्यमाने......धारा पूजा–
११. श्रीमाइदेवे......विषय रुद्रणं मांगलीक
१२. भाइयल सुखार्थ.....राज्ये वत्तिकादय....
१३. साय प्रदत्त..................
१४. पूजा.....भायणदेवभं जिणलि हे भाज लि–
१५. खितं च राजप्पैयदेवे[न]। मंगल महाश्रीः ॥०॥

# १८

## अंधेरी येथील शिलालेख

### प्रास्ताविक

मुसलमानांच्या आक्रमणापूर्वी कोंकण विभागावर शिलाहार घराण्यातील राजे राज्य करीत होते, हे इतिहासज्ञांना माहीतच आहे. ते आरंभी चालुक्यांचे तर नंतर यादवांचे मांडलिक म्हणून राज्य करीत. शेवटच्या काही शिलाहारांनी यादवांचे मांडलिकत्व झुगारून देऊन स्वतंत्रपणे राज्य केल्याचे दिसून येते.[१] यादवांचे राज्य नष्ट झाल्यावर कोंकण विभागावर मुसलमान राजे राज्य करू लागले. त्यांचा आरंभीच्या काळातील इतिहास फारसा उपलब्ध नाही. 'महिकावतीची बखर' या ग्रंथातून तो थोडाफार आलेला आहे. पण तो काहीसा पौराणिक स्वरूपाचा व काहीसा बखरवजा आहे. त्यामुळे निश्चित पुराव्याच्या अभावी त्याला ऐतिहासिक महत्त्व देता येत नाही. अलीकडे कोंकण विभागावरील मुसलमान राजवटीतील शिलालेख उपलब्ध होऊ लागले आहेत. यादवकालीन काही शिलालेखांत त्या भागातील मुसलमान अधिकाऱ्यांचे व त्यांनी मशिदी बांधल्याचे उल्लेख येतात. त्या दृष्टीने डॉ. तुळपुळे यांनी प्रसिद्ध केलेल्या 'प्राचीन मराठी कोरीव लेख' या ग्रंथातील कालवार (क्र. ४०), अक्षी (क्र. ४१), कोपराड (क्र. ४३), चेउल (क्र. ४४) व आगासन (क्र. ४६) हे रामदेवराव यादवकालीन लेख तपासून पाहण्यासारखे आहेत. हंबीरराव याचे रानवड (उरण) आणि वाघरण येथील शिलालेखही या अभ्यासाला उपयुक्त ठरतील. चार वर्षांपूर्वी 'डोंबिवली' येथे एक शिलालेख उपलब्ध झाला होता. त्याचे सविस्तर संपादन 'नागपूर युनिव्हर्सिटी जर्नल' (वर्ष १७–१, ऑक्टो. १९६६) मध्ये मी केले आहे.[२] अलीकडे अंधेरी येथे एक शिलालेख उपलब्ध झाला आहे. त्याची माहिती प्रस्तुत लेखात देत आहे.

### उपलब्धी व वर्णन

अंधेरी (ता. वसई, जिल्हा ठाणे, महाराष्ट्र) येथील तेली गल्लीत 'स्टेट बँक ऑफ इंडिया' च्या इमारतीसाठी पाया खोदताना नोव्हेंबर १९६९ मध्ये एक

१ इतिहास आणि संस्कृति त्रैमासिक, वर्ष ७, पुस्तक २६, जुलै १९७०. पृ. ७६.

२ पुढे पृ.३७२–३८० पाहा.

शिलालेख सापडला. ही तेली गल्ली म्हणजे पूर्वीचे 'गुंडवली' या नावाचे गाव होय, असे कळते. ते आता अंधेरी गावात समाविष्ट झालेले आहे. वरील शिलालेखाच्या उपलब्धीची माहिती मुंबई येथील मराठी दैनिक 'नवशक्ती' च्या दिनांक २८ नोव्हेंबर १९६९ च्या अंकात प्रथम प्रसिद्ध झाली. महाराष्ट्र शासनाच्या पुरातत्त्व व पुराभिलेख विभागाचे संचालक श्री. वि. गो. खोबरेकर, यांनी त्याचे उत्कृष्ट ठसे मला मिळवून दिले. त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. त्यांच्या संमतीने, त्या ठशावरून प्रस्तुत शिलालेखाचे संपादन मी येथे करीत आहे.

उपलब्ध झालेली ही शिळा खालून फुटलेली आहे. त्यामुळे शिलालेख अपूर्ण आहे. शिळेची वरची बाजू ओबडधोबड आहे. त्या खालील भाग व्यवस्थितपणे सपाट केलेला असून त्यावर शिलालेख कोरलेला आहे. या उपलब्ध भागाची रुंदी ४२ सें. मी. असून उंची ६० सें. मी. आहे. वरच्या भागावर आरंभी शिळेच्या उजव्या बाजूला सूर्य आणि डाव्या बाजूला चंद्र यांच्या आकृती उठावात कोरलेल्या आहेत. मध्यभागी दोन स्तंभ असून त्यांच्यामध्ये वरच्या भागाला कलशासारखी आकृती उठावात कोरलेली दिसते. ती बरीच फुटलेली असल्यामुळे तिचे निश्चित स्वरूप वर्णन करता येत नाही. या आकृतीच्या खाली थोडी जागा सोडून नंतर शिलालेखाचा मजकूर कोरलेला आहे. वरच्या भागाप्रमाणेच शिळेच्या दोन्ही बाजूंनीही थोडी थोडी जागा सोडलेली आहे. शिलालेखाच्या तिन्ही बाजूंना व्यवस्थितपणे सरळ रेषा कोरलेल्या आहेत. खालच्या बाजूलाही अशी सरळ रेषा ओढलेली असावी. त्यावरून प्रथम सर्व बाजूंनी मर्यादा–रेषा कोरून नंतर त्यामध्ये लेखाचा मजकूर कोरण्याची कोरकाने काळजी घेतल्याचे दिसून येते. तरीही ओ. ९ व १० यांच्या शेवटची अक्षरे मर्यादेबाहेर गेल्याचे दिसून येते. संपूर्ण शिलालेखातील केवळ १४ ओळी उपलब्ध भागावर आहेत. त्यातील १४ व्या ओळीच्या मधल्या भागातील फक्त चारच अक्षरे उपलब्ध आहेत. प्रत्येक ओळीची लांबी ३५ सें. मी. असून तिच्यात साधारणपणे १६ ते १८ अक्षरे आहेत. प्रत्येक अक्षराची उंची सुमारे २ सें. मी. आहे. त्यावरून अक्षरांच्या ठळकपणाची कल्पना येईल. सर्व मजकूर कोरकाने स्वच्छ व ठसठशीत कोरलेला आढळतो.

### भाषा व लिपी

शिलालेखाची भाषा संस्कृत आहे पण ती सर्वत्र शुद्ध आहे असे नाही. 'न्रिप' 'सवंसरेषु' (ओ. १); 'द्वादससु' (ओ. २); 'सवंसरांतर्गत' (ओ. ३);

'क्रिष्ण' (ओ. ४); 'सकछवंछर' (ओ. ५) इत्यादी शब्दांचे लेखन चुकीचे आहे हे स्पष्ट होय. परसवर्णासाठी सर्वत्र अनुस्वार दिलेला आहे. उदा. अत्रांकतोपि (ओ. २), पिंगळ सवंसरांतर्गत (ओ. ३) इत्यादी. तालव्य **श** आणि मूर्धन्य **ष** यांच्यासाठी दंत्य **स** योजलेला आहे. उदा. द्वादससु (ओ. १, २), **द्वादस्स्यां** (ओ. ५) इत्यादी. संयुक्त अक्षरातील मूर्धन्य **ऋ** चा **रि** केलेला आढळतो **उदा.** **न्रिप** (ओ. १), **क्रिष्ण** (ओ. ४), **प्रिथिवी** (ओ. ८) इत्यादी. लेखात वापरलेली लिपी नागरी होय. **ल** साठी सर्वत्र **ळ** कोरलेला आहे. उदा. '**काळातित**' (ओ. १), 'साळिवाण' 'पिंगळ' (ओ. ३), 'आळुनाक' (ओ. १०), '**दळाधि-पतौ** (ओ. १२). दोन ठिकाणी **स** च्या ऐवजी **छ** कोरलेला आहे. उदा. **छवंछर** (ओ. ५). ओ. १ व ३ मधे मात्र 'सवंसर' असाच हा शब्द कोरलेला आहे हे लक्षात घेतले पाहिजे. 'संवत्सर' हा शब्द 'सवंसर' असा कोरण्यात कोरकाकडून चुक झालेली आहे. ओ. ९ मधे एक उभा दंड कोरकाने जास्तीचा कोरलेला आहे. 'श्री' कोरताना त्यावर एक मात्रा कोरलेली आढळते. ती अर्थातच निरर्थक होय. बहुधा त्याकाळी **श्री**वर एक मात्रा देऊन लिहिण्याची पद्धती असावी.

### कालनिश्चिती

प्रस्तुत शिलालेखात काळाचा निर्देश ओ. १ ते ६ मधे केलेला आहे त्या-वरून गत शक १२९९, पिंगळ संवत्सर, भाद्रपद वद्य १२, रविवार हा या लेखाचा काळ असल्याचे दिसून येते. शककालाचा निर्देश जसा अक्षरात केलेला आहे तसा तो आकड्यांतही केलेला आहे. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे शके १२९९ मधे पिंगळ संवत्सर असून त्या वर्षीच्या भाद्रपद वद्य १२ ला जंत्रीत सोमवार दिलेला आहे. जंत्रीनुसार रविवारला एकादशी होती हे खरे असले तरी ती तिथी म्हणजे एकादशी त्याच दिवशी सकाळी ७ वाजून ४० मिनिटांनी संपली. त्यानंतर द्वादशी सुरु होऊन ती सोमवारी सकाळी ९ वाजून ३५ मि. पर्यंत होती. अर्थात, रविवारी सकाळी ७ वाजून ४० मिनिटानंतर दिवसभर द्वादशी तिथी होती हे स्पष्ट आहे. तेव्हा आपल्या शिलालेखात निर्देशिल्याप्रमाणे शके १२९९ मधील भाद्रपद वद्य द्वादशीला रविवार होता हे विधान बरोबर ठरते.

शकसंवत्सराबरोबरच लेखात मुसलमानी कालगणनेप्रमाणे 'ईजरत' म्हणजे हिजरी सन ७७९ निर्दिष्ट केला आहे. तोही पिल्ले यांच्या जंत्रीनुसार बरोबर आहे. खिस्ती कालगणनेप्रमाणे हया लेखाची तारीख इ. स. १३७७, सप्टेंबर ३० (रविवार) ही येते.[1]

**आशय व चर्चा**

प्रस्तुत शिलालेखाचा निश्चित उद्देश कोणता होता हे सांगता येणे शक्य नाही. कारण लेख अपूर्ण आहे. १४ व्या ओळीनंतरच्या भागात बहुधा त्याचा निर्देश असावा, पण नेमका तोच भाग उपलब्ध झालेला नाही. तथापि, जो भाग उपलब्ध आहे त्यावरून ऐतिहासिक स्वरूपाची थोडीफार माहिती मिळू शकते आणि तेच या लेखाचे आजच्या स्थितीत विशेष महत्त्व होय.

लेखाचा प्रारंभ 'स्वस्ति' या शब्दाने झालेला असून त्यानंतर सहा ओळींत कालनिर्देश आलेला आहे. त्याची चर्चा यापूर्वी केलेलीच आहे. या कालनिर्देशानंतर त्यावेळी 'ठाणे कोंकण' विभागावर राज्य करणाऱ्या 'नासिर राय' याचा उल्लेख आलेला असून (ओ. ८) त्याला 'ठाणेकोंकणसमस्तभुवनाश्रयश्रीप्रिथिवीवल्लभमहाराजाधिराज' (ओ. ७ व ८) असे संबोधलेले आहे. यातील 'समस्तभुवनाश्रय' 'पृथ्वीवल्लभ' 'महाराजाधिराज' ही बिरुदे चालुक्य नृपतींची असून त्यांतील 'महाराजाधिराज' हे बिरुद शिलाहारांच्या शिलालेखांतही आढळते. ही सर्व बिरुदे नासिररायाला लावलेली आहेत त्यावरून तो सामान्य राजा नसून कोणी मोठा 'महाराजाधिराज' असावा, असा तर्क करण्याला हरकत नाही. त्याच्या नावाच्या निर्देशानंतर 'विजयराज्योदये' हा शब्द आलेला असून त्याच्या मांडलिकाचा निर्देश करताना त्याला, अर्थात त्या मांडलिकाला 'तत्पादपद्मोपजीवी' असे विशेषण लावले आहे. हे दोन्ही शब्द यादव नृपतींच्या शिलालेखांत येतात. तेथूनच ती प्रस्तुत शिलालेखाच्या लेखकाने उचलली असावीत त्यावरून चालुक्य, यादव आणि शिलाहार नृपतींच्या लेखांतील मायन्यांचा प्रभाव या शिलालेखातील मजकुरावर पडला आहे हे दिसून येईल. कोंकण विभागावरील आरंभीच्या मुसलमान राजांनी आपल्या शिलालेखासाठी संस्कृत भाषेचा, इतकेच नाही तर त्या विभागातील पूर्वकालीन नृपतींच्या शिलालेखांतील मसुद्यांचा उपयोग कसा करून घेतला होता हे पाहण्यासारखे आहे.

हा **नासिरराय** 'ठाणेकोंकण (आदिकरून) समस्त भुवनांना' आश्रय असल्याचे जसे म्हटले आहे, तसेच तो 'वेळाऊळ माहा–हिंदा(दो)स्ताने' राज्य करीत होता असेही म्हटले आहे (ओ. ९). हा 'नासिरराय' कोण आसावा? त्याचा शोध घेण्यापूर्वी कोंकण विभागावरील मुसलमानांच्या आक्रमणाचा इतिहास लक्षात घेतला पाहिजे. इ. स. १२९७ मध्ये गुजराथेतील अन्हिलवाड राजघराणे अल्लाउद्दीन खिलजी याने नष्ट केले. त्यामुळे स्वाभाविकपणेच त्याच्या ताब्यातील कोंकणचा भाग दिल्लीच्या ताब्यात गेला आणि त्यावर दिल्लीश्वराचे प्रतिनिधी

गुजराथचे सुलतान राज्य करू लागले. इ. स. १३१८ मध्ये देवगिरी येथील यादवांचे राज्य नष्ट झाले, आणि त्यांच्या ताब्यात असलेला कोंकणचा काही भाग दिल्लीश्वर खिलजींच्या ताब्यात गेला. देवगिरी–दौलताबाद येथील मुसलमान अधिकाऱ्यांनी दिल्लीविरुद्ध बंड करून इ. स. १३४७ मध्ये स्वतंत्र बहामनी राज्य स्थापन केले. त्यामुळे अर्थात कोंकणाचा काही भाग बहामनी सुलतानांच्या ताब्यात गेला.[१] काही ठिकाणी किरकोळ हिंदू राजे राज्य करीतच होते. अशा स्थितीत इ. स. १३७७ मध्ये कोंकणावर राज्य करीत असलेल्या नासिरूचा शोध घेण्यासाठी दौलताबाद, अहमदाबाद आणि दिल्ली येथे राज्य करणाऱ्या घराण्यांतील व्यक्तींची नावे पाहिली पाहिजेत. यावेळी दौलताबाद येथील सुलतानांनी आपली राजधानी गोवळकोंडा येथे हलविली होती. इ. स. १३७७ मध्ये तेथे मुजाहिदशहा सुलतान होता. त्याच्या घराण्यात त्यावेळी 'नासिर' नावाची कोणतीही व्यक्ती नव्हती. गुजराथेत अहमदाबाद येथे झाफरखान लोदी याचा मुलगा दरयाखान गादीवर होता. दिल्ली येथे फिरोजशहा तघलक हा बादशहा होता. त्याने १३५१ ते १३८८ पर्यंत राज्य केले. अर्थात या तिन्ही ठिकाणी कोणी नासिर नावाची व्यक्ती प्रत्यक्ष राज्य करीत होती असे दिसत नाही.

फिरोजशहा तघलक हा स्वतः बादशहा असला तरी आपल्या बरोबरच आपल्या मुलालाही त्याने बादशाहीचे अधिकार दिले होते असे दिसते. हिजरी सन ७६० म्हणजे इ. स. १३५८ मध्ये त्याने आपला वडील मुलगा फतेखान याला आपल्या बरोबर बादशहा केले. इतकेच नाही तर दोघांच्या संयुक्त नावाने नाणीही पाडली. फतेखानाचा मृत्यू झाल्यावर फिरोझने आपला दुसरा मुलगा झाफर याला बादशाहीचे अधिकार दिले व त्याचवेळी आपला तिसरा मुलगा महम्मदखान ऊर्फ नासिर याला मुख्य वजीर[२] केले. अर्थात, त्यावेळी दिल्लीला फिरोज तघलक बादशाहा असला तरी अधिकार सूत्रे महम्मदखान ऊर्फ नासिरच्या हातात असावी. झाफरखानाचा मृत्यू इ. स. १३७१ मध्ये झाला असे मिरात-इ-महमदीने म्हटले आहे. फेरिस्ताने हा मृत्युकाल इ. स. १३७३ असा दिला आहे.[३] यांपैकी कोणताही काळ स्वीकारला तरी झाफरखानाच्या मृत्यूनंतर फिरोझने आपल्या बरोबरच बादशाहीचे अधिकार आपला तिसरा मुलगा महम्मदखान याला दिले असावेत, त्याच वेळी त्याने नासिरूद्दीन हे नाव धारण केले असावे

१ बॉबे गॅझेटीअर, व्हॉ. १, भाग २, पृ. २९ व ३०.

२ तघलक डायनेस्टी, (आगा महदी हुसेन), पृ. ४४२.

३ बॉबे गॅझेटीअर, व्हॉ. १, भाग १, पृ. २३१.

असे दिसून येते. या दृष्टीने पाहता, आपल्या शिलालेखात निर्दिष्ट 'माहा-हिंदोस्ताने' राज्य करणारा 'नासिरुराय' तो हाच असावा. तोच पुढे नासिरूद्दीन महंमद म्हणून दिल्लीच्या गादीवर बसला, हे इतिहासज्ञांना माहीत आहेच.

'वेळाऊळ' हा शब्द संस्कृत 'वेलाकुल' शब्दाचे मराठी रूपांतर होय. वेल, म्हणज समुद्राचा किनारा. त्याने आकुल म्हणजे व्याप्त, मर्यादित. समुद्राच्या किनाऱ्याने (किंवा किनाऱ्यापर्यंत) व्याप्त, मर्यादित, अशा माहा–हिंदोस्तानात, अर्थात संपूर्ण हिंदोस्थानात नासिरराय राज्य करीत होता, असा शिलालेखातील या वाक्याचा भावार्थ दिसून येतो. दिल्लीपतीला शोभून दिसणारे असेच हे वर्णन आहे यात शंका नाही.

त्यानंतर त्याचा 'पादपद्मोपजीवी' **आळुनाक राणा** याचा मुलगा **हामाराणा** याचा उल्लेख आलेला आहे. या आळुनाक राण्याचा डोंबिवली शिलालेख प्रसिद्ध झालेला आहे. तो शके १३१८ म्हणजे इ. स. १३९६ चा असून त्यात त्याला आलुनाकु असे म्हटलेले आहे. महिकावतीच्या बखरीत निर्दिष्ट केलेला आलु नाखवा तोच हा आलुनाक असून तो नाइता म्हणजे नव्यानेच धर्मांतरीत झालेल्या नावाड्यांच्या (कोळ्यांच्या) वर्गापैकी होता, हे मी माझ्या डोंबिवली शिला-लेखावरील निबंधात दाखवून दिलेले आहे.[1] शके १३१८ (इ. स. १३९६) मध्ये तो ठाणे येथे राज्य करीत होता. प्रस्तुत अंधेरी शिलालेखावरून असे दिसून येते की, शके १२९९ (इ. स. १३७७) मध्ये तो विद्यमान असून दिल्लीच्या तक्तावरील नासिररायाचा एकनिष्ठ सेवक म्हणून ठाणे-कोंकण विभागावर राज्य करीत होता. 'तत्पादपद्मोपजीवी' हे विशेषण त्यालाच लावलेले आहे. त्याचा मुलगा हामाराणा हा कोंकण विभागाच्या एका प्रांताचा, विशेषत: जेथे हा शिलालेख सापडला त्या अंधेरी प्रांताचा अधिकारी असावा. त्याचा 'निरोपित' म्हणजे त्याने निरोप (आदेश) देऊन पाठविलेला **हामण नाकाचा** मुलगा **श्रीजक(फ)र माहामद** हा त्यावेळी दळाधिपती होता. हामणनाक हा सर्व सैन्याधिपती होता. समस्त सैन्याधिपती आणि दळाधिपती हे दोन शब्द वापरून त्यांची श्रेष्ठकनिष्ठता सूचित केली असावी असे वाटते. सर्वसैन्याधिपती हा मुख्य सेनापती असून त्याच्या हाताखाली असलेल्या सैन्याच्या एका तुकडीवरील अधिकाऱ्याला दळाधिपती म्हटले असावे, असे वाटते. मंत्रिवर्गात **नागदेओ** सारखे श्रीकरणाधिपती म्हणजे लेखनिकावरील प्रमुख होते. यानंतरच्या ओळी नष्ट

१ नागपूर युनि. जर्नल, वर्ष १७–१. पृ. १०३–१०४.

झाल्या आहेत. त्यांत आणखी काही अधिकाऱ्यांची नावे व दानोल्लेख असावा असे वाटते.

या शिलालेखात 'ठाणे–कोंकण' असा या विभागाचा निर्देश केलेला आहे. या विभागात कोंकण प्रांताचा कोणकोणता भाग मोडत होता हे सांगता येत नाही. बहुधा उत्तर कोंकणाला उद्देशून हा शब्दप्रयोग असावा. या विभागाची राजधानी ठाणे येथे असल्यामुळेच त्याला 'ठाणे–कोंकण' हे नाव पडले असावे. प्रस्तुत शिलालेखाच्या काळापूर्वी दहा वर्षे अगोदरचा कोंकणाधिपती हंबीरराव याचा शके १२८९ (इ. स. १३६७) चा नागाव शिलालेख प्रसिद्ध आहे.[१] त्यात 'श्रीमत्यप्रौढप्रतापचक्रवर्ति महाराजाधिराज श्रीहंबिरराओ ठाणे-कोंकण राज्यं क्रोति' असा ठाणे–कोंकणाचा उल्लेख आला आहे. अर्थात, त्यावेळी उत्तर कोंकणावर हंबीरराव राज्य करीत होता. त्या लेखात 'श्रीहिजरत ७६९' असाही सन दिलेला असल्यामुळे, या हंबिररावाची बिरुदे लक्षात घेऊनही, तो मुसलमान बादशहाचा प्रतिनिधी या नात्याने उत्तर कोंकणावर ठाणे येथे राज्य करीत असावा असे वाटते. माझ्या मते तोही मुसलमान असून नायत्या राजांच्या कुळातील हंबीरखान तो हाच असावा.[२] त्याच्या नंतर शके १२९९ (इ. स. १३७७) ते शके १३१८ (इ. स. १३९६) पर्यंत तरी दिल्लीच्या बादशहाचा प्रतिनिधी म्हणून नायत्यांच्याच कुळांतील आळुनाक हा ठाणे–कोंकण विभागावर राज्य करीत असावा असे प्रस्तुत अंधेरी व डोंबिवली या शिलालेखांवरून दिसून येते.

### वाचन

१ स्वस्ति श्रीशकन्रिपकाळाति(तो)तसवंसरेषु द्वाद–
२ ससु नवनवत्यधि[के]षु । य[३]अत्रंकितोपि । सा–
३ ळिवाण १२९९ वर्तमानं पिंगळसवंसरांतर्ग–
४ त ईजरत ७७९ भाद्रपदमासे क्रिष्णपक्षे द्वाद–
५ स्यां तिथौ रविदिने अस्यां सके[४]छवंछरमास–

१ प्राचीन मराठी कोरीव लेख (तुळपुळे, पृ. २८४ ते २८९).

२ नागपूर युनि. जर्नल, वर्ष, १७–१, पृ. १०४.

३ या ठिकाणी य किंवा अ हे अक्षर चुकून जास्तीचे कोरले गेले आहे. 'यत्रांकतोपि' अथवा 'अत्रांकतोपि' असे वाचावे.

४ क वर कोरलेली मात्रा निरर्थक होय.

६ पक्षादिसु पु(पू)र्वायां तिथौ अद्येह श्री[1]मत ठाणें–
७ कोंकण (स)मस्तभुवनाश्रयश्रीप्रिथिविव–
८ ल्लभमाहाराजाधिराजश्रीनासिररराऐ विजय–
९ राज्योदये वेळाऊळ[मा]हाहिं[2]दा(दो)स्ताने राज्यं क–
१० रोति (।*) तत्पादपद्मोपजि(जी)वि आळुनाकराणासुतहा–
११ माराणा वर्तमाने तंनिरोपितः । [स]मस्तसैन्याधि–
१२ पति हांमणनाकासुत श्रीजकरमाहा[म]द दळ(ळा)धि–
१३ पतौ मंत्रिवर्ग नागदेप्रोसमश्रीकरणाधिपतौ [ ]
१४ .........दे प्रो ऐवं...........

---

१ श्री वर कोरलेली मात्रा निरर्थक होय.

२ हा शब्द 'छिदास्ताने' असा वाचता येणे शक्य आहे. ओ. ५ मध्ये असलेल्या 'छ' चे वळण लक्ष्यात घेता ते बरोबर ठरणार नाही. तथापि, 'छिदास्ताने' असे वाचल्यास 'छिदास्तान' म्हणजे सिंदान (आजचे संजान) मानावे लागेल. 'स' च्या ऐवजी 'छ' लिहिण्याची प्रवृत्ती ओ. ५ मधील 'छवंछर' या शब्दावरून दिसून येईल. (सिंदान>छिंदान+स्तान=छिदास्तान.) अकराव्या व बाराव्या शतकातील अरब प्रवाशांनी संजान या बंदराचे नाव 'सिंदान' असे दिलेले आहे. तेथे 'शकन्रिपकालातीत संवत १३५४ फाल्गुन शुद्ध'–अशी अक्षरे कोरलेला एक शिलालेखही उपलब्ध झाला होता. (बॉम्बे गॅझेटीअर, व्हॉ. २, पृ. ३०२ व ३०३). 'वेलाऊळ' (बंदर. संस्कृत वेलाकुल) अशा छिदास्ताने म्हणजे सिंदान (संजान) बंदरात, नासिररायाने ठाणें-कोंकण विभागाचे मुख्य ठाणे केले असावे असे मानता येईल.

# १९

## सातवाहन नृपतीचे एक अपूर्व नाणे

विदर्भात सातवाहनांची अनेक नाणी आतापर्यंत सापडली आहेत. चांदा जिल्ह्यातील ब्रम्हपुरी तालुक्यात इ. स. १८८८ मध्ये एकूण १४३ नाणी सापडली, तर इ. स. १९३९ सप्टेंबरमध्ये आकोला जिल्ह्यातील मंगरुळ तालुक्यात, तऱ्हाळा या गावी एकूण १,६०० नाण्यांचा एक संच मातीच्या मडक्यात जमिनीत पुरलेला आढळला. चांदा जिल्ह्यात सापडलेल्या नाण्यांचे वाचन डॉ. होर्न्ले यांनी करून त्यावरील आपला निबंध बंगाल एशियाटिक सोसायटीच्या १८९३ च्या इतिवृत्तात प्रसिद्ध केला आहे. या संचात श्रीसातकर्णी याची ५१, श्रीपुळुमावि याची २४, व श्रीयज्ञसातकर्णी याची ४२, आणि इतर काही नाणी होती. तऱ्हाळा येथील नाण्यांच्या संचाचे वाचन व परीक्षण डॉ. वा. वि. मिराशी यांनी केले असून त्यावरील आपला निबंध त्यांनी 'जर्नल ऑफ दि न्युमिस्मॅटिक सोसायटी ऑफ इंडिया', वर्ष २, पृ. ८३ मध्ये प्रसिद्ध केला आहे. हाच निबंध त्यांच्या 'स्टडीज इन इंडॉलॉजी', खंड ३, पृ. ३४–४८ मध्ये अंतर्भूत झालेला आहे. या संचात श्रीसातकर्णी (तिसरा) गौतमीपुत्र याची ५७३, श्रीपुळुमावी (दुसरा) याची १७४, श्रीसातकर्णी (चौथा) याची ३५, श्रीपुळुमावी (तिसरा) याची ३२, श्रीस्कंदसातकर्णी याची २३, श्रीयज्ञसातकर्णी याची २४८, श्रीविजयसातकर्णी याची ५६, श्रीकुंभसातकर्णी याची ५६, श्रीकर्णसातकर्णी याची ७, श्रीशकसातकर्णी याची ४, आणि (श्री)पुळहामवि याची ४ अशी नाणी होती. इतर काही नाण्यांवर नामोल्लेख नाहीत, तर काहींवर ते अस्पष्ट आहेत. अशी सातकर्णी नृपतींची एकूण १,५२५ नाणी तऱ्हाळा संचात सापडली.

आकोला येथील माझे मित्र श्री. कमलकिशोर बियाणी यांना जुन्या मूर्ती नाणी इत्यादी प्राचीन वस्तूंचा संग्रह करण्याची विशेष आवड आहे. आकोला येथील भांड्यांच्या व्यापाऱ्यांजवळून मोडीत आलेली अनेक नाणी त्यांच्या संग्रहात आहेत. हा संग्रह त्यांनी मला दाखविला त्यावेळी त्यात सातवाहनांची १२ नाणी माझ्या दृष्टीस पडली. त्यांत दोन्ही बाजूंनी स्पष्ट असलेले

एकच नाणे आढळले. बाकीची ११ नाणी सातवाहनांची असावीत हे त्यांतील काहींवर वरच्या बाजूस असलेल्या हत्तीच्या अस्पष्ट चिन्हावरून व काहींच्या मागील बाजूवर असलेल्या उज्जयिनी प्रतीकावरून दिसून येते. यांतील ९ नाणी चौकोनी आकाराची तर दोन वर्तुळाकार आहेत. वर्तुळाकार नाण्यांपैकी एकावर वर सोंड करून उजवीकडे धावणाऱ्या हत्तीची आकृती स्पष्ट आहे. हत्तीच्या पाठीवरील बाजूस राजाचे नाव असलेली अक्षरे आहेत. पण ती वरच्या बाजूने कापली गेलेली आहेत. त्यामुळे त्यावरून काहीच अर्थबोध होत नाही. मागे सांगितल्याप्रमाणे यांतील एक नाणे मात्र दोन्ही बाजूंनी स्पष्ट आहे व ते महत्त्वाचेही आहे. श्री. बियाणी यांच्या अनुज्ञेने तेच या ठिकाणी संपादन करीत आहे.

हे नाणे तांब्याचे आहे. त्याचा आकार चौकोनी (२४ मि.मि. × १७ मिमि.) असून वजन ४.९०० ग्राम आहे. वरच्या बाजूवर सोंड उंच करून उजवीकडे धावणाऱ्या हत्तीची आकृती उठावात आहे. पाठीवर त्रिकोण शीर्षचिन्ह. त्याच्याहीवर डाव्या बाजूस किंचित खाली सुरू होऊन उजव्या बाजूच्या कोपऱ्यापर्यंत राजाच्या नावाचा उल्लेख आहे. तो 'स द वा ह न' असा वाचता येतो. हत्तीच्या पायाखाली एक नागमोडी रेषा असून त्याखाली आणखी एक सरळ रेषा दिसते. ती उठावात नसून खोल दबलेली आहे. तेथे नाणे संपले असावे. पण नाण्याच्या धातूचा पत्रा किंचित लांब असल्यामुळे त्याच्याही खाली काही जागा (३ मिमि.) उरलेली आहे. नाण्याच्या मागील बाजूवर डावीकडे प्रसिद्ध उज्जयिनी प्रतीक आहे, ते अपूर्ण आहे. त्याची केवळ दोन वर्तुळे नाण्यावर उमटलेली आहेत. प्रत्येक वर्तुळात दुसरे एक लहान वर्तुळ असून त्यात एकेक गोळी आहे. या दोन वर्तुळांच्यामध्ये उजव्या बाजूस दिसते ते नन्दिपदचिन्ह, आणि वरच्या वर्तुळावर दोन लहान गोलाकार आकृती दिसतात ते त्रिरत्न होय. उज्जयिनी प्रतीकातील चार वर्तुळांना जोडणारे 'अधिक' (+) आकाराचे जे चिन्ह नेहमी असते त्यातील दोन्ही वर्तुळांना जोडणारा काही भाग नाण्याच्या बाजूने स्पष्ट दिसतो.

प्रस्तुत नाणे 'सदवाहन' म्हणजे सातवाहन नृपतीचे होय. महाराष्ट्रात प्राचीन काळी प्रतिष्ठान (पैठण) येथून राज्य करणाऱ्या सातवाहन कुलाचा हा संस्थापक होय. या कुळाचे नाव पुराणात 'आंध्र' म्हणून निर्दिष्ट केले आहे. परंतु सातवाहनांच्या कोरीव लेखात कोठेही आंध्र म्हणून त्यांचा उल्लेख आढळत नाही. तसेच पुराणात आंध्र कुलातील नृपतींच्या यादीत सातवाहन हे नावही आढळत नाही.

त्यामुळे 'सातवाहन' या नावाचा एखादा राजा खरोखरच होऊन गेला की काय, याविषयी कित्येकांनी संशय निर्माण केला. आणि या नावाची आपापल्या परीने व्युत्पत्ती लावण्याचा प्रयत्न केला. पुढे हैद्राबाद येथील श्री. हरमूझ कौझ यांना सातवाहनांची काही नाणी सापडली. त्यांतील एक त्यांनी डॉ. वा. वि. मिराशी यांच्याकडे वाचनासाठी पाठवले. तेव्हा डॉ. मिराशी यांना असे आढळले की, त्या नाण्यावर 'रंणो सिरिसादवाह' अशी अक्षरे आहेत. हा पूर्ण नामोल्लेख 'रंणो सिरीसादवाह [नस*]' असा असावा. हे नाणे व त्यावरील आपला लेख डॉ. मिराशी यांनी प्रथम 'जर्नल ऑफ दि न्युमिस्मॅटिक सोसायटी ऑफ इंडिया' व्हा. २ मध्ये प्रसिद्ध केला. त्यात त्यांनी दाखवून दिले की, सातवाहन नृपतीचे नाणे आता उपलब्ध झालेले असल्यामुळे या नावाचा राजा होऊन गेला होता यात शंका राहात नाही. त्यामुळे या नावाच्या उपपत्तीविषयी तर्कवितर्क करण्याचे काही कारण नाही. त्यानंतर डॉ. मो. गं. दीक्षित यांना सातवाहन नृपतीचे आणखी एक नाणे मिळाले. ते त्यांनी डेक्कन कॉलेज संशोधन संस्थेच्या बुलेटिनमध्ये (व्हॉ. ६; पृ. ५-६) प्रसिद्ध केले आहे. पुढे डॉ. मिराशी यांना हैद्राबाद येथील श्री. ख्वाजा मुहमद अहमद (पुरातत्त्व संचालक) यांच्याकडून सातवाहन नृपतीचे आणखी एक नाणे मिळाले. तेही त्यांनी 'जर्नल ऑफ दि न्युमिस्मॅटिक सोसायटी ऑफ इंडिया', व्हॉ. ११ मध्ये प्रसिद्ध केले आहे. डॉ. मिराशी यांचे हे लेख त्यांच्या 'स्टडीज इन इंडॉलॉजी', भाग ३, मध्ये अंतर्भूत झालेले आहेत. डॉ. मिराशी व डॉ. दीक्षित यांनी प्रसिद्ध केलेल्या सातवाहन नृपतींच्या वरील तीन नाण्यांशिवाय अशी आणखी ५ नाणी नेवासे येथे तेथील उत्खननात सापडली (नेवासे वृत्तान्त, पृ. १७१). त्यांतील ४ शिशाची असून ती गोल आहेत, आणि पाचवे तांब्याचे असून चौरस आकाराचे आहे. नेवाशाला सापडलेल्या या पाच नाण्यांपैकी एकाहीवर उज्जयिनी प्रतीक आढळत नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. त्यानंतर उपलब्ध झालेले सातवाहन राजाच्या नावाचे नाणे म्हणजे आकोला येथील श्री. बियाणी यांच्या संग्रहातील प्रस्तुतचे नाणे होय.

या नाण्यावरील नामोल्लेख 'सदवाहन' असा आहे. यापूर्वी उपलब्ध झालेल्या सातवाहन नृपतींच्या नाण्यांवरील नामोल्लेखावरून हा संपूर्ण उल्लेख 'रंणो सिरी सादवाहनस' (म्हणजे, श्रीसातवाहन राजाचे) असा असावा, असे वाटते. आपल्या या नाण्यावर आरंभीची 'रंणो सिरी' व शेवटचे 'स' ही अक्षरे आली नाहीत. याचे कारण नाण्याचा पत्रा हा नाण्याच्या साच्यापेक्षा लहान पडला असावा. 'सा' या अक्षरातील काऱ्याचे चिन्ह नीट न उमटल्यामुळे

ते 'स' असे वाचावे लागते. हा नामोल्लेख 'सादवाहन' असा असावा. त्यावरून प्रस्तुत नाणे हे सातवाहन नृपतीचेच होय, याविषयी शंका नाही.

या नामोल्लेखाच्या अक्षरांचे वळण या नृपतीच्या अन्य नाण्यांवर सापडते तसेच आहे. अक्षराच्या वळणावरून हे नाणे इ. स. पूर्व दुसऱ्या शतकातील असावे असे वाटते.

हे नाणे अनेक दृष्टींनी महत्त्वाचे आहे. पहिली गोष्ट अशी की, 'सातवाहन' नृपतीचा नामोल्लेख असलेले विदर्भात सापडलेले हे पहिले नाणे होय. चांदा जिल्हा व आकोला जिल्ह्यातील तऱ्हाळा येथे सातवाहनांची अनेक नाणी सापडली असली तरी त्यात 'सातवाहन' नामोल्लेख असलेले एकही नाणे नाही. या राजाची डॉ. मिराशी यांनी प्रसिद्ध केलेली नाणी हैद्राबादकडे मिळाली आहेत. डॉ. दीक्षित यांनी प्रसिद्ध केलेले नाणे त्यांना श्री. स. आ. जोगळेकर यांच्याकडून मिळाले होते. श्री. जोगळेकर यांनी ते औरंगाबाद येथे तेथील एका व्यापाऱ्याकडून विकत घेतले होते. नेवासे उत्खननातील नाणी विदर्भाबाहेरची. सारांश, या राजाची आतापर्यंतची नाणी विदर्भाबाहेर उपलब्ध झाली आहेत. विदर्भात उपलब्ध झालेले हे पहिलेच नाणे होय असे वर म्हटले ते यामुळे. यावरून सातवाहन कुळाचा संस्थापक श्रीसातवाहन नृपती याचेही विदर्भावर राज्य असले पाहिजे असे अनुमान करण्यास हरकत नाही.

या नाण्याचे दुसरे महत्त्व असे की, त्याच्या वरच्या बाजूवर जे हत्तीचे चिन्ह आहे त्यातील नाविन्य. या हत्तीच्या आकृतीखाली एक नागमोडी रेघ असल्याचे पूर्वी निर्देशिलेले आहेच. ही रेघ नदीची निदर्शक असावी असे वाटते. हत्ती नदीतून पुढे चालला आहे हे दाखविण्यासाठी नदीची सूचक अशी ही नागमोडी रेषा असावी. हेच या नाण्याचे महत्त्वपूर्ण नावीन्य होय. नदीचे हे प्रतीक आतापर्यंत उपलब्ध झालेल्या सातवाहनांच्या कोणत्याही नाण्यावर नाही. प्रस्तुत नाण्यावरच ते प्रथमतः आढळते. आणि याचमुळे हे नाणे नाविन्यपूर्ण आणि म्हणून महत्त्वाचे ठरते.[१]

---

१ अगदी अशाच प्रकारचे, पण आकाराने लहान असलेले एक नाणे अलीकडे डॉ. अजयमित्र शास्त्री, विभागप्रमुख, प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती व पुरातत्त्व विभाग, नागपूर विद्यापीठ, नागपूर, यांना मिळालेले आहे.

२०

# देशिंग बोरगाव येथील कन्नड शिलालेख : शके १०७१

## प्रास्ताविक

प्रस्तुत शिलालेखाची माहिती महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसचे भूतपूर्व अध्यक्ष व सध्या महाराष्ट्र राज्याचे पाटबंधारे आणि विद्युतमंत्री श्री. वसंतराव दादा पाटील यांनी सातारा मुक्कामी, पुरातत्त्व व पुराभिलेख विभाग, महाराष्ट्र राज्य, यांच्या सातारा येथील संशोधन-सहायकांना मार्च १९७१ मध्ये दिली. या लेखाची शिळा बोरगाव (ता. कवठे महंकाळ, जिल्हा सांगली) येथे गावाबाहेरील महादेवाच्या हेमाडपंती देवळापाशी होती. हे देऊळ आता मोडकळीस आलेले आहे. म्हणून ही शिळा सध्या गावातील मराठी शाळेच्या जवळील ग्रामपंचायत कचेरीच्या दरवाजापाशी आणून ठेवलेली आहे. पुरातत्त्व विभागाचे संचालक श्री. वि. गो. खोबरेकर यांनी या शिलालेखाचे ठसे काढवून संपादनासाठी ते माझ्या स्वाधीन केले. श्री. लक्ष्मी-नारायणराव (भारत सरकारचे सेवानिवृत्त पुरालेखाधिकारी, हल्ली मुक्काम कोल्हापूर) यांनी त्याचे निर्दोष वाचन करून दिले व संपादनकार्यात मला मार्ग-दर्शनही केले. मराठी भाषांतराच्या कार्यात श्री. गु. व्यं. दिवेकर, मुंबई, यांनी मला बहुमोल साह्य केले. या सर्वांचा मी अत्यंत आभारी आहे.

## वर्णन

या कोरीव लेखाची शिळा ९० सें. मी. उंच व ६३ सें. मी. रुंद आहे. तिच्या वरच्या बाजूस उजवीकडे सूर्य व डावीकडे चंद्र यांच्या आकृती कोरलेल्या आहेत. मधल्या भागात कोणत्याही आकृती कोरलेल्या नाहीत. या जागेखाली शिलालेखाचा मजकूर कोरलेला आहे. त्याचे एकूण तीन भाग आहेत. पहिल्या भागात बारा ओळी आहेत. त्यानंतर सुमारे ८ सें. मी. जागा मोकळी सोडलेली आहे. त्या-नंतर तेवीस ओळींचा मजकूर कोरलेला आहे. त्यापुढील ११ सें. मी. जागा पुन्हा मोकळी सोडून सहा ओळींचा मजकूर शेवटी कोरलेला आहे. अशा एकूण एकेचाळीस ओळींचा मजकूर या शिळेवर कोरलेला आहे. मधे दोन ठिकाणी मोकळ्या जागा का सोडल्या आहेत ते सांगता येत नाही. मजकुराच्या दृष्टीने या लेखाचे तीन

विभाग पडतात हे खरे आहे; पण ते कोरताना पहिल्या व दुसऱ्या विभागानंतर एवढी मोकळी जागा सोडण्याचे वस्तुतः काही कारण नव्हते.

**लिपी व भाषा**

लेख प्राचीन कन्नड लिपीमध्ये कोरला आहे. अक्षरे चांगली खोल कोरलेली असल्यामुळे वाचनास अडचण पडत नाही. श्लोक १, ९ व १० यांची भाषा संस्कृत आहे. इतर श्लोक व गद्य मजकूर जुन्या हळेकन्नड भाषेत आहे. त्यावर संस्कृतचा पगडा विशेष दिसून येतो. संस्कृत शब्दांतील **ल** हे अक्षर कन्नड भाषेच्या वळणाला धरून अनेक ठिकाणी **ळ** असे लिहिले आहे. **र** या अर्धस्वरानंतर आलेली व्यंजने संस्कृत व कन्नड शब्दांतही द्वित्त करून लिहिलेली आहेत. उदा. चक्रवर्त्ति (ओ. ३ व १०), प्रवर्द्धमान, आचन्द्रार्क्कतारं (ओ. ४), पेर्म्माडिदेव, धर्म्म (ओ. ७) इत्यादी. **श** या तालव्य वर्णाचे लेखन दंत्य स असे अनेक ठिकाणी केलेले आहे. उदा : **सुक्ल, सुद्ध**, त्रयोदसि (ओ. १९).

**लेखनकाळ**

१९ व्या ओळीत कालनिर्देश आलेला आहे. चालुक्यप्रतापचक्रवर्ती जगदेकमल्लाच्या बाराव्या राज्यवर्षी (वर्षद हन्नेरडनेय) शुक्ल संवत्सरातील फाल्गुन शुद्ध त्रयोदशी, आदित्यवार रोजी या लेखातील दान दिलेले आहे. तेव्हा तोच या शिलालेखाचा काळ होय. जगदेकमल्लाचा राज्यकाल सामान्यतः शके १०६० ते १०७२ (इ. स. ११३८ ते ११५०) समजला जातो. या काळातील शुक्ल संवत्सर शके १०७१ मध्ये येतो. पिल्ले यांच्या जंत्रीनुसार शके १०७१ मधील फाल्गुन शुद्ध त्रयोदशीला शनिवार येतो. त्या दिवशी त्रयोदशी संपली होती. रविवारला चतुर्दशी होती. त्यावरून असे अनुमान करण्यास हरकत नाही की, लेखातील दान त्रयोदशीला म्हणजे शनिवार रोजीच दिले असावे. पण शिलालेखात त्याची नोंद रविवारी झाली असावी. एरवीही पंचांगातील गणितात मागे किंवा पुढे एखाद्या दिवसाचा फरक असल्यास तो चुकीचा समजण्यात येत नाही. तेव्हा प्रस्तुत शिलालेखातील संवत्सर, महिना, पक्ष, तिथी व वार यांचा कालनिर्देश बरोबर आहे, असे म्हणण्याला हरकत नाही. त्या दिवशी ख्रिस्ती कालगणनेप्रमाणे इ. स. ११५० फेब्रुवारी, ता. २० शनिवार (किंवा ता. २१ रविवार,) होता.

या कालोल्लेखातून निर्माण होणाऱ्या एका प्रश्नाचा या ठिकाणी निर्देश करतो. शके १०७१ शुक्ल संवत्सर, फाल्गुन शुद्ध त्रयोदशीला जगदेकमल्लाचे १२ वे राज्यवर्ष चालू होते. भाळवणी येथील दोन कानडी शिलालेखांपैकी पहिल्या

शिलालेखात[१] जगदेकमल्लानंतर गादीवर बसलेला त्याचा भाऊ तृतीय तैलप म्हणजेच त्रैलोक्यमल्लदेव याचे ८ वे राज्यवर्ष (शके १०७८) धाता संवत्सर, मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेला चालू होते असे म्हटले आहे. म्हणजेच शके १०७१ मार्गशीर्ष प्रतिपदेला त्याचे १ ले राज्य वर्ष चालू असले पाहिजे. प्रस्तुत देशिंग बोरगाव शिलालेखावरून तर शके १०७१ मार्गशीर्ष प्रतिपदेनंतरही फाल्गुन शुद्ध त्रयोदशीला, म्हणजे कमीत कमी पुढे साडेतीन महिने तरी जगदेकमल्ल जिवंत असून राज्य करीत होता असे स्पष्ट दिसते. यावरून असे दिसून येते की, जगदेकमल्लाने आपल्या हयातीतच आपला भाऊ त्रैलोक्यमल्ल याला गादीवर बसवले असावे. म्हणूनच जगदेक-मल्लाच्या हयातीत त्रैलोक्यमल्लाचेही राज्यवर्ष सुरू झाले. वस्तुस्थिती तशीच दिसते. कारण शके १०७१ नंतरही जगदेकमल्ल काही वर्षे जिवंत होता.[२] त्याचा सर्वात अलीकडचा शिलालेख शके ११७४ (इ. स. ११५२) मधील म्हणजे त्याच्या १५ व्या राज्यवर्षीचा आहे, तर त्रैलोक्यमल्लदेवाचा आरंभीचा उपलब्ध विजापूर शिलालेख शके १०७३ (इ.स.११५१) चा असून तो त्याचा तिसऱ्या राज्यवर्षीचा आहे.

### विषय

बोरीग्राम येथे केत गावुंड याने बांधलेल्या पार्श्वनाथ देवाच्या वसतीला, मुनींच्या अन्नदानासाठी व वसतीच्या जीर्णोद्धारासाठी, बिज्जलाचा अधिकारी लक्खणदेव, इतर करणाध्यक्ष, नंदियण्ण सावंत आणि मुळिग कप्प गावुंड यांनी दिलेल्या दानाची नोंद करणे हा या शिलालेखाचा प्रमुख उद्देश आहे. याशिवाय सेट्टिगुत्त पेर्मा गावुंड, सौधोर आणि स्थानिक सेट्टी यांनी घरे, दुकाने इत्यादींवरील करातून वसतीला लागणाऱ्या तेलासाठी दिलेली दाने, तसेच सुंकवेग्गडे (कर गोळा करणारा अधिकारी) नागदेव नायक आणि त्याचा जावाई (किंवा पुतण्या) रेवग नायक व लक्ष्मरस यांनी घोड्यावरील विक्रीच्या करातून वसतीला दिलेली दानेही या शिलालेखात नोंदलेली आहेत.

### आशय व चर्चा : चालुक्य नृपती जगदेकमल्ल

जैन शिलालेख-ताम्रपटांच्या आरंभी सामान्यतः नेहमी आढळणाऱ्या 'श्रीमत्परमगम्भीर' या श्लोकाने प्रस्तुत शिलालेखाची सुरवात झालेली आहे. त्या-नंतर चालुक्यनृपती जगदेकमल्लदेव (द्वितीय) याचा, त्याच्या सर्व बिरुदांसहित निर्देश केलेला आहे (ओ. २ ते ५). चालुक्यनृपती तृतीय सोमेश्वर (इ. स. ११२६-३८)

---

१ भारतीय इतिहास आणि संस्कृति, त्रैमासिक, वर्ष ९, पु. ३५, पृ. ७८. (पुढे पृ. ३४६ पाहा.)

२ यझदानी. दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन, पृ. ३७५.

याला दोन पुत्र होते. एक जगदेकमल्ल व दुसरा तैलप. सोमेश्वराच्या मृत्यूनंतर जगदेकमल्ल गादीवर बसला (इ. स. ११३८). त्याच्या उपलब्ध शिलालेखांवरून तो शके १०७४ (इ. स. ११५१) पर्यंत राज्य करीत होता असे निश्चित दिसते. तथापि, त्याचा धाकटा भाऊ तृतीय तैलप याच्या शिलालेखांवरून शके १०७१ (इ. स. ११४९) पासून तैलपही राज्य करू लागला होता हे आपण पाहिलेच आहे. याचा अर्थ असा की, इ. स. ११४९ ते ११५१ या वर्षांत जगदेकमल्ल व तृतीय तैलप म्हणजेच त्रैलोक्यमल्ल हे दोघेही एकाच वेळी राज्य करीत होते. अशी उदाहरणे इतिहासात अनेक आढळतात.[१]

जगदेकमल्ल हे वस्तुतः एक बिरुद आहे, ते त्या राजाचे मूळ नाव नव्हे. त्याचे मूळ नाव इतिहासज्ञांना अजून माहीत झाले नाही. प्रथम सोमेश्वराचा पिता द्वितीय जयसिंह (इ. स. १०१५–१०४२) यानेही जगदेकमल्ल हे बिरुद धारण केले होते. म्हणूनच बहुधा या द्वितीय जगदेकमल्लाने 'प्रतापचक्रवर्ति जगदेकमल्ल' (ओ. ३) अशी बिरुदे लावून घेतली असावी असे दिसते.[२] त्याच्या कारकीर्दीतील पूर्वार्धात गंगवाडीचे होयसळ आणि गोव्यातील कदंबनृपती यांनी चालुक्य राज्याविरुद्ध बंड केले. ते जगदेकमल्लाने सिंद पेर्माडिदेवाच्या मदतीने मोडून काढले. इ. स. ११४३ च्या सुमारास जगदेकमल्ल व होयसळ नरसिंग यांनी माळव्यावर स्वारी करून परमारनृपती जयवर्मन याला गादीवरून पदच्युत केले आणि बल्लाळाला गादीवर बसवले. बहुधा याच स्वारीत जगदेकमल्लाने गुर्जरनृपती कुमारपाल याला जिंकून लाट देश लुटला असावा. दक्षिणेतही चोल कुलोत्तुंग दुसरा व कलिंगनृपती अनंतवर्मन चोडगंग यांच्याशी जगदेकमल्लाने युद्धे करून विजय मिळविले.[३] यावरून 'प्रतापचक्रवर्ति' या त्याच्या बिरुदाची यथार्थता लक्षात येईल. त्याला लावलेली इतर बिरुदे चालुक्य नृपतींची परंपरागत बिरुदे आहेत. त्यांचा विचार करण्याचे कारण नाही. आपल्या पूर्वजांप्रमाणे जगदेकमल्लही 'कल्याणी' येथूनच राज्य करीत होता (ओ. ४).

### पादपद्मोपजीवी बिज्जल

जगदेकमल्लाचे वर्णन (ओ. २ ते ५) केल्यानंतर 'तत्पादपद्मोपजीवि' म्हणजे 'त्याच्या (जगदेकमल्लाच्या) चरणकमलाने आपली उपजीविका करणारा'

---

१ यज्ञदानी, दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन, पृ. ३७५.

२ तत्रैव. पृ. ३७६.

३ मुजुमदार. दि स्ट्रगल फॉर एम्पायर, पृ. १७८.

त्याचा सेवक म्हणून पुढे **बिज्जल क्षोणिपालाचे** वर्णन आले आहे. (ओ. ५–८) येथील 'तत्पादपद्मोपजीवि' हा उल्लेख अत्यंत महत्त्वाचा आहे. हे महत्त्व लक्षात येण्यासाठी कळचुरीनृपती बिज्जलाचा थोडा पूर्वेतिहास लक्षात घेणे अवश्य आहे. कळचुरीनृपती पेर्माडि अथवा हेमाडी हा चालुक्यनृपती तृतीय सोमेश्वराचा मांडलीक म्हणून सध्याच्या बिजापूर जिल्ह्यातील प्राचीन तर्डवाडी नाडु (प्रदेश) मध्ये राज्य करीत होता. तो सुमारे इ. स. ११४५ मध्ये दिवंगत झाला व त्याच्या गादीवर त्याचा पुत्र बिज्जल बसला (इ. स. ११४५–११६८). त्यावेळी चालुक्यनृपती जगदेकमल्ल द्वितीय (इ. स. ११३८–११५१) कल्याण येथे राज्य करीत होता. त्याच्या हयातीत त्याचा धाकटा भाऊ तैलप तृतीय (इ. स. ११४९–११६३) राज्य करू लागला होता, हे आपण पाहिलेच आहे. त्याचे राज्य इ. स. ११६३ पर्यंत चालू असले तरी यात्र काळात बिज्जलाने इ. स. ११५६ मध्ये चालुक्यांचे सम्राटत्व झुगारून स्वातंत्र्य पुकारले; इतकेच नाही तर पुढे चालुक्यांची राजधानी कल्याणी येथूनच तो सम्राट म्हणून राज्य करू लागला.

इ. स. ११४५ मध्ये वडिलांच्या मृत्यूनंतर कळचुरींच्या गादीवर बसल्या-वर वडिलाप्रमाणेच बिज्जलानेही आपणाला चालुक्यांचे मांडलीक व सेवक म्हणवून घ्यायला पाहिजे होते. पण तसे त्याने केलेले क्वचितच आढळते. जगदेक-मल्ल द्वितीय, याच्या कारकीर्दीतील बिज्जलाच्या उपलब्ध शिलालेखांत कोठेही त्याने तसे म्हटले नाही, असे डॉ. फ्लीट, नीलकंठशास्त्री इत्यादी संशोधक मानतात. प्रा. नीलकंठशास्त्री यांच्या मते तर चालुक्यनृपती तैलप तृतीय याच्या तिसऱ्या राज्यवर्षातील (इ. स. ११५१) बिजापूर येथील शिलालेखात बिज्जलाने आपणाला महामंडलेश्वर म्हणवून घेऊन चालुक्यांचे सम्राटत्व मान्य केल्याचा उल्लेख प्रथमच सापडतो. तथापि, त्या किंवा त्यापूर्वीच्या शिलालेखांत त्याने आपणाला चालुक्यांचा 'पादपद्मोपजीवि' असे कोठेही म्हटलेले आढळत नाही; आणि त्यावरून ते असे अनुमान काढतात की, बिज्जलाच्या मनात आरंभापासूनच चालुक्यांचे सम्राटत्व झुगारून देण्याची महत्त्वाकांक्षा असावी.[२]

यापूर्वी उपलब्ध झालेल्या शिलालेखांच्या आधारे संशोधकांनी काढलेली वरील अनुमाने कदाचित बरोबर असतील; पण आता उपलब्ध झालेल्या प्रस्तुत देंशिग बोरगाव येथील शिलालेखामुळे या प्रश्नाचा पुनर्विचार करावा लागणार

---

१ यझदानी. दि अर्ली हिस्टरी ऑफ डेक्कन, पृ. ४५७.

२ तत्रैव. पृ. ४५८.

आहे. या लेखात जगदेकमल्ल द्वितीय याचे वर्णन केल्यावर 'तत्पादपद्मोपजीवि' म्हणून बिज्जलाचे वर्णन आले आहे. आणि म्हणून आरंभी म्हटल्याप्रमाणे हा उल्लेख अत्यंत महत्त्वाचा व इतिहासावर नवा प्रकाश टाकणारा ठरतो. याच लेखात बिज्जलाला 'महामंडलेश्वर' असे दोन ठिकाणी (ओ. २१ व २४) म्हटलेले आहे, हेही लक्ष्यात घेण्यासारखे आहे.

ओ. ६ ते ८ मध्ये आलेल्या वर्णनात बिज्जलाला 'कळचुरी' कुळातील सिंह व पेर्म्माडिदेवाचा प्रियपुत्र म्हटले आहे. पेर्म्माडिदेव हे बिज्जलाच्या पित्याचे नाव होय. 'हेम्माडिदेव' असेही हे नाव उल्लेखिलेले आढळते. संस्कृतातील प या वर्णाचा उच्चार कन्नड भाषेत अनेकदा ह असा होतो, त्याला हे धरूनच आहे. 'शत्रुवीरांच्या स्त्रियांच्या नेत्रातील अश्रुप्रवाहाने आपला कोपाग्नी शांत करणारा' व 'पृथ्वीचा उपभोग घेण्यासाठी आपल्या क्षात्रधर्माचा महिमा प्रगट करणारा' या विशेषणांनी बिज्जलाचा पराक्रम सूचित केला आहे. विजापूर शिलालेखात बिज्जलाने मावळ, लाट, नेपाळ आणि गुर्जर यांच्याविरुद्ध युद्धे करून त्यांना जिंकले होते असे म्हटले आहे.[1] बहुधा, जगदेकमल्ल द्वितीय याने केलेल्या उत्तरेकडील स्वाऱ्यांच्या वेळी बिज्जल त्याच्याबरोबर असावा व त्यावेळी त्याने केलेल्या पराक्रमाचे हे वर्णन असावे. त्यामुळे चालुक्यसम्राटांची कीर्ती विशेष वाढली. म्हणूनच की काय, आपल्या या शिलालेखात त्याला 'चालुक्ययशोवल्लीवसन्त' म्हटले असावे. बिज्जलाला येथे 'क्षोणिपाल' असेही म्हटले आहे. पण त्याचा अर्थ 'राजा' एवढाच अभिप्रेत आहे. मांडलिक असला तरी आपल्या ताब्यातील प्रदेशाचा तो 'क्षोणिपाल' च होता. या व इतर शिलालेखांत बिज्जलाला लावलेल्या 'क्षोणिपाल' या विशेषणा-वरून त्याच्या कारस्थानीपणाविषयी काढलेल्या अनुमानांना विशेष महत्त्व देण्याचे कारण नाही.

प्रस्तुत शिलालेखात बिज्जलाचा निर्देश पुढे २१ ते २४ या ओळींत पुन्हा आलेला आहे. तेथे त्याची अनेक बिरुदे उल्लेखिलेली आहेत. ती पारंपरिक असून त्यांवरून ऐतिहासिकदृष्ट्या नवीन अशी कोणतीच माहिती मिळत नाही. त्याला तेथेही 'महामंडलेश्वर' म्हणून संबोधले आहे (ओ. २४). ऐतिहासिक घटनांच्या दृष्टीने बिज्जलाच्या या उपाधीचे महत्त्व यापूर्वीच आपण पाहिले आहे.

---

१ तत्रैव.

## बिज्जलाचे बंधू : राजल व मैळुगिदेव

पुढील श्लोकात (श्लो. ३; ओ. ८–१०) बिज्जलाचे दोन धाकटे भाऊ **राजल** व **मैळुगिदेव** यांचे वर्णन असून त्यांच्यामुळे बिज्जल विशेष प्रसिद्ध होता, असे म्हटले आहे. इतिहासाच्या दृष्टीने हे उल्लेख अत्यंत महत्त्वाचे आहेत. बिज्जलाला 'मैळुगिदेव' नावाचा एक धाकटा भाऊ होता एवढेच उपलब्ध इतिहासावरून माहीत आहे. त्याच्या जोडीला 'राजल' नावाचा आणखी एक भाऊ त्याला होता हे प्रस्तुत शिलालेखातील या श्लोकावरून प्रथमच उजेडात येत आहे. मैळुगिदेवाच्या आधी त्याचा उल्लेख असल्यामुळे राजल हा मैळुगिदेवाहून वडील असावा असे अनुमान करण्यास हरकत नाही. 'श्रीवल्लीचे वन वाढविणाऱ्या आपल्या खड्गलतेच्या धारेवरील पाणी' म्हणजे 'आपल्या कीर्तिरूपी अनेक वेलींना, आपल्या तरवारीच्या धारेवरील पाणी घालून ज्याने वाढविले होते, अर्थात आपल्या पराक्रमाने ज्याने अनेकदा कीर्ती संपादन केली होती असा राजल.' (ओ. ८) असे त्याचे वर्णन केलेले आहे. आणि मैळुगिदेवाला 'देवेन्द्रासारख्या प्रचंड शत्रुनृपतींना जिंकणारा रावण' म्हणून संबोधले आहे. यावरून त्यांच्या पराक्रमाची कल्पना येते. या दोन धाकट्या भावांच्यामुळे प्रख्यात झालेला बिज्जल, असे श्लोकात म्हटले आहे. त्यावरून तत्कालीन राजकारणात व युद्धात बिज्जलाला या दोन्ही बंधूंचे नेहमीच साह्य होत असले पाहिजे असे स्पष्ट दिसते.

या दोन बंधूंच्या साह्याने बिज्जल करहाड प्रदेशाचे पालन करीत होता. हा प्रदेश त्याला चालुक्यचक्रवर्तीच्या कृपेने प्राप्त झाला होता, असे पुढील श्लोकात म्हटले आहे (श्लो. ४; ओ. १०–११). यावरून प्रस्तुत शिलालेखाच्या काळी म्हणजे इ. स. ११५१ मध्ये करहाड प्रांतावर कळचुरी बिज्जलाचे राज्य होते हे स्पष्ट दिसते. भाळवणी येथील शके १०७८ (इ. स. ११५६) च्या कन्नड शिलालेखावरून त्यावेळीही करहाड प्रांत बिज्जलाच्याच स्वामित्वाखाली होता असे दिसून येते.[1] इ. स. ११५६ मध्येच बिज्जलाने चालुक्यांचे सम्राटत्व झुगारून दिले. या त्याच्या कार्यात शिलाहारनृपती विजयादित्य याचे त्याला साह्य होते असे समजण्यात[2] येते. त्याचा उल्लेख 'कऱ्हाडचा शिलाहार नृपती' म्हणून करण्यात येतो. पण वरील उल्लेखावरून त्यावेळी शिलाहारनृपती विजयादित्याचे कऱ्हाडवर स्वामित्व नव्हते असे स्पष्ट दिसते. कोल्हापूर येथील शिलाहार

---

१ पुढे पृ. ३३१–३५४ पाहा.

२ डायनेस्टीज ऑफ दि कर्नाटक डिस्ट्रिक्ट्स. पृ. ४७५, ५४८.

शाखेच्या ताब्यात पूर्वी करहाट प्रदेश होता यात शंका नाही. या शाखेतील मारसिंह नृपतीच्या ताम्रपटात त्याचा पिता गोंक याला 'करहाटकुण्डी अधिपति' म्हटले आहे.[१] पुढे चालुक्यनृपती सहावा विक्रमादित्य याने 'करहाट–पति' विद्याधर राजकन्या हिच्याशी विवाह केल्याचे वर्णन बिल्हण कवीने 'विक्रमांकदेवचरिता'त[२] केले आहे. तेव्हा विक्रमादित्याच्या काळातही (इ. स. १०७६ ते ११२६) कऱ्हाड प्रांत शिलाहारांच्या ताब्यात होता असे दिसते. तथापि, त्यानंतर उपरोक्त मारसिंह नृपतीचा सर्वात धाकटा मुलगा गण्डरादित्य (इ. स. सुमारे १११०–११३५) याचे वर्णन ताळले ताम्रपटात[३] 'मिरिंज देश, सातखोल्ल आणि कोंकण' या प्रदेशांचा राजा म्हणून केलेले आहे. तेव्हा इ. स. ११२६ ते ११३५ च्या दरम्यान केव्हांतरी हा प्रांत चालुक्यांच्या स्वामित्वाखाली गेला असावा. बहुधा चालुक्यांच्या वतीने बिज्जलानेच आपले बंधू राजल व मैळुगिदेव यांच्या साह्याने तो जिंकून घेतला असावा आणि म्हणूनच द्वितीय जगदेकमल्लाने प्रसन्न होऊन तो बिज्जलाला दिलेला असावा. बालसंग[४] (जत संस्थान) येथील इ. स. ११४० च्या एका कन्नड शिलालेखात त्यावेळी करहाड–४ हजार प्रांतावर बिज्जल शासन करीत होता असा उल्लेख आढळतो.

या 'करहट' प्रदेशाचा 'हेड नाडु' या नावाने ओळखला जाणारा एक विभाग होता. त्याला करहट प्रांताचे नाक म्हणजे मुख्य महत्त्वाचे व शोभिवंत असे स्थान म्हटले आहे. 'विभवानीकनिधी' या विशेषणावरूनही हेड प्रदेश अत्यंत वैभव-संपन्न होता असे दिसून येते. महांक आणि करिकुळ राजे त्या प्रदेशावरील बिज्जलाचे अधिकारी होते (श्लो. ५; ओ. ११–१२).

### यापनीय संघ : कारेय गण : मैलाप अन्वय

यानंतरच्या पुढील सहाव्या श्लोकात **मोनि भट्टारक** नावाच्या जैन मुनीची प्रशस्ती वर्णन केली आहे. ते कारेय गणाचे स्वामी होते आणि मैलाप अन्वयाची कीर्ती त्यांनी वाढविली होती (ओ. १४). अर्थात, मोनि भट्टारक हे जैन धर्मातील 'कारेय' गणातील 'मैलाप' अन्वयाचे मुनी होते. वस्त्रप्रावर्णासंबंधीच्या मतभेदां-वरून जैन धर्माचे दिगंबर, श्वेतांबर व यापनीय असे तीन संप्रदाय प्रथम झाले. त्या-नंतर यातील प्रत्येक संप्रदायाचे निरनिराळ्या 'संघा'त विभाजन झाले. पुढे प्रत्येक

१ मिराशी. संशोधनमुक्तावलि, सर ५, पृ. २१९.
२ सर्ग ८ व ९.
३ जर्नल. बॉ. ब्रॅं. रॉ. ए. सो. वर्ष १३, पृ. १.
४ बॉम्बे–कर्नाटक. नं. १२८, वर्ष १९४०–४४.

संघाचे पुन्हा भेद होऊन 'गण' निर्माण झाले. गणाच्या पोटविभागाला 'अन्वय' असे म्हणतात. या अन्वयांना जी नावे मिळाली आहेत ती सामान्यत: या अन्वयाचा विशेष संबंध असलेल्या पवित्र जैन क्षेत्रावरून. 'मैलाप' तीर्थाशी संबंध असल्यामुळे प्रस्तुत अन्वयाला मैलाप अन्वय हे नाव मिळाले असावे. हा मैलाप अन्वय 'कारेय' गणाची एक शाखा होय. पण कारेय गण हा कोणत्या संघाचा घटक होता, याचा निर्देश आपल्या शिलालेखात केलेला नाही. वडली आणि हन्निकेरी येथील जैन शिलालेखांत[1] कारेय गण हा यापनीय संघाचा गण होता असे म्हटले आहे. तेव्हा मोनि भट्टारक हे यापनीय संघातील कारेय गणाच्या मैलाप अन्वयातील जैन मुनी होते यात शंका नाही.

जैनांच्या दिगंबर आणि श्वेतांबर संप्रदायांचा उल्लेख सर्वत्र विपुल प्रमाणात आढळतो तसा यापनीय संघाचा आढळत नाही. या संघाचे आणि त्याच्या शाखांचे कार्य प्रामुख्याने दक्षिण भारतातील कन्नड प्रदेशात झालेले आढळते. वृक्षमूल, कुंडि, कण्डूर, मडुव, वन्दियुर, कारेय इत्यादी गणांचा यापनीय संघामध्ये समावेश होता. यापनीय संघाचे जैन मुनी पुरोगामी वृत्तीचे व सुधारक होते. केवळ आपल्याच धर्माच्या तत्त्वज्ञानाने मोक्ष मिळतो असे नाही, तर 'परशासने मोक्ष:' म्हणजे इतर तत्त्वज्ञानानुसारही मोक्ष मिळू शकतो ; केवळ यतिमुनींनाच मोक्ष मिळतो असे नाही तर 'सग्रन्थानां मोक्ष:' म्हणजे गृहस्थाश्रमीयांनाही मोक्ष मिळू शकतो ; तसेच केवळ पुरुषांनाच नाही तर 'स्त्रीणां तद्भावे मोक्ष:' म्हणजे स्त्रियांनाही याच जन्मात मोक्ष मिळू शकतो, शीअ त्यांची उदार विचारसरणी होती. यामुळेच यापनीय संप्रदायांच्या मुनींना कन्नड प्रदेशात जैन धर्माचा मोठा प्रमाणात प्रसार करता आला.[2]

### मोनि भट्टारक

मोनि भट्टारक हे चारित्र्यसंपन्न व अत्यंत कडक विरक्ताचार्य होते. सर्व सामान्य जनतेला जैन धर्माचा उपदेश करण्यात त्यांनी आपले आयुष्य घालवले. 'सकळभव्यानंदमं' या विशेषणावरून हे स्पष्ट होते (ओ. १३). 'भव्य' या शब्दाचा अर्थ 'सांसारिक' असा या ठिकाणी आहे. (भव=संसार; भव्य=सांसारिक) त्याचमुळे कारेय गणातील आपल्या मैलाप अन्वयाचा ते उत्कर्ष करू शकले. (ओ. १४).

या मोनि भट्टारकाचे शिष्य **माधवचंद्र भट्टारक**, आणि त्यांचे शिष्य **भूरिचंद्र सिद्धांतदेव** होते (ओ. १५). त्यांच्यानंतर **मुनिचंद्राचा** उल्लेख पुढील ७ व्या

१ डॉ. पांडुरंग देसाई, जैनिझ्म इन साउथ इंडिया अँड सम् जैन एपिग्राफ्स. पृ. ११३.
२ तत्रैव. पृ. १६३–१६९.

श्लोकात आलेला आहे. ओ. १७ मध्येही त्यांचे नाव आलेले आहे. पुढे ओ. २६ मध्ये त्यालाच मुनिचंद्र सिद्धांतदेव असे म्हटले आहे. **भूरिचंद्र सिद्धांतदेवाचा** व मुनिचंद्र सिद्धांतदेवाचा संबंध स्पष्ट शब्दात सांगितलेला नाही. तथापि, मोनि-भट्टारकापासूनची शिष्यपरंपरा वर्णन करण्याचा लेखकाचा हेतू स्पष्ट दिसतो. त्या-वरून मुनिचंद्र सिद्धांतदेव हा भूरिचंद्र सिद्धांतदेवाचा शिष्य असावा यात शंका नाही. मुनिचंद्राचा शिष्य '**काम**' याचे वर्णन ७ व्या श्लोकात आलेले आहे (ओ. १५-१६). श्लोक ८ मध्ये वर्णन केलेला काव गावुंड, आणि ओ. २५ मधील कप्प गावुंड तो हाच 'काम' होय. काम, काव (गावुंड) आणि कप्प (गावुंड) ही एकाच व्यक्तीच्या नावाची भिन्न रूपे होत.

या **काव गावुंडाची** प्रशस्ती श्लो. ७ व ८ (ओ. १५–१८) मध्ये आलेली आहे. मुनिचंद्राच्या चरणकमळावर लुब्ध झालेला भ्रमर, असा हा काव गावुंड अजिंक्य होता. सांसारिक (भव्य) लोकांच्या शिरोभागी मण्याप्रमाणे शोभून दिसणारा तो काव गावुंड व्यवहारकुशल व लोकप्रिय होता. तो गुणसंपन्न होता. बस्स (वैश्य) कुळाला भूषणभूत होता (श्लो. ७). आदिजिन ही त्याची आराध्य देवता होती. त्याच्या पित्याचे नाव केत गावुंड. ते सद्‌गुणसंपन्न होते. पद्म-गावुंडी हे त्याच्या (काव गावुंडाच्या) मातुश्रीचे नाव. ती सत्यप्रिय व पवित्र होती. अशा या दांपत्याचा पुत्र काव गावुंड. व्रत-पालनात त्याची बरोबरी करणारा त्यावेळी दुसरा कोणीही नव्हता (श्लो. ८).

या काव गावुंडाचे वडील **केत गावुंड** याने (करहट प्रांतातील) हेंड विभागा-जवळील बोरिग्राम येथे श्रीपार्श्वदेवाचे एक मंदिर बांधून घेतले होते (ओ. २०). प्रतापचक्रवर्ती जगदेकमल्लाच्या १२ व्या राज्यवर्षी, शुक्ल संवत्सरातील फाल्गुन शुद्ध त्रयोदशी, रविवार रोजी (ओ. १९) त्या मंदिरातील ऋषींच्या अन्नदानासाठी व मंदिराच्या जीर्णोद्धारासाठी (ओ. २०–२१) महामंडलेश्वर बिज्जलदेव याचा ग्रामाधिकारी **लक्खणदेव**, केंद्र शासनाधिकारी व प्रमुख करणाध्यक्ष **नंदियप्ण सावंत** आणि स्थानिक **कप्प गावुंड** यांनी मुनिचंद्रदेवाला काही जमिनी व एक बगीचा हातावर पाणी सोडून दान दिला. (ओ. २४–२६). या दानांची नोंद करणे हा प्रस्तुत शिलालेखाचा मुख्य उद्देश आहे. याशिवाय, देवाच्या नंदादीपासाठी बाजारातील खरेदी-विक्रीवरील बसवलेले कर, घोड्यांच्या विक्रीवरील कराच्या उत्पन्नातून एक तेलघाणा, एक पान-दुकान व शेतातील एक घर यांची व्यवस्था करण्यासाठी **रेवण नायक** व **लखम राजे** यांनी घोड्यावरील कराचा एक चौवल (चतुर्थांश भाग) ही दिलेली देणगी, यांचीही नोंद करण्यात आली आहे.

**स्थळ निश्चिती**

प्रस्तुत शिलालेखात जगदेकमल्लाचे वास्तव्यस्थान म्हणून निर्देशिलेले **कल्याण** म्हणजे आजचे कल्याणी गाव होय (ता. गुलबर्गा, जिल्हा बिदर). महाराष्ट्रातील ठाणे जिल्ह्यात कल्याण नावाचे शहर आहे, ते हे नव्हे. **करहट** किंवा करहड म्हणजे आजचे कऱ्हाड (जि. सातारा, महाराष्ट्र) होय. भाळवणी येथील दोन कन्नड शिलालेखांपैकी पहिल्या शिलालेखात 'करहड नाल्कु' म्हणजे करहड-चार हजार, असा उल्लेख आहे. त्याचा अर्थ, चार हजार गावांचा समावेश असलेला करहड (कऱ्हाड) प्रांत. हा ग्रामसंख्यानिर्देश आपल्या शिलालेखात नाही. **हेंड** हे गाव सध्या पेड म्हणून ओळखले जाते. ते सांगली जिल्ह्यातील तासगाव तालुक्यात आहे. **बोरिग्राम** हे आजचे बोरगाव होय. ते सांगली जिल्ह्यातील मिरज तालुक्यात आहे. त्याजवळ सुमारे चार मैलांवर देशिंग नावाचे गाव आहे. त्यामुळे जेथे प्रस्तुत शिलालेख सापडला ते बोरगाव (बोरिग्राम) आज 'देशिंग बोरगाव' म्हणून ओळखले जाते. पेडपासून ते सुमारे १५–१६ मैलावर आहे.

**वाचन**

*भाग पहिला*

१. श्रीमत्परमगंभीरस्याद्वादामोघलांछनं [।*] जीयात् त्रैलोक्यनाथस्य शासनं जिनशा–

२. सनं ।। [१।।*] स्वस्ति समस्तभुवनाश्रयं श्रीपृथ्वीवल्लभमहाराजाधिराज परमेश्वर–

३. परमभट्टारकं सत्याश्रयकुळतिळकं चाळुक्याभरणं श्रीमत्प्रतापचक्रवर्त्ति जगदेकम-

४. ल्लदेवर विजयराज्यमुत्तरोत्तराभिवृद्धिप्रवर्द्धमानमाचन्द्राक्र्कतारं सललु कल्याणद

५. नॆलॆविडिनॊळु सुखसंकथाविनोर्ददिं राज्यं गॆय्युत्तमिरॆ [।।*] तत्पादपद्मोपजीवि ।। जयजयाजीविते–

६. शं कळचुरिकुळकुक्कीळसिंहं रिपुक्षत्रियनारीनेत्रवारिप्रसरशमितकोपाग्नि चाळु-क्यचक्रेश–

७. यशोवल्लीवसन्तं नॆगळ्दनवनीभोगक्कॆ पॆर्म्माडिदेवप्रियपुत्रं क्षत्रधर्म्मप्रकटितम–

८. हिमं बिज्जलक्षोणिपालं ।। [२।।*] श्रीवल्लीवनवर्द्धकासिलतिकाधाराजलं राजलं देवेन्द्रप्रतिम–

९. प्रचंडपरभूभृज्जैत्रदशग्रीवं मॆळुगिदेवनॆम्बनुजर्गे विख्यातिवॆत्तं प्रतापा-[विर्ब्बाडव] शोषितजलो–

१०. दन्वज्जळं बिज्जलं ।। [३।।*] पाळिसिदनमत्सरहृदयाळंबकना निजानुजर्व्वेर-सेन्दुं चाळुक्यचक्रवर्त्तिय लीळाद–

११. यॆयिंदमादकरहडनाडं ।। [४।।*] आ-करहटधरित्री श्रीकान्तॆयनाशिकांगमॆम्पुदु विभवा–

१२. नीकनिधि हॆंडनाडु [महांक]करिकुळन्रिपाळरद(क)धिनायकरु ।। [५।।*]

भाग दुसरा

१३. परमश्रीजिनतत्वदिं सकळभव्यानंदमं माडि दुर्द्धरमप्पुग्रतपः प्रभावबळदिं कंदर्प्पनं गॆल्दु सच्चरिताळं

१४. क्रितनागि बाप्पॆनिसि मैलापान्वयश्रीयनुद्धरिसल्दु साल्दनुदार कारयगणेशं मोनि भट्टारकं ।। [६।।*] अ–

१५. वरशिष्यरु माधवचन्द्रभट्टारकदेवरु ।। अवरशिष्यरु भूरिचन्द्रसिद्धान्तदेवरु ।। श्रीमुनिचन्द्रव्रतिघन

१६. कोमळपदपंकजमधुकरनॆनलुद्दामतॆ.डॆदं भव्यशिखामणिगुणि बप्सकुलललामं काप्पं ।। [७।।*] तत्नगा–

१७. राधिप देव्यवादिजिनपं चारित्रसारॆंदयं मुनिचन्द्रं गुरु तंदॆ सद्गुणसमेतं केत-गावुंडनॊळ्पिन तायि

१८. सत्यदशौचदार्प्पिनतुळश्रिपद्मगावुंडि नट्टनॆप्पुन्नतियिंदॆ पोल्वरॊळरॆ श्रीकावगावुंडन [।।८।।*] स्वस्ति श्रीमच्चा–

१९. ळुक्यप्रतापचक्रवर्त्ति जगदेकमल्लवर्षद हन्नॆरडनॆय सुक्लसंवत्सरद फाल्गुण सुद्ध त्रयोदसि आदिवरदंदु हॆंड–

२०. मूनूर्रद बळिय बाडं बोरिग्रामॆय केतगावुंडं माडिसिद श्रीपार्श्वदेवरबसदिय रिबियराहा–

२१. रदानक्कं खंडस्फुटितजीर्णोद्धार[क्कॆं] ।। स्वस्ति समधिगतपंचमहाशब्दमहामंडले-श्वरं कालांजरपुरवराधीश्वरं

२२. सुवर्ण्णव्रिषभध्वजं डमरुगतूर्य्यनिर्घोषणं कळचुरिकुळकमळमार्त्तंडं कदनप्रचंड मानकन–

२३. कावळ सुभतरादित्य कलिगळंकुश गजसामंत शरणागतवज्रपंजर प्रतापलंकेश्वर परनारीसहोदर गिरिदु–

२४. र्गमल्ल वैरीभकंठीरव निश्शंकमल्ल नामादिसमस्तप्रशस्तिसहितं श्रीमन्महा-मंडलेश्वरं बिज्जलदेवरसर पॆर्गडॆ ल–

२५. क्खणदेवव्यप्रमुखकरणाध्यक्षं गळु मेलाळ्कूय नंदियम सावन्तनु अल्लियमूलिग कप्पगावुंडनु–

२६. मिर्द्दु मुनिचन्द्रसिद्धान्तदेवर्गे धारापूर्व्वकं माडि बिट्ट कॅयि[ह]न्नसुगॆय्यिडं पडवलु तुरुदारियिं

२७. बडिगलु नट्ट कल्लिल मूडलु अकसालिगॆय्यि तॆंकलु यिन्नूरु कम्म आकॆय्गरुवणं नूर्रकारु चिन्नमं तिर्रुवरु

२८. बसदियि मूडलय्यगलद मनॆ नागेश्वरदेवर तोंटदिं मूड सिरिवडुणद मूड-बट्टॆयि बडगलु बन्नियमरडि पडुव-

२९. लु तोंटस्यनूर्ब्बरुं सॆट्टिगुत्त पॆम्म गावुंडनुं सौधॆरॆगळुं तळद सॆट्टियरुमिर्द्दु देवर सॊडेरण्णॆगे बोरिगावॆय

३०. तळद सॆट्टियरॊक्कलिगॆ हागवॊन्दु अल्लिमारिदहत्तिय जवळक्कॆ बत्तिगॆ हिडिहत्ति उप्पिन हॆरिगे सट्टुगे वॊन्दु हॆड-

३१. गॆगॆ मान ऒंडु तिप्पॆ सुंकमुं एलॆय हेरिगयिवत्तॆलॆ तलॆवोरिगिप्पत्तयिदॆलॆ अडकॆयं मारिद [हॆरिगि] प्पत्तयिदडकॆ मार्र-

३२. व भत्तदरासियल्लि देवर सरुगक्कॆ सट्टुग ऒन्दु यितिनितुमं बिट्टरु । अल्लि-मारिद कुदुरॆगॆ मन्नॆयर सुंकद कॊट्टगॆ [वॆ]ळॆयं

३३. बिट्टरु अल्लि[यितप] हणविनलु तॆल्लिगवनॆ ऒन्दु तंबुलिगरंगडि ऒन्दु हॊलबनॆ ऒंदु यिनितुमनुभयसाम्यमं बिट्टरु ॥

३४. श्रीमतु बिज्जलदेवरसर मेळाळ्कॆय सुंकवॆग्गडॆ नागदेवनायकरुं अवरळिय रेवणनायकनुं लखमरसनुं अल्लि मारिद कु

३५. दुरॆय काणिकॆयि बिट्ट चौव्वल ऒन्दु

*भाग तिसरा*

३६. स्वदत्तां परदत्तां वा यो हरेति वसुंधरां [।*] षष्ठिव्वर्षसहश्राणि विष्ठायां जायते क्रिमिः ॥ [९॥*] शासनमिदाउदॆल्लि-

३७. य शासनमारित्तरेकॆ सलिसुवॆ नानीशासनमॆम्ब पातकना सकळं रौरवक्कॆ गळगळनिल्लिगुं ॥ सकळोर्व्वीनु-

३८. तमप्प धर्म्मस्थनिदं कादं स्थितैश्वर्य्य भुंभुकनक्कुं [॥*] विपरीतदॊळु नडॆव गंगागयावाणरासि कुरुक्षेत्रदॊळॆ

३९. यदॆ गो-द्विज-मुनि-स्त्री-बाळरं कॊंदपातकनक्कुं बिडिदिक्कुमापुरुषनॆंदुं रौरवस्थानदॊळु ॥

४०. बहुभिर्व्वसुधा दत्ता राजभिस्सगरादिभिर्यस्य यस्य यदा भूमितस्य तस्य तदा फलं ॥ [१०॥*] स्वस्त्य-

४१. भ्युदय मंगळमहाश्री श्री ॥

## भाषांतर

अत्यंत गंभीर अशा श्रीमान स्याद्वादाचे अमोघ लांछन ज्यावर आहे अशा त्रैलोक्यनाथाच्या जिनशासनाचा विजय असो (श्लो. १, ओ. १). स्वस्ति. समस्तभुवनाश्रय, श्रीपृथ्वीवल्लभ, महाराजाधिराज, परमेश्वर, परमभट्टारक, सत्याश्रय (नृपतीच्या) कुळाचा तिलक, चालुक्य कुळाचा अलंकार, अशा श्रीमत्प्रताप-चक्रवर्ती जगदेकमल्लाचे विजयी राज्य चंद्र, सूर्य आणि तारे आहेत तोपर्यंत उत्कर्षाने वाढत असताना, आणि (जगदेकमल्ल) आपल्या कल्याण येथील वास्तव्यात विश्रंभालाप व विनोद यात काळ घालवीत राज्य करीत असताना (ओ. २–५)॥ त्याच्या चरणकमलाच्या प्रसादाने उपजीविका करणारा (त्याचा सेवक)॥ (ओ. ५). जीवितेश, कळचुरी कुळातील दुर्दम्य सिंह, शत्रुवीरांच्या स्त्रियांच्या डोळ्यांतील अश्रुप्रवाहाने आपला कोपाग्नी शांत करणारा, चालुक्य नृपतींच्या यशोरूपी वेलीला प्रफुल्लित करणारा वसंत, पेर्म्माडिदेवाचा प्रिय पुत्र, पृथ्वीचा उपभोग घेता यावा म्हणून क्षत्रिय धर्माचा महिमा ज्याने प्रगट केला आहे अशा त्या क्षोणिपाल बिज्जलाचा विजय असो. (श्लो. २, ओ. ८). यशोरूपी वेलींचे वन वाढवणारे (आपल्या) असिलतेच्या (लतेप्रमाणे असणाऱ्या तरवारीच्या धारेवरील) तीक्ष्ण पात्यावरील पाणीच असा राजल; (आणि) देवेंद्रासारख्या प्रचंड शत्रुनृपतींना जिंकणारा दशग्रीव (रावणच) असा मैळुगिदेव, या आपल्या धाकट्या बंधूमुळे विख्यात झालेला; आपल्या प्रतापरूपी वडवाग्नीने समुद्राचे पाणी शोषण करणारा बिज्जल (श्लो. ३; ओ. ८–१०), मत्सरशून्य हृदय धारण करणारा (असा तो बिज्जल) आपल्या धाकट्या भावांच्या निरंतर साह्याने, चालुक्यचक्रवर्तीच्या लीलाकृपेने प्राप्त केलेल्या करहड नाडूचे (प्रांताचे) पालन करीत होता॥ (श्लो. ४; ओ. १०–११). त्या करहट धरित्रीरूपी लक्ष्मीचे नाक (प्रमुख स्थान) म्हणून संबोधिल्या जाणाऱ्या वैभवसंपन्न हेड नाडूचे (प्रदेशाचे) महांक आणि करिकुळ नृपती हे (प्रशासक) अधिकारी होते (श्लो. ५; ओ. ११–१२).

परम श्री जिनतत्त्वांच्या उपदेशाने सर्व सांसारिक लोकांना आनंद देऊन, दुर्धर व उग्र तपःप्रभावाच्या सामर्थ्याने कंदर्पाला जिंकून, श्रेष्ठ चारित्र्याने अलंकृत होऊन, भलेपणा (प्रशस्ती) प्राप्त करून उदार कारेय गणाचे स्वामी मोनिभट्टारक मैलाप अन्वयरूपी लक्ष्मीचा उद्धार करू शकले (श्लो. ६; ओ. १३–१४).

त्याचा शिष्य माधवचंद्र भट्टारक देव. त्याचा शिष्य भूरिचंद्र सिद्धान्त देव.

श्री. मुनिचंद्र यतीच्या भरीव व कोमल चरणकमलाच्या ठिकाणी मधुकर झालेला (त्या चरणकमळांचा सेवक), अजिंक्य, सांसारिक जनांचे शिरोभूषण,

गुणसंपन्न व बय्स (वैश्य) कुलाची शोभाच असा काम (होता). (श्लो. ७; ओ. १५–१६). आदि जिन ही ज्याची पूज्य आराध्यदेवता आहे, श्रेष्ठ चरित्र्याने संपन्न मुनिचंद्र हे ज्याचे गुरु आहेत, सद्गुणसंपन्न केत गावुंड ज्याचे पिता आहेत व सत्य आणि शुचिता यांना आपले सर्वस्व अर्पण केलेली श्रीपद्मगावुंडी ज्याची प्रेमळ आई आहे, त्या काव गावुंडाची, व्रतपरिपालनात आणि उत्कर्षात बरोबरी करणारा दुसरा कोणी असू शकेल काय? (श्लो. ८; ओ. १६–१८).

स्वस्ति. हेड–३०० जवळील बोरिग्राम येथे केत गावुंडाने बांधविलेल्या श्रीपार्श्वदेवाच्या बसतीला, श्रीमच्चालुक्यप्रतापचक्रवर्ति जगदेकमल्लाच्या बाराव्या राज्यवर्षी शुक्ल संवत्सरातील फाल्गुन शुद्ध त्रयोदशी, रविवार रोजी, ऋषींच्या अन्नदानासाठी, तसेच पडझड झालेल्या (बसतीच्या) जीर्णोद्धारासाठी (ओ. १८–२१).

स्वस्ति, पंच महाशब्द (ही पदवी, किंवा या शब्दांचा सन्मान) प्राप्त करणारा, महामंडलेश्वर, कालांजर या श्रेष्ठ नगराचा स्वामी, सुवर्णवृषभध्वज (ज्याच्या ध्वजावर वृषभाचे चिन्ह सोन्याने काढलेले आहे असा), डमरुग आणि तुर्य या वाद्यांनी ज्याच्या नावाची घोषणा केली जाते असा, कळचुरिकमळमार्तंड, कदनप्रचंड (युद्धात शत्रूला अत्यंत घनघोर वाटणारा), मान-कनकाचळ (अभिमानाचा सुवर्ण मेरू पर्वत), सुभटरादित्य (शूरवीरांचा सूर्य), कलिगळंकुश (कलिकालाच्या गळ्यावर रोखलेला अंकुश), गजसामंत, शरणागतवज्रपंजर, प्रतापलंकेश्वर (रावणाप्रमाणे प्रतापी), परनारीसहोदर, गिरिदुर्गमल्ल, वैरीभकंठीरव (शत्रुरूपी हत्तींचा नाश करणारा सिंह), निःशंकमल्ल (निर्भयपणे पराक्रम गाजविणारा वीर) इत्यादी प्रशस्ती (बिरुदे) धारण करणारा श्रीमन्महामंडलेश्वर बिज्जलदेव याचा (ओ. २१–२४) ग्रामाधिकारी लक्खणदेव, प्रमुख करणाध्यक्ष (निरनिराळ्या खात्यांचा मुख्य) व केंद्रशासनाधिकारी (मेळाळ्केय) नंदियण्ण सावंत, आणि तेथील मूळ रहिवासी (मूळिग) कप्प गावुंड यांनी (ओ. २५) मुनिचंद्र सिद्धान्तदेवाला हातावर पाणी सोडून (धारापूर्वक) दोनशे कम्म जमीन दान दिली. तिच्या पश्चिमेला हन्नसुगे (नावाची जमीन) असून उत्तरेला गाईंची वाट, पूर्वेला पुरलेला एक खुणेचा दगड व दक्षिणेला सोनारआळी आहे. या जमिनीवरील शंभर सुवर्णमुद्रांचा कर त्यांनी भरावा (ओ. २६, २७). या जमिनीशिवाय बसतीपासून पूर्वेच्या बाजूने असलेले पाच हात रुंदीचे घर आणि एक बगीचा दान दिला असून तो नागेश्वरदेवाच्या मठाच्या पूर्वेकडे, सिरि-वड्डणाच्या जमिनीच्या उत्तरेकडे व शमीवृक्षाच्या पश्चिमेकडे आहे.

पाचशे स्वामी, सेट्टिगुत्त पेम्म गावुंड, सौधोर (चौधरी) महालकरी आन स्थानिक (तळद) श्रेष्ठी यांनी देवाच्या नंदादीपासाठी (पुढील कर लावले आहेत). बोरिगाव येथील श्रेष्ठींच्या प्रत्येक कुटुंबावर एक हाग (एक नाणे). तेथे विकल्या जाणाऱ्या कापसाच्या प्रत्येक गासड्यातून वातीसाठी पसाभर कापूस, मिठाच्या प्रत्येक पोत्यातून एक सट्टुग (पळाभर) मीठ, प्रत्येक ओझ्यावर एक मान कर. (विड्याच्या) पानांच्या प्रत्येक पोत्यातून पन्नास पाने. आणि डोक्यावर वाहून आणलेल्या (पानांच्या) प्रत्येक टोपलीतून पंचवीस पाने. विकलेल्या सुपाऱ्यांच्या प्रत्येक पोत्यातून पंचवीस सुपाऱ्या, विकलेल्या भाताच्या प्रत्येक राशीतून देवाच्या प्रसादासाठी एक सट्टुग (पळाभर) भात. याप्रमाणे संकल्प सोडला आहे. (ओ. २९–३२).

येथे विकल्या जाणाऱ्या घोड्यांच्या विक्रेत्यावर (सरदारावर) जो कर लावलेला आहे त्या कराच्या पैशातून एक तेलघाणा, एक (विड्यांच्या) पानाचे दुकान व सफाईगार (कर्मचाऱ्यांना) राहाण्यासाठी शेतातील एक घर देण्यात आले आहे (ओ. ३२–३३). श्री बिज्जलाच्या केंद्रशासनातील महसूल मंत्री नागदेव नायक याचा भाचा (किंवा जावाई) रेवणनायक व लखमराजे यांनी तेथे विकलेल्या घोड्यावरील कराचा एक चौवल (एक-चतुर्थांश भाग) दान म्हणून दिला आहे (ओ. ३४–३५).

आपण स्वत: किंवा इतरांनी (दान म्हणून) दिलेली भूमी जो हरण करील तो साठ हजार वर्षेपर्यंत विष्ठेमध्ये किडा म्हणून जन्माला येईल (ओ. ३६). हे कोणते शासन, कुठले शासन, ते कुणी दिले, मी हे शासन काय म्हणून पाळावे ? असे म्हणणाऱ्या पाप्याचे सर्वस्व रौरव नरकात पडेल (ओ. ३६–३७). सर्व पृथ्वीवर ज्याची स्तुती केली जाते अशा या धर्माचे जो पालन करील तो आपल्या ऐश्वर्याचा उपभोग घेऊ शकेल (ओ. ३७–३८); पण जो याला प्रतिकूल आचरण करील त्याला गंगा, यमुना, सरस्वती, वाणरसि (वाराणसी), कुरुक्षेत्र, इत्यादी पवित्र क्षेत्रामध्ये गाई, ब्राह्मण, मुनि, स्त्रिया, बालक यांची हत्या केल्याचे पातक लागेल, आणि तो पापी मनुष्य रौरव नरकातून कधीच बाहेर पडू शकणार नाही (ओ. ३८–३९). यापूर्वी सगरादि अनेक राजांनी भूमिदान दिलेले आहे. ती भूमी ज्यावेळी ज्याची ज्याची असते त्याला त्याला त्यावेळी (त्या भूमिदानाचे) फळ मिळते (ओ. ३९–४०) ॥ स्वस्ति, अभ्युदय, मंगळ महाश्री ॥

• • •

# २१

# भाळवणी येथील दोन कानडी शिलालेख

**प्रास्ताविक : उपलब्धी**

ता. २६ जून १९७१ च्या 'महाराष्ट्र टाइम्स'मध्ये कऱ्हाडजवळ भाळवणी या गावी प्राचीन शिलालेख सापडल्याची बातमी प्रसिद्ध झाली. तिच्या अनुषंगाने चौकशी केल्यानंतर असे कळले की, कऱ्हाड येथे श्रीशिवाजी विद्यालयातील शिक्षक श्री. भगवानराव घार्गे यांना भाळवणी (ता. खानापूर, जिल्हा सांगली) येथे जून १९७१ मध्ये एकूण चार शिलालेख उपलब्ध झाले असून ते त्यांनी कऱ्हाड येथील श्रीशिवाजी विद्यालयाच्या पुरातत्त्व विभागात आणून ठेवले आहेत. श्री. घार्गे यांना प्राचीन शिलालेखादी वस्तू शोधण्याचा व जमविण्याचा नाद आहे. प्रामुख्याने त्यांच्याच प्रयत्नाने श्रीशिवाजी विद्यालयात पुरातत्त्व विभाग उघडला असून तो अत्यंत उपयुक्त ठरला आहे. त्यांच्याच प्रयत्नाने भाळवणी येथील शिलालेख उपलब्ध झाले असल्यामुळे ते अभिनंदनास विशेष पात्र आहेत.

या चार शिलालेखांपैकी तीन शिलालेख कानडी लिपीत कोरलेले असून चौथा नागरी लिपीत कोरलेला आहे. कानडी लिपीतील तीन शिलालेखांपैकी एकाची शिळा फार खराब झालेली असल्यामुळे तिच्यावरील लेख अत्यंत अस्पष्ट आणि म्हणून दुर्वाच्य झालेला आहे. बाकीचे दोन कानडी व एक नागरी लिपीतील शिलालेख यांचे स्वच्छ ठसे माझ्या विनंतीवरून महाराष्ट्र राज्य, पुरातत्त्व व पुराभिलेख विभागाचे संचालक श्री. वि. गो. खोबरेकर यांनी काढवून आणले व ते मला उपलब्ध करून दिले. त्यांच्याच परवानगीने दोन कानडी शिलालेख मी येथे संपादन करीत आहे. या कानडी लेखांचे स्थूल वाचन नागपूर विद्यापीठाच्या 'प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती आणि पुरातत्त्व विभागा'तील संशोधक विद्यार्थी श्री. प्रसाद व श्री. राघवाचारी यांनी मला करून दिले. त्यानंतर त्यांचे निश्चित व निर्दोष वाचन भारत सरकारचे सेवानिवृत्त पुरालेखाधिकारी श्री. लक्ष्मीनारायणराव (हल्ली मुक्काम कोल्हापूर) यांनी करून दिले. या सर्वांचा मी अत्यंत आभारी आहे. मराठी वाचकांच्या सोयीसाठी हे दोन्ही शिलालेख मी पुढे मराठीत लिप्यंतर करून दिलेले आहेत.

यातील पहिल्या शिलालेखाचे ओळ १ ते १४ ; १४ ते १८ आणि १८ ते ३३ असे तीन पोट विभाग पडतात. त्यांना **अ, ब** आणि **क** अशी नावे मी दिली आहेत व त्याच क्रमाने त्यांचे संपादन येथे करीत आहे.

## [१] शिलालेख पहिला

### *(अ) विभाग*

**वर्णन**

प्रस्तुत कोरीव लेखाची शिळा ५० सें. मी. रुंद असून ९६ सें. मी. उंच आहे. तिचा वरचा भाग अर्धवर्तुळाकार आहे. या भागाची डावी बाजू तुटलेली आहे. या अर्धवर्तुळाकार भागात उजवीकडून एक लहान व त्याच्यापुढे दुसरी मोठी अशा जनावरांच्या दोन आकृती कोरल्या आहेत. या आकृती गाढवाच्या असाव्यात असे दिसते. मध्यभागी असलेली आकृती कशाची याचा स्पष्ट बोध होत नाही. त्यानंतर डाव्या बाजूला एक मनुष्याकृती कोरलेली असून तिचा उजवा हात उंच वर गेलेला आहे, तर डावा हात उंचावून खाली आलेला असावा असे दिसते. या आकृतीच्या डाव्या बाजूला सूर्य आणि चंद्रकोर यांच्या आकृती कोरलेल्या आहेत.

**विषय**

भाळवणी येथील गवरेश्वर देवाच्या पूजाअर्चेसाठी आणि देवालयाच्या जीर्णोद्धारासाठी (१) सोवणनायक, चावणनायक आणि नागदेवनायक; (२) कलिदेवय्य नायक; आणि (३) श्रेणी किंवा व्यापारी संस्था, यांनी दिलेल्या जमिनी आणि करांच्या रूपाने दिलेली दाने नमूद करणे हा पहिल्या शिलालेखातील अ विभागाचा विषय होय.

**भाषा**

प्रस्तुत शिलालेखातील कानडी भाषेच्या स्वरूपासंबंधी काही लिहिणे हे माझ्या अधिकाराबाहेरचे आहे. यात आलेल्या संस्कृत शब्दांवर कानडी वर्णोच्चारांची छाप पडलेली आहे. **त्रय्ळोक्य** (ओ. १), **चाळुक्य, त्रैळोक्य** (ओ. २), **मंडळेश्वर.** (ओ. ३), **कळचुर्य्यकुळकमळमार्तण्ड** (ओ. ५), **महामण्डळेश्वरं** (ओ. ६, १६) इत्यादी शब्दांतील **ळ** काराचा उपयोग पाहा. संस्कृत शब्दांचे लेखनही चुकीचे केलेले आहे. उदा. 'चारवे' ऐवजी चारुवे (ओ. १), त्रैलोक्य ऐवजी **त्रय्ळोक्य** (ओ. २) ; याशिवाय **सुवर्न्न** (ओ. ४), **विशभ** (ओ. ५), **निर्घोशण** (ओ. ५), **विक्रित** (ओ. १५), **साशन, आळंक्रित, सौचाचर** (ओ. १९), इत्यादी शब्दांचे लेखन पाहावे. यावरून मराठीप्रमाणे कानडी भाषेतही न–ण, श-ष-स यांतील

वर्णोच्चारातील सूक्ष्म भेद नाहीसे होत चालले होते ; तसेच ऋ या स्वराचे व्यंजनात उच्चारांतर होऊन त्याचा उच्चार व लेखन रि असे व्हायला लागले होते हे 'विक्रित,' 'आलंक्रित' या शब्दांवरून दिसून येते.

## कालनिर्देश

प्रस्तुत शिलालेखात एकूण दोन कालनिर्देश आलेले आहेत. (१) सोवण-नायक व चावणनायक यांनी गवरेश्वर देवालयाला ज्या वर्षी दान दिले ते वर्ष चालुक्य नृपती त्रैलोक्यमल्लदेव याचे ८ वे राज्यवर्ष होते. त्या वर्षाची मिती पुढीलप्रमाणे : धाता संवत्सर, मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा, गुरुवार. (ओळ २, ३). पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे गत वर्ष शके १०७८ (=इ. स. ११५६) ला धात्री संवत्सर होते. या संवत्सराचे नाव धातु, धातृ, धाता, धात्रि असे अनेक रीतींनी लिहिले जाते. या शिलालेखात ते 'धातु' असे लिहिलेले आहे. ते धातृ किंवा धात्री संवत्सर होय यात शंका नाही. या संवत्सरातील मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेला बरोबर गुरुवार येतो. तेव्हा हा कालनिर्देश पंचांगा-प्रमाणे बिनचूक आहे. इंग्रजी पंचांगाप्रमाणे ही तारीख इ. स. ११५६, नोव्हेंबर १५ गुरुवार, अशी होती.

(२) दुसरा कालनिर्देश कलिदेवय्य नायक याने ज्या दिवशी दान दिले त्यासंबंधीचा आहे. रायमुरारी सोयिदेव याचे ते ४ थे राज्यवर्ष असून त्या वर्षी विकृत संवत्सर होते. त्यातील ज्येष्ट शुद्ध अष्टमीला सोमवार होता. त्या दिवशी व्यतिपात होता (ओळ १४, १५). पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे विकृत संवत्सर गतवर्ष शके १०९२ ला होते. त्यातील ज्येष्ट शुद्ध अष्टमीला बरोबर सोमवार होता. सूर्यभाग ५२+चंद्रभाग १४७=१९९ भाग; यातून प्रत्येकी ११ (=२२) अयनांश वजा केले असता १७७ भाग उरतात. १८० भाग असले म्हणजे व्यतिपात योग पूर्ण होतो. अर्थात वरील दिवशी, म्हणजे ज्येष्ट शुद्ध अष्टमी, सोमवार, रोजी १७७ भाग काली व्यतिपात योग असल्याचेही पिल्ले जंत्रीवरून दिसून येते. तेव्हा शिलालेखातील हा दुसरा कालनिर्देशही बरोबर आहे, यात शंका नाही. त्या दिवशी इंग्रजी तारीख इ. स. ११७०, मे १८, सोमवार ही होती.

शके १०७८ (=इ. स. ११५६) मध्ये आणि शके १०९२ (इ. स. ११७०) मध्ये दिलेल्या दानांचे निर्देश एकाच शिळेवर कोरलेले असून त्यांचा मजकूर धावता आहे. ओळ १४ ते ३३ मधे अय्यावोळेय स्वामी आणि भाळवणी येथील शिष्यांची श्रेणी यांनी दिलेल्या दानांचा निर्देश आहे. ती दाने कोणत्या काळात दिली

गेली याचा स्वतंत्र उल्लेख नाही. बहुधा तीही सोयिदेवाच्या राज्यकालात दिली गेली असावी. ते काहीही असले तरी प्रस्तुत शिलालेख शके १०९२ (=इ. स. ११७०) मध्ये किंवा त्यानंतर लौकरच केव्हातरी, गवरेश्वर देवाला मिळालेल्या सर्व दानांचा निर्देश करण्यासाठी कोरण्यात आला असावा, असे दिसून येते.

## आशय व चर्चा

'नमस्तुंगशिरश्चुंबि-' या श्लोकाने लेखाचा आरंभ झालेला आहे. (ओ. १) हा श्लोक म्हणजे बाणभट्टाच्या 'हर्षचरिता' च्या आरंभीचे मंगलाचरण होय. चालुक्य नृपतींच्या अनेक शिलालेख-ताम्रपटांच्या आरंभी त्याचा उपयोग केल्याचे आढळते.[1] नमनाच्या या श्लोकानंतर त्रैलोक्यमल्लदेवाच्या ८ व्या राज्यवर्षाचा व त्यातील प्रस्तुत विभागातील दानाच्या तिथीचा उल्लेख केला आहे. (ओ. २, ३). हा त्रैलोक्यमल्ल म्हणजे कल्याणी येथील पश्चिम चालुक्य नृपतींच्या वंशातील तृतीय सोमेश्वराचा धाकटा पुत्र तृतीय तैलप होय. तृतीय सोमेश्वर (इ. स. ११२६—११३८) याच्या मृत्यूनंतर प्रथम त्याचा वडील मुलगा द्वितीय जगदेकमल्ल (इ. स. ११३८—११४९) गादीवर बसला आणि त्याच्या नंतर त्याचा धाकटा भाऊ तृतीय तैलप (इ. स. ११४९—११६३) याला गादी मिळाली. 'त्रैलोक्यमल्ल' आणि 'चालुक्यचक्रवर्ती' ही बिरुदे त्याने धारण केली होती. क्वचित, 'चालुक्यचक्रवर्ति विक्रम' असेही त्याचे बिरुद आढळते.[2] तथापि, त्रैलोक्यमल्ल या बिरुदानेच तो विशेष ओळखला जातो. धाता संवत्सरातील म्हणजे शके १०७८ मधील मार्गशीर्ष महिन्यात त्याचे आठवे राज्यवर्ष चालू होते. अर्थात शके १०७१ (इ. स. ११४९) मार्गशीर्ष महिन्यापूर्वी केव्हा तरी त्याचे राज्यारोहण झाले असावे.

## कलचुरी वंश व त्याच्या शाखा

त्रैलोक्यमल्लाच्या उल्लेखानंतर महामंडलेश्वर बिज्जणदेवाचा निर्देश आलेला आहे. त्याची अनेक बिरुदे ४ ते ६ या ओळींत आलेली आहेत. कळचूर्य नृपतींच्या दोन प्रमुख शाखा होऊन गेल्या. एक मध्य भारतात व दुसरी दक्षिण भारतात. मध्य भारतातील कलचुरी नृपतींची राजधानी आरंभी

१ इंडियन ॲन्टिक्वेरी. व्हॉ. १३, पृ. ९२.

२ दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन. (संपा: यज्ञदानी), पृ. ३७५.

कालंजर येथे व नंतर माहिष्मती (आजचे महेश्वर शहर)[1] येथे होती. त्यानंतर त्यांचा जो वंश उदयाला आला त्यांनी त्रिपुरा (जबलपूर जवळ नर्मदेच्या काठावरील सध्याचे 'तेउर' हे गाव) येथे राजधानी स्थापन केली. दक्षिणेतील कलचुरी वंश हा 'कल्याणीचे कलचुरी' म्हणून ओळखला जातो. मध्यभारतातील कलचुरीचीच ही शाखा होती की ती स्वतंत्र उदयाला आली हे निश्चित सांगता येत नाही. दक्षिणेतील कलचुरी नृपती आपणाला 'काळांजरपुरवराधीश्वर' म्हणवितात.[2] काळंजर हे शहर आजही उत्तर प्रदेशातील बांदा जिल्ह्यात विद्यमान आहे. प्रारंभीच्या कलचुरींची ती राजधानी होती. त्यावरून दक्षिणेतील कल्याणीचे कलचुरी त्याच वंशातील असावे असे अनुमान करण्यास हरकत नाही. बिजण्णाने आपणाला 'कळचुर्यकमळमार्तंड' म्हटले आहे (ओळ ४) ते यथार्थ वाटते. कारण त्याच्यामुळेच दक्षिणेतील कल्याणीचा कलचुरी वंश विशेष विख्यात आहे. बिज्जणाला सम्राटाकडून 'पंचमहाशब्दा'चा मान मिळालेला होता. (समधिगतपंचमहाशब्द). पूर्वी श्रेष्ठ व्यक्तींना आपल्या स्वारीसमोर किंवा इतराकडून त्याच्या आगमन प्रसंगी शंख, भेरी, मृदंग, शृंग व घंटा ही वाद्ये वाजवण्याचा सन्मान सम्राटाकडून मिळत असे. हा सन्मान बिज्जणाला प्राप्त झाला होता. 'डमरुग' आणि 'तूर्य' ही वाद्ये वाजवून (गमन व आगमन प्रसंगी) त्याच्या नावाची घोषणा होत असे. (डमरुगतूर्यनिर्घोषणं) युद्धात तो प्रचंड होता. शत्रूंना तो अत्यंत भीषण वाटत असे (कदन–प्रचंड).

### कलचूर्य नृपती बिज्जण

दक्षिणेतील कल्याणी येथील कलचुर्य वंशाचा, इतिहासाला ज्ञात असलेला मुख्य पुरुष म्हणून 'जोगम' प्रसिद्ध आहे. पण त्याच्याविषयी माहिती देणारी ऐतिहासिक साधने आज उपलब्ध नाहीत. जोगमाचा पुत्र पेर्माडी ऊर्फ हेम्माडियरस हा इ. स. ११२८ मध्ये चालुक्य नृपती तृतीय सोमेश्वराचा मांडलिक म्हणून सध्याच्या विजापूर जिल्ह्यातील तरडवाडी नाडूत (प्रदेशात) राज्य करीत होता, असा उल्लेख आढळतो[3] बिज्जण हा त्याचा मुलगा त्याच्या मागून गादीवर बसला. बिज्ज, बिज्जल या नावांनीही तो संबोधिला जातो.

१ कलचुरी नृपति आणि त्यांचा काल (वा. वि. मिराशी), पृ. ५.

२ प्रस्तुत लेखातील शिलालेख १ (ओळ ४) व शिलालेख २ (ओळ ५) पाहा.

३ इंडियन ॲन्टिक्वेरी, व्हॉ. १२, पृ. १२

इ. स. ११४५ च्या सुमारास तो गादीवर बसला असावा असे म्हैसूर राज्यातील हरिहर येथील शिलालेखावरून दिसून[1] येते. या लेखात त्याला कोणतीही बिरुदे लावलेली नाहीत. त्यावेळी चालुक्य नृपती जगदेकमल्ल द्वितीय कल्याणी येथे राज्य करीत होता. बिज्जलाचे कलचुरी घराणे हे या चालुक्यांचेच मांडलीक होते. जगदेकमल्लानंतर त्रैलोक्यमल्ल तृतीय तैलप इ. स. ११४९ मध्ये चालुक्यांच्या गादीवर आला. तो अत्यंत दुर्बळ होता. राज्यशासनकौशल्यही त्याजजवळ नव्हते. उलट बिज्जण अत्यंत पराक्रमी आणि चतुर राजकारणी होता. शिवाय तो अत्यंत महत्त्वाकांक्षीही होता. चालुक्य सम्राटांची सत्ता खिळखिळी झाल्याचे पाहून ती उलथून पाडून हस्तगत करण्याचे दूरदर्शी धोरण त्याने आरंभापासून स्वीकारले असावे असे दिसते. म्हणूनच की काय, त्याच्या आरंभीच्या काही शिलालेखांत चालुक्य सम्राट त्रैलोक्यमल्लाचा निर्देश असला तरी त्याचे आपण 'पादपद्मोपजीवी' सेवक आहोत असे त्याने म्हटलेले नाही. सम्राटाची मर्जी संपादून त्याने 'महामंडळेश्वर' ही पदवी प्राप्त करून घेतली, तरीही त्याच्या शिलालेखांत चालुक्य सम्राट त्रैलोक्यमल्लदेव याचा 'त्याच्या राज्यवर्षी' एवढाच उल्लेख तो करतो, असे काही संशोधक म्हणतात. प्रस्तुत भाळवणी शिलालेखात 'त्रैलोक्यमल्लदेवाच्या ८ व्या राज्यवर्षी' एवढेच म्हटले आहे. तथापि, त्रैलोक्यमल्लदेवाच्या 'चालुक्यचक्रवर्ती' या विशेषणाने त्याचे सम्राटत्व व आपल्या 'समधिगतपंचमहाशब्द महामंडलेश्वर' या बिरुदांनी आपले मांडलिकत्व त्याने मान्य केल्याचे, निदान तसा आभास निर्माण केल्याचे स्पष्ट दिसते. 'आभास' असे म्हणण्याचे कारण हे की, पुढे ६ व ७ या ओळीत त्यावेळी कऱ्हाड विभागावर शासन करणारा अधिकारी 'मैळुगिदेव' याला बिज्जणाचा 'पादपद्मोपजीवि' असे म्हटले आहे, त्यावरून कल्याणी येथील राज्य जणु बिज्जणदेवाचे होते, जणु तोच सम्राट होता व राज्यातील विभागांचे शासक त्याचे 'पादपद्मोपजीवि' अर्थात, त्याच्या चरणाच्या आश्रयाने राहाणारे सेवक होते असे ध्वनित होते. दुसरी गोष्ट अशी की, नेमके याच वर्षी म्हणजे इ. स. ११५६ मध्ये बिज्जणाने त्रैलोक्यमल्लदेवाचे सम्राटत्व झुगारून दिलेले दिसते. त्याच वर्षी त्रिभुवनमल्ल, भुजबलचक्रवर्ति, कळचूर्यचक्रवर्ति इत्यादी बिरुदे धारण करून बिज्जणाने स्वतःचे राज्यवर्षही चालू केले. त्याच्या पहिल्या राज्यवर्षाचा उल्लेख 'धातु संवत्सर, शकवर्ष १०७९ (चालू; अर्थात गत शकवर्ष १०७८)' असा आहे. त्या वर्षापासून

---

१ डायनेस्टीज ऑफ कॅनरीज डिस्ट्रिक्ट्स (फ्लीट), पृ. ४७१.

तो स्वतंत्र झाला आणि पुढील काही वर्षांत त्याने कल्याणीचे राज्य पादाक्रांत केलें. त्याच्या काही शिलालेखांवरून तो मंगळवेढे (जि. सोलापूर) येथून राज्य करीत होता असे दिसते. कदाचित, कल्याणी येथे त्याचे आसन स्थिर नसल्यामुळे त्याला काही काळ राजधानी बदलणे भाग पडले असावे. इ. स ११६२ च्या एका शिलालेखात त्याला 'समस्तभुवनाश्रय श्रीपृथ्वीवल्लभ महाराजाधिराज परमभट्टारक' ही चालुक्य नृपतींची बिरुदे लावली आहेत. त्यावरून त्यावर्षी किंवा त्याआधी थोडे अगोदर कल्याणीच्या चालुक्य राज्याचा तो पूर्णपणे स्वामी बनला असावा, असे दिसून येते.[1]

### वीरशैव पंथ आणि बिज्जणाचा अंत

बिज्जण जैन धर्मानुयायी होता असे 'बसव पुराण' व 'चन्नबसव पुराण' या वीरशैवांच्या आणि 'बिज्जलदेवरायचरित' या जैनांच्या ग्रंथात म्हटले आहे. तथापि, तेलगू 'बसव पुराणमु' या ग्रंथात तो पांडुरंगाचा भक्त होता असेही म्हटले आहे. दक्षिणेतील कलचुरी वंश शैव मतानुयायी होता. तेव्हा परंपरेने बिज्जण शैव होता असे दिसते. त्याच्या शिलालेखांच्या आरंभी नेहमी शिवाचे मंगलाचरण आढळते, त्यावरूनही तो शैव असावा असे अनुमान सयुक्तिक वाटते. त्याच्या कारकीर्दीत वीरशैव धर्म निर्माण होऊन फोफावू शकला याचेही कारण त्याचे शैवमतानुयायित्व असावे. बिज्जणाच्या मुख्य प्रधानाचे नाव बलदेव. तो शैव ब्राह्मण होता. मादिराज आणि मादलांबिका याचा पुत्र बसव हा बलदेवाचा भाचा होता. बसव म्हणजे शिवाच्या नंदीचा अवतार. शिथिल झालेल्या शैव धर्माच्या पुनरुत्थापनासाठी शंकराने आपणाला पाठवले आहे अशी त्याची घोषणा होती. आत्मा नवीन शरीर धारण करतो हे त्याला मान्य नव्हते. बालविवाहाला त्याचा विरोध होता. विधवाविवाहाचा तो पुरस्कर्ता होता. नंदीची पूजा करणे व गळयात लिंग धारण करणे ही त्याच्या या नवीन धर्माची वैशिष्ट्ये होत. म्हणून त्याचा धर्म 'लिंगायत' या नावाने ओळखला जातो. 'वीरशैव' म्हणजे नैष्ठिक शिवोपासक, हेही त्याचे दुसरे नाव आहे. त्याच्या अलौकिकत्वाने प्रभावित होऊन बलदेवाने आपली गंगादेवी नावाची मुलगी त्याला दिली व आपला जावई केले. बसवाच्या नवीन मतामुळे ब्राह्मण वर्ग त्याचा छळ करू लागला. त्यामुळे त्याला पळून जावे लागले. तथापि, बलदेवाच्या मृत्यूनंतर बिज्जणाने त्याला

१ डायनेस्टीज ऑफ कॅनरीज डिस्ट्रीक्ट्स (फ्लीट) पृ. ४७४-४७५.

बोलावून मुख्यमंत्रीपद दिले. त्याला कोषाध्यक्ष नेमून मुख्य सेनापतीपदाच्या जागेवरही त्याची स्थापना केली. इतकेच नाही तर नीललोचना नावाच्या आपल्या बहिणीचा त्याच्याशी विवाह लावून दिला, ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. बसवाने राजदरबारी असलेल्या आपल्या या वजनाचा व अधिकाराचा उपयोग करून आपल्या अभिनव मतांचा धूमधडाक्याने प्रचार सुरू केला. बसवाच्या वडील बहिणीचे नाव नागलांबिका. ती अत्यंत सुंदर होती. तिला कौमार्यावस्थेत झालेला मुलगा चन्नबसव. (जैन लेखकांच्या मते नागलांबिकेच्या सौंदर्यावर मोहित होऊन बिज्जणाने तिला आपली रखेली म्हणून ठेवले होते). बसवाच्या मतांचा प्रचार व प्रसार करण्यात त्याने विशेष भाग घेतला. बिज्जणाने हे सर्व चालू दिले, यावरून त्याचे शैवमतानुयायित्वच दिसून येते. तथापि, आपल्या मतांच्या कडवेपणामुळे पुढे बसवाने इतर धर्मांचा उच्छाद करणे सुरू केले. जैन धर्मियांवरही त्याने हत्यार धरले. त्यामुळे क्रुद्ध होऊन बिज्जणाने दोन लिंगायत धर्मानुयायांचे डोळे फोडले व त्यांना आंधळे केले. तेव्हा बसव पळून गेला. त्याने जगद्देव नावाच्या आपल्या शिष्याला बिज्जणाचा वध करण्यासाठी पाठवले. जगद्देवाने आपल्या साथीदाराच्या साह्याने भर दरबारात बिज्जणाचा वध केला, असे एक मत आहे. इकडे कुडालसंगम येथे बसव शिवात विलीन झाला. चन्नबसव पुराणाच्या मते बसव शिवतत्त्वात विलीन झाल्यावर चन्नबसव हा मुख्य प्रधान झाला. यादवी सुरू झाल्यावर त्याने युद्धात बिज्जणाचा पराभव केला. पण नंतर आपल्या आईच्या सांगण्यावरून त्याने बिज्जणाला त्याचे राज्य परत केले. 'बिज्जल-देवरायचरित' या जैन ग्रंथात थोडी निराळी हकीकत आहे. त्याच्या मते, जैन वेष धारण करून एका लिंगायताने बिज्जणाला विषाने माखलेले एक फळ अर्पण केले. ते हुंगल्यामुळे बिज्जणाला मृत्यू आला. ते काहीही असले तरी बिज्जणाच्या कारकीर्दीतच बसव व चन्नबसव हे वीरशैव अथवा लिंगायत पंथाचे प्रमुख उदयाला आले आणि या पंथाचा उदय आणि उत्कर्ष झाला, ही गोष्ट महत्त्वाची होय. बिज्जलाने इ. स. ११६७ पर्यंत राज्य केले. आपल्या मृत्यूपूर्वी इ. स. ११६७ मध्येच आपला मुलगा सोयिदेव याला गादीवर बसवून तो निवृत्त झाला होता.[1]

---

१ डायनेस्टीज ऑफ कॅनरीज डिस्ट्रिक्ट्स. (फ्लीट) पृ. ४७७-४८५; दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (संपा. यझदानी) पृ. ४६१-४६५.

कुमारनारायण मैळुगिदेव

महामंडलेश्वर बिज्जणाच्या उल्लेखानंतर **कुमार न.रायण मैळुगिदेव** याचा निर्देश आलेला आहे. (ओळ ७) 'मैळुगिदेव' हे विशेषनाम असून 'कुमार-नारायण' ही याची उपाधी अथवा बिरुद होय. कल्याणीच्या कलचुरी वंशात मैळुगिदेव नावाच्या दोन व्यक्ती आढळतात.[1] एक बिज्जणाचा धाकटा भाऊ व दुसरा बिज्जणाचा पुत्र किंवा सोयिदेवाचा धाकटा भाऊ म्हणून निर्देशिलेला आढळतो. बिज्जणाच्या मुलांत मैळुगिदेवाचे नाव आढळत नाही. तेव्हा हा दुसरा मैळुगिदेव बहुधा सोयिदेवाचा धाकटा भाऊ म्हणजे चुलत भाऊ असावा. बिज्जणाचा धाकटा भाऊ असलेल्या मैळुगिदेवाला कलिदेव नावाचा मुलगा होता. आपल्या शिलालेखात मैळुगिदेवाचा जसा उल्लेख आहे तसा कलिदेवाचाही आहे. त्यावरून असे वाटते की, या लेखात उल्लेखिलेला मैळुगिदेव हा बिज्जणाचाच धाकटा भाऊ असावा. 'कुमार-नारायण' ही उपाधी त्याची असावी. नुकत्याच उपलब्ध झालेल्या 'देशिंग-बोरगाव' येथील शके १०७२ च्या कन्नड शिलालेखात बिज्जणाचा धाकटा भाऊ मैळुगिदेव कऱ्हाड प्रांतावर राज्य करीत होता असे स्पष्ट म्हटले आहे. आपल्या शिलालेखातील मैळुगिदेव कऱ्हाड-४००० विभागावर राजधानी भाळवणी येथून शासन करीत होता. (ओळ ८) भाळवणी हे राजधानीचे गाव कऱ्हाड विभागाच्या ७ आणि १२ या पोटविभागात होते. कऱ्हाड विभागाचा उल्लेख 'कऱ्हाड-४०००' (नाल्कु ससिरद) असा केलेला आहे. याचा अर्थ असा की, कऱ्हाड विभागात ४ हजार गावांचा समावेश होता. ग्रामसमूह आणि विषय (विभाग) यांची रचना करताना त्यात दशगुणित ग्रामसंख्येचा अंतर्भाव करण्याची ही दशमान पद्धती म्हणून ओळखली जाते. राज्याचे शासकीय दृष्टीने विभाग पाडताना ते अशा दशमान पद्धतीचा स्वीकार करून पाडावे असे धर्मशास्त्रलेखकांनी सुचविले आहे. ही पद्धत दक्षिण भारतात इ. स. आठव्या शतकापासून सुरू झाली आणि क्रमाक्रमाने पुढे ती रूढ झाली.[2] या कऱ्हाड विभागाचे अनेक पोटविभाग होते. त्यातील ७ व्या आणि १२ व्या पोटविभागात राजधानी भाळवणीचा समावेश होता.

१ दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (संपा. यज्ञदानी) पृ. ४६५. तळटीप. २
२ तत्रैव. पृ. ५१.

### मैळुगिदेवाचे अधिकारी : दाने देणारे

**सोवण नायक** (ओळ १०) हा मैळुगिदेवाचा महाप्रधान होता. त्याला पोथेग्राहक असेही म्हटले आहे. त्यावरून कऱ्हाड विभागाचा मुख्य लेखाधिकारीही तोच असावा असे दिसते. **चावण नायक** हा मैळुगिदेवाचा 'करण' (=हिशेबनीस, लेखक) होता. 'करण' याचा अर्थ प्रशासनातील एक विभाग असाही होतो. 'लेखापद्धती' ग्रंथात एकूण ३२ करण म्हणजे खाती सांगितलेली आहेत. उदा. श्रीकरण, व्ययकरण, टंकशालाकरण इत्यादी. खातेप्रमुखाला करणाध्यक्ष असे म्हणत. **नागदेव नायक** हा करणाध्यक्ष होता. तो कोणत्या करणाचा अध्यक्ष होता ते स्पष्ट सांगितले नाही. (ओ. ९–१०).

### दानाचा तपशील

भाळवणी येथील गवरेश्वर देवाच्या पूजेसाठी आणि जीर्णोद्धारासाठी सोवण नायक, चावण नायक आणि नागदेव नायक या तिघांनी दहा कप्पडिकोलु दंडाने (गजाने) मोजलेली २०० कम्म जमीन, आणि त्यासाठी २ पाय दिले. (ओ. १२) 'कप्पडिकोलु' हा जमीन मोजण्याचा मापदंड किंवा गज होय. 'कम्म' हे जमिनीचे माप होय. १०० कम्म मिळून एक मत्तर (किंवा निवर्तन) होते. दान दिलेली जमीन, सिवनिगे गावाला जाणाऱ्या रस्त्याच्या पूर्वेकडे, सीळवेदेवी मंदिराच्या आणि ब्रह्मपुरीतील सोमनाथदेवाच्या उद्यानाच्या ईशान्येकडे होती. ब्रह्मपुरी हा शब्द येथे ब्राह्मणांची वस्ती या अर्थाने वापरलेला आहे. सीळवेदेवी आणि सोमनाथदेव यांची मंदिरे भाळवणी गावातीलच असावी. या जमिनीशिवाय गवरेश्वर देवालयातील दिव्यांच्यासाठी तेल काढण्याला एक तेलघाणी आणि देवालयातील देवदासींना राहाण्यासाठी एक घर दान दिले होते. (ओळ १२–१४).

*(ब) विभाग*

### रायमुरारी सोयिदेव

या शिलालेखाचा दुसरा भाग (ब) ओळ १४ ते १८ पर्यंत असून त्यात गवरेश्वर देवाला मिळालेले दुसरे दान 'कळचुर्यचक्रवर्ति **रायमुरारी सोयिदेव**' याच्या कारकीर्दीत महामंडलेश्वर **सिद्धय्या** याच्या रेचरस या श्रीकरणाचा मुख्य प्रतिनिधी **कलिदेवय्या** याने दिल्याचे नमूद केलेले आहे.

**सोयिदेव** हा बिज्जणाचा वडील पुत्र त्याच्यानंतर गादीवर बसला. या दानाच्या कालोल्लेखाची चर्चा पूर्वी केलेलीच आहे. विशेष लक्ष वेधण्यासारखी बाब अशी की, विकृत संवत्सरातील शकवर्ष १०९२ (इ. स. ११७०) हे सोयिदेवाचे चौथे राज्यवर्ष

म्हणून उल्लेखिलेले आहे. अर्थात, शके १०८९ (इ. स. ११६७) हे त्याचे पहिले राज्यवर्ष होय. याच वर्षी राज्यत्याग करून बिज्जणाने राज्यकारभार सोयिदेवाच्या स्वाधीन केल्याचा उल्लेख पूर्वी केलेलाच आहे. बिज्जणाने धारण केलेले 'कळचुर्यचक्रवर्ति' हे बिरुद सोयिदेवानेही धारण केले होते. 'रायमुरारि' हे त्याचे विशेष बिरुद होते व त्यानेच तो सामान्यतः ओळखला जातो. त्याचे मूळ नाव 'सोमेश्वर' असे होते. पण 'सोयिदेव' किंवा 'सौविदेव' हे त्याचे दुसरे नावच विशेष रूढ झालेले आहे. त्याने शके १०८९ ते १०९९ (इ. स. ११६७ ते ११७७) पर्यंत एकूण दहा वर्षे राज्य केले. त्याच्या पत्नीचे नाव सावळदेवी. नृत्यगायनात प्रवीण असलेली ही सम्राज्ञी दरबारात देखील नृत्यगायन करीत असे.[१]

महामंडलेश्वर सिद्धय्या हा सोयिदेवाचा मांडलिक होता. मंत्रिचूडामणि आणि रायसाधार (राजाचा आधारस्तंभ) या त्याच्या विशेषणांवरून तो उत्तम राजकारणी आणि सोयिदेवाच्या विश्वासाला विशेष पात्र असा पराक्रमी पुरुष असला पाहिजे. त्याचे राज्य कोणत्या भागात होते हे निश्चित सांगता येत नाही. रेवरस दंडनायक हा सिद्धय्याचा श्रीकरण (लेखनाधिकारी) होता. त्याच्या मुख्य प्रतिनिधीचे किंवा अधिकाऱ्याचे (हेग्गडे) नाव कलिदेव नायक. याला कोणतीही विशेषणे लावलेली नाहीत. त्यावरून तो एक सामान्य अधिकारी असावा असे दिसते. प्रस्तुत शिलालेखाच्या या दुसऱ्या भागातील दान त्याने दिलेले आहे.

या दानाचा तपशील असा : शिलालेखाच्या पहिल्या भागात जी जमीन दान दिल्याचा निर्देश आहे तिच्या शेजारीच १०० कम्म आणि १ हाय जमीन, आणि (भाळवणी येथील) एका मल्ल नामक नाविदाच्या (न्हाव्याच्या) बगीचाच्या पूर्वेकडील फुलांचे १० बगीचे. १ मत्तर किंवा निवर्तन याचा एक शंभरावा भाग म्हणजे १ कम्म. हाय हा कम्माचा पोट भाग होय.

## *(क) विभाग*

**पंचशत अध्यावोळेय–स्वामी–श्रेणी**

शिलालेखाच्या तिसऱ्या भागात (ओळ १८ ते ३३) गवरेश्वर देवाला निरनिराळ्या श्रेणींनी (व्यापारी संस्थांनी) दिलेल्या दानांचा उल्लेख आहे. निरनिराळ्या वस्तूंच्या खरेदीविक्रीचे नियमन करण्यासाठी त्यावेळी अनेक

१ दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन (संपा. यझदानी) पृ. ४६५.

व्यापारी संस्था ऊर्फ श्रेणी अस्तित्वात होत्या. त्यांतील सर्वांत महत्त्वाची आणि प्रमुख श्रेणी म्हणजे अय्यावोळे शहरातील पाचशे स्वामी ही होय. तिचे वर्णन ओ. १८ ते २० मध्ये आलेले आहे. अय्यावोळे शहर म्हणजे आजचे ऐहोळे (ता. हुनगुंड, जिल्हा विजापूर, कर्नाटक राज्य) हे गाव. त्यावेळी चालुक्यांच्या राज्यातील ते एक महत्त्वाचे व्यापारी केंद्र होते. तेथील व्यापारी श्रेणी ही केंद्रीय श्रेणी असावी असे दिसते. पाचशे स्वामी हे तिचे प्रमुख अधिकारी सभासद होते. अय्यावोळेपुर येथील पाचशे स्वामींच्या या केंद्रीय श्रेणीचा उल्लेख त्या काळच्या अनेक शिलालेखांत आढळतो. शिमोगा जिल्ह्यातील शिकारपूर[1] तालुक्यात सापडलेल्या इ. स. १०५४ च्या एका शिलालेखात यांची विस्तृत प्रशस्ती आलेली आहे. कोल्हापूर[2] येथे उपलब्ध झालेला शके १०५८ (इ. स. ११३५) चा एक, आणि मिरज[3] येथे सापडलेला शके १०६६ (इ. स. ११४२) चा एक, या दोन्ही शिलालेखांतही या श्रेणीची थोडीफार हकीकत आलेली आहे. त्यावरून असे दिसते की, या श्रेणीतील प्रमुखात पाचशे व्यक्तींचा सामावेश होत असे. त्यांना स्वामी असे म्हणत. पाचशे ही संख्या अनेक शिलालेखांत सारखीच निर्देशिलेली आहे. या श्रेणीने निरनिराळ्या गावांत तेथील खरेदीविक्रीवर कर बसवून दाने दिलेली आढळतात. त्यावरून ही केंद्रीय श्रेणी असून तिच्या पाचशे स्वामींमध्ये अनेक गावांतील प्रतिनिधींचा समावेश होत असावा असे अनुमान करण्यास हरकत नाही. त्यांच्या ध्वजावर टेकडीची आकृती असे. (गुड्ड ध्वज). वासुदेव, खंडाली आणि मूलभद्र यांच्या वंशातील आपण आहोत असे ते मानीत. (वासुदेव–खंडाली–मूलभद्रवंशोद्‌भवरु). यादव नृपती कन्हर याच्या शके ११७२ च्या ममदापूर[4] शिलालेखात 'बलदेव' हे यांचे वंशनाम अधिक असून ते सर्वांच्या आधी आलेले आहे. त्यांची उत्पत्ती 'अघपट्टिगुरु' पासून झाल्याचाही निर्देश त्यात अधिक आढळतो. (अघपट्टिगुरूत्पत्तिबलदेववासुदेव-खंडालीमूलभद्रवंशोद्‌भवरु). अत्यंत साहसी, भाग्यवान, पराक्रमी, शूर, धीट, ज्ञानी, कलावंत, न्यायप्रिय, सदाचरणी इत्यादी विशेषणांतून त्यांच्या अनेक गुणांचे वर्णन आलंकारिक शब्दांत केलेले आढळते. भारतातच नव्हे तर

---

१ एपिग्राफिया कर्नाटिका ( VII, SK. 118 ).

२ एपिग्राफिया इंडिका. वर्ष १९, पृ. ३०––३५.

३ तत्रैव. वर्ष १९, पृ. ३५––४१.

४ तत्रैव. वर्ष १९, पृ. १९––३०.

भारताबाहेरही ते व्यापार करीत. सुमात्रा देशात तामिल-नाडूमधील एका व्यापारी श्रेणीचा उल्लेख आढळतो. हत्ती, घोडे, मोती, पाच, माणिक इत्यादी रत्ने, चंदनादी सुगंधी द्रव्ये, मसाल्याचे पदार्थ वगैरेचा व्यापार ते देशात व परदेशात सवत्र करीत. आपल्या व्यापारावर राजाने ठरवलेला 'शुंक' नावाचा कर त्यांना भरावा लागे. त्यातून राज्याला मिळकतही चांगली होई. इतर देशांतील मूल्यवान वस्तू व शस्त्रेही ते राजाला आणून देत असत. साधुसंत, विद्वान पंडित, देवदेवालये इत्यादींना ते देणग्या व दानेही देत असत. यावरून यांच्या कार्याचे महत्त्व व व्याप्ती चांगली कळते.

'वीर बळंज धर्माचे' प्रतिपाळण करणे हेच त्यांचे मुख्य कार्य होते. 'बळंज' हा शब्द 'वणंज' असाही अनेक शिलालेखांत आढळतो. संस्कृत 'वणिज' या शब्दापासून 'वणंज' (बणंज) हा शब्द आला असून 'बळंज' हे त्याचेच दुसरे रूप होय. तेव्हा बळंज धर्म म्हणजे वणिजांचा, व्यापाऱ्यांचा धर्म; त्यांची व्यापारविषयक नीतितत्वे. वीर हा शब्द श्रेष्ठ किंवा नैष्ठिक अर्थाने वापरला जातो. उदा. वीरशैव, वीरवैष्णव, वीरमहेश्वर इत्यादी. त्याचप्रमाणे 'वीर बळंज धर्म' म्हणजे श्रेष्ठ किंवा नैष्ठिक असा वाणिज्य धर्म; किंवा वाणिज्य व्यवहारामध्ये वीर=श्रेष्ठ, निष्ठावंत असलेल्यांनी (वीरांनी) घालून दिलेला धर्म. याचा स्पष्ट उल्लेख यांच्या प्रशस्तींच्या आरंभी 'वीर शासन' या शब्दांतही आढळतो. सर्व भुवनात सुप्रसिद्ध असलेल्या पाचशे 'श्रेष्ठांनी (नैष्ठिक व्यापाऱ्यांनी) घालून दिलेले शासन (व्यापारविषयक धर्माज्ञा)' किंवा 'श्रेष्ठांनी (नैष्ठिक व्यापाऱ्यांनी) घालून दिलेल्या पाचशे धर्माज्ञा' असाही 'पंचशतवीरशासन' या शब्दांचा अर्थ होऊ शकेल.[१] या धर्माज्ञा-पासून प्राप्त झालेल्या अनेक गुणांनी या श्रेणीतील स्वामी अलंकृत होते; अर्थात, त्या धर्माज्ञांत सांगितलेले अनेक गुण त्यांच्यात होते.

---

१ 'सर्व पृथ्वीत प्रसिद्ध असलेल्या पाचशे माणसांच्या (वीरांच्या) शासनाने जे अनेक गुणांनी अलंकृत झाले होते' असा बार्नेटने केलेला अर्थ बरोबर नाही. कारण त्यामुळे असे सूचित होते की पाचशे वीरांनी काढलेल्या आज्ञापत्रामुळेच हे गुण त्यांना प्राप्त झाले होते, त्यांच्या स्वतःच्या गुणसंपन्नतेमुळे नव्हे. 'गुण' असे आज्ञेने चिकटवता येत नाहीत. माणसांनी ते आपल्या ठिकाणी विकसित केले पाहिजेत. 'गुण' हा शब्द उपाधी किंवा पदवी या अर्थाने योजलेला नाही हे लक्षात ठेवावे. (पहा. एपि. इंडिका, वर्ष १९, पृ. ३४ व ३९).

दाने देणाऱ्या श्रेणींमध्ये अय्यावोळ येथील ५०० स्वामींच्या केंद्रीय श्रेणी-व्यतिरिक्त पुढील अन्य श्रेणींचा उल्लेख आहे. गवरें, गात्रिग, सेट्टी, सेट्टिगुत्तरु, बीर, बीरवणिग, गौंड, गाऊंड स्वामी, ३६ शहरांतील सेट्टी, भाळवणी येथील मुम्मुरिदंड, उभयनानादेशि व्यापारी, इत्यादी (ओळ २१–२३) 'गवरें' हा शब्द मुळात गवरिग असा आहे. त्याचा अर्थ टोपल्या, चटया वगैरे विणणारा बुरुड. 'गात्रिग' म्हणजे गाड्यावर मालांची वाहतूक करणारे व्यापारी. मंगोली शिलालेखातील[1] उल्लेखावरून 'गात्रिग' ही विड्याच्या पानांचा व्यापार करणारी श्रेणी असावी असे दिसते. 'सेट्टी' (सं. श्रेष्ठिन्) म्हणजे प्रमुख व्यापारी. 'सेट्टिगुत्त' म्हणजे व्यापारी. गुत्त=करारनामा किंवा ठोक व्यापार. यावरून 'सेट्टिगुत्त' म्हणजे कर्जरोखे वगैरे करून घेऊन सावकारी करणारे, किंवा ठोक व्यापारी, असा याचा अर्थ असावासे वाटते. 'बीर' (सं. वीर) म्हणजे शिपाई. देशदेशांतरात व्यापार करण्यासाठी व्यापाऱ्यांचे तांडे जात तेव्हा त्यांच्या संरक्षणासाठी शिपाई असत. त्यांना बीर=वीर म्हणत. या वीरांपैकी काहीजण व्यापारही करीत. त्यांना 'बीर वणिग' म्हणून संबोधले आहे. 'गौंड' म्हणजे खेड्याचा प्रमुख. गौड, गौंड, गावुड, गावुंड हे एकाच शब्दाचे पर्याय आहेत. संस्कृतमधील 'ग्रामकूट' शब्दाच्या अर्थाने ते वापरले जातात. गौंड हा शब्द या ठिकाणी गौडाच्या श्रेणीतील प्रत्येक सामान्य सभासद (खेडेप्रमुख) या अर्थाने योजला असावा. उलट 'गाउंडस्वामी' म्हणजे खेडेप्रमुखांच्या श्रेणीतील (त्यांच्या कार्यकारिणी-तील) प्रमुख सभासद, या अर्थाने या शब्दाचा वापर केला असावा असे वाटते. वर निर्देशिलेल्या सर्वांच्या स्वतंत्र श्रेणी त्यावेळी अस्तित्वात होत्या. याशिवाय ३६ गावांतील सेट्टींची एक श्रेणी होती. ही ३६ गावे कोणती हे निर्देशिलेले नाही. 'मुम्मुरिदंड' हेही अशाच एका व्यापारी श्रेणीचे नाव होते. अय्या-वोळेच्या ५०० स्वामींच्या केंद्रीय श्रेणीतून आपली निर्मिती झाली असे ते म्हणतात. त्यांचे प्रमुख केंद्र आरंभी द्वारावतीपुर (सध्याचे हलेबीड, कर्नाटक राज्य), आणि नंतर कुरुगोडू (जिल्हा बेल्लरी, कर्नाटक राज्य) येथे होते. शिलालेखात आढळणारी यांची प्रशस्ती अय्यावोळे येथील वीरवळंजु–प्रशस्तीसारखीच आहे. एका कन्नड शिलालेखामध्ये[2] मुम्मुरिदंडाची स्तुती पुढील शब्दांत केलेली आढळते. 'ते शूरांमध्ये शूर, शरणागतांचे संरक्षक, दुष्टांशी अत्यंत

---

१ एपि. इंडिका. वर्ष ५, पृ. २३.

२ साउथ इंडियन इन्स्क्रिप्शन्स. IX (i) नं. २९७.

क्रूर, सज्जनांशी सज्जन आणि बलाढ्य शत्रूंनाही जिंकणारे आहेत.' या वर्णनावरून वीर वणिगाप्रमाणेच मुम्मुरिदंड हीसुद्धा व्यापारी सैनिकांची श्रेणी असावी असे दिसते. भाळवणी येथील मुम्मुरिदंडाचा स्वतंत्र उल्लेख आपल्या शिलालेखात असल्यामुळे ती त्यांची स्थानिक श्रेणी असावी. 'उभयनानादेशि' ही सुद्धा एक व्यापारी श्रेणी होय. 'देशि' 'नानादेशि' व 'उभयनानादेशि' अशा तीन श्रेणींचे स्वतंत्र उल्लेख आढळतात. 'देशि' ही स्थानिक व्यापाऱ्यांची श्रेणी होय. 'नानादेशि' ही बाहेरून येऊन स्थायिक झालेल्या व्यापाऱ्यांची श्रेणी. हिचे दोन विभाग असत. एक 'नानादेशि' आणि दुसरा 'चित्रमेळि' या दोहोंना मिळून अनेकदा 'उभयनानादेशि' हा शब्द वापरीत असत. या सर्व श्रेणींचा अंतर्भाव अय्यावोळेय ५०० स्वामींच्या केंद्रीय श्रेणीत होत असे.

वरील श्रेणींनी गवरेश्वर देवाला दिलेल्या दानांची कल्पना ओ. २४–२८ च्या भाषांतरावरून येईल. 'तोगरहासू' हे भाळवणीतील बाजारपेठेचे नाव असावे. 'तोणेकार' याचा शब्दशः अर्थ 'टाके घालणारा' म्हणजे शिंपी. 'मळव' शब्द मला किटेलच्या कोशात मिळाला नाही. 'ओझे' असा त्याचा अर्थ असावा. तोणेकारांनी रेड्याच्या पाठीवरून बाजारात आणलेल्या प्रत्येक ओझ्यावर १ कावे कर द्यायचा असे. कावे, पाय या शब्दांचेही अर्थ किटेलच्या बृहत्कोशात सुद्धा नाहीत. त्या काळी प्रचारात असलेली ही नाणी असावीत असे वाटते. 'जिम्मवे' शब्दही कोशात सापडत नाही.

उपरोक्त श्रेणींच्या बरोबर तेथील शिंप्यांनीही काही कर बसवून गवरेश्वर देवाला दाने दिली होती. 'तेल्लडी' ही शिंप्यांची विशिष्ट जमात असावी. 'पाय' हा शब्द या भागातील करांच्या नोंदीत अनेकदा आलेला आहे. त्यावरून ते एक नाणे असावे या कल्पनेला पुष्टी मिळते. कर चुकवल्यामुळे किंवा इतर कारणासाठी दंड भरावा लागला तर त्याचाही उपयोग गवरेश्वर देवाच्या पूजाअर्चेसाठीच करावा लागत असे. कर चुकवणाऱ्यांना वाराणशीत गोवध केल्याचे पातक लागणार. या शिक्षेपेक्षाही जबर शिक्षा म्हणजे त्याला व्यापारी श्रेणीतून काढून टाकण्याची होय. यावरून व्यापारी श्रेणीचे महत्त्व चांगले लक्षात येते. 'पटेयकार' म्हणजे विणकरांनी दरवर्षी १ धरण श्रेणीत जमा करायचे असे. त्याचाही उपयोग अर्थात गवरेश्वर देवाच्या सेवेकडेच व्हायचा असे. 'धरण' हे त्यावेळी प्रचारात असलेले रुप्याचे नाणे होते. त्याचे वजन २४ रती असून त्याचे मूल्य अर्ध्या गद्याणाइतके होते. काहींच्या मते धरण हे ३२० रती वजनाचे सोन्याचे नाणे होते.

## वाचन

१. नमस्तुंगशिरश्चुंबिचंद्रचामरचारुवे [।*] त्रय्ळोक्यनगरारंभमू–
२. लस्तंभाय शंभवे ।। स्वस्ति श्रीमतु चाळुक्यचक्रवर्ति त्रैळोक्यमल्लदेव–
३. वर्षद ८ नेय धातुसंवत्सरद मार्ग्गसिर सुध १ ब्रिहवार [दं]–
४. दु [।।*] स्वस्ति समधिगतपंचमहा[श*]ब्दमहामंडळेश्वरं काळांजरपुर-
वराधीश्वरं सुवर्न्नव्रि–
५. शभध्वजं । डमरुगतूर्य्यनिर्घोशणं कळचुर्य्यकुळकमळमार्तण्डं कदनप्रचं–
६. डं नामादिसमस्तप्रसस्तिसहितं श्रीमन्महाण्डळेश्वरं बिज्जणदेवरसर तत्पादप–
७. द्मोपजीविथप्प श्रीमतु कुमारनारायण मैळुगिदेवरुसराळ्केय करह–
८. डनाल्कु सासिरदबळिय येळुं हंनेरंडरोळगण श्रीमतुराजधानिभाळवणिगेय[लु]
९. गवरेश्वरदेवरिगे गंधधूपदीपनिवेद्यखंडस्फुटिक[त]जीर्ण्णोधारक्कं नडसलु
श्रीमन्महाप्र–
१०. धानं पोथेग्राहकं [सो]वणनायकं । करणं चावणनायकं । करणाध्यक्षं नाग-
देवनाय–
११. करुं याचंद्रार्क्कतारंबरं सलुवंतागि [कोट्टरु।] सि[वनि]गेय बट्टेइं मूडलु [सी]ळबे
१२. देविइन्दं ईशान्यदलु । हत्तुकप्पडिकोलोळु कम्म २०० दवकं पाया २ ब्रह्मपुरिय
सो–
१३. मनाथदेवर तोंटदिं मूडणस्थळद । हूदोंट १ देवर सोडरेण्णेगे गाणदमने १ [भो]–
१४. दपात्रदमने १ [।।*] स्वस्ति श्रीमतुकळचुर्य्यचक्रवर्त्ति रायमुरारि सोयिदेव
वर्श–
१५. ४ नेय विक्रितसंवत्सरद जेष्ट शुध ८ सोमवार व्यतिपातनिमित्त वागि श्री–
१६. मन्महामंडळेश्वरं मंत्रिचूडामणि रायसाधारं सिध्धयन श्रीकरणं रे–
१७. वरस दंडनायकर हेग्गडे कलिदेवय्यनायकरु कोट्टआस्थळदहोरेयलु कम्म
१८. १०० हाय १ नाविदसल्लन तोंटदिं मूडण हूदोंट १० [।।*] स्वस्ति समस्त-
भुवन–
१९. विक्षा(ख्या)तपंचशतवीरसाशनलब्धानेकगुणगणाळंक्रित सत्यसौचा[चार*]-
चारुचारित्र–
२०. नयविनयविज्ञानवीरबळंजधर्म्मप्रतिपाळनरप्प श्रीमतु अय्यावोळेय अ–
२१. ऱणूर्व्वस्वामिगळुं गवरेंगात्रिगरुं सेट्टियरुं सेट्टिगुत्तरुं बीररुं बीरवणि–
२२. गरुं । गौंडुगळुं गाउंडस्वामिगळुं मूवत्तारुं बीडिनसेट्टियरुं भाळवणि–
२३. गेय स्थळद मुंम्मुरिदंडमुं । उभयनानादेशिप्रमुखवागि देवरभोगक्के

२४. कोणनलु हेरिबंदतोगरहासोळगागि समस्तभंडक्कं तोणेकाररु बिट्टमळ–
२५. व १ दक्कं कवे १ [ओलेयमेळसिन] मळवेगे पाय २ कत्तेयहेरिगे पाय १ संथे–
२६. यलु हसरक्के अडके २ पत्तिय हेरिगे हिडिहत्ति जोरगे मैळसुयँ संबरंगळं
२७. मूरुं बेरदलु जिम्मवियं कोंबरु अरिसिनद पसारक्के कोंबु ४ चिंपिगरु
२८. नेरडु ऐनूर्व्वर कोट्टधर्म्मक्के तेल्लडि चिंपिगरु कोट्टधडंबे बडेकु सुबेय
२९. होमतुरटिहट्टेयणिले इबंडइं सक्कं होंगे कोट्टलि । पाय १ कोंडलि पाय १
३०. बलजिगरलि हसुंबेय निक्कुवलि पाग १ दंण्ड दोस हुट्टिदडं देवरिगे
३१. कुडुवुदु कुडदे कळदु कोण्ड बलजिग वणरसियलु कवुलेयं कों–
३२. ददोसदलु होहरु इद इट्टुं टां हलरहपधाविसि हडद जोति गुरुवु
३३. पटेयकाररुं नाडिगे तेल्लडि गवरेस्वरदेवरिगे कोट्टवु वरिसक्के धरण १

भाषांतर

आपल्या उंच मस्तकाचे चुंबन घेणाऱ्या चंद्ररूपी शुभ्र चवरीने सुंदर दिसणारा त्रैलोक्यरूपी नगराचा जो पहिला खांब होय अशा शंकराला नमस्कार असो. (ओ. १–२) स्वस्ति. श्रीमत् चालुक्यचक्रवर्ती **त्रैलोक्यमल्लदेवाच्या** ८ व्या राज्यवर्षी, धातृ संवत्सर मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा गुरुवार रोजी (ओ. २–३). स्वस्ति. ज्याने पंचमहाशब्दाचा मान मिळविलेला आहे असा, महामंडलेश्वर, श्रेष्ठ अशा काळांजर नगराचा स्वामी, सुवर्णवृषभध्वज (ज्याच्या ध्वजावर वृषभाचे चिन्ह सोन्याने काढलेले आहे असा), डमरुग आणि तूर्य या वाद्यांनी ज्याच्या नावाची घोषणा केली जाते असा, कळचूर्यवंशरूपी कमळाला प्रफुल्लित करणारा सूर्य, कदनप्रचंड (युद्धप्रसंगी अत्यंत भीषण असलेला), इत्यादी प्रशस्ती (बिरुदे) धारण करणारा श्रीमान महामंडलेश्वर **बिज्जणदेव** (ओ. ४–७). त्याच्या चरणकमळाच्या आश्रयाने राहणारा (त्याचा आश्रित) श्रीमान कुमारनारायण (असे बिरुद धारण करणारा) मैळुगिदेव हा, ज्यात सात आणि बारा पोटभाग अंतर्भूत झाले आहेत अशा कऱ्हाड–४००० विभागावर राज्य करीत असताना, महाप्रधान व पोथेग्राहक (लेखाधिकारी) **सोवणनायक**, आणि करण **चावणनायक**, यांनी भाळवणी येथील गवरेश्वर देवाला गंध, धूप, दीप, निवेद्य आदींनी त्याची पूजाअर्चा करण्यासाठी आणि गवरेश्वर देवालयाच्या जीर्णोद्धारासाठी पुढील जागा आचंद्रार्कतारांबरं (जोपर्यंत चंद्र, सूर्य, तारे आणि आकाश विद्यमान आहेत तोपर्यंत) दान म्हणून दिली आहे. ही जागा सिवनिगेकडे जाणाऱ्या रस्त्याच्या पूर्वेकडे, सीळबे देवीच्या (देवळाच्या) ईशान्येकडे असून तिचा विस्तार २०० कम्म, १० कप्पडिकोळ आणि दोन पाय आहे. (या जागेशिवाय) ब्रम्हपुरी येथील सोमनाथदेवाचा

(देवालयातील) फुलांचा बगीचा, गवरेंश्वर देवाच्या दिव्यासाठी एक तेलघाणी आणि देवदासींना राहण्यासाठी एक घर ही दाने त्यांनी दिली आहेत. (ओ.७-१४)

स्वस्ति. श्रीमान कळचूर्यचक्रवर्ती रायमुरारी **सोयिदेव** याच्या ४ थ्या राज्यवर्षी विक्रित संवत्सरातील ज्येष्ठ शुद्ध ८ सोमवारी व्यतिपात (योग) असल्यामुळे (त्या मुहूर्तावर), श्रीमन्महामंडलेश्वर मंत्रिचूडामणी, रायसाधार **सिध्धय्याचा** श्रीकरण असलेल्या **रेवरस दंडनायकाचा** हेग्गडे (मुख्य प्रतिनिधी) **कलिदेवय्य-नायक** याने वरील जागेच्या जवळची १०० कम्म आणि १ हाय जमीन आणि नाविदमल्लाच्या उद्यानाच्या पूर्वेकडील फुलांचे १० बगीचे दान दिले. (१४-१८).

स्वस्ति. समस्त भुवनात प्रसिद्ध असलेल्या पाचशे श्रेष्ठींनी घालून दिलेल्या धर्माज्ञांतील गुणसमूहाने अलंकृत, उत्तम चरित्य, नय, विनय आणि विज्ञान (बुद्धिमत्ता) यांनी युक्त, वीरवळंज धर्माच्या प्रतिपालनात शुद्ध, असे अय्यावोळे नगरातील ५०० स्वामी, तसेच गवरें, गात्रिग, सेट्टी, सेट्टीगुत्त, बीर, बीरवणिग, गौंडु, गाउंडस्वामी, ३६ शहरांतील सेट्टी या सर्वांच्या श्रेणी (व्यापारी संस्था), तसेच भाळवणी येथील मुम्मुरिदंड आणि त्यांचे उभयनानादेशीप्रमुख यांनी (गवरेंश्वर) देवाच्या सेवेसाठी पुढीलप्रमाणे कर दिले आहेत. (ओ. १८–२४) तोगरहासूमध्ये रेड्यांच्या पाठीवरून नेलेल्या मालाच्या सर्व ओझ्यासाठी तोणेकार यांनी प्रत्येक मळवाला १ कावे, मिऱ्यांच्या वेलीच्या एका मळवेसाठी २ पाय; गाढवाच्या पाठीवरील प्रत्येक ओझ्यावर १ पाय, बाजारपेठेतील प्रत्येक हसरावर (दुकानावर) २ अडके (सुपाऱ्या), कापसाच्या प्रत्येक गसडीतून बचकभर कापूस, पांढरे जिरे, मिरी इत्यादीसारख्या मसाल्याच्या पाच पदार्थातून तिघांच्या मिश्रणावर एक जिम्मवे (गोळा करावा); हळकुंडाच्या एका ढिगातून ४ हळकुंडे द्यावी. (ओ. २४–२७)

वरील ५०० स्वामींनी दिलेल्या दानांत, जमलेल्या शिप्यांनी पुढील देणग्यांची भर घातली. तेल्लडी शिप्यांनी (काहीएक प्रकारच्या) मालावरील उत्पन्न दान दिले. ते असे : १ होन किंमतीच्या मालाच्या विक्रीवर आणि खरेदीवर प्रत्येक वेळी १ पाय, बलजिग (व्यापारी) यांनी विक्रीसाठी ठेवलेल्या मालाच्या प्रत्येक पोत्यावर १ पाय. (ओ. २८–२९). द्यावा लागणारा कोणताही दंड हाही देवालाच द्यावा. जो बलजिग (व्यापारी) वरील प्रमाणे ठरवलेला कर (देवाला) देणार नाही त्याला वाराणशी (काशी) मध्ये गोवध केल्याचे पातक लागेल. (आणि त्याला आपल्या श्रेणीतून, व्यापारी संस्थेतून) काढून टाकण्यात येईल. पटेयकार (विणकर) तेल्लडि गवरेंश्वरदेवाला (देवाच्या सेवेसाठी) श्रेणीला दरवर्षी १ धरण दिले. (ओ. २९–३३)

## [२] शिलालेख दुसरा

भाळवणी येथील या दुसऱ्या कानडी कोरीव लेखाची रुंदी ४५ सें. मी. आणि उंची ४६ सें. मी. आहे. या शिळेचे दोन तुकडे झालेले आहेत. वरचा लहान तुकडा १० सें. मी. उंचीचा असून त्यात शिलालेखाच्या आरंभीच्या ४ ओळी आहेत. खालचा मोठा तुकडाही अनेक ठिकाणी फुटलेला आहे. त्यामुळे १० ते २१ ओळींतील पुष्कळ अक्षरे गेली आहेत. पहिल्या तुकड्यात उजवीकडे एक आकृती कोरली आहे. तसेच दुसऱ्या तुकड्यात खाली दोन्ही बाजूंना अक्षरांवरील वेलांट्याच्या द्वारे दोन आकृती कोरल्या आहेत. इतर अनेक ठिकाणी अक्षरे सुंदर कोरलेली आढळतात. उपलब्ध शिळांवर एकूण ४० ओळी आहेत. अर्थात, लेख अपूर्ण आहे. शेवटच्या नष्ट झालेल्या भागात दोनतीन ओळीशिवाय अधिक ओळी नसाव्या.

### विषय

प्रभु आणि पट्टण सेट्टि प्रमुख सर्व नगरे (व्यापारी श्रेण्या) तसेच राजधानी भाळवणी येथील वड्डव्यवहारी (व्यापारी श्रेणीचा प्रमुख) यांनी एका जैन बसतीला दिलेल्या दानांची नोंद करणे हा या शिलालेखाचा उद्देश होय.

### कालनिर्देश

ओ. १० व ११ मध्ये वर्ष १०९६, जय संवत्सर, ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमा, सोमवार, हा काल निर्देशिलेला असून संक्रांतीनिमित्त हे दान दिले असल्याचे म्हटले आहे. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे हा कालनिर्देश चुकीचा आहे. गत शक १०९६ ला जय संवत्सर येतो हे खरे, पण त्या वर्षीच्या ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमेला सोमवार नसून शनिवार आहे. तथापि, याच्या पूर्वीच्या वर्षी, म्हणजे गतशक १०९५ विजय संवत्सर, ज्येष्ठ शु. पौर्णिमेला मात्र बरोबर सोमवार येतो. त्या अगोदरच्या शनिवारी संक्रांत होती. त्या निमित्ताने पुढील दिवशी दान दिले असणे योग्य ठरते. तेव्हा शिलालेखात चालू शक निर्दिष्ट केला असावा, आणि 'विजय' संवत्सरातील **वि** हे अक्षर चुकीने गळले असावे असे वाटते. लेखकाला अभिप्रेत काल 'वर्ष १०९५ विजय संवत्सर ज्येष्ठ शु. पौर्णिमा सोमवार' असाच असावा. त्या दिवशी इंग्रजी तारीख, 'सोमवार, २८ मे ११७३' ही होती. त्याच्या दोन दिवस अगोदर म्हणजे २६ मे ११७३ शनिवार या दिवशी संक्रांत होती.

## आशय व चर्चा

आधी अरहंतांना नमस्कार करून 'नमस्तुंगशिरश्चुंबि–' या श्लोकाने शिलालेखाला सुरुवात केलेली आहे. (ओळ १–३). नंतर ओ. ४ ते १० मध्ये कलचुर्य नृपतींची अनेक बिरुदे दिली आहेत. ती निश्चित कोणत्या नृपतीची आहेत हे सांगता येत नाही. कारण, त्या नृपतीचे नाव स्पष्टपणे कोठेच आलेले नाही. १० व्या ओळीत शेवटी शेवटी आलेल्या **सो** या अक्षरावरून तेथे सोयिदेवाचे नाव असावे असे वाटते. कलचुर्य नृपती बिज्जण राज्यावर आल्यावर त्याने धारण केलेली सर्व बिरुदे यात आहेत. ओ. ११ व १२ मधील निर्दिष्ट काळी म्हणजे शके १०९६ (=इ. स. ११७४) किंवा शके १०९५ (=इ. स. ११७३) मध्ये बिज्जणाचा पुत्र सोयिदेव राज्य करीत होता. तेव्हा त्याचाच नामनिर्देश येथे असला पाहिजे, हे स्पष्ट होते. अर्थात, ही बिरुदे त्याची असावीत. बिज्जणाची सर्व बिरुदे सोयिदेवाने धारण केली होती असे यावरून दिसते. तथापि, त्याने धारण केलेले विशेष बिरुद 'रायमुरारी' ते मात्र यात कोठेही आढळत नाही. शिलालेखाच्या नष्ट झालेल्या या ओळीतील भागात ते असण्याची शक्यता आहे. ते काहीही असले तरी प्रस्तुत शिलालेख सोयिदेवाच्या कारकीर्दीतील आहे यात शंका नाही. सोयिदेवाची माहिती यापूर्वीच्या शिलालेखातील (ब) विभागात दिलेली आहे. तिची पुनरुक्ती करण्याचे कारण नाही.

ओ. १३ व १४ मध्ये दान देणाऱ्या व्यक्तींची नावे आली आहेत. त्यावरून असे दिसून येते की, राजधानी (भाळवणी) येथील नगर–संस्थेचे (व्यापारी श्रेणीचे) प्रमुख प्रभु, पट्टण सेट्टी आणि पाणुव नायक यांनी हे दान दिलेले आहे. 'नगर' म्हणजे व्यापाऱ्यांची सहकारी संस्था किंवा श्रेणी. 'नकर' 'नगरत्तार' इत्यादी शब्दही कन्नड शिलालेखांत त्याच अर्थाने वापरले जात. धर्मपुरी येथील संस्कृत शिलालेखातील[1] 'तस्मै प्रदत्तः नगरेण तोषाद्द्वायस्त्वयं देसिजनैश्च सार्द्धं:' (श्लो. २५) या चरणात व्यापाऱ्यांची श्रेणी याच अर्थाने नगर शब्द आलेला आहे. 'वड्ड–व्यवहारि' म्हणजे थोर, श्रेष्ठ किंवा प्रमुख व्यापारी. 'वड्ड' हा शब्द संस्कृत 'वृद्ध' शब्दापासून निघालेला आहे. त्या तिघांनी मिळून (भाळवणी येथील) 'बसती'ला म्हणजे जैन देवालयाला, तेथील देवतेची गंध, पुष्प, धूप, दीप, निवेद्य इत्यादिकांनी पूजाअर्चा करण्यासाठी, अर्थात याच्या खर्चासाठी उत्पन्नाचे साधन म्हणून काही जमीन दान दिली. जैनांच्या देवळाला 'बसती'

---

१ इतिहास आणि संस्कृती (संपा. फाटक-खोबरेकर) वर्ष ९, पु. ३३, पृ. २७. (मागे पृ. १४१ पाहा).

म्हणतात हे प्रसिद्धच आहे. किती जमीन दान दिली त्याचा स्पष्ट निर्देश नाही पण तिच्या काही सीमा मात्र दिलेल्या आहेत. त्या अशा : दक्षिणेकडे प्रभूंची 'वृत्ति' म्हणजे प्रभूंना आपल्या निर्वाहासाठी दान म्हणून मिळालेली जमीन. पूर्वेकडे (अक्षरे नष्ट झाली असल्यामुळे ही सीमा निश्चित सांगता येत नाही.) ही जमीन व देवळाला लागून असलेली (त्यावरील) घरे वरील दात्यांनी तेथील व्यवस्थापकांच्या (आयंगळुं) आणि स्थानपतीच्या म्हणजे देवळातील पुजाऱ्याच्या (अधिकाऱ्याच्या) स्वाधीन केली. (ओळ १५–१८).

ओ. १९ ते २९ पर्यंतच्या वाक्यांत निरनिराळी शापवचने आलेली आहेत. ३० ते ३३ ओळीत, अनेक विषेषणांनी युक्त अशा वर्धमानाला प्रणिपात आहे. ३४ ते ३६ या ओळीत, सामान्यतः बहुतेक जैन शासनांत आढळणारा 'श्रीमत्परमगंभीर'–इत्यादी श्लोक व त्यापुढील दोन ओळींत वर्धमानाचे आशीर्वचन मागितले आहे. शेवटच्या दोन ओळीत 'वड्डव्यवहारी' पाणुवनायकाचे नाव पुन्हा आले आहे.

## वाचन

१. नमो अरहंताणां ।। श्री नमस्तुंगसि(शि)–
२. रश्चुंविचंद्रचामर[चार*]वे (।*) त्रैळोक्य–
३. नगरारंभमूलस्तंभाय सं(शं)भवे ।।
४. स.......[पृथ्विवल्ल]भं महाराजाधिराजं
५. परमेस्व(श्व)रं । काळंजरपुरवराधीस्व(श्व)रं । सुंवर्णव्रिषभध्व–
६. जं डमरुगतूर्य्यनिर्घोशणं । कळचुर्य्यकुळक–
७. मळमार्त्तंडं । कदनप्रचंडं । मानकनकाचळं सुभटरा–
८. दित्यं कलिगळंकुसं(शं) । प्रतापलंकेस्व(श्व)रं । परनारीसहोदरं ।
९. चलदंकरामं वैरीभकंठीरवं । निसंकमल्लं कळचुर्य्य–
१०. निजभुजबळप्रतापचक्रवर्ति त्रिभुवनयसो.....घ....
११. ळंकवर्षं १०९६ जयसंवत्सरद जेष्ठ सु पौ[र्ण*]मेय [सो]–
१२. मवारदंदु संक्रांतिनिमित्तवागि श्रीमतु राजधानि [भाळवणि*] गे–
१३. य प्रभुपट्टण सेट्टि मुक्ष(ख्य)वागि समस्तनगरगळुंद....
१४. डुव्यवहारि । पाणुवनायकरु म......[ब]
१५. ...सदिगे धारापूर्वकवागि कोट्टभूमिज्जिनो....
१६. ...प्रमाण तेंकलु प्रभूगळवृत्ति मूडलु...वळगे पर्य्य–
१७. [तं] केरेगि गंधपुष्पधूपदीप[नि]वेद्यकंककोट्ट–

१८. यदेवर केयिमनेयं । आयंग[ळु] स्तानपतिगळुं. . . . . . . र ।
१९. आहिडिववरिगं श्रीमतु बल्लहदेवठाण्य । पट्ट . . . ण्य
२०. इडुव[व]रवित्तिछ्छेद । हिडवर होंनु
२१. नेरडु होंनं दंडमं कोंबरु ।। . . . . . स्वदत्तां [परद]त्तां
२२. वा यो हरेति वसुंधरा । सष्टिवर्षश(स)हस्रा(स्रा)णि मि(वि)ष्ठायां [जा]य–
२३. ते क्रिमि ।। सासनमिदाउ देल्लियसासनवारित्तरेके सलिसुत्रे नानी
२४. सासनमनेंबपातकनासकलं रौरवक्के गळगळनिळिगुं ।। कोट्टिपयंक
२५. विलेय । नेकोट्टितपोधनरं । वेदविदरं पंनिश्र्कोटियननेकविर्धादिं
२६. कोटिमहादिनदलळिर्दनिंतिदनळिदं ।। ई धर्म्मकार्यमनारानुं ]
२७. . . यलियदे. . . . वाळिसदरप्पडे वारणासि कुरुक्षेत्र. . . सासिरको–
२८. टिकविलेप्पुमं । सारिरकोट्टि[दि*]ब्य(व्य)तपोधनरुमं । स्वहस्तादिं
२९. कोंदपातकमक्कुं मंगळमहाश्री महा ।। ००००
३०. देवाधिदेव परमेस्व(श्व)रवीतराग सर्वज्ञ तीर्थंकरसि(शि)–
३१. ष्य महानुभाव (।*) त्रैलोक्यनाथ जिन–
३२. पुंगव वर्धमानां न(त)स्मि । गतोस्मि(स्मि) स(श)रणं
३३. चरणं प्रपद्ये ।। नमो वीतरागाय नमः ।। सर्वज्ञ ।।
३४. श्रीमतु(त्) परमगंभीरस्याद्वादामोघ–
३५. लांछनं । जीयात् त्रैळोक्यनाथस्य
३६. सा(शा)सनं जिनसा(शा)सनं ।। श्रीयंबनन्तविद्या
३७. श्रीयंश्रीयरडे साक्षहेतुगळर्हरिं श्री–
३८. युमनन्ता विद्या श्रीयुत नेमगीगे वर्द्धमान जिनेंद्र ।।
३९. श्रीपारीस्वनाथदेवरपादाराधकरु मप्पवड्डब्य(व्य)वहारि पा
४०. णू. . . . . . . . डायिनाय[क]

भाषांतर

अरहंतांना नमस्कार असो. आपल्या उंच मस्तकाचे चुंबन घेणाऱ्या चंद्ररूपी शुभ्र चवरीने सुंदर दिसणारा त्रैलोक्यरूपी नगराचा जो मूल स्तंभ (खांब) होय अशा शंकराला नमस्कार असो. (ओ. १–३) समस्तभुवनाश्रय, पृथ्वीवल्लभ, महाराजाधिराज, परमेश्वर, काळांजरपुरवराधीश्वर (सर्वश्रेष्ठ अशा काळांजर नगराचा अधिपती), सुवर्णवृषभध्वज (ज्याच्या ध्वजावर वृषभाचे चिन्ह सोन्याच्या रसाने चित्रित केले आहे), डमरुगतूर्यनिर्घोषण (डमरुग व तूर्य या वाद्यांनी, ही वाद्ये वाजवून, ज्याच्या नावाची घोषणा केली जाते), कळचूर्यकुळकमळमार्तंड

(कलचुरी राजवंशरूपी कमळाला प्रफुल्लित करणारा सूर्य), कदनप्रचंड (युद्ध-प्रसंगात अत्यंत भीषण वाटणारा), मानकनकाचळ (अभिमानाचा सुवर्णमेरू पर्वत), सुभटरादित्य (वीरांमध्ये सूर्य), कलिगळंकुश (कलिकालाच्या गळ्याला लागलेला पाश), प्रतापलंकेश्वर (पराक्रमाने रावण), परनारीसहोदर (परस्त्रीचा बंधू), चलदंकराम (चारित्र्यपालनामध्ये रामाप्रमाणे निग्रही), वैरीभकंठीरव (शत्रुरूपी हत्तींचा नाश करणारा सिंह), निःशंकमल्ल (निःशंक मनाने पराक्रम गाजवणारा मल्ल), कलचुर्य निजभुजवळ प्रतापचक्रवर्ती (आपल्या बाहूच्या सामर्थ्याने पराक्रमी असा कलचुर्य नृपती).........(ओ. ४–१०)....वर्ष (शके) १०९६, जय संवत्सराच्या ज्येष्ठ शु. पौर्णिमा, सोमवार रोजी आलेल्या संक्रांतीच्या मुहूर्तावर राजधानी भाळवणी येथील प्रभु आणि पट्टण सेट्टी प्रमुख सर्व नगरे (=व्यापारी श्रेण्या), तसेच वड्डव्यवहारी (व्यापारी श्रेणीचा प्रमुख) पाणुवनायक यांनी बसदीला (बसतीला, जैनांच्या विहाराला) गंध, पुष्प, धूप, दीप, निवेद्य, इत्यादिकांनी पूजाअर्चा करण्यासाठी, जमिनीचे दान धारापूर्वक (उदक सोडून) दिले. या जागेच्या चतुःसीमा पुढीलप्रमाणे: दक्षिणेला प्रभूंची वृत्ति (जमीनजुमला), पूर्वेला........ही जमीन व देवालयाच्या आवारातील घरे, तेथील व्यवस्थापक व स्थानपती यांच्या स्वाधीन केली. (ओ. ११–१८).

(यापुढील तीन ओळींचा अर्थ स्पष्ट लागत नाही. भावार्थ असा दिसतो की, जो कोणी या दानाला प्रत्यवाय निर्माण करील त्याला १२ सुवर्णमुद्रांचा दंड भरावा लागेल. –ओ. १९–२१) आपण स्वतः दिलेली अथवा इतरांनी दिलेली भूमी जो हरण करील तो साठ हजार वर्षेपर्यंत विष्ठेमध्ये किडा म्हणून जन्माला येईल. (ओ. २१–२३). हे शासन (दानपत्र) काय आहे? हे कुणी दिलेले आहे? मी त्याचे पालन काय म्हणून करावे? असे प्रश्न जो विचारील तो पापी एकदम रौरव नरकाच्या तळाशी जाईल (ओ. २३–२४). जो कोणी या (शिळेवरील) दानपत्राचा नाश करील त्याला एक कोटी दुभत्या गाई, सात कोटी ऋषी आणि बारा कोटी वैदिक पंडित यांचा एक कोटी पवित्र दिवसात नाना प्रकारांनी वध केल्याचे घोर पातक लागेल. या शासनाचा नाश न करता जो त्याचे संरक्षण करील त्याला वाराणसी व कुरुक्षेत्र या जागी पुण्यकर्म केल्याचे (पुण्य मिळेल). (उलट जो या शासनाचा नाश करील त्याला) एक हजार गाई आणि एक हजार पवित्र मुनी यांचा आपल्या हाताने वध केल्याचे पाप लागेल. (ओ. २५-२९) मंगल महाश्री––३० ते ३६ ओळीतील नमस्कार वचने स्पष्ट आहेत. यापुढील कानडी श्लोकाचे भाषांतर पुढीलप्रमाणे: कल्याण आणि ज्ञानाची अनन्त संपत्ती ह्या दोनच मानवाच्या अस्तित्वाच्या प्रमाण प्रेरणा आहेत. म्हणून, वर्धमान

जिनेन्द्र आम्हाला कल्याण आणि ज्ञानाची अनन्त संपत्ती प्राप्त करून देवो. (ओ. ३६–३८). श्रीमत् पार्श्वनाथाच्या चरणांचा भक्त बहुव्यवहारी....पा नायक. (३९–४०) (यानंतरचा शिलालेखांचा भाग खराब झाला आहे. त्यामुळे अक्षरे नष्ट झाली आहेत.)

● ● ●

# २२

## हरिश्चंद्र गडावरील शिलालेख

अहमदनगर (महाराष्ट्र राज्य) जिल्ह्यातील अकोला तालुक्याच्या पश्चिमेकडील सीमेवर हरिश्चंद्र नावाचा एक पर्वत आहे. हरिश्चंद्रगड या नावाने तो ओळखला जातो. समुद्रसपाटीपासून सुमारे साडेचार हजार फूट तो उंच असून कोकण प्रदेशाकडे तोंड करून असलेली वायव्य दिशेकडील त्याची एक बाजू उंचच उंच अशा तुटलेल्या ताशीव सरळ कड्यासारखी आहे. असे म्हणतात की, जगातील कोणत्याही पर्वताचा इतका उंच ताशीव कडा क्वचितच आढळेल. या कड्याचे आणि भोवतालच्या परिसराचे नैसर्गिक सौंदर्य अप्रतिम होय. गडाच्या घाटमाथ्यावर एक लहानसा किल्ला आहे. घाटमाथ्याहून सुमारे सहाशे फूट खाली काही लेणी आहेत. त्यांची संख्या ८ किंवा ९ असावी ही लेणी ओबडधोबड असून त्यात फारशी शिल्पेही नाहीत. काही लेण्यांच्या प्रवेशद्वारावर गणपतीची मूर्ती कोरलेली आहे. लेण्यांचा आतील भाग फारसा मोठा नाही. ओबडधोबड तासलेले मोठमोठे चौकोनी खांब, भितींना लागून असलेले ओटे व क्वचित आढळणारी लिंगे किंवा शाळुंका येवढेच त्यांचे वर्णन करता येईल. त्यावरून हे शैव उपासकांचे स्थान असावे हे स्पष्ट दिसते. या लेण्यांच्या ओळीखालील भागावर हेमाडपंथी स्वरूपाची एक बारव असून तिच्यातील दक्षिण भागाकडील भितीत लहान लहान देवळ्या आहेत. त्यांतील काही देवळ्यांत देवतांच्या मूर्ती अजूनही आहेत. बारवेच्या भोवती काही लहान देवळे व समाधी आहेत. बारवेच्या खालच्या भागावर काहीशा खोलगट भागात एक हेमाडपंथी देऊळ असून ते केदारेश्वर मंदिर म्हणून ओळखले जाते. या मंदिराचा काही भाग पर्वताच्या पाषाणातून कोरून काढला असून काही भाग दगडांनी बांधून काढला आहे. मंदिराला सभामंडप नाही. चारही बाजूंना चार दरवाजे असून आत शिवलिंगाची प्रतिष्ठापना केलेली आहे. देवळाच्या आग्नेय भागाला दगडात कोरून काढलेली देवतेची एक विशाल मूर्ती असून जवळच काही गुहा आहेत. बहुधा योग्यांच्या राहण्यासाठी त्या तयार केल्या असाव्यात. तेथून जवळच सुमारे दीडशे फूट

अंतरावर सुमारे ५५ चौरसफूट आकाराचे एक लेणे आहे. त्याच्या समोरच्या भागात चार मोठे खांब असून आत शाळुंका व लिंग आहे. या लेण्याचा आतील भाग खाली चार फूट खोल कोरलेला असून तो नेहमी पाण्याने भरलेला असतो. पूजेसाठी शिवलिंगापर्यंत पाण्यातूनच चालून जावे लागते. (गॅझेटिअर ऑफ दि बॉम्बे प्रेसिडेन्सी, व्हॉ. १७, अहमदनगर. पृ. ७१७ ते ७१९).

हरिश्चंद्र गडावरील या लेण्यांत किंवा गुहांत काही शिलालेख असल्याचा निर्देश डब्ल्यू. एफ. सिंक्लेर यांनी केला होता. 'नोट्स ऑन दि अहमदनगर कलेक्टोरेट' (इंडियन अँटिक्वेरी. वर्ष ५. इ. स. १८७७, पृ. ११) या आपल्या लेखात हरिश्चंद्र गडावरील लेण्यांचे वर्णन करताना ते लिहितात :—

"The pit is enclosed on the approachable side by a massive stone wall, out side of which and the pillars of the dharmashala and linga caves are two or three very rude and fragmentary inscriptions, apparently in rather modern Marathi characters; but I had not time to stamp or read them, nor could I get a copy taken. I fancy they are merely the work of visitors or idlers."

त्यानंतर या शिलालेखांचा धावता उल्लेख फर्ग्युसन आणि बर्जेस यांच्या 'दि केव्ह टेम्पल्स ऑफ इंडिया' या पुस्तकात आढळतो.

"But the style of the low doorways, and of the pillars in the second cave from the east end of the range the detached sculptures lying about and some fragments of inscriptions, all seem to point to about the tenth or eleventh century," (Book II P. 478).

या दोन व्यक्तींनंतर अनेक वर्षांनी (इ. स. १९६९ मध्ये) या शिलालेखांचा निर्देश श्री. गो. नी. दांडेकर यांनी केलेला आढळतो. 'दुर्गदर्शन' या त्यांच्या ग्रंथातील 'हरिश्चंद्र दुर्ग' या प्रवासवर्णनपर लेखात (पृ. १५६-१५७) त्यांनी हे शिलालेख पाहिल्याचा उल्लेख आहे. इतकेच नाही तर त्यांतील एका लेखाचा काही भाग वाचून ते वाचन तेथे नोंदविलेही आहे. तथापि, शिला-लेखांचे ठसे घेऊन ते सर्व वाचण्याचा कोणी प्रयत्न केलेला दिसत नाही. नागपूर विद्यापीठाच्या मराठी विभागातील तरुण संशोधक प्रा. म. रा. जोशी हे गेल्या वर्षी हरिश्चंद्रगडावर गेले होते, त्यांचे लक्ष या शिलालेखांकडे गेले. त्यांनी ही माहिती मला व महाराष्ट्र राज्याच्या पुरातत्त्व विभागाचे संचालक श्री. वि. गो. खोबरेकर यांना सांगितली. त्यांच्या सूचनेवरून पुरातत्त्व विभागाने आपली माणसे पाठवून त्या शिलालेखांचे ठसे आणविले आणि माझ्या विनंती

वरून त्यांनी ते मला उपलब्ध करून दिले. या सर्वांचा मी फार आभारी आहे. त्या ठशांच्या साह्यानेच प्रस्तुत लेख मी लिहीत आहे.

१

यांतील क्र. १ चा लेख हरिश्चन्द्रेश्वर मंदिराच्याभोवती असलेल्या प्राकाराच्या प्रवेशद्वारातून आत शिरण्यापूर्वी डाव्या हाताच्या भिंतीवर कोरलेला आहे. त्याची लांबी १६० सें. मी. (=५ फूट ४ इंच) आहे. अक्षरे खूप मोठी व ठसठशीत आहेत. प्रत्येक अक्षराची उंची सुमारे १० ते ११ सें.मी. असून रुंदी ७ ते ८ सें. मी. आहे. यावरून अक्षरांच्या ठळकपणाची कल्पना येऊ शकेल. अक्षरे देवनागरी लिपीत कोरलेली असून त्यांचे वळण उत्तर भारतीय अक्षरांच्या स्वरूपाचे आहे. त्यावरून साधारणपणे हा लेख तेराव्या शतकात कोरला गेला असावा असे वाटते. लेखाचे वाचन पुढीलप्रमाणे :

**चक्रपाणी वटेस्वर नंदनु[1] तस्य सुतु वीकटदेओ**

हरिश्चंद्रेश्वर मंदिराच्या प्रवेशद्वाराच्या दुसऱ्या बाजूवरही एक लेख असावा असे श्री. दांडेकर यांच्या नोंदीवरून वाटते. माझ्याकडे आलेल्या ठशातील तेथील लेख कोणता ते निश्चित सांगता येत नाही.

२

हा लेख केदारेश्वर लेण्याच्या दर्शनी स्तंभावर कोरलेला आहे. लेखाची लांबी जवळजवळ ५० सें.मी. आहे. अक्षरांचे वळण फार प्राचीन असल्यासारखे वाटते. लिपी ब्राम्ही असल्याचा भास होतो. पण ती ब्राम्ही लिपी नव्हे. देवनागरीचे प्राचीन स्वरूप तीत पाहावयास मिळते. खालची बाजू वर धरून

---

१ श्री. गो. नी. दांडेकर यांनी 'वटेश्वरः नन्दतु तस्य सुतः—' अशी ही अक्षरे वाचली आहेत. मुळात 'वटेश्वरः' असा शब्द नसून 'वटेस्वर' असा आहे. र च्या समोर विसर्ग नाही. दगड फुटल्यामुळे दोन पांढरे ठिपके दिसतात, पण तो विसर्ग नव्हे. 'श्व' ऐवजी 'स्व' हे अक्षर ठशात स्पष्ट आहे. 'नन्दतु' शब्द 'नंदनु' असा ठशात स्पष्ट दिसतो. यातील दुसऱ्या अक्षरात न् ला द जोडलेला नसून त्यापूर्वीच्या **न** वर अनुस्वार आहे. 'सुतः' असा शब्द नसून 'सुतु' हा शब्द ठशात स्पष्ट दिसतो.

लेख वाचला तर आरंभीची काही अक्षरे ब्राम्ही लिपीत असल्यासारखी वाटतात.! पण तसे वाचन करणे मुळातच चुकीचे होय. त्याच रीतीने वाचण्याचा प्रयत्न प्रथम मी केला. ही चूक म. म. डॉ. मिराशी यांनी माझ्या लक्षात आणून दिली. लेखाचे वाचनही त्यांनीच सुचवले. त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. या लेखाचे वाचन पुढीलप्रमाणे.—

**[सिद्धं] श्री गुहेश्वर भैरव**

आरंभीची अक्षरे अस्पष्ट आहेत. 'सिद्धं' (किंवा, सिद्ध) हा शब्द तेथे असावा असे वाटते. त्यानंतर 'श्री' हे अक्षर फार मोठे कोरले आहे. 'गुहेश्वर' या शब्दातील 'गु' हे अक्षर स्वच्छ वाचता येते. मधल्या भागी एक आडवी रेघ दिसते ती दगड फुटल्यामुळे दिसत असावी. पुढील अक्षर 'हे' आहे. ह वरील मात्रा ब्राम्ही लिपीतील मात्रेप्रमाणे डावीकडे आडवी रेघ कोरून दर्शविलेली आहे. तिला खाली एक उभी रेघ काढली आहे. जुन्या शिला-लेखात असे वळण क्वचितच आढळते 'भैरव' या शब्दातील भ चे लेखनही लक्षात घेण्यासारखे आहे.

३

केदारेश्वर लेण्याच्या दर्शनी स्तंभावरील दुसरा लेख दोन ओळींचा असून बराच मोठा आहे. पहिल्या ओळीची लांबी सुमारे ७० सें. मी. व दुसऱ्या ओळीची लांबी १७ सें.मी. आहे. अक्षरे ठसठशीत कोरली आहेत. प्रत्येक अक्षराची उंची सुमारे ९ ते १० सें.मी. आहे. लेख देवनागरी लिपीत कोरलेला आहे. अक्षरांचे घळण सुंदर आहे. अक्षरांचे उभे दंड खाली लांबवर कोरले असून टोकांना बाक दिलेले आहेत. इकाराच्या वेलांटीतील वरचा भागही सुंदर आहे. काही अक्षरांवरील शिरोरेषाही सरळ न ओढता नक्षीदार ओढल्या आहेत. लेखातील पहिल्या 'श्री' नंतर व पुढील पाच अक्षरांनंतर थोडी थोडी मोकळी जागा सुटलेली आढळते. कदाचित दरवाज्यावर कोरलेल्या (शिव) मूर्तीच्या पायाचा भाग पूर्वी तेथे असावा. आरंभीची **श्री** नक्षीदार कोरलेली आहे. त्यानंतर मोकळ्या असलेल्या जागी कोणती अक्षरे असावी हे निश्चित सांगता येणे कठीण आहे. त्या जागी फार तर दोन अक्षरे असू शकतील. पुढील अक्षरांचा संदर्भ लक्षात घेता ती 'वटे' असावीत अशी कल्पना केली आहे. लेखाचे संपूर्ण वाचन पुढीलप्रमाणे—

**श्री[वटे]सर सिवस्य प्रण**
**[म]तिः ।**

४

हरिश्चंद्रेश्वर मंदिराच्या मागील लेण्यातील दर्शनी स्तंभावर डाव्या बाजूला हा लेख आढळतो. त्यातील आरंभीचे एखादे तरी अक्षर गेलेले असावे. अर्थात, लेख अपूर्ण आहे. सध्या विद्यमान असलेल्या लेखाची लांबी ५६ सें. मी. आहे. अक्षरे बरीच मोठी असून ती नागरी लिपीत कोरलेली आहेत. सर्व अक्षरे सारखीच उंच नाहीत. काहींची उंची ८ सें. मी. तर काहींची जवळजवळ १३–१४ सें. मी. आहे. आरंभी असलेल्या पण आता नष्ट झालेल्या अक्षरातील शेवटच्या अक्षराचा फक्त काना दिसतो. त्यापुढील अक्षर **गा** होय. ते आजच्या **णा** सारखे दिसते. पुढील शब्द 'वटेस्वराचा' असा आहे. तो लक्षात घेऊन मागील शब्दाची कल्पना करण्याचा प्रयत्न केल्यास तेथे 'चक्रपाणी' किंवा 'चांगा' हे दोनच शब्द संभवतात. त्यातील शेवटचे अक्षर 'णी' किंवा 'गा' तेथे असले पाहिजे. एकतर ह्या अक्षराला क्र. १ मधील **ण** या अक्षराचे वळण नाही, म्हणून ते 'ण' असे वाचणे योग्य नाही. णा सारख्या दिसणाऱ्या अक्षरावर वेलांटीचे कोणतेच चिन्ह नाही. तेव्हा ते **णी** खास नव्हे. **णा** असे वाचल्यास त्याला अर्थ नाही. शिवाय **गा** च्या उजव्या बाजूला जी पोकळी असते ती तेथे निश्चित वाचता येते. म्हणून हे अक्षर मी **गा** असे वाचले आहे. अर्थात, त्यापूर्वीचे अक्षर 'चां' हे असले पाहिजे. सारांश, या लेखाचे वाचन

**[चां*]गा वटेस्वराचा**

असेच केले पाहिजे. हरिश्चंद्रेश्वर मंदिराच्या प्राकारावरील लेखात 'चक्रपाणी वटेस्वर' हे नाव आले आहे आणि येथे 'चांगा वटेस्वर' हे नाव आले आहे हे लक्षात घेण्यासारखे आहे.

५

हरिश्चंद्रेश्वर मंदिराच्या मागील लेण्यातील दर्शनी स्तंभावर समोरच्या बाजूला आढळणारा हा लेख होय. तो सुमारे ९० सें. मी. लांब आहे. अक्षरांची उंची साधारणपणे ४ ते ५ सें. मी. आहे. लेख ठिकठिकाणी फुटल्यामुळे दुर्वाच्य झाला आहे. आरंभीची दोन अक्षरे 'वृत' अशी दिसतात. तेथे 'वृति' ही अक्षरे असावी. त्यामागील 'नि' हे अक्षर नष्ट झाले असावे. हा शब्द निवृत्ति असा असावा. त्यापुढील दोन अक्षरे 'पुत्र' अशी आहेत. त्यानंतर 'ज्ञानादे' अशी अक्षरे वाचता येतात. त्यापुढे 'ना' या अक्षरापूर्वी 'उ' चे अस्पष्ट चिन्ह दिसून येते.

'ज्ञाना (न) देउ' असा शब्द त्या ठिकाणी असावा. त्यापुढील शब्द 'नाम···उ' असा आहे. मधले दुर्वाच्य अक्षर 'दे' असावे. अर्थात हा शब्द 'नामदेउ' असा वाचण्यास हरकत नाही. त्यापुढील दोन अक्षरे मी 'वारी' असे वाचतो. त्यापुढील अक्षरे व शब्द वाचण्यास फारशी अडचण पडू नये. 'श्रीधर देव देउ श्री हरीश्चंद्र देवो' अशी ती वाचता येतात. या लेखाचे संपूर्ण वाचन पुढीलप्रमाणे :

**[नि]वृत(ति)पुत्र ज्ञाना(न)देउ नाम[दे]उ वारी–**

**स्त्रीधर देवदेउ स्त्रीहरी[श्चं]द्र देवो**

६

उपरोक्त क्र. ५ वा लेख ज्या स्तंभावर आहे त्याच्यावरील हा लेख. लांबी सुमारे ६८ सें. मी. नागरी लिपीत लिहिलेला. अक्षरांची उंची ५ ते ६ सें. मी. च्या दरम्यान. लेख बराच दुर्वाच्य आहे. आरंभीची काही अक्षरे जवळजवळ नष्ट झालेली. राहिलेल्या अक्षरांचे वाचन पुढीलप्रमाणे :

**त्वाल्लर्वांकु सिवा स्त्री मह(हे)षाजचा**

शेवटचा शब्द 'महेषाचा' असा असावा. बहुधा 'ज' चुकीने कोरला गेला असावा.

७

उपरोक्त लेखाच्या स्तंभावरील हा आणखी एक लेख. लांबी ६८ सें. मी. नागरी लिपीत लिहिलेला. अक्षरांची उंची ४ ते ५ सें.मी. च्या दरम्यान. लिपीचे वळण ओबडधोबड. एकंदर लेख दुर्वाच्य. मी केलेले वाचन पुढीलप्रमाणे :

**··· देवी स्त्रीनंदनाषु(थु) वावि गयनाषु(थु)**

८

हरिश्चंद्रेश्वर मंदिराच्या डावीकडील भिंतीसमोरच्या ओटयावरील गणेशमूर्तीच्या मागील चौकटीवर माथ्याच्या भागात हा लेख आहे. लांबी ६५ सें. मी. देवनागरी लिपीत कोरलेला. अक्षरांची उंची साडेतीन-चार सें. मी. अक्षरांचे

वळण चांगले. साधारणपणे तेराव्या-चौदाव्या शतकातील अक्षरासारखे. लेखाचे वाचन पुढीलप्रमाणे :

**श्रीदषि(खि)णनाथ का सिष सकपनाथ**

*　　*　　*

वरील सर्व लेख लक्षात घेतले म्हणजे असे दिसून येईल की, त्यांत निरनिराळ्या व्यक्तींची नावे नोंदलेली आहेत. ह्या व्यक्ती म्हणजे कधीकाळी त्या ठिकाणी राहणारे योगी किंवा दर्शनाला आलेली भक्तमंडळी. अर्थात, इतके परिश्रम घेऊन नावे कोरून ठेवण्याच्या योग्यतेची अशीच ही नामांकित मंडळी असली पाहिजेत यात शंका नाही. यांतील लेख क्रमांक १ व ४ माझ्या दृष्टीने विशेष महत्त्वाचे आहेत. प्राचीन मराठी साहित्यातील काही अनिर्णित प्रश्नांचा त्यामुळे समाधानकारक उलगडा होऊ शकेल असे वाटते.

पहिल्या लेखात 'चक्रपाणी वटेश्वर' व चौथ्या लेखात 'चांगा वटेश्वर' अशी नावे आली आहेत. प्राचीन मराठी साहित्यात 'चांगा वटेश्वर' नावाचे एक संतकवी होऊन गेले. चांगदेव नावाचे प्रसिद्ध योगी सत्पुरुष तोच हा चांगा वटेश्वर. ज्ञानेश्वरांची बहीण मुक्ताबाई हिने 'कोरा' म्हणून संबोधून त्याचा गर्व हरण केला व ज्ञानदेवांनी त्याला उद्देशून 'चांगदेव पासष्टी' हा ग्रंथ लिहिला. चांगदेवाने लिहिलेल्या अभंगांत त्याने स्वतःला 'चांगा वटेश्वर', 'वटेश्वर चांगा' असे म्हटले आहे. 'चांगदेव पासष्टी'त चांगाला उद्देशून ज्ञानेश्वरांनी 'तया पुत्र तू वटेश्वराचा। रवा जैसा कापुराचा। चांगया मज तुज आपणयाचा। बोल ऐके ॥' (३७) या ओवीत 'वटेश्वराचा पुत्र' म्हणून म्हटले आहे. मुक्ताबाईच्या अभंगांतही 'वटेश्वरसूत चांगा अवधूत। मुक्ताई शांतवीत ज्ञानदृष्टी ॥' 'वटेश्वरसुता बोले मुक्ताई' असे उल्लेख आलेले आहेत. 'तत्त्वसार' या ग्रंथात चांगाने स्वतःचा उल्लेख 'वटेश्वराचा सुतु। चांगा म्हणे अवधुतु' असा केलेला आहे. तेव्हा 'वटेश्वरपुत्र' किंवा 'वटेश्वरसुत' चांगा तोच चांगा वटेश्वर यात शंका नाही. या चांगालाच ज्ञानदेवांनी 'चक्रपाणी' असेही म्हटले आहे. 'एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे। दोन्ही डोळस आरीसे। परस्पर पाहता कैसे। मुकले भेदा ॥' (चां. पा. ६२) या ओवीवरून हे दिसून येते. तेव्हा चांगा वटेश्वर आणि चक्रपाणी वटेश्वर ही एकाच व्यक्तीची भिन्न नावे होत.

हरिश्चंद्र गडावरील लेख क्र. ४ मधील 'चांगा वटेस्वरा'चा हा उल्लेख 'तत्त्वसार' कर्त्या चांगाचा होय यात शंका नाही. चांगाने 'तत्त्वसार'

ग्रंथाच्या शेवटी ग्रंथाच्या लेखन—स्थळाचा पुढीलप्रमाणे उल्लेख केला आहे.

हरिश्चंद्र नाम पर्वतु । तेथ महादेओ भक्तु
सुरसिद्धगणीं विख्यातु । सेविजे जो ।।
हरिश्चंद्र देवता । मंगळ गंगा सरिता
सर्वतीर्थ पुरविता । सप्तस्थान ।।
ब्रह्मस्थळें ब्रह्म न संडितु । चंचळ वृक्षु अनंतु
लिंगि जगन्नाथु । महादेओ ।।
ऐसा सर्वांचा समाओ । कळी संसारु दुःखाचा प्रवाहो
तो देओ मोक्षाचा उत्साओ । शनैः शनैः ।।
जो तीर्थांसि तीर्थ । केदारेंसि तुकिताति
आणि क्षेत्रिं निर्मीती । प्रबंधु हा ।। (१०२९—३३)

हरिश्चंद्र पर्वत कोणता ते आतापर्यंत निश्चित झालेले नाही. भोर संस्थानात हरिश्चंद्र नावाचा एक डोंगर आहे. अहमदनगर जिल्ह्याच्या अकोला तालुक्यातील हरिश्चंद्र गड हा दुसरा. चांगा वटेश्वराने जेथे आपला ग्रंथ लिहिला ते 'नगर जिल्ह्यात आकोले तालुक्यात एक हरिश्चंद्राचा डोंगर आहे तेच हे स्थान असावे' असे श्री. ल. रा. पांगारकर यांनी म्हटले आहे (मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड २, पृ. २) पण पुराव्याच्या अभावी त्यांना ते निश्चित करता आले नाही. हरिश्चंद्र गडावर मिळालेल्या लेख क्रमांक १ व ४ वरून चांगा वटेश्वराचा हरिश्चंद्र पर्वत तो हाच असे आता निश्चित करावयास हरकत नाही. तेथे हरिश्चंद्र देवतेचे मंदिर असून केदारेश्वराचे लिंगही आहे. शिवाची उपासना करण्यासाठी तेथे अनेक सिद्ध-योगी राहात असत हे त्या ठिकाणी मिळालेल्या इतर लेखांतील योग्यांच्या नावांवरून स्पष्ट होते. तेथून निघालेल्या नदीला गंगा हे सामान्य नाव असावे. हेमाडपंथी बांधणीचा तेथील तलाव हेच बहुधा 'सप्ततीर्थ' असावे.

लेख क्र. १ मधील चक्रपाणी वटेश्वर आणि क्र. ४ मधील चांगा वटेश्वर एकच व्यक्ती होय असे मराठी साहित्याचे इतिहासकार मानतात. तथापि, त्या भिन्न व्यक्ती असाव्या असेही काहींचे म्हणणे आहे. अमृतानुभवावरील आपल्या टीकेत—

तो तैसाचि रस वोसंडला । तवं मुक्ताबाई प्रकाशला ।
प्राशुनि तैसाचि उरला । श्रीवटेश्वरा दिधला तो ।।
वटेश्वराहुनि चक्रपाणी । लाधले हे अमृतसंजीवनी ।।
विमलानंदी तेथुनी । लाधते जाले ।।

अशी गुरुशिष्य परंपरा वर्णन केली आहे. तीत वटेश्वर ही स्वतंत्र व्यक्ती म्हणून निर्देशिलेली आहे. मुक्ताबाईचे शिष्य वटेश्वर, वटेश्वराचे चक्रपाणी आणि चक्रपाणीचे शिष्य विमलानंद अशी ही गुरुशिष्यपरंपरा होय. यात चांगदेवांचा स्पष्ट उल्लेख नाही. तेव्हा वटेश्वर म्हणजे चांगदेव वटेश्वर असे अभिप्रेत असावे. तसे नसल्यास वटेश्वर ही स्वतंत्र व्यक्ती असून त्याचा शिष्य चक्रपाणी म्हणजे चांगदेव असे म्हणावे लागेल. त्यावरून चक्रपाणी हे चांगदेवाचे दुसरे नाव असल्याचे चांगदेव पासष्टीवरून जे दिसून येते त्याला पुष्टी मिळते. तेव्हा आपल्या क्र. १ लेखातील वटेश्वरनंदन् 'चक्रपाणी' आणि क्र. ४ या लेखातील वटेश्वराचा 'चांगा' ही नावे एकाच व्यक्तीची असल्याचे दिसून येईल. दोन्ही नावे वटेश्वराच्या शिष्यांची म्हणून उल्लेखलेली आहेत हे लक्षात ठेवावे. क्र. ३ लेखातील वटेश्वर-नंदनु (=पुत्र=शिष्य) चक्रपाणी याचा सुत (=शिष्य) विकटदेव असल्याचे म्हटले आहे. हा वीकटदेओ कोण ते निश्चित सांगता येत नाही. कदाचित विमलानंदाचे ते दुसरे नाव असावे.

या लेखांपैकी आणखी एक विशेष महत्त्वाचा लेख क्रमांक पाचवा होय. या लेखाचा पूर्वार्ध अतिशय खराब झालेला आहे आणि म्हणून सर्व अक्षरे नीट वाचता येत नाहीत हे खरे. तथापि, मी माझ्या दृष्टीने ती वाचण्याचा प्रयत्न केला आहे. हे वाचन निराळ्या रीतीने करता येणे शक्य झाल्यास माझ्या वाचनाचा मी पुर्नविचार अवश्य करीन, हे मुद्दाम नमूद करावेसे वाटते. माझे वाचन मान्य झाल्यास हा लेख अतिशय महत्त्वाचा ठरेल. या लेखाचे मी दोन भाग करतो. पहिल्या भागात '[नि]वृत(ति)पुत्र ज्ञाना(न)देउ नाम-[दे]उ बारी' हे वाक्य आहे. त्यावरून या संतांची हरिश्चंद्र गडाला वारी झाली असावी असे म्हणता येते. महाराष्ट्रातील नाथ व वारकरी संप्रदायात निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई ही चार भावंडे प्रसिद्ध आहेत. आळंदी येथील विठ्ठलपंतांची ही मुले होत. निवृत्ती हे त्यांत सर्वात वडील. त्यांचा धाकटा भाऊ ज्ञानदेव. ज्ञानदेव हे निवृत्तीचे जसे धाकटे भाऊ होते तसे शिष्यही होते. निवृत्तीपासून त्यांनी गुरूपदेश घेतला होता. ज्ञानदेवांनी लिहिलेल्या ज्ञानेश्वरीत त्यांनी स्वतःला निवृत्तिदास म्हणून आणि 'तें माहेशान्वयसंभूतें। श्रीनिवृत्तिनाथसुतें। केलें ज्ञानदेवें गीते। देशीकार लेणें॥' (अ. १८-१७८४) या ओवीत 'निवृत्तिसुत' म्हणून म्हटले आहे. सुत म्हणजे मुलगा; तथापि शिष्य या अर्थानेही त्याचा उपयोग केला जातो. त्याच अर्थाने आपल्या लेखात ज्ञानदेवाला निवृत्ति 'पुत्र' असे म्हटलेले आहे. ज्ञानदेवांनी 'तया पुत्र तू वटेश्वराचा' (चां. पा. ३७) या ओवीत शिष्य या अर्थानेच 'पुत्र' शब्दाचा

उपयोग केलेला आहे. ज्ञानदेवाची माहिती मराठी वाचकांना नव्याने सांगायला पाहिजे असे नाही.

त्यानंतर 'नामदेउ' हे नाव आलेले आहे. हा 'नामदेउ' म्हणजे वारकरी संप्रदायाचे प्रवर्तक, प्रचारक व प्रसारक संत नामदेव होत. त्यांची जन्मसप्त-शताब्दी या वर्षी सर्वत्र साजरी होत आहे. निवृत्ती, ज्ञानदेव, नामदेव यांनी बहुधा आपल्या तीर्थयात्रेत हरिश्चंद्र गडावर वारी केली असावी. या संतांच्या मेळाव्यात असलेले चांगा वटेश्वर हरिश्चंद्र गडावर वस्ती करून होते. तेथेच बहुधा नाथ सांप्रदायिक योगीही राहात असावे. तेथील हरिश्चंद्रेश्वर व केदारेश्वर या देवतांचे 'तत्त्वसारा' तील माहात्म्य लक्षात घेता हे स्थान प्रसिद्ध क्षेत्रांत मोडत असले पाहिजे यात शंका नाही. शिवाय नेवाशाजवळचे हे क्षेत्र होय. हे सर्व लक्षात घेता निवृत्ती, ज्ञानदेव, नामदेव इत्यादी संत-मंडळी तेथे गेली असणे असंभनीय नाही. प्रस्तुत शिलालेखावरून ते तेथे गेले असावे असे स्पष्ट दिसून येते. या नामोल्लेखाच्या दृष्टीने हा लेख विशेष महत्त्वाचा ठरेल असे वाटते. ज्ञानदेव-नामदेवांचा शिलालेखातील हा पहिलाच निर्देश होय !

लेखाच्या उत्तरार्धात आलेली 'श्रीधरदेवदेव' आणि 'हरिश्चंद्रदेव' ही दोन्ही हरिश्चंद्र पर्वतावरील देवतांची नावे होत. सध्या तेथील देवळांचा व त्यातील मूर्तींचा बराच भंग झालेला आहे. शिव, गणपती इत्यादी देवतां-बरोबर श्रीधराचे, अर्थात कृष्णाचे किंवा विष्णूचे मंदीर तेथे असावे असे वाटते. आताही तेथील हेमाडपंथी बांधणीच्या तलावाच्या दक्षिण दिशेला काळ्या पाषाणात बांधलेले चौदा नक्षीदार कोनाडे असून त्यात चतुर्भुज विष्णूच्या चौदा मूर्ती आहेत हे लक्षात घेतले पाहिजे (पाहा—दुर्गदर्शन, पृ. १५५). इतकेच नाही तर हरिश्चंद्रेश्वराजवळील एका गुहामंदिरात विठ्ठल-रखुमाईच्याही मूर्ती आहेत (तत्रैव, पृ. १५६). यांपैकी विष्णूच्या मूर्तींना उद्देशून 'श्रीधर-देवदेवा' चा निर्देश असावा असे वाटते. 'हरिश्चंद्रदेव' हा तर स्पष्टच हरिश्चंद्रेश्वराचा उल्लेख आहे. त्यावरूनच या पर्वताला हरिश्चंद्रगड हे नाव पडले आहे. तेव्हा त्याविषयी अधिक विस्ताराने लिहिण्याची आवश्यकता नाही.

हरिश्चंद्रगडावरील या लेखांतून आणखी एक महत्त्वाची गोष्ट निदर्शनाला येते. ती अशी की, क्रमांक एक, तीन व चार या लेखांत 'वटेस्वर' या नावाचा उल्लेख आला आहे. क्र. ३ या लेखात 'श्रीवटेस्वर शिवस्य प्रणतिः' असे म्हटले आहे. वटेश्वर म्हणजे शिव हे त्यावरून स्पष्ट होते. एरवीही त्याच अर्थाने या शब्दाचा उपयोग केलेला आढळतो. वटेश्वर या नावाची

एखादी व्यक्ती होती की शिवस्वरूप ईश्वरालाच वटेश्वर म्हटले आहे हा प्रश्न नेहमी चर्चिला जातो. चांगदेवपासष्टीत ज्ञानदेवांनी चांगाचा गुरू वटेश्वर याचे वर्णन शिवस्वरूप म्हणूनच केले आहे, तर शिवकल्याणांनी आपल्या अमृतानुभवावरील टीकेत जी गुरुपरंपरा दिली आहे त्यावरून वटेश्वर ही स्वतंत्र व्यक्ती होती असे दिसून येते. (मागे पृ. ३६४ पाहा) आपल्या क्र. ३ च्या लेखावरून या प्रश्नाचा अधिक विचार करण्यास मदत होईल.

क्र. २ च्या लेखातील 'गुहेश्वर भैरव' हे हरिश्चंद्रपर्वतावरील देवतेचे नाव असावे. कदाचित एखाद्या भैरव योग्याचेही ते नाव असू शकेल. क्र. ६ च्या लेखातही काही नावे आहेत. पण त्यांचा स्पष्ट बोध होत नाही.

क्र. ७ या लेखात नंदनाथ, गयनाथ आणि क्र. ८ च्या लेखात दखिणनाथ व त्याचा शिष्य सकपनाथ यांची नावे आलेली आहेत. ह्या व्यक्ती कोण असाव्या हे सांगता येत नाही. नाथ संप्रदायातील ते योगी होते हे स्पष्ट आहे, 'गयनाथ' म्हणजे गहिनीनाथ असावेत काय? काही असले तरी या नावावरून हरिश्चंद्र पर्वतावर अनेक नाथयोगी राहात होते हे सिद्ध होते.[1]

---

१ या लेखातील शिलालेखांची निश्चित स्थाने डॉ. रा. चिं. ढेरे यांनी दिल्या-प्रमाणे दुरुस्त करून घेतली आहेत. (पाहा : चक्रपाणि. पृ. १६६.)

# २३

## पारडा शिलालेख

### उपलब्धी

लोणार (ता. मेहेकर, जिल्हा बुलडाणा, महाराष्ट्र) क्षेत्राच्या दक्षिणेस सुमारे सहा मैलांवर असलेल्या पारडा गावातील शिवमंदिराच्या खांबाच्या तुटून पडलेल्या एका शिळेवर हा शिलालेख मिळाला. या शिलालेखाची माहिती लोणार येथील श्री. कृष्णराव काटे यांनी मला दिली. माझ्या विनंतीवरून नागपूर म्यूझियमचे क्यूरेटर श्री. रोडे यांनी त्याचे ठसे घेण्याची व्यवस्था करून ते माझ्या स्वाधीन केले. वरील दोन्ही सद्‌गृहस्थांचा मी फार आभारी आहे.

पारडा येथील शिवमंदिरात एकूण चार लेख आहेत. त्यांपैकी एक मुख्य दरवाजाच्या उंबरठ्यावर कोरलेला असून तो बराच अर्वाचीन असावा. लेख २ फूट लांब व सहा इंच रुंद असून त्यावर तीन ओळी आहेत. लेख मराठीत आहे. पहिल्या ओळीत 'भावसर भीक(कु) सेटी ला तो महीन्या पे. . . .' अशी अक्षरे असून दुसऱ्या ओळीच्या आरंभी 'बांधिले...' हा शब्द आहे. बाकीचा भाग अस्पष्ट व दुर्वाच्य आहे. दुसरा लेख याच मंदिराच्या दारात जमिनीवर असून त्यावर ' आ पा जा ' अशी अक्षरे कोरलेली आहेत. हे दोन्ही लेख आधुनिक असून मुळीच महत्त्वाचे नाहीत. याच शिवमंदिराच्या बाहेरच्या खांबावर चौकोनी लेख आहे. पण तो दुर्वाच्य आहे. शेवटच्या ओळीत १ २ ४ ५ हा आकडा अस्पष्ट दिसतो. मंदिराच्या आतील खांबावर असलेला मराठी शिलालेख मात्र स्पष्ट आहे व तोच येथे संपादन करीत आहे.

### वर्णन व लेखन

या शिलालेखाची लांबी एक फूट असून रुंदी साधारणपणे ६ इंच आहे. लेख चार ओळींचा आहे. पहिल्या तीन ओळींत प्रत्येकी सुमारे १२ अक्षरे असून चौथ्या ओळीत फक्त दोनच अक्षरे आहेत. अक्षरे ठसठशीत कोरली असून प्रत्येक अक्षराची उंची साधारणपणे १ ते १॥ इंच यांच्या दरम्यान आहे. बहुतेक अक्षरांवर शिरो-रेषा आहेत. १ ल्या ओळीतील **वा** आणि दुसऱ्या ओळीतील **या** अक्षरांच्या

काऱ्यावर, तसेच दुसऱ्या ओळीतील **वी** आणि तिसऱ्या ओळीतील **गा** या अक्षरांवर शिरोरेषा द्यायच्या चुकून राहिलेल्या दिसतात. अक्षरांचे वळण यादवकालीन दिसते.

**लेखनकाल**

प्रस्तुत शिलालेखात कालनिर्देश नाही. अक्षरांच्या वळणावरून तो १४ व्या शतकातील असावा असे वाटते. व्रीती, आसु, दंडी, वींजैया या शब्दांची रूपे यादवकालीन आहेत. यादव रामचंद्रदेव याच्या सावरगाव व कोपराड शिलालेखात **व्रीति (ती)** शब्द आलेला आहे. शके १३२० च्या मुसलमानकालीन काही शिलालेखात तो 'व्रीती' असा आढळतो. 'आसु' या नाण्याचा प्रचार यादवकालात होता. त्यानंतर मुसलमानकाळात ते प्रचारातून गेले. प्रस्तुत लेखात गाढवावरून शिवी दिलेली आहे. असे 'गद्धेगाळी'चे लेख यादवकालात विशेष आढळतात. त्यानंतरही काही काळ गद्धेगाळी प्रचारात असली तरी अक्षरांचे वळण, मुसलमानी शब्दांचा अभाव, आसु या नाण्याचा उल्लेख, वींजैया हे रूप यांवरून हा शिलालेख यादवकालीन, फार तर उत्तर यादवकालीन असावा असे वाटते.

गद्धेगाळीचे शापवचन विशेषेकरून यादवांच्या आणि शिलाहारांच्या शिलालेखात आढळते. (प्रामकोले. प्रस्ता. पृ. ५७) बहामनी सुलतान फेरोजशहा याच्या वेळच्या (शके १३२०) काही शिलालेखांतही ते आढळते.[1] या सर्व शिलालेखांतील ही गद्धेगाळीची वचने सूक्ष्मपणे पाहिली तर असे लक्ष्यात येते की, उत्तरकालीन शिलालेखांत ही गद्धेगाळ अपराध्याच्या आईवरून केलेली आहे. 'तेहाचीए माएसि गाढौ + वे' असा या शापवचनाचा प्रकार त्यात आढळतो. पण शके १०८६ च्या कदंब मरुडदेव याच्या सावरगाव येथील शिलालेखात मात्र आईचा उद्धार केलेला नाही. 'फेडी तो स्वान गाढवु' एवढीच शिवी अपराध्याला हासडली आहे. यावरून असे दिसते की, आरंभी आरंभी अशा प्रकारची शिवी केवळ अपराध्याला उद्देशून दिलेली असे, तर नंतरच्या काळात ती त्या अपराधी व्यक्तीच्या आईवरून देण्यात येऊ लागली. प्रस्तुत शिलालेखातील गद्धेगाळ आईवरून केलेली नसून अपराधी व्यक्तीला उद्देशून केलेली आहे हे लक्ष्यात घेण्यासारखे आहे. यावरून व यापूर्वी नमूद केलेल्या कारणांवरून हा शिलालेख यादवकालीन असावा असे म्हणता येते.

---

१ यादवोत्तर पण शिवपूर्वकाळातील काही मुसलमान शिलालेखांत ही गद्धेगाळ आढळते. मूर्तजा निजामशहाच्या कारकीर्दीत (इ. स. १५६५ ते १५६८) बिस्मत खानाने अहमदनगर येथील मशिदीतील दिव्यावत्तीसाठी दिलेल्या इनामासंबंधी एक शिलालेख आहे. (एपि. इंडो मोस्लेमिका १९३९–४०, पृ. ३०) त्याच्या शेवटी 'जो कोण्ही मना करील त्याचे मापर गधव' अशी गद्धेगाळ आहे.

**विषय**

प्रस्तुत लेखाचा उद्देश पारडा येथील 'गाउदेवा'ला चाटुए गावीची वृत्ती दिल्याचा निर्देश करण्याचा, तसेच त्यासंबंधीचे काही आदेश निर्दिष्ट करण्याचा दिसतो. दर्शन घेताना देवासमोर ठेवलेल्या मुद्रा जो घेईल त्याला २० आसूंचा दंड सांगितलेला असून जो हा दंड देणार नाही त्याला गाढव लागेल असे शापवचन आहे. देवाचे, अर्थात, देवळातील देवतेचे जो पालन करील, (पालापाणी घालून पूजाअर्चा करील इत्यादी) तो विजयी होईल, असा शेवटी आशीर्वादही दिलेला आहे. यावरून **घे** आणि **न दे** या क्रियापदांनी सूचित होणाऱ्या क्रिया देवळातील देवासंबंधी असल्या पाहिजेत हे स्पष्ट दिसते.

**स्थलनिश्चिती**

शिलालेखात निर्देशिलेले 'चाटु' गाव कोणते हा प्रश्न आहे. 'सर्व्हे ऑफ इंडिया'च्या नकाशात या नावाचे गाव पारडचाच्या जवळपास असलेले आढळत नाही. तथापि, १९५१ च्या जनगणनेच्या वृत्तांतात पारडचाजवळ 'किनगाव चाथु' (Kingaon Chathu) नावाच्या गावाचा उल्लेख आहे. हेच गाव 'किनगाव जट्टु' म्हणून आज प्रसिद्ध आहे. 'चाटु' या शब्दाचे जट्टु असे उच्चारांतर झाले असणे अशक्य नाही. 'किनगाव जट्टु' या गावाचा 'किनगाव चाथु' असा उल्लेख ज्या अर्थी जनगणनावृत्तांतात आहे (Census of India, Madhya Pradesh, Buldana District, page 80) त्याअर्थी महसूल खात्याच्या दप्तरात 'चाटु(थु)' असे हे नाव परंपरेने नोंदले गेले असावे असे वाटते. पारडा येथील संबंधित देवळाला किनगाव चाटु (जट्टु) येथील वृत्ती मिळालेली असावी असा तर्क करण्यात हरकत नाही.

**वाचन**

**१. [श्री][1] गाउदेवा चाट[2](टु)ऐ गांवीची व्रीती द[र्श][3]**

---

१ ठशात हे अक्षर 'ब्रा' किंवा 'द्रा' सारखे दिसते. ते 'श्री' असे वाचले पाहिजे.

२ 'ट' च्या खाली दगड फुटलेला आहे. त्यामुळे वाचन दुर्बोध झाले आहे. फुटलेल्या ठिकाणी उकाराचे चिन्ह दिसते.

३ या ठिकाणची अक्षरे दगड फुटल्यामुळे अपूर्ण आहेत ; तथापि **द** आणि **श** चा पूर्वभाग स्पष्ट आहे.

२. न[1] [मु]द्राऐं[2] घे तेया वीस आसु दंडी
३. [न][3] दे तेयासी गाढौ देवाते पाली तो (वी)[4]
४. जैया

---

१ ठशावरून हे अक्षर **न** असावे असे वाटते. ते **ळ** असे वाचता येणेही संभवनीय आहे.

२ या शब्दाचे वाचन अनिश्चित आहे. **द्रा** हे अक्षर स्पष्ट आहे. त्यापूर्वीचे अक्षर **मु** असावे असे मला वाटते. 'दर्शनमुद्रा' या ऐवजी 'दळभद्रा' असे वाचन डॉ. मो. ग. दीक्षित सुचवितात; तर 'देउळस्था' असे डॉ. य. खु. देशपांडे सुचवितात. ती मला समाधानकारक वाटत नाहीत.

३ हे अक्षर ठशात स्पष्ट नाही. त्या जागी असलेल्या अस्पष्ट चिन्हावरून ते **न** असावे असे वाटते. डॉ. य. खु. देशपांडे यांनी हे वाचन सुचविले आहे, त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

४ येथे दगडाचा भाग फुटलेला असल्यामुळे अक्षर अपूर्ण व अस्पष्ट आहे. **व** स्पष्ट दिसतो. पुढील अक्षरांच्या संदर्भाने ते अक्षर वी असे वाचले पाहिजे.

● ● ●

# २४

## डोंबिवली येथील शिलालेख

### उपलब्धी

डोंबिवली (जिल्हा ठाणे) येथे दक्षिणेस गावाच्या शेवटी, खडकवलीच्या दिशेने श्रीमती शांताबाई काळू दागूजी यांच्या बाडीत रस्त्याच्या बाजूला एका झाडाच्या बुंध्याशी ह्या शिलालेखाची शिळा उभी करून ठेवलेली होती. एशियाटीक सोसायटीतील सहायक ग्रंथपाल श्री. वेलणकर यांच्याकडून कु.दुर्गा भागवत यांच्या मार्फत मला त्याची माहिती मिळाली. महाराष्ट्र शासनाच्या पुरातत्त्व विभागाला या शिलालेखाची माहिती तीनचार वर्षापूर्वीच मिळाली असावी असे दिसते. तथापि, त्याचा ठसा घेऊन अद्याप त्याचे व्यवस्थित व संपूर्ण वाचन मात्र झालेले नाही. पुरातत्त्व विभागाचे संचालक डॉ. मो. गं. दीक्षित यांनी मला तातडीने लेखाचा ठसा उपलब्ध करून दिला याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. या लेखासंबंधी त्यांनी लिहिलेले टिपण 'डोंबिवली शहराचा इतिहास' (लेखक : श्री. कुळकर्णी) या पुस्तकातील परिशिष्ट–१ मध्ये नुकतेच प्रसिद्ध झालेले आहे.

### वर्णन

शिलालेखाची शिळा साधारणपणे अडीच फूट उंच व सव्वा फूट रुंद आहे. तिच्यावर वरच्या भागी चंद्र व सूर्य यांची चिन्हे कोरलेली आहेत. शिलालेखाच्या खालच्या भागावर गद्धेगाळीचे चिन्ह कोरलेले आहे. शिलालेख एकूण तेरा ओळींचा असून त्यांतील पहिल्या आठ ओळी मराठीत आहेत. शेवटच्या पाच ओळीत 'स्वदत्तं वा प्रदत्तं वा—' इत्यादि शापवचनादिकाचे दोन श्लोक संस्कृत भाषेत आहेत. एका ओळीत साधारणपणे १७ अक्षरे असून प्रत्येक अक्षर सुमारे एक इंच उंच आहे. पाण्यापावसामुळे व शेंदूर लावल्यामुळे शिळेवरील अक्षरे बरीच खराब झाली आहेत. त्यामुळे लेखाचा ठसा अस्पष्ट आहे. लेखाचे वाचन त्यामुळे बरेच कठीण झाले आहे.

### काळ

'सकु १३१८ ईजरत ७९९' असा कालोल्लेख पहिल्या ओळीत आलेला आहे. डॉ. मो. गं. दीक्षित म्हणतात त्याप्रमाणे 'धातृ संवत्सरे' हे शब्द कालोल्लेखात नाहीत.

शकवर्ष आणि हिजरी सन यांचा हा मेळ बरोबर बसतो. इंग्रजी कालगणनेप्रमाणे हा शिलालेख इ. स. १३९६ मधील आहे.

### विषय

शिलालेखाचा विषय शिरवली गावाचे दान देण्यासंबंधीचा आहे. त्यावेळी श्री आलुनाकु नावाचा राजा ठाणे येथे राज्य करीत होता. त्याचे अधिकारी सर्व-व्यापारी हाना नाखुआ, कर्णिक पोमलप्रो व आवलप्रो (सेनाधिपती ?) सिंहदेव होते. त्यांच्या काळात हे शासनपत्र लिहिण्यात आले आहे. आलुनाकरायाने आपला सेवक जसवंत दळवै याला आठ गावामधील 'शिरवली' नावाचे गाव दान दिले आहे. सहाव्या ओळीतील सर्व अक्षरे स्पष्ट वाचता येत नसल्यामुळे ही आठ गावे (किंवा आठागर, अष्टागार) कोणती ते सांगता येत नाही.

ठाण्याचा राणा आलुनाकु याला 'आहवामाल' व 'माहाराजाधिराज' अशी विशेषणे लावली आहेत. 'आहवामाल' (सं. आहवमल्ल) म्हणजे युद्धातील मल्ल, उत्कृष्ट योद्धा. या विशेषणावरून त्याचे युद्धनैपुण्य आणि श्रेष्ठ अधिकारपद दिसून येते. शककालाबरोबर हिजरी सनाचा निर्देश असल्यामुळे या विभागावर त्यावेळी मुसलमानाचे राज्य होते हे स्पष्ट दिसते.

### आलुनाकु कोण ?

शके १३१८ म्हणजे इ. स. १३९६ मध्ये ठाणे येथे राज्य करणारा हा 'आलुनाकु' कोण असावा याचा विचार केला पाहिजे. कोकणपट्टीवर राज्य करणारे या किंवा यापूर्वीच्या काळातील राजे शिलाहार वंशातील असून ते कोणत्या ना कोणत्या तरी अन्य राजाचे मांडलीक असत अशी समजूत आहे ; आणि ती बव्हंशी खरीही आहे. प्रस्तुत शिलालेखातील आलुनाकु राजाला माहाराजाधिराज ही पदवी लावलेली आहे, ती एक तर चुकीची असली पाहिजे, किंवा हा आलुनाकु राजा स्वतंत्र तरी असला पाहिजे, आणि हीच गोष्ट खरी असावी असे मला वाटते.

### हंबिरराव याचा नागाव शिलालेख

कोंकणाधिपती हंबिरराव याचा, शके १२८९ मधील 'नागाव शिलालेख' उपलब्ध असून अलीकडे त्याचे पुनःसंपादन डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी 'प्राचीन मराठी कोरीव लेख' या आपल्या ग्रंथात केले आहे. त्यातील आरंभीच्या 'श्रीमत्य प्रौढि प्रताप चक्रवर्ति माहाराजाधिराज श्री हंबिरराओ ठाणे कोकण राज्यं क्रोति' या वाक्यात या हंबिररावालाही माहाराजाधिराज हे विशेषण लावले आहे. हे विरुद्ध

वास्तविक देवगिरीकर यादव वंशातील राजांच्या मागे लावण्याचा प्रघात असल्यामुळे हा हंबिरराव देवगिरीच्या वंशाशी संबद्ध असावा असा तर्क डॉ. तुळपुळे यांनी केला आहे. पण ज्याअर्थी हे बिरुद आपल्या नावामागे हंबिररावाने लावून घेतले त्याअर्थी यादवांची सत्ता झुगारून स्वतंत्र राजा म्हणून तो मिरवीत असावा असाही तर्क यावरून करता येणार नाही काय? यापूर्वीच्या काळातील कोकणपट्टीचे राजे यादवांचे मांडलीक होते असे दिसते. पण कोणत्या काळापर्यंत? त्यांची सत्ता संपुष्टात केव्हा आली? यादवानंतर कोकणावर कोणाचे स्वामित्व स्थापन झाले? या प्रश्नांचा ऐतिहासिक दृष्टीने विचार केला पाहिजे.

**यादव राज्याचा शेवट**

एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती अशी की, यादव नृपती रामचंद्रदेव अथवा रामराजा याच्या कारकीर्दीत अल्लाउद्दीन खिलजीची स्वारी देवगिरीवर होऊन यादवांच्या विनाशकाळाला सुरुवात झाली होती; आणि त्यानंतर शके १२२७ म्हणजे इ. स. १३०६ मध्ये यादवांचे राज्य खालसा होऊन त्यांचे अस्तित्व संपुष्टात आले. अर्थात, त्याबरोबर त्यांच्या सार्वभौमत्वाखाली असलेल्या कोकण प्रदेशावरील त्यांचे अधिराज्य देखील संपले. या दृष्टीने पाहता शके १२८९ (इ. स. १३६७) मध्ये कोकणपट्टीवर राज्य करणारा हंबिरराव यादव राज्याशी संबद्ध असणे फारसे शक्य नाही. आणि ज्याअर्थी तो स्वतःला 'प्रौढप्रताप चक्रवर्ती' आणि 'माहाराजाधिराज' म्हणवून घेतो त्याअर्थी तर तो कुणीतरी दुसराच यादवेतर स्वतंत्र राजा असावा असे अनुमान करण्याला हरकत नाही.

डॉ. तुळपुळे यांनी संपादन केलेल्या 'प्राचीन मराठी कोरीव लेख' या ग्रंथात रामदेवरावाचे, कोकणपट्टीत सापडलेले, कालवार (क्र. ४०), अक्षी (क्र. ४१), कोपराड (क्र. ४३), चेउल (क्र. ४४) आणि आगासन (क्र. ४६) असे ५ शिलालेख आहेत. याशिवाय हंबिरराव याचे रानवड (उरण) येथील एक (मुंबई विद्यापीठ जर्नल, वर्ष ८, पृष्ठे १८–२१) व वाघरण येथील एक, असे दोन शिलालेख प्रसिद्ध झालेले आहेत. त्यावरून रामचंद्रदेवाचे म्हणजे रामदेवरायाचे कोकणावरील अधिकारी कान्हरदेव व जाइदेव हे होते असे दिसते. कान्हरदेवाचा कोपराड भागातील निरोपित (=मुतालिक अधिकारी) मुहुमद प्रोस्ताहि हा होता. म्हणजे शके १२१९ (इ. स. १२९७) च्या सुमारालाच कोकणावर मुसलमान अधिकारी नेमले जाण्याइतपत त्यांचे वर्चस्व स्थापन झाले होते. यादव साम्राज्याचा शेवट झाल्यावर अशा मुसलमान अधिकाऱ्यांचीच सत्ता तेथे स्थापन झाली असल्यास आश्चर्य नाही. या कोपराड शिलालेखाचा आशय तेथे बांधल्या गेलेल्या मशिदीसाठी

दान लावून देण्याचा दिसतो, ही गोष्ट सुद्धा लक्षात घेण्यासारखी आहे. हंबिररावाच्या नागाव शिलालेखातसुद्धा अनेक मुसलमान अधिकाऱ्यांची नावे आली असून त्यांतील एकाने बांधलेल्या मशिदीला काही दान दिल्याचा उल्लेख आहे ही गोष्ट सुद्धा महत्त्वाची आहे.

कोपराड शिलालेखात (शके १२१९=इ. स. १२९७) मुसलमान अधिकाऱ्याचे नाव असले तरी त्यावेळी प्रौढप्रताप चक्रवर्ती रामचंद्रदेव सार्वभौम नृपती असल्यामुळे कालोल्लेख शकसंवत्सराचा निर्देश करून केलेला आहे. पण नागावच्या शिलालेखात (शके १२८९=इ. स. १३६७) शकसंवत्सराबरोबर हिजरत म्हणजे हिजरी सनाचा उल्लेख आलेला आहे. त्यावरून आपला सन स्वतंत्र रीतीने उल्लेखिण्याइतपत मुसलमान राजे स्वतंत्र झाले होते असे स्पष्ट दिसते. प्रस्तुत डोंबिवलीच्या शिलालेखाच्या वेळी (शके १३१८=इ. स. १३९६) तीच परिस्थिती अधिक बलवत्तर असली पाहिजे. अर्थात, त्या काळात कोकणपट्टीवर मुसलमानांची सत्ता चांगलीच प्रस्थापित झाली होती यात शंका नाही.

### उत्तर कोकणच्या इतिहासाचे सिंहावलोकन

उत्तर कोकणावर काही वर्षे चालुक्यांचे मांडलीक राज्य करीत होते. त्यानंतर सुमारे इ. स. ८०० पासून तो १२६५ पर्यंत राष्ट्रकूटांचे मांडलीक म्हणून शिलाहार राजांनी तेथे राज्य केले. शिलाहार नृपती द्वितीय कपर्दीच्या काळात (इ. स. सुमारे ८५० ते ८८०) संजान मंडलात अरब मांडलीकही होते. चिंचणी ताम्रपटात मधुमति म्हणजे मुहम्मद, त्याचा मुलगा सहियारहार आणि नातू सुगतिप म्हणजे सुबक्त यांची नावे आढळतात. इ. स. १००० च्या सुमारास अपराजित शिलाहाराने त्यांचे राज्य नष्ट केले असले तरी ते म्हणजे अरब लोक व पुढे मुसलमान कोकणातून नाहीसे झाले असे नाही. शिलाहारानंतर यादवांनी कोकण काबीज करून तेथे आपले अधिकारी नेमले. त्यांच्या काळात तेथे मुसलमान अधिकारी नेमले जाऊन त्यांच्याकडून मशिदीही उभारल्या जाऊ लागल्या होत्या हे आपण पाहिलेच आहे.

उत्तर कोकणचा थोडाफार इतिहास 'महिकावतीची उर्फ माहिमची बखर' या ग्रंथात आलेला आहे. हा इतिहास बखरवजा असला तरी त्यातील माहितीकडे अगदीच दुर्लक्ष करता येत नाही. या बखरीवरून असे दिसते की, शके १०६० च्या सुमारास अन्हिलवाडच्या प्रताप बिंबाने कोकणच्या किनाऱ्यालगतचा काही भाग काबीज करून पुढे हळूहळू इतर मुलूख पादाक्रांत केला व माहीम येथे आपली राजधानी स्थापन केली. त्यानंतर तेथे अनेक उलाढाली होऊन 'निका मलिकाने

ठाणे-कोकणचे राज्य घेतले. शक १२७० त ठाणे-कोकणात तुर्काण झाले ' (म. ब. प्रस्ता. ५९) ; 'निका मलिकाने माहिमचे राज्य शक १२७९ त नायत्या राजांच्या स्वाधीन केले ' (म. ब. प्र. ६१). या नायत्या राजांची कुळी सांगताना बखरकार लिहितो 'आता नाईत्या रायाचि कुळि सांगेन ॥ आबु नाखवे कोकणि राज्य केले वरुषे ॥१२॥ तयाचा पुत्र पाणि सावंत॥ तेण्हे राज्य केले वरुषे ॥१३॥ त्याचा पुत्र हंबीरखान...' (म. ब. पृ. ६३). नाइत्यांपैकी पहिला राजा 'आलु नाखवा' याचे नाव येथे चुकून 'आबु' असे लिहिले, वाचले किंवा छापले गेले असावे असे मला वाटते. या ठिकाणी ते 'आलु नाखवा' असे असावे. याच बखरीत अन्यत्र हे नाव पुढीलप्रमाणे आले आहे. 'मग ते राज्य आलि नाखवासि दिधले' (पृ. ५०). 'तेधवा हर ठाकुर बोलता जाला ॥ खत आलजी नाखवा हस्तिचे मजवळ आहे॥ ते खत वाचोनी पाहाता निवाडा शेषवंशाचे निशाण मोहोरे सीका आल नाखवा नवाईत माहिमचा राजा...' (पृ. ७०). यावरून दिसून येईल की, 'आबु नाखवा' हे नाव चुकीचे असून ते 'आलु नाखवा' असे असले पाहिजे. आल, आलु, आलि, आलजी ही एकाच नावाची भिन्न रूपे असून ती मुसलमानी नाव 'अली' याची अपभ्रष्ट रूपे असावी. प्रस्तुत डोंबिवली शिलालेखातील 'आलु नाकु' म्हणजे हा आलु नाखुआ असावा. डॉ. मो. गं. दीक्षित यांना 'आलु' हे 'अल्ला'चे रूप असावेसे वाटते. यापेक्षा, महिकावतीच्या बखरीत आलेले व मुसलमानात रूढ असलेले 'अली' 'आली' या नावाचेच ते उच्चारांतर असावे असे मानणे भाषादृष्ट्या अधिक योग्य होईल.

**नाकु = नाखुआ**

नाक, नाकु ही रूपे नाइक, नायक या शब्दांची उच्चारांतरे आहेत असे आपण नेहमी मानतो; आणि ते खरेही आहे. पण 'नाखुआ' या शब्दाचेही ते रूप असणे भाषाशास्त्रदृष्ट्या असंभवनीय नाही. विशेषत: 'आलु' हे 'अली' चे रूपांतर असेल तर 'आलु नाकु' या नावातील 'नाकु' हा शब्द 'नाखुआ'चे अपभ्रष्ट रूप असणे अधिक संभवते. म्हणूनच प्रस्तुत शिलालेखातील 'आलु नाकु' म्हणजे महिकावतीच्या बखरीतील 'आलि नाखवा' होय असे अनुमान काढण्याला हरकत नाही.

कालदृष्टया यात थोडी विसंगती आहे, हे मान्य केले पाहिजे. निका मलिकाने माहिमचे राज्य नायत्या राजांच्या स्वाधीन शके १२७९ मध्ये केले. नायत्यांचा पहिला राजा 'आलि नाखवा' असून त्याने १२ वर्षे राज्य केले असे बखरकार सांगतो. (पृ. ६३) म्हणजे १२९१ पर्यंत त्याचे राज्य होते. प्रस्तुत डोंबिवलीचा शिलालेख शके १३१८ चा आहे. त्यावेळी आलु नाकु ठाणे येथे राज्य करीत

होता असे स्पष्ट दिसते. तेव्हा या व बखरकाराच्या कालनिर्देशात कमीत कमी २७ वर्षांचे अंतर आहे. बखरकाराच्या कालनिर्देशात संवत्सरादिकाचा उल्लेख नसल्यामुळे तो तपासून पाहता येत नाही. शिलालेखातील कालनिर्देश त्यात आलेल्या हिजरी सनाच्या तुलनेने तपासून पाहता बरोबर दिसतो. बखरकाराच्या कालनिर्देशात आकड्यांची चूक झाली असणे अशक्य नाही.

आलु नाकु हा 'नायता' होता असे बखरीत म्हटले आहे. नायता म्हणजे नाखुआ, नाव चालविणारा. आलु नाखव्याला 'नवाईत' असे बखरीत म्हटलेलेच आहे. नवाईत म्हणजे नायता=नावाडी, नाविक. यूल आणि बर्नेल यांच्या हॉबसन–जॉबसन या पुस्तकात (पृ. ६२०) याचा अर्थ 'a name given to Mahomedans of mixed race in the Konkan and S. Canara' (कोकण आणि दक्षिण कॅनरामधील मुसलमानांच्या मिश्र वंशाला दिलेले नाव) असा दिलेला आहे. 'नवाईत' हा कोकणी शब्द संस्कृत 'नव' शब्दापासून निघालेला असून त्याचा अर्थ 'नवीन आलेला—धर्मांतरीत' असा आहे, असे त्याचे म्हणणे आहे. 'नाइत' हे एका अरब जमातीचे नाव असून त्यापासून 'नाइता' शब्द निघाला असावा, असेही काहींचे म्हणणे आहे. कदंब नृपती जयकेशी द्वितीय याच्या पणजी ताम्रपटात आलिय, मधुमद व चधम या तीन नौवित्तकांची नावे आढळतात. शके ११०६ मधील शिलाहार नृपती अनंतदेव(पाल) याच्या खारेपाटण ताम्रपटात 'वा–सैद' या 'नौ–वितकाचे' नाव आले आहे. ('तथैतद्राज्यचिन्ताभारं समुद्वहति महामात्य श्रीनौवितकवासैदः'— एपि. इंडिका. वर्ष १०, पृ. ३५) 'नौ–वित्तक' या संस्कृत रूपाचा अर्थ, नौ=नाव हेच ज्याचे वित्त आहे तो, अर्थात नाविक. नाइते हे नाविक, म्हणजे नाखुआ होते हे यावरून दिसून येईल. म्हणूनच 'आलु नाकु' या नावातील 'नाकु' हा शब्द नायक याचे रूपांतर नसून 'नाखुआ' या शब्दाचे रूपांतर असावे असे मला वाटते. अर्थात, नाइते ही मुसलमानांची मिश्र संतती होती. त्यांच्याविषयी राजवाडे लिहितात : 'हे राजे मूळचे प्रतिलोम हिंदू होते, परंतु पुढे ते मुसलमान बनले. जन्माने व कुळाने देशी आणि धर्माने मुसलमानी असे हे दुरंगी राजे हिंदू देसल्यासही मानवले व निका मलिकासहि आवडले' (म. ब. प्रस्ता. पृ ६१).

या सर्व विवेचनावरून लक्षात येईल की, प्रस्तुत शिलालेखातील 'आलु नाकु राणा' म्हणजे महिकावतीच्या बखरीतील 'आलि नाखवा' असून तो नायत्यांच्या कुळातील होता. तो मूळचा हिंदू असून धर्मांतर करून मुसलमान झालेला होता. लढाईत एखाद्या मल्लाप्रमाणे शत्रूशी टक्कर देणारा, अर्थात युद्ध करण्यात निपुण होता. इ. स. १३९६ मध्ये ठाण्याचा तो 'राणा' म्हणजे राजा होता.

माहाराजाधिराज' ही पदवी त्याने धारण केलेली असल्यामुळे (निका मलिकाने ठाण्याचे राज्य त्याच्या स्वाधीन केले असले तरी) त्या विभागात तो स्वतंत्र होता.

### अधिकारी वर्ग

आलुनाकु राण्याच्या अधिकारी-वर्गाची काही नावे ह्या शिलालेखात आली आहेत. 'हाना नाखुआ' हा 'सर्व–व्यापारी' म्हणजे मुख्य प्रधान होता. या अर्थाने हा शब्द हंबिररावाच्या नागाव शिलालेखातही आलेला आहे. दुसरा अधिकारी 'पोमल प्रो' हा 'कर्णिक' होता. कर्णिक म्हणजे लेखक किंवा लेखनाधिकारी. याचा पूर्वी मंत्रिमंडळात समावेश होत असे. अनंतदेवाच्या पूर्वोक्त खारेपाटण ताम्रपटात मंत्रिमंडळातील महामात्य, महासांधिविग्रहिक इत्यादींची नावे देऊन 'एवमादि – **श्रीकरणे** प्रवर्त्तमाने–' असा निर्देश आलेला आहे. विहार, रानवड, कालवार, परळ, चांजे इत्यादी ताम्रपट-शिलालेखांतूनही याच प्रकारे श्रीकरणिकांचे उल्लेख आढळतात (प्राचीन मराठी कोरीव लेख. प्रस्ता. पृ. ८९ पाहा) त्यावरून हे दिसून येईल.

'पोमलप्रो' या शिवाय 'आब(व)लप्रो' या नावाचा आणखी एक अधिकारी आलुनाकाच्या मंत्रिमंडळात होता. पोमल, आवल ही व्यक्तिनामे त्या काळात प्रचारात असावी. त्यांच्यापुढे लावलेला 'प्रो' हा शब्द 'प्रोत्नाहि' (अरबी शब्द –'पर्वरिशी') याचे संक्षिप्त रूप असून पालक, पोशिंदा, शासक असा त्याचा अर्थ आहे. या शब्दाची व्युत्पत्ती संस्कृत 'पर' किंवा 'प्रव' शब्दापासून साधण्याचा प्रयत्न केला गेला आहे, त्याने समाधान होत नाही. प्रोत्नाहि शब्दाचे ते संक्षिप्त रूप असावे, हे बरोबर असेल तर पोमल, आवल ह्या अधिकारी व्यक्तीही मुसलमान असाव्या असे वाटते. नागाव शिलालेखातील 'सिहिप्रो' बहुधा मुसलमान असावा असा एक तर्क आहेच. मला तर याहीपुढे जाऊन असे म्हणावेसे वाटते की, नागाव शिलालेखातील हंबिरराव हाही बहुतेक मुसलमानच असावा. नायत्या राजांच्या कुळात हंबीरखान, हंबीरखा हे नाव येते. नागावच्या शिलालेखातील हंबीररावाने आपल्या नावापुढे खान, खा असा शब्द न वापरता आपल्या जुन्या प्रचाराला अनुसरून 'हंबिरराव' असेच नाव कायम ठेवले असावे. ह्या सर्व व्यक्ती पूर्वीच्या हिंदू पण धर्मांतर करून मुसलमान झालेल्या असाव्या असे त्या काळच्या एकंदर इतिहासावरून वाटते. नावापुढे 'प्रो' शब्द आल्यामुळे तर पोमलप्रो आणि आवलप्रो हे अधिकारी मुसलमान असावेत असे अनुमान करण्याला हरकत वाटत नाही.

### दान दिलेले गाव

वरील अधिकारी राज्य कारभार करीत असताना आलु नाक रायाने आपला अवसरिया (=एकनिष्ठ सेवक) जसवंत दळवै याला 'शीरवली' नावाचे गाव (दान म्हणून) दिले. 'शीरवली' हा शब्द डॉ. दीक्षित 'डोंबवली' असा वाचतात. सातव्या ओळीच्या आरंभीचे अक्षर निश्चित **र** असे आहे; **ब** नव्हे. सहाव्या ओळीतील शेवटचे अक्षर **शी** आहे. फार तर ते **क्षी** असे वाचता येईल; पण **डो** असे वाचता येणे शक्य नाही. तेव्हा गावाचे नाव डोंबवली असे निश्चित नाही; ते शिरवली वाचले पाहिजे असे मला वाटते. हा शिलालेख डोंबिवली येथे सापडला, त्यावरून गावाचे नाव डोंबवली असायला पाहिजे होते हे खरे, पण तसे ते नाही हेही खरे. डोंबिवली येथे ही शिळा सुटी, उभी करून ठेवलेली आढळली. त्यावरून तेथे ती दुसरीकडून आणून ठेवली असणे शक्य आहे. किंवा ज्या आठागरातील शिरवली हे गाव दान म्हणून देण्यात आले त्याची सीमा डोंबिवलीपर्यंत असावी व म्हणून तेथे ही शिळा ठेवलेली असावी. शिरवली हे गाव डोंबिवलीपासून जवळच ३–४ मैलांवर आहे.

सहाव्या ओळीतील काही सुटी अक्षरे वाचता येतात तशी वाचनात मी दिलेली आहेत; पण त्यावरून निश्चित अर्थबोध मात्र काही होत नाही. 'आठगवामध्ये' म्हणजे आठ गावा मधून, आठागरामधून असा त्याचा अर्थ दिसतो. तथापि, या ओळीचे वाचन व अर्थ निश्चित होणे आवश्यक आहे याचा निर्देश येथे केला पाहिजे.

### वाचन

**१. (स्वस्ति)[१] श्री : सकु १३१८ ईजरत ७९८ आहवामल[२]**
**२. माहाराजाधिराज श्रीआलुनाकु राणा**
**३. ठाण(णे) राज्यं करोति तंनिरोपित सर्वव्यापारी**
**४. हाना नाषु(खु)आ[३] कणि(णि)क[३] पोमलप्रो[४] आवलप्रो[५]**

---

पुढील सर्व वाचनभेद डॉ. मो. गं. दीक्षित यांच्या लेखातून नमूद केले आहेत.

१ (द्व) (ओम् चिन्हाने दाखविलेले).

२ (अद्ये) धातृ संवत्सरे.

३ आकरणिक.

४ कोमलप्रो.

५ आंवलप्रो.

५. हृदेवं[1] प्रव्वर्त्तमाने साशनपत्र लिष्य(ख्य)ते यथा
६. कां मा रा वि ए (क) र म ण आ ठ ग (वा) म ध्ये ना शि[2]
७. रवली[3] ग्रामु श्रिआलुनाकराऐं[4] अवसरि–
८. आ(या) जसवंतु दलवैंआ (लागौ)नि[5] दत्तः
९. स्वदत्तं वा प्रदत्तं वा यो हरेत वसुंधरां [।*] षठि(ष्ठि)–
१०. र्व(व)र्षसहक्षा(स्त्रा)णि विष्टायां जायते [कृ]मिः [॥*]
११. मम वंशे परिच्छिणे[6] (न्ने) य(यः) कञ्चि(श्चि)त[7] नृपतिर्भवे–
१२. त्त(त् । त)स्याहं करल(ग्नोस्मि) मम दत्तं त्व पाल्ल(ल्य)–
१३. ताम्[8] ॥ ॥ सुभं भवतु ॥ मंगलमस्तुः[9] ॥

---

१ इत्येवं.
२ ही संपूर्ण ओळ डॉ. दीक्षित पुढील प्रमाणे वाचतात : 'कांमराचिए दत्त मण आठ धावा मध्ये....'
३ (डों)बवली.
४ स्थित शासना कर ऐ.
५ गामि.
६ न क्रियते.
७ कंस्थितं.
८ ताणां.
९ महाश्रीः

● ● ●

२५

# मलकापूर येथील राममंदिरातील शिलालेख

### प्रास्ताविक

मलकापूर (जि. बुलढाणा, महाराष्ट्र) येथील, राजे नेमिवंतांच्या राममंदिरात मुख्य देवळाच्या दरवाजाच्या वरील बाजूस प्रस्तुत शिलालेख आहे. लांबी दोन फूट अकरा इंच व रुंदी दहा इंच. लेखातील अक्षरे उठावाची आहेत; म्हणजे ती कोरलेली नाहीत, तर बाजूची जागा कोरून उंच व उठावाची केलेली आहेत. लेखात एकूण ९ ओळी असून प्रत्येक ओळीत साधारणपणे ५० अक्षरे आहेत. अक्षरे मोठी, जाड व ठसठशीत आहेत. प्रत्येक अक्षराची उंची साधारणपणे एक इंच व रुंदी पाऊण इंच आहे.

या शिलालेखाचा उल्लेख बुलढाणा जिल्हा गॅझेटिअरमध्ये (पृ. ४४३) असून त्या ठिकाणी 'नागरी लिपीतील सुमारे १० ओळींचा दुर्वाच्य (illegible) कोरीव लेख' म्हणून त्याचा निर्देश केलेला आढळतो. या. मा. काळे यांनी 'वऱ्हाडचा इतिहास' या ग्रंथात (पृ. ४१३) त्याचा निर्देश केला असून 'त्यात या घराण्याची तोटक हकीकत आहे,' अशी माहिती दिलेली आहे. 'तो लेख शके १७३१ चा आहे' असे त्यांनी म्हटले ते मात्र बरोबर नाही. 'मध्यप्रांत व वऱ्हाड यांतील कोरीव लेखांची वर्णनात्मक यादी' (द्वितीय आवृत्ती, सन १९१६) या पुस्तकात राय बहादूर हीरालाल यांनी केलेल्या नोंदीत (पृ. १४०) या शिलालेखात आलेला कालविषयक उल्लेख, शके १७२२ असा बरोबर नमूद केलेला आहे. पण या लेखात 'देवळाच्या निर्वाहासाठी विकत घेतलेल्या अनेक खेड्यांची नावे नमूद केलेली आहेत' असे त्यांनी म्हटले आहे, ते मात्र बरोबर नाही.

### वर्णन

शिलालेखाच्या एकूण ९ ओळींपैकी पहिल्या सात ओळी मराठी गद्यात असून शेवटच्या दोन ओळींत एक संस्कृत श्लोक आलेला आहे. अक्षरे स्वच्छ

व स्पष्ट असली तरी **प** आणि **य** या अक्षरांचे वळण सारखेच आहे. काही ठिकाणी **ब** साठी **व** कोरलेला आढळतो. उदा. मेमिनावाद, ओ. ४ ; दरोवस्त (ओ. ५). **श** हे अक्षर भिन्न प्रकारांनी लिहिले आहे. उदा. **शुभ** (ओ. १), **शुद्ध** (ओ. ७), **शुक्ल** (ओ. ८), यातील **श** पाहा; व शालीवाहन (ओ. ७, ८), **दशमके** (ओ. ८), **धर्मशाळा** (ओ. ६) इत्यादी शब्दांतील '**श**' चे लेखन पाहा. पहिल्यातील **श** हा **श्री**तील **श** सारखा आहे; तर दुसऱ्यातील **श** आजच्या **श** सारखा आहे, पण तो कोरताना त्याचा पूर्वभाग उभ्या दंडासारखा कोरला गला आहे.

सामान्यपणे अक्षरे काळजीपूर्वक उठवलेली आहेत ; तथापि काही ठिकाणी **घ** व **ध** मधील फरक स्पष्ट झालेला नाही. धरणगाव (ओ. २), **धर्मशाळा** (ओ. ६), या शब्दांतील **ध** हा **घ** सारखा दिसतो. ५ व्या ओळीत 'कुळकर्ण' शब्दांतील **ण** चा दंड कोरण्याचे राहून गेले.

लेख मराठी-संस्कृत मिश्र भाषेत आहे. शेवटी आलेला संस्कृत श्लोक सोडून बाकीचा सर्व भाग मराठीत आहे. कृतं (ओ. १), एवं, पंच (ओ. २) यांसारखे संस्कृत शब्द मधून मधून आलेले आहेत. लेखातील मराठी भाषेवर फारसी भाषेची छाप आहे, ती तत्कालीन मराठीच्या स्वरूपाला धरूनच होय. प्रगणे, मजकूर, पान्हेरमये, मजरे, खरीदि, मौजे, सर्कार, सुभे, मुकदमी इत्यादी शब्दांच्या उपयोगावरून हे दिसून येईल. येकुन, निमित्य या शब्दांची रूपे व संपूर्ण लेखाचे अनुच्चारित अनुस्वार वगळून केलेले लेखन लक्षात घेण्यासारखे आहे. संस्कृत श्लोकाची रचना शुद्ध आहे. 'माघसिते' आणि 'शुक्लके' या शब्दांमुळे झालेली पुनरुक्ती मात्र सदोष वाटते.

**कालनिर्देश**

लेखाचा काळ शालीवाहन शके १७२२ रौद्रनाम (संवत्सरे) माघ शुद्ध १०, फसली सन १२१० असा ओ. ७ व ८ मध्ये आलेला असून हाच काळ त्यानंतर आलेल्या संस्कृत श्लोकात नमूद केला आहे. त्यात शनिवार (शनौ) असा वाराचाही स्पष्ट उल्लेख आहे. संस्कृत श्लोकात शककाल नमूद करताना 'द्विद्व्यद्रिगोत्रामिते' असे संकेत वापरले आहेत. द्वि (२), द्वि (२), अद्रि (७), गोत्र (१) हे आकडे 'अंकानां वामतो गतिः' या नियमाप्रमाणे वाचले म्हणजे १७२२ हा आकडा येतो. मराठी कालनिर्देशात तोच आकडा दिलेला आहे.

विषय

शिलालेखाचा उद्देश हरबाजी गोविंद गोवर्द्धन यांनी पायाघाटच्या 'वराड' प्रांतातील महाशुभस्थान मलकापूर येथे भट आळीत, लोकांनी दर्शन घेऊन सुख पावावे या निमित्त श्रीरामाचे मंदिर व धर्मशाळा बांधल्याचा उल्लेख करण्याचा आहे. २ ते ६ ओळींत या हरबाजीविषयी त्रोटक माहिती दिलेली आहे. हरबाजी गोविंद गोवर्धन यांची प्राचीन वृत्ती ज्योतिष्याची, म्हणजे जोशीपणाची. धरणगाव, कुंड, लेहे, हिंगणे व तांदुळवाडी या पाच गावांचे जोसपण त्यांच्याकडे परंपरागत होते. याशिवाय पान्हेर व त्यामध्ये अंतर्भूत असलेले वाहापूर हे एक आणि दुसरे अन्वराबाद, अशा दोन गावांचे, म्हणजे एकूण तीन गावांचे पांडेपण त्यांनी स्वतः नवीन संपादन केले होते. त्याचप्रमाणे त्याच प्रांतातील चांदूर परगण्यातील मेमिनाबादचे पांडेपणही त्यांनी मिळविले होते. याशिवाय बालाघाट प्रांतात (सर्कार= जिल्हा नांदेड, सुभे महमदाबाद) 'भेटे' या गावाची मुकदमी (पाटिलकी) व कुळकर्ण, तसेच लामजणे या गावाचे कुळकर्णीपण व जोसपण, अशी या दोन गावांची वृत्तीही त्यांनी आपल्या हाताने विकत घेतली होती. त्यांनीच मलकापूर येथे जागा विकत घेऊन त्या ठिकाणी श्रीरामाचे मंदिर व धर्मशाळा शके १७२२, रौद्रनाम संवत्सर, माघ शुद्ध १० शनिवार रोजी बांधून पूर्ण केली.

या शिलालेखात उल्लेखिलेले हरबाजी गोविंद गोवर्धन हे मलकापूरचे राजे नेमिवंत म्हणून प्रसिद्ध असलेल्या घराण्याचे मूळ पुरुष होत. हे मूळचे धरणगाव (ता. मलकापूर, जिल्हा बुलढाणा) येथील राहणारे असून आरंभी साधे भिक्षुक होते. आपल्या कर्तृत्वाने त्यांनी इतर गावांची भिक्षुकी, पाटिलकी व कुळकर्णीपण संपादन करून लौकिक मिळवला. वृत्तीने धार्मिक असल्यामुळे त्यांनी मलकापूर येथे एक धर्मशाळा व त्या धर्मशाळेत श्रीरामाचे मंदिर बांधले. हे मंदिर आपले मूळ गाव 'धरणगाव' येथे न बांधता 'मलकापूर' येथे बांधले. त्याचे एक कारण असे दिसते की, 'मलकापूर' हे 'महाशुभ स्थान' असून त्याला 'अलकासंनिभ' (अलका नगरीसारखे शोभिवंत) म्हणून संबोधले आहे. (ओ. ९) 'मलकापूर' या नावाचा संबंध लोकवार्तेत 'मलिक काफूर' शी जोडतात, पण तो पूर्णपणे चुकीचा आहे. 'मलिक काफूर' चा या गावाशी संबंध असल्याचे आढळत नाही. कित्येक जण असे सांगतात की, हे गाव खानदेशातील फारुकी घराण्यातील मीरन घनी अदिल खान राजाने वसवले असून आपली मुलगी 'मलिका' हिचे नाव त्या गावाला दिले. त्यावरून 'मलकापूर' हे नाव पडले. ऐतिहासिक दृष्टया हेही बरोबर नाही.

(बुलढाणा जिल्हा गॅझेटिअर, पृ. ४४२ पाहा). शिवाय, तसे असते तर त्या मुसलमान राजाने स्वतः आपल्या मुलीच्या नावापुढे 'पुर' हा संस्कृत शब्द जोडला असता असे वाटत नाही. वस्तुस्थिती अशी दिसते की, मलकापूर येथे 'मल्लिके' चे फार जुने देवस्थान आहे. मल्लिकार्जुनाचेही तेथे एक जुने देवालय आहे. त्यावरून मल्लिका+पुर=मल्लिकापूर असे या गावाचे नाव पडले असावे. 'मलकापूर' हा त्याचाच अपभ्रंश होय. या देवतांच्या स्थानामुळेच हे गाव 'महा शुभ स्थान' समजले जात असावे ; आणि म्हणूनच हरबाजी गोविंदाने श्रीरामाचे देऊळ या गावी बांधले असावे.

हे देऊळ बांधल्यानंतर हरबाजींचा लौकरच विशेष उत्कर्ष झाला. त्यांना निजामुल्मुल्काकडून देवधाबे, माकोडी, सावरगाव, चावर्धा व कमर्दीपूर या पाच गावांची जहागीर व राजे नेमिवंत ही पदवी मिळाली. (या. मा. काळे, वऱ्हाडचा इतिहास, पृ. ३१२ व ४१३ पाहा). यांपैकी कमर्दीपूर या गावाचे संपूर्ण उत्पन्न हरबाजींनी रामाच्या देवळाला लावून दिले होते. ते इ. स. १९४८ पर्यंत चालू होते. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर जहागिऱ्या काढून टाकण्यात आल्यावर सरकारकडून कमर्दीपूरच्या उत्पन्नाच्या मोबदल्यात या राममंदिराला वार्षिक १,६४० रुपये खर्चाप्रीत्यर्थ आज मिळतात. देवळाची वहिवाट मात्र अजूनही नेमिवंताच्या घराण्याकडेच आहे. नेमिवंतांचे वंशज सध्या हैद्राबाद (आंध्र) येथे राहतात.

या शिलालेखातील सर्व गावे आजही विद्यमान आहेत. 'मलकापूर' हे बुलढाणा जिल्ह्यातील तालुक्याचे ठिकाण असून ते मध्य रेल्वेवर आहे. मलकापूरच्या उत्तरेस सडकेने दोन मैलांच्या अंतरावर कुंड, तिसऱ्या मैलावर धरणगाव व पाचव्या मैलावर तांदुळवाडी ही गावे आहेत. धरणगावच्या पश्चिमेला एका मैलावर नळगंगा नदीच्या काठी 'लिहा' या नावाने ओळखले जाणारे सध्या ओसाड असलेले गाव हेच शिलालेखातील 'लेहे' गाव होय. धरणगावच्या पश्चिमेला तीन मैल अंतरावर हिंगणे गाव असून ते सध्या हिंगणे-काजी म्हणून ओळखले जाते. पान्हेर म्हणजे सध्याचे पान्हेरा ; मलकापूरच्या ईशान्येस १ मैल. त्याच्याच जवळ बाहापूर गाव आहे. शिलालेखात आलेले अन्वराबाद म्हणजे आजचे अनुराबाद, मलकापूरच्या ईशान्येस दोन मैलांवर असून त्याच दिशेने पाच मैलांवर असलेले मोमिनाबाद म्हणजे शिलालेखातील मेमिनाबाद होय. मेमिनाबाद गाव चांदूर परगण्यात होते. हे चांदूर म्हणजे मलकापूरच्या पूर्वेस मध्य रेल्वेच्या ५०९ किलोमिटरवरील बिस्वा ब्रिज हे गाव होय. या गावाचे मूळ नाव चांदूर. विश्वगंगेच्या

काठावर वसलेले असल्यामुळे त्याचा 'चांदूर बिस्वा (विश्व)' असे म्हणतात. 'विश्व (बिस्वा) गंगा' नदीवर रेल्वेपूल (ब्रिज) बांधला गेल्यापासून सरकारी अधिकारी या गावाला 'बिस्वा ब्रिज' म्हणून संबोधू लागले. रेल्वेच्या वेळापत्रकात तेच नाव आता रूढ झाले आहे. गावाची मूळ नावे मागे पडून नवीन नावे कशी रूढ होतात याचे हे चांगले उदाहरण आहे. चांदूर (बिस्वा) हे सध्या लहान खेडेगाव असले तरी सुमारे दोनशे वर्षांपूर्वी परगण्याचे मुख्य ठिकाण होण्यासारखे मोठे असले पाहिजे. हे गाव बरेच जुने आहे. राष्ट्रकूट नृपती चतुर्थ गोविंद याच्या अंदूरा ताम्रपटात 'चन्द्रपुरी' या नावाने त्याचा उल्लेख आढळतो. भोवतालच्या गावातील इतर काही ब्राम्हणांबरोबर चन्द्रपुरी (चांदूर) येथील 'सण्वैभट्ट' नावाच्या भारद्वाजगोत्री ब्राम्हणाला पयोष्णी नदीवरील 'एलउरी' (एरळी) गाव दान दिल्याचा निर्देश त्या ताम्रपटात आहे. (विदर्भ संशोधन मंडळ, वार्षिक १९६२, पृ. १७ पाहा).

ही सर्व गावे पायाघाटच्या वराड प्रांतातील होत. बुलढाण्याच्या अजिंठा पर्वताच्या उत्तरेकडील भाग हा 'पायांघाट' (पर्वताच्या पायथ्याकडील घाट) म्हणून ओळखला जात असे,[1] दक्षिणेकडील उंच डोंगराळ भागाला बालाघाट (बाला=उंच भाग. पर्वताच्या उंच भागावरील घाट) म्हणत. 'भेटे' हे बारशी-पंढरपूर रेल्वेवरील निवळी स्टेशनापासून सुमारे चार मैल अंतरावर आहे. आज त्याला 'भेटगाव' म्हणतात. त्याच गावाजवळ लामजणे गाव विद्यमान आहे. ही गावे पूर्वी नांदेड सर्कारात (जिल्ह्यात) अंतर्भूत होत असून, नांदेड जिल्हा बालाघाटात मोडत असावा असे दिसते. नांदेड सर्काराच्या ज्या महमदाबाद सुभ्यात ही गावे मोडत ते महमदाबाद म्हणजे आजचे बिदर शहर होय. अहमदशाह वली बहामनी याचा दुसरा मुलगा 'महमद' हा बीदरचा सुभेदार होता. त्याच्याच नावावरून बीदरला महमदाबाद हे नाव हिजरी सन ८२७ (इ. स. १४२३) च्या सुमारास ठेवले गेले होते. (एपिग्राफिया इंडो-मोस्लेमिका १९३१-३२, पृ. २७ पाहा).

---

१ 'पायांघाट' चा उल्लेख अनेक मुसलमानी शिलालेखांत 'पायांघाट बरार' म्हणून येतो. उदा. 'ब सुबेदारी ए दकन सिवाय खानदेश व बरार पायांघाट ब मुअय्यब गश्त' (Mathirul--Umra, Vol. II, p. 56; याशिवाय याच ग्रंथातील पृ. ६६ व ९८ पाहा).

## वाचन

॥ श्रीराम ॥

१. स्वस्ति श्रीमहाशुभस्थाने क[१] ०॥ मलकापुर प्रांत वराड पायाघाट हे स्थानी भट आळीत राममंदिर कृतं ह–
२. स्ते हरबाजी गोविंद गोवर्द्धन प्राचीन वृत्ति ज्योतिषी मौजे[२] घ(ध) रणगाव व कुंड व लेहे व हिंगणे व तांदुळवाडि एवं पं–
३. चग्रामी प्रा मार[३] नूतन संपादित स्वहस्ते पांडेपण दोन ग्राम मौजे पान्हेरमये[४] हरदो[५] मजरे[६] येक बाहापुर व अेक अन्वराबा(द)
४. येकुन ३ पा मार[७] व मौजे मेमिनावा(बा)द पा[८] चांद्र(दू)र प्रांत मार[९] व दोन ग्रामवृत्ति प्रांत बालाघाट स्वहस्ते खरीदि मौजे भेटे येथील (मु)–
५. कदमी[१०] व कुळकर्ण दरोव(ब)स्त[११] व मौजे लामजणे येथील कुळकर्ण(र्ण) ब(व) ज्योतिष्प(ष्य) दरोबस्त अैसा सर्कार[१२] नांदेड सुभे महमदाबाद हे

---

१ कसबे या शब्दाचा संक्षेप.

२ मौजे=खेडे.

३ प्रा मार=प्रगणे मजकूर, या शब्दाचा संक्षेप.

४ मये=बरोबर.

५ हरदो=दोन्हीही.

६ मजरे=अंतर्भूत. या संपूर्ण वाक्याचा अर्थ असा : पान्हेर या खेड्याबरोबर (खेड्यात) अंतर्भूत झालेली, एक बाहापुर व एक अन्वराबाद, ही दोन्ही गावे; अशी एकूण तीन गावे.

७ परगणे मजकूर, या शब्दाचा संक्षेप.

८ परगणे या शब्दाचा संक्षेप.

९ मजकूर या शब्दाचा संक्षेप.

१० मुकदमी=पाटीलकी.

११ दरोबस्त=पूर्णपणे, सर्व.

१२ सर्कार=जिल्हा.

६. स्थळ स्वहस्ते श्रीजीचे कृपे खरीद करून राममंदिर व धर्म[शा]ळा श्रीजी-
प्रीत्यर्थ सिद्ध केली की लोगी ये स्थळी श्रीजीचे दर्षण घेउन

७. सुख पावावे ये निमित्य हे कार्य श्रीजीचे आपले नित्य सये केली कर्त्ता करविता
श्रीराम शालीवाहन शके १७२२ रौद्रनाम म(मा)घ शुद्ध १० सन

८. १२१० फसली ।। श्ले(श्लो)क ।। प्रासादो नृपशालिवाहनशके द्विह्या(द्व्या)
द्रिगोत्रामिते ।। रौद्रे माघसिते तिथौ दशमके ब्राह्मे शनौ शुक्लके ।। चक्रे श्री–

९. मलकापुरे निजगृहाद्व(द्दू)रे(ऽ*)लकासंनिभे ।। श्रीगोवर्धन नामकेन हरिणा
सीतापतेः कौतुकात(त्) ।।१।। श्रीरामजयराम जय

● ● ●

# २६

## पवईचा शिलालेख

**उपलब्धी**

'पवई' हे गाव मुंबई शहराच्या उत्तरेस सुमारे सतरा मैलांवर आहे. तेथील तलाव कोरडा पडला असताना पवई-खोतीचे व्यवस्थापक श्री. श्री. ना. परांजपे यांना प्रस्तुत शिलालेखाची शिळा आढळली. पण ती शेवाळाने माखलेली असल्यामुळे तिच्यावरील अस्पष्टशा अक्षरांवरून त्यांना काही अर्थ-बोध होईना. त्यांच्या मृत्यूनंतर पवई इन्स्टिटयूटच्या ग्रंथालयात काम करणारे त्यांचे पुत्र श्री. ह. श्री. परांजपे यांनी त्याच संस्थेतील डॉ. द. वि. जोग आणि डॉ. श्री. मो. खोपकर यांच्याकडून तो साफ करवून घेतला. त्यानंतर या शिलालेखाच्या उपलब्धीसंबंधीची माहिती प्रथम टाइम्स ऑफ इंडिया, महाराष्ट्र टाइम्स आणि नवभारत टाइम्स या तीन वृत्तपत्रांत १४ डिसेंबर १९६४ मध्ये प्रसिद्ध झाली. त्यानंतर फेब्रुवारी १९६५ च्या 'नवनीत' नामक मराठी डायजेस्ट-मध्ये श्री. श्री. म. सहस्रबुद्धे यांनी एक सविस्तर निवेदन प्रसिद्ध केले. प्रस्तुत शिलालेखावर डॉ. मो. गं. दीक्षित यांनी तारीख ४ मार्च १९६५ रोजी पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळाच्या पाक्षिक सभेत एक निबंध वाचला. तो अजून प्रसिद्ध झालेला नसला तरी त्या संबंधीची माहिती तारीख ६ मार्च १९६५ च्या लोकसत्तेत प्रसिद्ध झाली आहे. याच विषयावर प्रस्तुत लेखकाने उमरावती येथील विदर्भ महाविद्यालयातील इतिहास मंडळात एक निबंध वाचला. त्याचा सारांश तारीख २० मार्च १९६५ च्या 'महाराष्ट्र टाइम्स' च्या अंकात प्रसिद्ध झालेला आहे. प्रस्तुत शिलालेख संपादन करून आज येथे प्रसिद्ध करीत आहे.

**वर्णन**

प्रस्तुत लेखाची शिळा सुमारे दोन फूट उंच असून पंधरा इंच रुंद आहे. वरच्या अर्ध्या भागातील कोरीव चौकोनात डाव्या बाजूला, भोवतालचा भाग कोरून काढून, पेटीप्रमाणे दिसणाऱ्या बैठकीवर शंकराची पिंड असून त्यासमोर उजव्या बाजूला, आपल्या डाव्या खांद्यावर कावड घेतलेल्या मनुष्याची

उभी मूर्ती आहे. त्याखाली, शिळेच्या अर्ध्या भागात प्रस्तुत शिलालेख कोरलेला आहे. त्याच्या एकंदर ओळी सात असून प्रत्येक ओळीत साधारणपणे बारा ते चौदा अक्षरे आहेत. अक्षरे ठसठशीत आहेत. प्रत्येक अक्षराची उंची सुमारे एक इंच आहे.

**लेखाची भाषा व अक्षरवटिका**

प्रस्तुत लेखासंबंधी प्रथम माहिती प्रसिद्ध करण्यात आली त्यावेळी तो संस्कृतमध्ये असल्याचे सांगण्यात आले. श्री. सहस्रबुद्धे यांच्या निवेदनात पहिल्या सहा ओळी संस्कृतमध्ये असून त्यात मराठीचे मिश्रण आहे, असे म्हटले आहे. वस्तुतः हा संपूर्ण शिलालेख मराठीत आहे. 'ग्रामांते' 'होत्वा' यासारखी एकदोन शब्दांची रूपे संस्कृतच्या वळणावर गेलेली आहेत, एवढेच. आरंभी आलेले **स्वस्ति श्री** हे शब्द संस्कृत मानण्याचे कारण नाही. कारण लेखाचा किंवा पत्राचा शुभारंभ करण्यासाठी म्हणून मराठीत ती आत्मसात झाली आहेत.

अक्षरांचे वळण प्राचीन आहे. **ए** या अक्षराच्या वळणावरून तो चौदाव्या किंवा पंधराव्या शतकातील असावा असे डॉ. मो. गं. दीक्षित म्हणतात. माझ्या मते शिरोरेषायुक्त इंग्रजी 'व्ही' च्या आकाराचे **ए** चे हे वळण निश्चित चौदाव्या किंवा पंधराव्या शतकापूर्वीचे आहे. शके ९८२ च्या दिवे-आगर ताम्रपटात, शके १०६६ च्या उदयादित्यदेव याच्या आंबे शिलालेखात, त्याचप्रमाणे शिलाहार हरिपालदेव याचा रांजली शिलालेख (शके १०७०), नेवासे येथील कर्णेश्वराचा शिलालेख (शके ११६१), पैठण येथील सोमेश्वर देवाचा शिलालेख, राजपुरी येथील सोमनाथ देवाचा शिलालेख इत्यादी अनेक प्राचीन ताम्रपटांत व शिलालेखांत ए या अक्षराचे वळण प्रस्तुत शिलालेखातील वळणाप्रमाणे त्रिकोणाकृतीच आहे. शिलालेखाच्या प्राचीनत्वाचे ते एक प्रमाण मानायला हरकत नाही. माझ्या मते प्रस्तुत शिलालेख शिलाहार कालीन होय.

प्रस्तुत शिलालेखातील **इ** या अक्षराचे चिन्ह हेही त्याच्या प्राचीनत्वाचे द्योतक होय. **इ** साठी दोन पोकळ शून्ये व त्याखाली उकाराचे चिन्ह या लेखात वापरलेले आहे. (ओळ ५) हे चिन्ह म्हणजे लेखाच्या प्राचीनत्वाचे स्पष्ट गमक होय असे डॉ. शं. गो. तुळपुळे म्हणतात. (प्राचीन मराठी कोरीव लेख : प्रस्तावना—पृ. ५० पाहा.)

पोंवै या शब्दातील **वै** कोरताना पृष्ठमात्रेचा उपयोग केलेला आहे.

**विषय**

पोंवै (पवई) गावाच्या सीमेवर श्रीनागुजेश्वर देवपतीच्या बावे (विहिरी)-निमित्त एक शेत लावून दिल्याचा निर्देश, हा या शिलालेखाचा विषय होय. जो हे शेत चाळील म्हणजे लागवडीला आणिल त्याने देवाचे द्रव्य (देवाला दिलेले, अर्पण केलेले द्रव्य) व या शेताचे उत्पन्न खावे. ही आज्ञा जो लोपी =लोपवील, मोडेल तो श्वान, गर्दभ किंवा चांडाळ होऊन आपल्या आईवर येईल, असे गद्धेगाळीचे शापवचन लेखाच्या शेवटी आलेले आहे.

शिलालेखाची शेवटची ओळ खराब झालेली असल्यामुळे तिचे वाचन शंकास्पद आहे, हे नमूद केले पाहिजे.

**वावा=शेत**

प्रस्तुत शिलालेखातील **वावा** हा शब्द आज प्रचलित नाही. शब्द-कोशातही तो आढळत नाही. डॉ. मो. गं. दीक्षित यांनी त्याचा अर्थ विहीर असा केला होता. माझ्या मते वावर, शेत या अर्थाने तो योजिलेला आहे. वावा आणि वावर ही एकाच शब्दाची भिन्न रूपे असावीत. मराठीत अन्यत्र हा शब्द अद्याप मला आढळला नाही. प्रस्तुत शिलालेख शिलाहार-कालीन होय हे आपण पाहिले आहे. शिलाहार नृपती छित्तराजाचा नातू मुम्मुणि याने दिलेल्या ठाणे ताम्रपटात[1] हा शब्द आलेला आहे. एक विशिष्ट प्रकारचे शेत या अर्थाने तेथे तो वापरलेला दिसतो. मूळ मराठी शब्द **वावा** असून त्याचे संस्कृतीकरण **वावक** असे झालेले आढळते. या ताम्रपटातील पुढील उदाहरणे पाहा.

(१) दक्षिणतो वटुकेशवैयसत्क **वावकः** (ओळ १०२)

(२) पूर्व्वतो विष्णुनारायणदेवसत्क **वावकः** (ओळ ११६)

याशिवाय प्रस्तुत ताम्रपटाच्या १५८, १५९, १६६ या ओळींतही हा वावक शब्द आलेला आहे. १६६ व्या ओळीत मुम्मुणीने दान दिलेल्या गावांचा व शेतांचा उल्लेख 'एवं चतुराघाटनोपलक्षिता ग्रामास्तथा वावकाश्च सवृक्ष-मालाकुलाः' असा केलेला आहे. त्यावरून वावक=शेत असा अर्थ दिसून येईल. संस्कृत वावक, मराठी वावा. हा मराठी शब्दही या ताम्रपटात पुढीलप्रमाणे आढळतो.

शूर्प्पारक षष्ठष्ठी (षट्षष्टी) विषयान्तष्पाति पेढालग्रामान्तर्व्वर्त्ति माझिल **वावा**क्षेत्रं (ओ. १५७–१५८)

---

१ डॉ. वा. वि. मिराशी, संशोधनमुक्तावलि, सर चौथा. पृ. ११५–१४१.

यात **वावाक्षेत्र** म्हणजे वावा प्रकाराचे क्षेत्र, ज्यात वावा पिकतो ते क्षेत्र असा अर्थ दिसतो. अशी क्षेत्रनामे या ताम्रपटात अनेक आली आहेत, उदाहरणार्थ, कुसुम्भोलि क्षेत्र (ओळ १३३), चणेवटी क्षेत्र (ओळ १३७) इत्यादी. **संस्कृतात** वावक: म्हणजे तुळस, दवणा, मरवा इत्यादी सुगंधी वनस्पती, असा शब्द आहे. त्यावरून वावा शब्द आला असणे शक्य आहे. तसे असल्यास वावा=सुगंधी वनस्पती ज्यात वाढतात असे शेत.

शिलाहार वंशातील अपरादित्य द्वितीय याच्या लोनाड शिलालेखातही वावा शब्द आलेला आहे. या लेखाच्या बाराव्या ओळीच्या आरंभीची काही अक्षरे, त्या शिलालेखाचे प्रथम संपादक डॉ. मो. गं. दीक्षित यांना लागली नाहीत. डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी ती 'निजवादी दीन्हला' अशी वाचून निजवादी शब्दाचा अर्थ देताना प्रश्नचिन्ह घातले आहे. माझ्या मते हा शब्द 'निज वावा' (आपले शेत) असा आहे. लेखाच्या ठशावरून **दी** असे वाचलेले अक्षर वस्तुत: **वा** असे आहे. एक तर त्या अक्षरावर **इकारदर्शक** वेलांटी नाही, जे बारीक चिन्ह दिसते ते शिळेला त्या ठिकाणी उडालेल्या बारीक खपलीमुळे. आणि मुख्य गोष्ट अशी की, **द** सारखे दिसणारे हे अक्षर **व** असे आहे. आठव्या ओळीत अपरादित्यदेव आणि देवाय असे शब्द आलेले आहेत. त्यातील **व** हे अक्षर पाहावे. ते दिसते **द** सारखे, पण आहे **व**. त्याचप्रमाणे निजवादा शब्दातील **व** हा **द** सारखा दिसत असला तरी **व** आहे. तेव्हा हा शब्द **वावा** असल्याचे दिसून येईल.[1] (तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख, पृ. ७५.)

शके ११५० मधील खोलेश्वराच्या 'आंबे' शिलालेखातील (प्राचीन मराठी कोरीव लेख, पृ. १२३) एकेचाळिसाव्या ओळीत **सालिवावी** १ असा उल्लेख आलेला आहे. त्याचा अर्थ डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी साळीचे किंवा भाताचे शेत असा दिलेला आहे. (शब्दसूची पृ. ४४२) अर्थात, **वावी**=शेत, हा अर्थ त्यांना अभिप्रेत आहे, यात शंका नाही. या ठिकाणी सुद्धा 'सालि वावी' असा शब्द डॉ. तुळपुळे यांनी वाचला असला तरी मुळात तो 'सालिवावा' असल्याचे दिसून येईल. या शिलालेखात दीर्घ ईकाराचे वळण पाहावे,

---

१ याच लोनाड शिलालेखाच्या नवव्या ओळीतील आरंभीचा शब्द डॉ. तुळपुळे यांनी वाटक असा वाचला आहे. पण त्याचे वाचन **वावक** असे करणे अधिक बरोबर होईल. शिलालेखातील **व** अक्षर स्पष्ट आहे. या ठिकाणीही वावक शब्द वावा या मराठी शब्दाचे संस्कृत रूप होय.

विशेषत: चाळिसाव्या ओळीत 'गावी' या शब्दातील दीर्घ **वी** पाहावी. सालिवावी शब्दातील **वी**चे वळण तसे नाही. तेथे मूळ अक्षर **वा** असेच असावेसे वाटते. आणि म्हणून तो शब्द **सालि वावा** असा वाचला पाहिजे. तात्पर्य असे की, प्राचीन मराठीत शेत या अर्थाने वावा शब्द प्रचारात होता. तो जसा कोकणपट्टीत वापरला जात होता तसा मराठवाड्यातील आंबेजोगाई या प्रदेशात देखील वापरला जात होता.

**निवालु=द्रव्य**

'वावा' शब्दाप्रमाणेच 'निवाल' हा एक अपरिचित शब्द या शिलालेखात आलेला आहे. याचा अर्थ द्रव्य असा असावा, असे संदर्भावरून वाटते. जो हे शेत लागवडीला आणील तो देविका म्हणजे देवाचा, देवाची पूजाअर्चा करणारा मनुष्य निवालु=उत्पन्न, त्यातून मिळालेले द्रव्य खाईल. देविका हे निवालुचे विशेषण घेतले तर देवासंबंधीचे, देवाचे (देवाला वाहिलेले) द्रव्य, देवाचे उत्पन्न खाईल, असा अर्थ दिसतो.

या अर्थाने निवाल शब्दाचा उपयोग हल्ली प्रचारात नाही हे खरे असले तरी पूर्वी तो उपयोगात आणला जात असावा असे वाटते. 'झुंझारराव देशमुख यासी इसाफती अजरामऱ्हामतीबद्दल निवाले दिधला असे' (रा. १, पृ. ३५) असे एक अवतरण श्री. य. न. केळकर यांनी आपल्या ऐतिहासिक शब्दकोशात (भाग १, पृ. ७३७) दिले असून 'निवाले' शब्दासमोर प्रश्नचिन्ह घातले आहे. संदर्भावरून त्याचा अर्थ द्रव्य, रोकड पैसा असा असावासे वाटते. चौकशीवरून हा शब्द फारशी किंवा अरबी नाही असे कळते. तेव्हा हा मूळचा देशी शब्द असावा व तो कोकणपट्टीत त्यावेळी रूढ असावा असा तर्क करण्याला हरकत नाही.

**सली=इच्छा, आदेश**

'सली' हा एक तिसरा विवाद्य शब्द या लेखात आला आहे. त्याचा अर्थ इच्छा, आदेश असा असावा. ईर्षा, इच्छा या अर्थाने सळ शब्द पूर्वी योजला जात होता. उदाहरणार्थ, "सौम्या सवीया सीतळ : परी ध्यानस्ते तीयेचेचि बळ : मलजे मीळोनि सीधी नेती सळ : रसराजाचे" (मूर्तिप्रकाश, २१६८). 'सली' हे सळ(ल) शब्दाचे स्त्रीलिंगी रूप असावे. ए (ही) सली (इच्छा, आज्ञा) जो लोपी (मोडेल) तो—असा एकंदर अर्थ.

### श्री श्रीहप

श्री नागुजेश्वर देवपतीच्या वावेनिमित्त शेत ज्याने दान दिले त्याचा उल्लेख **महासामन्त श्रीसीहप** असा केलेला आहे. हा सीहप कोण? कोकणपट्टीच्या इतिहासावरून असे दिसून येते की, शककालाच्या नवव्या शतकापासून तो बाराव्या शतकापर्यंत या भागावर शिलाहार नृपतींचे राज्य होते. हे शिलाहार राजे आरंभापासून कोणत्या ना कोणत्या तरी वरिष्ठ राज्यसत्तेचे मांडलीक होते. त्यांचा मूळ पुरुष जीमूतवाहन याला 'महासामन्ताधिपती' अशी उपाधी लावलेली असल्याचे त्यांच्या अनेक ताम्रपटांवरून दिसून येते. त्यावरून शिलाहार राजांच्या प्रांताधिकाऱ्यांना किंवा श्रेष्ठ अधिकाऱ्यांना महासामन्त हे बिरुद लावीत असावे. सीहप हा असाच एक श्रेष्ठ अधिकारी असावा.

ठाणे येथील शिलाहार राजवंशातील आठवा पुरुष अपराजित याने शके ९१९ मध्ये दिलेल्या 'भादाणे' ताम्रपटात युद्ध व शांतता मंत्री महासांधिविग्रहिक 'श्रीसीहप' नामक अधिकाऱ्याचा उल्लेख पुढीलप्रमाणे आढळतो: "श्री बिरुदंकराजामात्य श्रीसंगलैये महासांधिविग्रहिक **श्रीसिहपैये** च सति--" (एपि. इंडिका., वर्ष ३, पृ. २७२ ओ. ८५). त्याच वंशातील अकरावा पुरुष छित्तराज याने शके ९४८ मध्ये दिलेल्या भांडुप ताम्रपटातही 'सिहप' नावाच्या अधिकाऱ्याचा उल्लेख आहे. तो असा "सर्व्वाधिकारि श्रीनागणैयसांधिविग्रहिक **श्रीसिहपैयक** कर्ण्णाट सांधिविग्रहिक श्रीकपर्द्दि श्रीकरणादिपंचप्रधानेषु सत्सु–" (इंडि. अँटिक्वेरी: वर्ष ५, पृ. २७६–२८१, ओ. २२) या दोन्ही ताम्रपटांतील श्री सिहप ही व्यक्ती आणि प्रस्तुत पवई शिलालेखातील श्रीसिहप ही व्यक्ती एकच असावी. वरील दोन्ही ताम्रपट ठाणे येथून दिलेले असून पवई हे गाव तेथून जवळ आहे, ही गोष्ट लक्षात घेता याच सिहपाने या शिलालेखात निर्देशिलेले पवई गावाच्या सीमेवरील शेत नागुजेश्वरदेवाच्या विहिरीसाठी दान दिलेले असावे. त्यावेळी ठाणे येथे राज्य करणाऱ्या अपराजित किंवा छित्तराज या शिलाहार राजाचा सिहप हा श्रेष्ठ अधिकारी होता. व म्हणून त्याला सामन्त ही उपाधी दिलेली असावी असे दिसून येते.

### कालनिश्चिती

प्रस्तुत लेखात कालनिर्देश नाही. त्यामुळे इतर अंतर्गत प्रमाणांवरून कालनिर्णय करणे आवश्यक झाले आहे. लेखात सिहप सामंताचा उल्लेख आहे. तो या बाबतीत मार्गदर्शक होऊ शकतो. सिहप नावाचा एक अधिकारी शिलाहार राजे अपराजित व छित्तराज यांच्या दरबारी होता व तोच प्रस्तुत

लेखातील सिहप होय, असे वर दाखविले आहे. त्यांच्या राज्यकालात म्हणजे साधारणपणे ९१९ ते ९४८ च्या दरम्यान, म्हणजे शककालाच्या दहाव्या शतकाच्या पूर्वार्धात केव्हातरी हा शिलालेख कोरला असावा असे निश्चित अनुमान करण्याला हरकत नाही.

शिलालेखातील अक्षरांचे वळण लक्षात घेता ते या अनुमानाला विरोधी नाही, तर उलट पोषक ठरेल असे मला वाटते. ३ हा अंक व ए या अक्षराची धाटणी पाहाता तो (शिलालेख) चौदाव्या व पंधराच्या शतकातील असावा असे डॉ. मो. गं. दीक्षित म्हणतात. एक तर ३ हा आकडा या शिलालेखात कुठेही आलेला नाही. पाचव्या ओळीच्या आरंभीचे अक्षर ३ या आकड्यासारखे दिसते पण वस्तुतः तेथे दोन पोकळ टिंबे असून त्याखाली उकाराचे चिन्ह आहे. (◌ु) आणि ते प्राचीन शिलालेखात आढळणारे इकाराचे चिन्ह होय. याचे विवेचन या पूर्वी केलेले आहे. ए या अक्षराच्या वळणासंबंधीचीही चर्चा तेथे केलेली आहे. या दोन्ही बाबी प्रस्तुत शिलालेखाच्या प्राचीनत्वाची साक्ष देतात. दहाव्या शतकात हे वळण अस्तित्वात असल्याचे इतर शिलालेखां-वरूनही दिसून येते.

## वाचन

**१. स्वस्ति श्री पोंबै ग्रामांते[१] : महासा**
**२. मन्त श्रीसीहपः[२] श्री नागुजेस्वर**
**३. देवाति[३] वा(बा)वे निमिते वावा दीनला [।*] जो हा**
**४. वावा चाली[४](ळी) तो देविका निवालु[५] षा(खा)**
**५. इ [।*] ए[६] सली[६] जो लोपी तो स्वान गई(भ)**

---

१ या पुढील अक्षरे डॉ. मो. गं. दीक्षित, 'ग्रामांतर्गतांसां' अशी वाचतात.

२ डॉ. दीक्षित : 'श्रीहर्षः'

३ डॉ. दीक्षित : 'पानिका'. डॉ. य. खु. देशपांडे यांच्या मते 'प्रतिठाचे निर्मिते' अशी ही अक्षरे आहेत.

४ डॉ. दीक्षित : 'गण्ये'.

५ डॉ. दीक्षित : 'निवासु'. डॉ. य. खु. देशपांडे ही अक्षरे पुढीलप्रमाणे वाचतात : 'ते ठिकानि वास्तु षा'.

६ डॉ. दीक्षित : 'एसणी'; डॉ. देशपांडे : 'ऐसीही'.

६. चांडालु हा वावा वडत[1] होंत्वा (सू)ष्म[2]--
७. ग[3]... (मा)उली[4] उव्वरि[5] आला

---

१ डॉ. दीक्षित : 'रार'. डॉ. देशपांडे : 'वस्तु'.
२ डॉ. दीक्षित : 'स्य(ल)ष्म(क्ष्म)ण'.
३ डॉ. दीक्षित : '(अ)गाणे'.
४ डॉ. दीक्षित : 'राउली'.
५ डॉ. दीक्षित : 'उत्नरिअलां'. डॉ. देशपांडे : 'उपरि'.

● ● ●

# २७

# उमरखेड येथील मराठी शिलालेख इ. स. १६२८

**प्रास्ताविक :**

इ. स. १९७१ च्या डिसेंबर महिन्यात मी उमरखेड येथे गेलो असता तेथील बाजाराला लागून असलेल्या वेशीतील दरवाज्यावर एक मराठी शिलालेख आहे असे कळले. त्याच वेळी मी त्याचे ठसे घेतले. माझ्यापूर्वीही काही जणांनी त्याचे ठसे काढून नेल्याची माहिती मिळाली. पण कोणीही तो अजून वाचला नाही म्हणून सांगण्यात आले. हा लेख वाचून त्यावर कोणी टिपण लिहिल्याचे माझ्या आढळात नाही. त्याचे वाचन पुढे देत आहे.

**वर्णन**

लेखाची शिळा दोन फूट दोन इंच लांब व दहा इंच रुंद आहे. त्यावर दहा ओळींचा लेख देवनागरी–मराठी बाळबोध लिपीत कोरलेला आहे. प्रस्तुत लेख एरवी आढळणाऱ्या मुसलमान काळातील लेखाप्रमाणे उठावाच्या अक्षरात नसून तो कोरलेला आहे, हे विशेष होय. अक्षरे ठसठशीत आहेत. पहिल्या ओळीतील अक्षरे इतर ओळींतील अक्षरांपेक्षा मोठी आहेत. लेख बऱ्याच ठिकाणी खराब झालेला असला, तरी बहुतेक अक्षरे चांगल्या स्थितीत आहेत.

**काळ**

लेखाचा काळ पहिल्या व दुसऱ्या ओळीत पुढीलप्रमाणे दिलेला आहे. 'सके १५५० विभव नाम संवत्सर कार्तिक सुध पंचमि' पहिल्या दोन आकड्यांपैकी ५ या आकड्यावरील काही भाग फुटलेला असल्यामुळे तो १ सारखा दिसतो. पण तो ५ चाच आकडा आहे हे निःसंशय. शके १५५० ला विभव संवत्सर येतो. वार दिलेला नसल्यामुळे पुढील तिथी पडताळून पाहाता येत नाही. शकसंवत्सराचा मेळ बरोबर असल्यामुळे हा कालनिर्देश विश्वसनीय मानायला हरकत नाही. या वर्षी इसवी सन १६२८ होता.

### विषय

'ऊंबरखेड' येथे दाजिबाजि महाराज यांनी कोट व हौद बांधला त्याचा निर्देश करून तो जो पाडील त्याला आण म्हणजे शपथ घातलेली आहे. शेवटच्या ओळीत कोट बांधण्याला दहा हजार रुपये खर्च आल्याचे नमूद केले आहे.

### भाषा

या लेखातील मराठीत 'ल' नाही. त्यासाठी सर्वत्र 'ळ' लिहिला आहे. 'ळ' चा उच्चार 'ल' सारखा होत असावा असे त्यावरून दिसते. मुस्वद, रुके, हजार हे परकी शब्द मराठीत रूढ झाले होते. 'खादिळियाचि' हे जुन्या मराठीतील रूपही अभ्यासकांचे लक्ष वेधून घेईल.

### चर्चा

आजच्या उमरखेडचा उल्लेख **ऊंबरखेड** असा केलेला आहे, तो लक्षात घेण्यासारखा आहे. सं. उदुंबर चे ऊंबर हे मराठी रूपांतर होय. इ. स. १६२८ मध्ये तेथे दाजिबाजी महाराज हे कोण होते ते सांगता येत नाही. तेथील ते अधिकारी असावेत. त्यांनी 'कोट मुस्वत केला' म्हणजे तयार केला, अर्थात बांधला. मुस्तअद म्हणजे तयार असा मूळ शब्द असावा. 'मुस्वत' हे त्याचेच रूपांतर असावे.

कोट पाडील त्याला शपथ घातली आहे. अपराधी मुसलमानासाठी स्वतंत्र शपथ घातली आहे. मुसलमान असून म्हणजे मुसलमानाने जर कोट पाडला तर त्याला मक्केमध्ये डुक्कर मारल्याचे पाप लागेल. मुसलमान लोक डुकराला अपवित्र मानतात. अशा प्राण्याचे मांस त्यांच्या पवित्र जागेत, मशिदीत टाकल्याने ती पवित्र जागा भ्रष्ट होते. असे जो करील तो विशेष पापी. यापुढे ४ थ्या ओळीतील शेवटची काही अक्षरे अस्पष्ट आहेत. 'हि' हे अक्षर स्पष्ट दिसते. त्याच्यापुढे 'दु' अक्षर असावे 'हिंदु होउन' असे वाचन करता येते व ते मागील संदर्भाला धरून आहे. मुसलमानांना जशी आण घातली आहे तशी हिंदूनाही स्वतंत्रपणे आण घातली आहे. ती अशी की, हिंदु होऊन म्हणजे हिंदु असून, अर्थात एखाद्या हिंदूने जर कोट पाडला (किंवा पाडण्याचा प्रयत्न केला) तर त्याला त्याने गाय मारून खाल्ल्याचे पाप लागेल. हिंदूंना व मुसलमानांना स्वतंत्र शपथा घालण्याचा हा प्रकार तत्कालीन सामाजिक व राजकीय परिस्थितीचा विचार करताना अवश्य लक्षात घेण्यासारखा आहे.

कोट बांधण्यास लागलेल्या रुक्यांचा खर्च लिहिताना हजार शब्द अक्षरी लिहून त्यापुढे १०,००० हा आकडा घातला आहे. दहा हजार ही संख्या लिहिण्याची ही पद्धत देखील लक्षात ठेवण्यासारखी आहे.

### वाचन

१. सके १५५० विभव नाम संवत्सर का–
२. र्तिक सुध पंचमि [दा] जीबाजि महाराज ऊंबरखेडि कोट
३. मुस्बद केळा असे [।*] जो कोट पाडिळ त्यासि आण मुसेळमा–
४. न होऊन मकेस सोरु मारिलियाचि आण [।*] हिं (दु) होऊन
५. पाडिळ त्याणे गाय मारुन खादिळियाचि आण असे [।*]
६. यास रुके हजार १०,००० ळागळे असत.

# २८

## आकोला येथील शिलालेख

**प्रथम प्रकाशन : वाचन**

आकोला हे शहर मोरणा नदीच्या काठावर दोन्ही बाजूंनी वसलेले आहे. सध्या पश्चिम बाजूस असलेली जुनी वस्ती म्हणजेच मूळचे आकोला शहर. या जुन्या शहरात एक तट आहे. शहराची आगरवेस नावाची एक जुनी वेस आहे. तीच मोकासवेस म्हणूनही ओळखली जाते. या वेशीला एक मोठा दरवाजा आहे. तो दिल्ली दरवाजा म्हणून ओळखला जातो.

या दिल्ली दरवाज्याच्या उत्तरेकडील भागावर एक फारशी शिलालेख आहे, तर दक्षिणेकडील भागावर एक मराठी शिलालेख उठावी अक्षरांत कोरलेला आहे. प्रथम तो 'एपिग्राफिया मोस्लेमिका' नावाच्या त्रैमासिकात (इ. स. १९०७–८ पृ. १७) मध्ये मेजर हेग यांनी प्रसिद्ध केला. मूळ लेखाचे वाचन व इंग्रजी भाषांतर मेजर हेग यांनी सर्वश्री डी. व्ही. भागवत, व्ही. एम. महाजनी (विष्णु मोरेश्वर महाजनी), आणि एस. ए. अधिकारी यांच्याकडून करवून घेतले होते. शिलालेखाबरोबर त्याचा मूळ ठसा छापण्यात आलेला नाही. त्यानंतर 'आकोला डिस्ट्रीक्ट गॅझेटीअर' (इ. स. १९१०, पृ. २९४), व 'वऱ्हाडचा इतिहास' (लेखक : या. मा. काळे, इ. स. १९२४, पृ. ४४३) या ग्रंथांत त्यातील आशयासह या लेखाचा निर्देश केलेला आढळतो. या दोन्ही ठिकाणी लेखकांनी आपली माहिती मेजर हेग यांच्या उपरोक्त लेखावरूनच घेतलेली आहे.

प्रस्तुत शिलालेखाचा ठसा मिळविण्याचा मी खूप प्रयत्न केला. महाराष्ट्र राज्याच्या पुरातत्त्व विभागाकडून हा ठसा घेण्यासाठी तेथे माणसेही पाठविण्यात आली. पण शिलालेख फार उंचावर असल्यामुळे त्यांना ते शक्य झाले नाही. तथापि, आकोल्याच्या इतिहासाच्या दृष्टीने शिलालेख महत्त्वाचा असल्यामुळे त्याचा ठसा घेऊन ठेवणे आवश्यक आहे. या लेखाच्या निमित्ताने महाराष्ट्र राज्याच्या पुरातत्त्व व पुराभिलेख विभागाचे त्याकडे मी पुन्हा लक्ष वेधतो.

### वाचन

हा शिलालेख मराठीत आहे आणि विशेष हे की तो पद्यात आहे. पद्यरचना शार्दूलविक्रीडित वृत्तात आहे. शिलालेखाचे वाचन पुढीलप्रमाणे :

स्वस्ति श्रीनृपशालिवाहन शके सत्रासें पैं अष्टकीं
जी कीं पुण्यतमा पराभव महा संवत्सरा नामकीं ।
त्या वर्षीं शुभस्थान थोर नगरी आकोल नांवें बरी
जेथे संहित साधु संत द्विजही माहानुभावी धुरी ।।१।।
त्या पुण्यश्रीनगरीत उत्तर दिशे लावण्य लावण्यही
केलें द्वार विशाल घाटहि बरा गोंविद आपाजिहीं ।
मोकाशी अधिकार पावन जगी नामेंचि त्या वेसिसी
जाणावें सकलीं सदोदितपणें मोकास वेसी असी ।।२।।

ही श्लोकरचना अगदी साधारण प्रतीची आहे. 'सत्रासें' यातील 'सें' चे दीर्घत्व (श्लो. १, ओ. १), 'प्रभव' या संस्कृत शब्दाचे 'पराभव' असे अपभ्रष्ट रूप (श्लो. १, ओ. २), 'पुण्यश्री' (श्लो. २, ओ. १) यातील एक अधिक अक्षर, इत्यादींमुळे वृत्तदोष बरेच जाणवतात.

### लेखन काल

शिलालेखातील पहिल्याच श्लोकाच्या आरंभीच्या दोन ओळीत 'शके १७०८, पराभव (प्रभव) संवत्सर' असा कालनिर्देश आहे. त्यात महिना, वार वगैरे दिलेली नसल्यामुळे पंचांगावरून तो ताडून पाहता येत नाही. शकसंवत्सरांचा मेळ मात्र बरोबर आहे. या शकाचा इसवी सन १७८६-८७ असा येतो.

आकोला जिल्हा गॅझेटीअर मधील उल्लेखात हा काल इ. स. १८४३ असा नमूद केला आहे. श्री. या. मा. काळे यांच्या 'वऱ्हाडचा इतिहास' या ग्रंथातही (पृ. ४४३) इ. स. १८४३ म्हणूनच या लेखाचा काळ दिलेला आहे. बहुधा त्यांनी तो आकोला जिल्हा गॅझेटीअरमधूनच घेतलेला असावा. तोही अर्थात चुकीचा होय.

### शिलालेखाचा उद्देश

लेखाचा मुख्य विषय, ज्या दरवाजावर हा शिलालेख लावलेला आहे त्याच्या व त्याच्याजवळील घाटाच्या बांधणीचा निर्देश करण्याचा आहे. 'आकोला शहराच्या उत्तरेस एक अतिशय सुंदर व विशाल दरवाजा आणि एक चांगला (बरा) घाट, गोंविद आपाजी नावाच्या कोणा एका अधिकाऱ्याने बांधला.'

त्याला 'मोकाशी' चा अधिकार होता. 'मोकाशी' म्हणजे सरकारमार्फत वसूल जमा करण्यासाठी, किंवा लष्करातील नोकरीच्या अटीवर ज्याला गावे, जमिनी वगैरे दिलेल्या असतात असा सरकारी अधिकारी. 'मोकाशी' किंवा 'मोकासदार' हे आडनाव आजही आढळते. या गोविंद आपाजी मोकाशीनेच ती वेसही बांधली असावी. त्या वेशीलाच त्याने सुंदर व विशाल दरवाजा केला व त्या वेशीजवळच एक चांगला घाटही बांधला. 'मोकाशी' हा अधिकार जगात फार पवित्र मानतात म्हणून ही वेस यापुढे 'मोकाशीवेस' या नावाने ओळखली जावी, असा सरकारी आदेश नमूद करणे हाही या शिलालेखाचा दुसरा उद्देश आहे. या वेशीचे नाव 'आगरवेस' म्हणून श्री. या. मा. काळे यांनी नमूद केले आहे.

### पुण्यक्षेत्र आकोल

या शिलालेखावरून दिसून येते की, 'आकोला' या शहराचे मूळ नाव 'आकोल' हे होय. 'आकोलसिंग' नावाच्या रजपुताने मूळ गाव व किल्ला वसविला व त्यावरून या गावास 'आकोल' हे नाव पडले अशी दंतकथा असल्याचे आकोला जिल्हा गॅझेटिअर मध्ये नमूद केले आहे. लेखातील श्लोकात या शहराला 'शुभस्थान थोर नगरी' तसेच 'पुण्य श्री नगरी' अशी विशेषणे लावली आहेत. त्यावरून त्या काळात म्हणजे अठराव्या शतकात आकोला नगरीला एखाद्या पुण्यक्षेत्राइतके पावित्र्य प्राप्त झाले होते व त्यामुळेच की काय त्या ठिकाणी साधुसंत ब्राम्हण व श्रेष्ठ माहानुभाव एकत्रित होत असत असे दिसून येते. अर्थात, खास आकोला येथे व त्याभोवतालच्या परिसरात श्रेष्ठ साधुसंत त्यापूर्वीपासून राहात असावेत अशी कल्पना करण्यास हरकत नाही.

### साधुसंतांचा वास

प्रसिद्ध साधुपुरुष व संतकवी शिवकल्याण हे मूळचे आंबेजोगाईचे. इसवी सनाच्या सोळाव्या-सतराव्या शतकात ते होऊन गेले. त्यांचा एक मठ आकोला येथे होता. शिवकल्याण यांच्या आकोला येथील मठातील 'रासपंच्याध्यायी' रा. मोडक यांनी वऱ्हाडातील धनिक लोकांच्या मदतीने छापून काढली आहे, अशी माहिती श्री. या. मा. काळे यांनी आपल्या 'वऱ्हाडचा इतिहास' या ग्रंथात (पृ. ३००) नोंदली आहे. त्यावरून संत शिवकल्याणाच्या परंपरेतील साधुपुरुष आकोला येथील त्यांच्या मठात राहात असावेत, त्या निमित्ताने इतर साधुसंत तेथे येत असावेत असे म्हणण्यास हरकत नाही.

त्याचप्रमाणे एकनाथांच्या संप्रदायापैकी तेरावे पुरुष गोविंदनाथ हे आकोला तालुक्यातील 'घुसर' या गावी राहात अशीही माहिती श्री. या. मा. काळे यांनी त्याच ग्रंथात दिली आहे (पृ. २९५). महाराष्ट्रातील दत्त संप्रदायाचे प्रवर्तक श्रीनृसिंह सरस्वती (इ. स. १३७८—१४५८) हे मूळचे आकोल्याजवळील कारंजा या गावचे. त्यांच्यामुळेच कारंजा हे प्रसिद्ध दत्तक्षेत्र बनले. कारंजा हे जैन धर्माचे, मुनींचे व विद्येचेही महत्त्वाचे केंद्र म्हणून फार पूर्वीपासून प्रसिद्ध आहे, हेही लक्षात घेतले पाहिजे. याशिवाय वाशिम, पातूर, मंगरूळनाथ, बार्शी-टाकळी इत्यादी गावेही फार पूर्वीपासून धार्मिकदृष्ट्या प्रसिद्ध आहेत. त्यामुळे तेथे साधुसंतांचा निवास असणे स्वाभाविकच आहे. या अनेक ठिकाणाहून साधुसंत आकोला येथे एकत्रित येत असत एवढे माहात्म्य 'आकोल' या नगरीला त्यावेळी होते यात शंका नाही.

## महानुभावांचा उल्लेख

लेखातील 'जेथे संहित साधुसंत द्विजही माहानुभावी धुरी' या चौथ्या ओळीतील 'माहानुभाव' हा शब्द सर्वसाधारण अर्थाने योजला आहे की महानुभाव संप्रदायाला उद्देशून योजला आहे, हे निश्चित सांगता येत नाही. तथापि, 'साधुसंत' हा शब्द आधी वापरलेला असल्यामुळे पुन्हा त्याच अर्थाने 'माहानुभाव' शब्द वापरला असेल असे वाटत नाही. म्हणून या श्लोकात 'माहानुभाव' शब्द महानुभाव संप्रदायातील साधुसंतांना उद्देशून वापरला असावा असे मानणे हेच अधिक तर्कसंगत वाटते. १८ व्या शतकात महानु-भावासाठी 'मानभाव' या अपभ्रष्ट रूपाऐवजी 'महानुभाव' हा शब्द वापरला जाऊ लागला होता हे निरंजन माधव कवीच्या 'शैव वैष्णव शांभव। सौर गाणपत्य शाक्त महानुभाव। घरी येतां मानिजे देव। भेदमत्सर त्यागोनी।' या ओवीवरूनही दिसून येते. तेव्हा प्रस्तुत शिलालेखातील श्लोकात 'महानुभाव' हा शब्द त्या पंथीयांसाठी वापरला असावा असे मानण्यात हरकत नाही.

## श्रीचक्रधरांचा पदस्पर्श

वस्तुस्थितीच्या दृष्टीनेही तसेच दिसून येते. आकोला शहराच्या भोवतालच्या भागात वर दाखविल्याप्रमाणे, घुसर, मंगरूळ, वाशिम, कारंजा इत्यादी ठिकाणी अन्यपंथीय साधुसंत राहात असत त्याप्रमाणे महानुभावपंथीय साधुसंतही राहात असत. सध्याच्या आकोला जिल्ह्यात महानुभाव पंथाची अनेक तीर्थक्षेत्रे आहेत. महानुभाव पंथाचे प्रवर्तक व महानुभाव साहित्याचे प्रेरणास्थान

असलेले श्रीचक्रधरस्वामी आपल्या 'एकांकी' काळात पातुरडे (पातूर) व आलेगाव या गावी गेले होते. 'पूर्वार्ध' काळात पैठणहून रिद्धपुराकडे जाताना त्यांनी आलेगाव, पातूर, टाकळी (बार्शी-टाकळी), वेळुवन (एळवण), माना, लाखपुरी या गावी, तर परतताना मांगळौर (मंगरूळ) येथे वस्ती केली होती. ही सर्व स्थाने श्रीचक्रधरस्वामींच्या चरणस्पर्शाने पवित्र झालेली आहेत आणि म्हणून महानुभावीयांची गेल्या सातशे वर्षांपासून ती तीर्थक्षेत्रे बनली आहेत. प्राचीन मराठी साहित्यातील आद्य गद्यग्रंथ जो 'लीळाचरित्र' त्यात या तीर्थ-क्षेत्रांना स्थान मिळाले आहे. त्यांतील काही ठिकाणी श्रीचक्रधरस्वामींच्या झालेल्या 'लीळां' नी या आद्य मराठी ग्रंथाला भूषविले आहे. या स्थानांची, तेथील देवळांची व देवतांची माहिती या ग्रंथात सापडते. मराठी साहित्याच्या दृष्टीने आकोला जिल्ह्याची ही अपूर्व देणगी होय.

### आणखी तीन केंद्रे

श्रीचक्रधरस्वामींच्या चरणांनी पवित्र झाल्यामुळे तीर्थस्थाने बनलेल्या वरील गावांशिवाय आकोल्याच्या परिसरात महानुभावांची आणखीही तीन महत्त्वाची केंद्रे होती. एक 'कारंजा' येथे, दुसरे बाळापूरजवळील 'वाडेगाव' येथे, तर तिसरे 'बोरगाव-मंजू' येथे. कवीश्वर आम्नायाचे मूळ पुरुष भास्करभट्ट बोरीकर यांची पुतणी नागाइसा, तिचे शिष्य मुनिबास व त्यांचे शिष्य कमळाकर मुनी; या कमळाकर मुनींनी कारंजा येथे आपला आश्रम स्थापन केला, म्हणून त्यांना कारंजेकर असे म्हणतात. हा आश्रम हे महानुभाव महंतांचे एक महत्त्वाचे केंद्र होते. आजही या गादीला महानुभावपंथात फार मान्यता आहे. दुसरे केंद्र 'वाडेगाव' हे 'सस्ति-वाडेगाव' म्हणूनही ओळखले जाते. तेथे पंधराव्या शतकात महानुभावांचा मठ होता. विश्वनाथबास बाळापूरकर यांनी आपले 'ज्ञानप्रबोध' हे काव्य तेथेच लिहिले. त्यांच्या भेटीला आलेल्या नारोबास बहाळिये यांनीही आपले 'ऋद्धिपूर-वर्णन' हे काव्य सस्ति-वाडेगाव येथे असतानाच लिहिले. या दोन्ही काव्यांना महानुभावांच्या 'साती ग्रंथां'त मानाचे स्थान मिळाले आहे. या दोन्ही महानुभाव काव्यांची निर्मिती आकोल्याच्या परिसरात झाली, ही प्रस्तुत शिलालेखाच्या संदर्भात महत्त्वाची बाब होय.

### वाङमयनिर्मिती

सस्ति-वाडेगावाप्रमाणेच बोरगाव-मंजू येथेही पंधराव्या शतकापासून महानुभावांचे मठ होते. साहित्याचार्य भीष्माचार्य यांचा एक मठ आजही तेथे असून तेथील

पूजाअर्चेचे काम धुळधर घराण्यातील पुजारी पाहातात. भीष्माचार्यांनी सुंदरी लिपीत लिहिलेल्या वाइंदेशकर पाठाच्या अनेक पोथ्यांचा फार मोठा संग्रह त्या ठिकाणी साठसत्तर वर्षांपूर्वीही होता. या वाङ्मयसंपत्तीचे आज काय झाले ते सांगता येत नाही.

चक्रधरचरणांकित स्थाने, कारंजा, वाडेगाव व बोरगाव-मंजू येथील महानुभावीय केंद्रे—या सर्व ठिकाणी तीर्थयात्रेच्या आणि अटनविजनाच्या निमित्ताने महानुभाव संतमहंत, भिक्षुक, वासनिक, इत्यादींचे येणे-जाणे सतत चालू असे, त्यांचे मेळावे भरत ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे प्रस्तुत आकोला शिलालेखातील महानुभावांचा उल्लेख हा त्या पंथातील संतमहंतांचाच असला पाहिजे हे दिसून येते. मेजर हेग यांनी या शिलालेखाचे भाषांतर सर्वश्री भागवत, व्ही. एम. (विष्णु मोरेश्वर) महाजनी आणि अधिकारी या जाणत्या व्यक्तींकडून करवून घेतले होते. या श्लोकातील संबंधित भागाचे भाषांतर त्यांनी पुढीलप्रमाणे केलेले आहे : '....in the blessed and great city of Akol of good fame, where are gathered pious men, and holy men, also Brahmans and leaders of Mahanubhavs....' यात माहानुभावांचा त्यांनी स्वतंत्र उल्लेख केला आहे. त्यावरूनही प्रस्तुत शिलालेखातील 'माहानुभाव' हा उल्लेख महानुभाव संप्रदायातील संतमहंतांचाच होय, यात शंका नाही.

* * *

## परिशिष्ट १

# लेखांची पूर्व-प्रसिद्धी स्थळे

१. **पौनी येथील चार ब्राह्मी कोरीव लेख :** पूर्वी अप्रसिद्ध.

२. **वाई येथील एक जैन शिलालेख :** 'सन्मति '—गुरुकुल दिव्यावदान विशेषांक, १९८३.

३. **वाकाटक देवसेन याचा हिस्से-बोराळा शिलालेख :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९६४.'

४. **द्वितीय प्रवरसेन याचा पौनी ताम्रपट :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९६७.'

५. **द्वितीय पृथिवीषेणाचा माहुरझरी ताम्रपट :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९७१.'

६. **विनयादित्याचा बनावट कासार-शिरसी ताम्रपट :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९६८.'

७. **चालुक्य नृपती विनयादित्य याचा बनावट कोल्हापूर ताम्रपट :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९८२.'

८. **चालुक्य नृपती विजयादित्य याचा कासार-शिरसी ताम्रपट :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९६६.'

९. **धर्मापुरी शिलालेख :** 'भारतीय इतिहास आणि संस्कृती, त्रैमासिक,' वर्ष ९, पृ. ३३.

१०. **जगद्देवाचा राणी सावरगाव शिलालेख :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९७३.'

११. **चालुक्य नृपती सहाव्या विक्रमादित्याच्या काळचे गणेशवाडी शिलालेख :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९६९.'

१२. **राष्ट्रकूट तृतीय गोविंदराजाचा झरिका ताम्रपट :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९५८.'

१३. **राष्ट्रकूट नृपती तृतीय गोविंद याचा नेसरी ताम्रपट :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९५९.'

१४. **राष्ट्रकूट नृपती प्रथम अमोघवर्ष याच्या काळातील मेहूण शिलालेख :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९८४.'

१५. **तृतीय इंद्रराज याचे वजीरखेड येथील दोन ताम्रपट :** 'सन्मती' नोव्हें-डिसें. १९६७.

१६. **अनंतदेव द्वितीय याचा वसई शिलालेख :** 'भारतीय इतिहास आणि संस्कृती', त्रैमासिक, वर्ष ७, पु. २६.

१७. **यादव नृपती द्वितीय सिंघणकालीन भाळवणी शिलालेख :** 'विदर्भ संशोधन मंडळ, वार्षिक, १९८२.'

१८. **अंधेरी येथील शिलालेख :** 'भारतीय इतिहास आणि संस्कृती,' त्रैमासिक वर्ष ७, पु. २७.

१९. **सातवाहन नृपतीचे एक अपूर्व नाणे :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९७४.'

२०. **देशिंग बोरगाव येथील कन्नड शिलालेख :** 'भारतीय इतिहास आणि संस्कृती,' त्रैमासिक वर्ष ११, पु. ४२.

२१. **भाळवणी येथील दोन कानडी शिलालेख :** 'भारतीय इतिहास आणि संस्कृती' त्रैमासिक, वर्ष ९ पु. ३५.

२२. **हरिश्चंद्र गडावरील शिलालेख :** 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९७०.'

२३. **पारडा शिलालेख :** 'संशोधन पत्रिका,' ऑक्टोबर १९६४.

२४. **डोंबिवली येथील शिलालेख :** 'नागपूर युनिव्हर्सिटी जर्नल.' खंड १७, ऑक्टोबर १९६६.

२५. **मलकापूर येथील राममंदिरातील शिलालेख :** 'नागपूर युनिव्हर्सिटी जर्नल.' खंड १५, ऑक्टोबर १९६४.

२६. **पवईचा शिलालेख :** 'मौज : दिवाळी अंक, १९६६.'

२७. **उमरखेड येथील मराठी शिलालेख :** 'तरुण भारत' दैनिक, ६ एप्रिल १९७५.

२८. **आकोला येथील शिलालेख :** 'महानुभाव मासिक' जुलै १९८१.

# परिशिष्ट २

## सूची

ऊ



ए



ऐ



ओ



औ



ऋ



क

ख



ग

## द

## १. पौनी येथील चार ब्राह्मी कोरीव लेख



कोरीव लेख - अ



कोरीव लेख - ब



कोरीव लेख - क



कोरीव लेख - ड

